

अरविंद केशव साने,
१०१/१०२, पद्मप्रभा हाईटस्,
गणेशनगर, नटराज सोसायटी जवळ,
पुणे, ४११०५२
टेलीफोन : ०२० २५४४ ७०७६
ईमेल : bhausane@yahoo.com

जन्म १४ नोव्हेंबर १९४०

बालपण पुणे येथील मध्यवस्तीत गणपती चौक, लक्ष्मी रोड, येथे गेले. नूतन मराठी शाळे नंतर बृहन् महाराष्ट्र कॉमर्स कॉलेज, येथून बी.कॉम्, व लॉ कॉलेज, पुणे येथून लॉ ची पदवी घेतली. याच दिवसात बी.ए. पण केले. १९६१ ते २००० अशी सलग चाळीस वर्षे बँक ऑफ बरोडा मध्ये विविध पदांवर व वेगवेगळया ठिकाणी नोकरी केली. बँकेच्या नोकरीत असताना सी.ए.आय्.आय्.बी. परीक्षा दिली. बँकेतर्फे चार वर्षे १९८३ ते १९८७ युगांडा येथे व नंतर थोडया दिवसांसाठी मॉरीशस व सेशल्स या देशांच्या बँकेत कामाची संधी मिळाली. युगांडाच्या बँकेच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर वर एक डायरेक्टर व बोर्डाचा सेक्रेटरी म्हणून काम करण्याची संधी मिळाली. युगांडाहून परत आल्यानंतर पुणे कँप सारख्या प्रतिष्ठित शाखेची जबाबदारी सांभाळली. नोव्हेंबर १९९१ ते नोव्हेंबर १९९५ नाशिक विभागाचा रिजनल मॅनेजर म्हणून यशस्वी काम केले. शेवटची पाच वर्षे इन्स्पेक्शन व काही दिवस प्लॉनींग विभाग प्रमुख म्हणून काम केल्यानंतर २००० च्या नोव्हेंबर मध्ये बँकेच्या नोकरीतून निवृत्त.

शालेय जीवनापासूनच नाटकाचे वेड. शाळेच्या व कॉलेजच्या प्रत्त्येक वर्षाच्या संमेलनात नाटकात कामे केली. ज्युनियरच्या वर्षात कॉलेजच्या सांस्कृतिक विभागाचा व संमेलनाचा सेक्रेटरी म्हणून काम केले. बँकेची नोकरी करीत असतानाच हा छंद जोपासण्यासाठी १९५७ ते १९६५ दरम्यान पुण्याच्या प्रोग्रसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन मधून पहाटेची चाहूल, जगन्नाथाचा रथ, तू वेडा कुंभार, प्रेमा तुझा रंग कसा, पवनाकाठचा धोंडी, खून पहावा करून, राजमुकुट, सत्तावनचा सेनानी, शारदा, गावगुंड, कोरीव लेणी व काही एकांकीकामधून रंगमंचावर तसेच रंगमंचामागे कामे केली. त्यापैकी चार वर्षे संस्थेचा व्यवस्थापक म्हणून काम केले. त्याच काळात अरूण जोगळेकर व सई परांजपे यांच्या बरोबर चिल्डन्स थिएटरचे काम पाहिले.

१९६५ ते १९७० दरम्यान महाराष्ट्रीय कलोपासक संस्थेतर्फे क्षण झाला वैरी, राजा नावाचा गुलाम, ही चौकट वाटोळी, चक्र, अडीच घरे वजीराला, मधल्या भींती या नाटकातून महत्वाच्या भूमिका केल्या. १९८९ मध्ये युगांडाहून परत आल्यावर नांदी संस्थेतर्फे प्रेमाच्या गावा जावे व प्रेमा तुझा रंग कसा या दोन नाटकातून भूमिका केल्या. २०१४ साली बॉस्टन, यु एस् ए येथिल वास्तव्यात नाटयप्रवेशांचा गजरा हा तीन तासांचा कार्यक्रम गुंफला, काही भाग दिग्दर्शन केले व स्वतः नटसम्राट मधील शेवटचा भाग सादर केला.

युगांडाच्या वास्तव्यात संगीताची खूप आवड निर्माण झाली. संगीत ऐकण्यात दिवसातील बराच वेळ घालवितो. गेल्या वीस पंचवीस वर्षात सर्व प्रकारचे संगीताचा खजिना जमा केला आहे. लोकांनी त्याचा आस्वाद घ्यावा अशी धडपड चालू असते.

२००१ ते २०१० मधील बराच काळ सचिन (मोठा मुलगा) याच्या बरोबर बंगलोर येथे वास्तव्य झाले व २०13 पासून आता फोलसम, कॅलीफोर्निया आणि बॉस्टन, मॅसाच्युसेटस्‌येथे स्थलांतर केले आहे. वर्षातील काही महिने पुण्याला येतो.

# ई वितरण : ई साहित्य प्रतिष्ठान


www. esahity. com

esahity@gmail. com

eSahity Pratishthan

eleventh floor

eternity

eastern express highway

Thane.

Whatsapp: 7710980841

App : https://play.google.com/store/apps/details?id=com.esahity.

प्रकाशन :४ जून २०१७

**सप्रेम भेट**
रेखा व अरविंदकडून

# कानमंत्र

## भाग -१



संग्राहक आणि अनुवादक
**अरविंद केशव साने**

**कानमंत्र भाग १**

**विभाग १ : बोधकथा**

**विभाग २ : विचारप्रवर्तक व भावनाप्रधान लेख/कथा**

**विभाग ३ : आदर्श जीवनाचे मंत्र**

**संग्राहक आणि अनुवादक**
अरविंद केशव साने,
१०१/१०२, पद्मप्रभा हाईटस्,
गणेशनगर, नटराज सोसायटीजवळ,
पुणे – ४११ ०५२
टेलिफोन : (०२०) २५४४ ७०७६
Email : bhausane@yahoo.com



प्रथम आवृत्ती : २०१६

**अक्षरजुळणी**
प्रांजल एंटरप्राइजेस्, पुणे

**मुखपृष्ठ :** प्रतिक काटे

**मूल्य :** खाजगी वितरणासाठी फक्त

## अर्पणपत्रिका

ज्यांच्या अपार कष्टामुळे मला हे दिवस दिसले आणि त्यांच्या कृतीतून माझ्यावर जे संस्कार झाले त्या माझ्या कै. दादा व कै. मा यांच्या स्मृतीस विनम्र अर्पण

# ‘कानमंत्र’च्या निमित्ताने (मनोगत)

सामान्य माणसाला संगणक आणि त्यावरील इंटरनेट, इमेल याची ओळख व सवय होऊन आता बराच काळ लोटला आहे. एकदा का संगणक, इंटरनेट, इमेल यांची सवय झाली की त्याची चटकच लागते. संगणक व इतर प्रगतीमुळे तरूण पिढी परदेशी जाण्याचे प्रमाण खूपच वाढले. साहजिकच भारतात असलेल्या त्यांच्या पालकांशी संवाद साधायला संगणकाद्वारे इमेल हे एक वरदान ठरले आहे. त्यामुळे इमेलचा वापर फार झपाट्याने वाढला.

इमेलच्या माध्यमातून संदेश व खुशाली पोहोचविणे सोईस्कर व अत्यंत वेगाने होऊ लागले. साधारण २००० सालापासून माझे मुलगे व पुतण्या यांच्याकडून इमेलद्वारा मला नेहमी अतिशय चित्तवेधक, उद्‌बोधक आणि माहितीपूर्ण असे छोटे छोटे लेख येत होते. मला ते अतिशय आवडत. त्यातील आशय, विषय, मथितार्थ माझ्या मनाला भिडत असे. मला आवडणारे लेख जमविण्याचा मला छंदच लागला. संगणकाच्या वापरामुळे ते सर्व लेख संग्रही ठेवणे सोपे व शक्य झाले.

ते सर्व लेख वाचून पाहताना मला एक विचार मनात आला. अशा चित्तवेधक, मनोरंजक, उद्‌बोधक व माहितीपूर्ण लेखांचे मराठीत भाषांतर करण्याची कल्पना मला सुचली. त्यामागे काही कारणेही होती. प्रथमत: संगणकाचा प्रसार व वापर झपाट्याने झाला असला तरी अजूनही फार कमी घरात संगणक उपलब्ध असतो. जरी घरात संगणक असला तरी त्याचा वापर तरुण पिढीच जास्त करते. ४०/५० वयानंतरचे लोक अजूनही संगणकाला बिचकूनच असतात. मग हा इमेलद्वारे आलेला खजिना त्यांच्यापर्यंत पोहोचणार कसा? असे वाटून मी भाषांतर करण्याचा निर्णय पक्का केला.

हे सर्व लेख संगणकावर इंग्रजीमध्ये येत होते. आपले अनेक मराठी बांधव इंग्रजीपेक्षा मराठी वाचनासच प्राधान्य देतात. ही वस्तुस्थिती शहरापेक्षा लहान गावात, खेडेगावात जास्त आढळते. अशा ठिकाणी संगणक सुध्दा अजून फार कमी प्रमाणात पोहोचला आहे. आपल्या या मराठी बांधवांना मला आनंद मिळवून देणाऱ्या या लेखसंग्रहाचा लाभ करून द्यावा, या हेतूनेही मी भाषांतर करायला सुरुवात केली.

मराठी भाषेत पुस्तकरुपाने बोधकथा खूप आहेत. संस्कारक्षम मराठी मनाला त्या खूप आवडतातही. मला मिळालेल्या या लेखामधूनही अशाच शिकवण देणाऱ्या, विचार करायला लावणाऱ्या छोट्या छोट्या गोष्टी आहेत. मुळात त्या इंग्रजी भाषेत असल्यामुळे त्याला नक्कीच थोडाफार इंग्रजी बाज, घाट आहे. पुष्कळ लेखात त्याची पूर्वपीठिका व संदर्भ परकीय वळणाचे वाटतात. परंतु या सर्व लेखांचा आशय व विषय साऱ्या जगात कोठेही, केव्हाही व कोणालाही लागू पडतील असे आहेत. म्हणूनही मी ते भाषांतर करण्याच्या मोहात पडलो.

माझ्या अमेरिकेतील लेकरांकडून इमेलच्या माध्यमातून आलेल्या या सर्व लेखांचा उगम केव्हा, कोठे व कसा होतो हे जाणून घेण्याचा मी आटोकाट प्रयत्न केला. अजून तरी मला त्यात यश मिळालेले नाही. मला ते जाणून घेण्यामागे त्या उगमस्थानाला व उगमकर्त्याला प्रणाम करण्याची प्रामाणिक इच्छा आहे. तसेच माझ्या या भाषांतराच्या प्रयत्नाला मान्यता, परवानगी मिळवावी असा मनापासून हेतू आहे. अजूनही जर मी कोणाशी संपर्क साधणे आवश्यक असल्यास त्याला माझी पूर्ण तयारी आहे.

या सर्व लेखसंग्रहाचे भाषांतर करताना प्रथम मी शब्दश: भाषांतर करुन घेतले होते. त्यानंतर त्यातील वाक्यरचना, शब्द, आशय, संदर्भ, उदाहरणे याचे मराठीकरण करण्याचा जास्तीतजास्त प्रयत्न केला आहे. माझ्या मर्यादा मला मान्य आहेत. त्यामुळे काही ठिकाणी त्या लिखाणाला जर इंग्रजी बाज शिल्लक राहिला असला तर कृपया मला माफ करा. माझ्या चुका माझ्या नजरेस आणून दिल्यास मी आपला आभारी राहीन.

हे बहुतेक लेख अतिशय उद्‌बोधक असून मी जसजसे ते वाचीत गेलो तसतसा माझ्या स्वभावात, विचारात, आचरणात आपोआप फरक पडत गेला. माझी कोणत्याही गोष्टीकडे, अडचणीकडे पाहण्याची पध्दत बदलली. माझा सकारात्मक दृष्टिकोन नेहमी जागा राहायला लागला. उदाहरण सांगायचे झाले तर, मला खूप राग यायचा. आताही राग येतो पण आला तर मला त्याची लगेच जाणीव होते. तो कमी करायला हवा हे कळते. मन शांत होते. कधी काही अडचण आली तर त्याचा मनावर ताण

कमी येतो. कारण ती आल्यानंतर ती आली म्हणून काळजी करत बसण्यापेक्षा तिचे निवारण कसे करता येईल, याचा विचार सुरू होतो. कसलीही प्रकृतीची तक्रार सुरू झाली तर या वयात हे होणारच व यातून बाहेर कसे पडायचे ते पाहण्याचा विचार मनात येतो. होणारा त्रास तर होणारच पण तो सतत उगाळीत बसलो तर मला व इतरांना त्याचा त्रास जास्त होणार ह्याची जाणीव होते. कोणतीही नवीन वस्तू हवी आहे असे वाटले तर त्याची आपणास खरेच गरज आहे का हा विचार लगेच मनात येतो. इतरांच्या मुळे घडणाऱ्या गोष्टीवर तुम्ही फारसे काही करू शकत नाही; पण त्यावर तुम्ही कसा प्रतिसाद द्यायचा ते समजू लागले. कोणत्याही घटनेचा सर्वांगीण विचार करून त्यातून योग्य मार्ग काढायला सोपे जाऊ लागले. माझ्या वागण्याला एक प्रकारची दिशा सापडू लागली.

माझ्या नकळत माझ्यात होत असलेले हे बदल लक्षात आल्यानंतर हे लेख जर मी आणखी लोकांपर्यंत पोहोचवू शकलो तर फार चांगले होईल असे वाटले. म्हणून हा प्रपंच करण्याचे मनात आले. यातील पुष्कळसे लेख हे मुळातच वाचनीय आहेत. ते मी भाषांतर करण्याचा प्रयत्न केला नाही. असे सर्व लेख इंग्रजीमधून मूळ स्वरुपात 'कानमंत्र' याच नावाने भाग २, ३ व ४ अशी तीन पुस्तके प्रसिध्द केली आहेत. आपणास ती पुस्तके पण मी देत आहे. आपल्याला ही चारही पुस्तके आवडतील अशी मला खात्री आहे.

जे लेख किंवा बोधकथा मराठीतूनच पोहोचवाव्यात असे वाटले त्या मी भाषांतर करण्याचा प्रयत्न केला आहे. मराठी माणसाने मराठी माणसासाठी केलेला हा प्रयत्न आपण गोड मानून घ्याल, अशी मी आशा करतो. त्याचबरोबर मला अज्ञात असलेल्या त्या लेखमालेच्या उगमकर्त्याचे कायमचे ऋण मी मान्य करतो. इमेलद्वारा हे सर्व लेख वाचण्याची, त्याचा आनंद घेण्याची व तुमच्यापर्यंत येण्याची संधी माझ्या लेकरांनी मला दिली, त्याबद्दल मला त्यांचा अभिमान वाटतो. यातील बरेच लेख गुगलवर किंवा दुसऱ्या एखाद्या इंटरनेट पोर्टलद्वारा तुम्हाला वाचायला मिळू शकतात. पण सर्वांनाच ते माध्यम हाताशी असत नाही.

यापैकी जवळजवळ ४० लेख दैनिक सकाळमध्ये 'कानमंत्र' या नावाने काही वर्षांपूर्वी प्रसिध्द झाले आहेत. गेली चार वर्षे 'पुणे परिचय' या पाक्षिकाद्वारे मी ते लोकांपर्यंत पोहोचविण्याचा प्रयत्न करीत होतो. त्यांच्या दर पाक्षिकात एक याप्रमाणे त्यांनी माझे ९८ लेख प्रसिध्द केले होते. शेवटचा त्यांचा अंक नोव्हेंबर २०१४ मध्ये इंटरनेटवर प्रसिध्द झाला होता; पण त्यांच्या काही अडचणींमुळे त्याचे प्रकाशन तूर्तास बंद झालेले असावे. त्याचा संगणकावरील पत्ता होता www.puneparichay.com

खरे तर यापैकी अनेक लेख लहान मुलांनी जरूर वाचावेत असे आहेत. त्यांच्यापर्यंत ते नेण्याचा मी एक प्रामाणिक प्रयत्न चार वर्षांपूर्वी केला होता. ही लेखमाला मुलांपर्यंत पोहोचविण्यासाठी मूळ आंग्लभाषेमधील सर्व लेखांची सी.डी. करून ती एकूण १५ शाळांमध्ये देऊन आलो. सर्व शाळांच्या मुख्याध्यापकांना वेळ घेऊन भेटलो. त्यांना त्या सीडीमध्ये काय आहे ते सविस्तर समजावून सांगितले. त्यातील लेख दर आठवड्याला एक याप्रमाणे त्यांनी 'सुविचार' बोर्डावर लावावेत अशी इच्छा व्यक्त केली. यासाठी मला कसल्याही मोबदल्याची अपेक्षा नाही हे स्पष्ट केले. हे सगळे माझ्या लहान मित्रांपर्यंत जावे एवढाच हेतू असल्याचे आवर्जून सांगितले. परंतु दुर्दैवाने त्यांच्यापैकी एकाही शाळेकडून मला त्याबद्दल काहीही कळले नाही. असो.

यातील सगळेच लेख लहान मुलांसाठी आहेत असे नव्हे. मोठ्यांसाठी तर सगळेच आहेत. ते तुमच्यासारख्या विचारवंतांनी जरुर वाचावेत एवढीच इच्छा आहे.

या लेखाचे एक पुस्तक व्हावे अशी माझी खूप इच्छा होती. त्यासाठी मी बऱ्याच व्यावसायिक पुस्तक प्रकाशकांना भेटलो. त्यांना वाचायला दिले; पण मला कोणाकडूनच त्यासाठी प्रतिसाद मिळाला नाही. कदाचित त्याला व्यावसायिक किंमत नाही या कारणास्तव त्यांनी प्रकाशन केले नसावे. एक दिवस अचानक मला एक जाहिरात हातात पडली. ती मला सौ. उषाताई रेगे यांनी आणून दिली. त्यानुसार श्री. आशुतोष पुरंदरे हे अशा प्रकारची पुस्तके वाजवी दरात प्रकाशित करत असल्याचे समजले. मी त्यांना माझ्या एकूण सहा पुस्तकांबद्दल बोललो. त्यांनी ते तत्काळ मान्य केले. त्यानंतर मी लगेच अमेरिकेस येणार होतो. अर्थात, जी दोन पुस्तके तयार स्वरुपात होती त्यावर काम लगेचच सुरू करण्यास त्यांना विनंती केली व त्यांनी तसे केले. पुढच्या

चार पुस्तकांचे काम मी अमेरिकेत संगणकावर केले व त्यांच्याशी संगणकामार्फतच संपर्कात राहिलो. श्री. पुरंदरे अत्यंत वक्तशीर, काटेकोर, शिस्तशीर, संघटक व ठरल्याप्रमाणे वेळेत काम करणारे असल्यामुळे मला माझ्या वेळेत ही सहा पुस्तके प्रकाशित करता आली. त्यासाठी श्री. पुरंदरे व त्यांची सगळी टीम यांचा मी अत्यंत ऋणी आहे. डीटीपी, प्रूफ रिडींग, फोटो छपाई, मुखपृष्ठ चित्र, पुस्तक छपाई ही सगळी कामे अत्यंत चांगल्या पध्दतीने केल्यामुळेच मला माझ्या मनासारखी पुस्तके तुमच्या हातात देता आली आहेत. त्यासाठी त्या सगळ्यांचा मी आभारी आहे.

श्री. पुरंदरे व माझ्यामध्ये दुवा असणारे माझे साडू श्री. अजितभाई व मेहुणी डॉ.(सौ.) किरण फाटक यांची मला वेळोवेळी खूप मदत झाली. त्यांच्या मदतीशिवाय मी हे काम करूच शकलो नसतो. त्या दोघांनी जणू त्यांचीच पुस्तके होत आहेत इतक्या तळमळीने मला मदत केली. त्यांचे औपचारिक आभार मानणे त्यांना सुध्दा आवडणार नाही; परंतु त्यांचा उल्लेख केल्याखेरीज मला समाधान लाभणार नाही. धन्यवाद किरण आणि अजितभाई.

मुळात हे सगळे लेख ज्यांनी मला संगणकाद्वारे पाठविले त्या माझ्या दोन्ही मुलांचा, सचिन व श्रीनिवास यांचा व पुतण्या पराग याचा मी आभारी आहे. माझ्या दोनही सुना मोनिका व स्वाती यांनी वेळोवेळी मला खूप मदत केली. केलेली भाषांतरे वाचणे व मुख्य म्हणजे हा पुस्तकांचा उपक्रम प्रत्यक्षात आणण्यासाठी त्या दोघींनी मला सतत प्रोत्साहन दिले. मी ते मुद्दाम नोंदवू इच्छितो.

या सर्वांबरोबर सतत माझ्या सोबत असणारी माझी पत्नी सौ. अनुराधा (सर्वांना परिचित असलेली रेखा) हिचा तर वाटा फार मोठा आहे. मुळात आलेले लेख वाचणे, मी भाषांतर केलेले वाचून त्याबद्दल योग्य त्या सूचना करणे, पुस्तकांच्या दृष्टीने केलेल्या तयारीत मला मदत करणे हे तिने आवर्जून केले. तिचे असलेले प्रचंड वाचन मला अनेक वेळा फार उपयोगी पडले. तिचे आभार तर मी मानतोच पण त्याबरोबर माझ्या या यशाचे सर्व श्रेय तिलाच देतो.

सर्वांत शेवटी तुम्हा सगळ्या वाचकांचे आभार. अनेक वेळा मी तुम्हाला मला आवडलेले लेख तोंडी सांगून भंडावले असेल; पण केवळ त्यामुळेच मी ही पुस्तके प्रकाशित करण्यास उत्सुक होत गेलो व आज त्याचे मूर्त स्वरुप दिसत आहे. तुम्हा सगळ्यांना ही पुस्तके भेट म्हणून देताना मला आणि रेखाला खूप आनंद होत आहे. आपण त्याचा स्वीकार करावा ही नम्र विनंती.

# अनुक्रमणिका

अरविंद साने

## भाग पहिला
## विभाग १ बोधकथा

**विभाग २**

**विचारप्रवर्तक व भावनाप्रधान लेख / कथा**

**विभाग ३**
**आदर्श जीवनाचे मंत्र**

# अकबर, बिरबल आणि सोन्याची नाणी

अकबराच्या राज्यात बिरबलाइतका हुशार सरदार दुसरा कोणीही नव्हता; परंतु अकबराचा मेहुणा सतत बिरबलाचा मत्सर करीत असे. त्याने अकबराला सांगितले की बिरबलाला हाकलून दे व त्याच्या जागी त्याची नियुक्ती कर. त्याने अनेक प्रकारे आपण बिरबलापेक्षा जास्त हुशार व कर्तबगार असल्याचे पटविण्याचा प्रयत्न केला. अकबराने त्याबद्दल काही निर्णय घेण्याआधीच बिरबलाच्या कानावर ही बातमी गेली.

बिरबलाने राजीनामा दिला आणि तो निघून गेला. अकबराने मेहुण्याला त्या जागी नेमले. अकबराने मेहुण्याची परीक्षा घेण्याचे ठरविले. त्याने मेहुण्याला तीनशे सोन्याची नाणी दिली आणि सांगितले, ''ही नाणी अशा तऱ्हेने खर्च कर की यापैकी शंभर नाणी माझ्याकडे याच जन्मात परत आली पाहिजेत. शंभर नाणी मला दुसऱ्या जगात परत आली पाहिजेत आणि शेवटची शंभर नाणी या जन्मात  वा पुढच्या जगात कोठेच हातात यायला नकोत. मेहुण्याला ते सर्वच मोठे अनाकलनीय व कोडे वाटले. त्याचे उत्तर शोधणे मोठे गुंतागुंतीचे व अवघड वाटले. रात्र रात्र विचारात घालवूनही त्याला त्याच्यातून बाहेर पडण्याचा मार्ग दिसत नव्हता. अनेक रात्री त्याने झोपेविना घालविल्या. विचार करून त्याचे डोके चक्रावले. अखेर त्याच्या बायकोच्या सल्ल्यानुसार तो बिरबलाकडे मदत मागायला गेला. बिरबलाने त्याला फक्त ती सोन्याची नाणी द्यायला सांगितली व म्हणाला, आता तू निश्चिंत मनाने जाऊन झोप. काय करायचे ते मी पाहतो.

बिरबल सोन्याच्या नाण्यांची पिशवी घेऊन शहराच्या मोठ्या रस्त्याने हिंडत असताना त्याला एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या मुलाचे लग्न मोठ्या थाटाने सुरू असलेले लक्षात येते. जवळच्या पिशवीमधून बिरबल त्या व्यापाऱ्याला शंभर नाणी देतो. ती देताना सांगतो, ''महाराज अकबर यांनी तुझ्या मुलाच्या लग्नानिमित्त त्याला शुभेच्छा आणि आहेर म्हणून ही सोन्याची शंभर नाणी पाठवली आहेत. त्याचा कृपया स्वीकार करावा.'' व्यापारी खूश झाला. राजाने खास माणसाच्या हाती स्पेशल आहेर पाठवला हा त्याचा सन्मान केल्यासारखे त्याला वाटले. त्याची परतफेड म्हणून त्याने बिरबलाचा सत्कार तर केलाच, त्याचबरोबर सोन्याच्या नाण्यांची थैली महाराजांसाठी बिरबलाच्या हाती पाठविली.

राहिलेली नाणी घेऊन बिरबल शहराच्या जुन्या भागात गेला. तिथे अत्यंत गरीब लोकांची वस्ती होती. बिरबलाने शंभर नाण्यांचे अन्न व कपडे विकत घेतले. त्या गरीब वस्तीमधील लोकांना महाराजांतर्फे ते मोफत वाटले. ती माणसे तृप्त होऊन राजाला दुवा देत होती.

आता बिरबलाकडे शंभरच नाणी शिल्लक राहिली होती. शहराच्या उच्चभ्रू लोकांच्या वस्तीत त्याने एक गाण्याचा व नृत्याचा कार्यक्रम आयोजित केला. तो कार्यक्रम सर्वांच्या मनोरंजनासाठी विनामूल्य जाहीर केला. दुसऱ्या दिवशी बिरबल दरबारात आला. त्याने दरबारात निवेदन केले की महाराजांनी त्यांच्या मेहुण्याला जे जे करायला सांगितले होते ते सगळे त्याने केले. अकबर बादशहाला बिरबलाने कसे केले ते ऐकण्याची उत्सुकता लागली होती. बिरबलाने जे केले ते त्याच क्रमाने सांगितले व तो पुढे म्हणाला, ''त्या श्रीमंत माणसाच्या मुलाला लग्नानिमित्त दिलेली शंभर नाणी महाराज तुम्हाला याच जन्मात परत मिळाली आहेत. मी गरीब जनतेसाठी अन्न व कपडे यावर खर्च केलेली शंभर नाणी महाराज तुम्हाला दुसऱ्या जगात नक्की मिळतील आणि गाणी आणि नृत्य या करमणुकीसाठी खर्च केलेली शंभर नाणी तुम्हाला कधीच परत मिळणार नाहीत. या जन्मात नाही आणि दुसऱ्या जगात पण मिळणार नाहीत.''

**तात्पर्य** :– तुम्ही मित्रांसाठी खर्च केलेले पैसे तुम्हाला परत अगर परतफेड म्हणून या ना त्या स्वरुपात नक्की मिळतील. सत्पात्री केलेल्या दानाचे पुण्य तुम्हाला त्याची पावती देवाच्या दरबारी पावती म्हणून मिळेल आणि निव्वळ मजा, करमणुकीसाठी केलेला खर्च हा तुमच्या हाती परत न येणारा असतो. तेव्हा पैसे खर्च करताना थोडातरी विचार करा.

❋ ❋ ❋

# ॲडम आणि इव्हचे पाळीव प्राणी

ॲडम आणि इव्ह एक दिवस परमेश्वराला म्हणाले, ''देवाधिदेवा जेव्हा आम्ही बागेत होतो तेव्हा तू सतत आमच्या बरोबर असायचास. दररोज आमच्या बरोबर चालत होतास. पण आजकाल तू आमच्या बरोबर नसतोस. आम्हाला दिसत नाहीस. आम्ही इथे एकाकी पडलो आहोत. तुझे आमच्यावर किती प्रेम आहे याचा सुध्दा आम्हाला पत्ता लागत नाही.''

त्यावर परमेश्वर म्हणाला, ''ठीक आहे. मी तुमच्यासाठी एक सोबती तयार करतो. तो कायम तुमच्या संगतीत राहील. माझ्या तुमच्यावरच्या प्रेमाचे तो प्रतीक असेल. त्यामुळे तुमच्या दृष्टीस जरी मी पडलो नाही तरी माझ्यावरचे तुमचे प्रेम कमी होणार नाही. तुम्ही कितीही स्वार्थी, बालिश किंवा तिरस्करणीय असाल तरी हा तुमचा नवा सवंगडी तुमची मैत्री मान्य करील. तुम्ही त्याच्यावर प्रेम करा अगर करू नका, तो माझ्यासारखेच तुमच्यावर प्रेम करील.''

परमेश्वराने एका प्राण्याची निर्मिती केली. तो प्राणी ॲडम आणि इव्हचा सवंगडी म्हणून निर्माण झाला. देवाच्या निर्मितीपैकी तो एक उत्तम प्राणी होता. त्याच्या निर्मितीमुळे परमेश्वराला आनंद झाला.

नवीन प्राण्याला पण ॲडम आणि इव्हजवळ राहायला मिळाल्याने आनंद झाला. आपली झुपकेदार शेपटी हलवून त्याने आपला आनंद व्यक्त केला.

ॲडम म्हणाला, ''देवा, आपल्या राज्यातील बहुतेक प्राण्यांची नावे मी सुचविली आहेत. पण मी नवीन प्राण्याला काय नाव ठेवावे ते मला सुचत नाही.'' त्यावर देव म्हणाला, ''ठीक आहे माझे प्रतिबिंब म्हणून मी या प्राण्याला निर्माण केले आहे. तेव्हा माझ्या उलट GOD-DOG असे त्याचे नाव ठेवू या.''

तेव्हापासून नवनिर्मित कुत्रा ॲडम व इव्ह बरोबर त्याचा सोबती म्हणून राहू लागला. त्यांच्यावर तो अतीव प्रेम करू लागला. ते खूपच आरामात राहू लागले. साहजिकच देव पण खूश झाला. कुत्रा पण खूश होऊन त्याने समाधानाने शेपटी हलवली.

काही दिवस गेले. देवदूत कसे चालले आहे ते निरीक्षण करीत होता. तो देवाकडे येऊन म्हणाला, ''देवाधिदेवा, ॲडम आणि इव्ह दोघांना खूप वृथा अभिमान झाला आहे. ते दोघे मोरासारखे नटूनथटून मोठ्या तोऱ्यात हिंडत असतात आणि गर्वाने बेपर्वा झाले आहेत. ते आदरणीय आहेत असा त्यांचा समज झाला आहे. कुत्रा अर्थातच त्यांच्यावर प्रेम करतो आहे पण तोही जरा जास्तच करतो आहे असे वाटते.

परमेश्वराने सांगितले, ''ठीक आहे. मी त्यांच्यासाठी आणखी एक सवंगडी निर्माण करतो जो त्यांच्याबरोबर कायम राहील आणि तसे जसे आहेत तसे तो त्यांना प्रतिसाद देईल. तो सवंगडी त्यांना त्यांच्यावरील बंधनांची व कमतरतेची जाणीव करून देईल. त्यांना कळून चुकेल की ते कायमच आदरणीय असत नाहीत.'' असे म्हणून परमेश्वराने मांजराची निर्मिती केली. ते पण ॲडम आणि इव्हच्या साथीला आले. मात्र मांजर त्यांचे मुळीच ऐकत नव्हते. ॲडम आणि इव्ह जेव्हा मांजराच्या डोळ्यांत एकटक पाहात तेव्हा ते सर्वश्रेष्ठ नसल्याचे त्यांना कळून येत असे. त्यामुळेच ॲडम आणि इव्ह विनम्रपणे वागण्यास शिकले. त्यानंतर त्यांच्या वागण्यात खूप सुधारणा झाली.

साहजिकच परमेश्वर खूश झाला. कुत्राही खूश झाला. मांजराचे तिरस्कारदर्शक बघणे व ओरडणे थांबले.

❋ ❋ ❋

# अभिप्रेरणा - चालना

एक व्यावसायिक कार्यकारी धंद्यात आलेल्या अपयशाने व त्याच्या वाढलेल्या देण्यामुळे हताश होऊन गेला होता.

त्यातून बाहेर पडण्याचा त्याला कोणताच मार्ग सापडत नव्हता. देणेकऱ्यांचा त्याच्या मागे सतत तगादा लागलेला होता. त्याला उधारीवर माल देणारे व्यापारी वसुलीसाठी त्याच्या दारात सतत हेलपाटे घालीत होते. या अवघड मन:स्थितीतच तो एक दिवस एका बागेत शांतपणे एका बाकावर येऊन बसला होता. बसल्या बसल्या हातावर डोके ठेवून विचार करीत होता. यातून काही मार्ग निघून समोर असणाऱ्या दिवाळखोरीतून आपल्याला वाचता येईल का असे विचारचक्र त्याच्या मनात सुरू होते.

अचानक एक अनोळखी वयस्कर गृहस्थ त्याच्या समोर येऊन उभा राहिला होता. ''मला वाटते तू कसल्या तरी मोठ्या अडचणीत सापडला आहेस.'' तो म्हणाला. त्या व्यावसायिकावर ओढवलेल्या अरिष्टांची हकिकत ऐकल्यानंतर तो गृहस्थ म्हणाला, ''मला वाटते मी तुला मदत करू शकेन.'' त्याने त्या व्यावसायिकाला त्याचे नाव विचारुन खिशातून एक चेक काढून त्यावर त्याचे नाव लिहून तो त्या व्यावसायिकाच्या हातात जवळजवळ कोंबला, ''हे पैसे घे आणि मला बरोबर एक वर्षानंतर ठीक याच वेळी याच बागेत याच बाकावर येऊन भेट. त्या दिवशी तू मला मी तुला दिलेले पैसे परत करू शकशील अशी मला खात्री आहे'' असे म्हणून जसा तो अचानक आला होता तसाच दिसेनासा झाला.

तो गेल्यावर व्यावसायिक कार्यकारीने हातातील चेक पाहिला तर तो ५००,०००/- डॉलर्सचा होता. त्यावर जॉन डी. रॉकेलफेअर अशी सही केलेली होती. म्हणजे सही करणारा जगातील सर्वांत श्रीमंत माणूस होता. ''एका फटक्यात मी माझे पैशाचे सगळे प्रश्न मिटवू शकतो.'' असे त्याच्या लक्षात आले. तरीसुद्धा तो मिळालेला चेक अगदी जरूर पडली तरच वापरायचा असा विचार करून तो तसाच बाजूला तिजोरीत राखून ठेवायचा असे त्याने ठरविले. वेळ पडली तर तो चेक आपल्या आधाराला आहे, या विचाराने व्यवसायाचे काम अधिक जोमाने करण्याची त्याला मानसिक ताकद मिळाली. त्यामुळे तो त्याचा डबघाईला आलेला व्यवसाय उर्जितावस्थेत आणू शकणार होता. नव्याने निर्माण झालेल्या या आशादायक परिस्थितीमुळे देणेकऱ्यांबरोबर तो जास्त खात्रीलायक पध्दतीने बोलणी करू शकला. त्याला हवे तसे व शक्य होणार असेल असे पैसे चुकते करण्याचे वेळापत्रक नक्की करू शकला. त्याच्या सोईस्कर अटी देणेकऱ्यांना, मान्य करण्यास तयार करू शकला. लवकरच तो त्याच्या उत्पादनाची विक्री वाढवू शकला. तिथून पुढच्या काही महिन्यातच तो त्याच्या डोक्यावरच्या कर्जातून बाहेर पडू शकला. लवकरच तो व्यवसायात नफा मिळवू शकला.

बरोबर एक वर्षानंतर तो त्याच बागेत त्याच वेळी त्याच बाकावर येऊन त्या दिवशी आलेल्या गृहस्थाची वाट पाहत बसला. येताना तो न वठवलेला चेक आणायला विसरला नाही. बराच वेळ झाला तरी तो वृद्ध गृहस्थ तिथे आला नाही. व्यावसायिक कार्यकारीने आणखी थोडा वेळ वाट पाहण्याचे ठरविले. काही वेळातच तो गृहस्थ आला पण त्याचे लक्ष त्या व्यावसायिक कार्यकाऱ्याकडे गेले नाही. त्याने केलेल्या मदतीचा चेक त्याला परत करुन मागच्या एक वर्षात घडलेल्या घडामोडी त्याला सांगण्यासाठी म्हणून व्यावसायिकाने त्या वृद्ध गृहस्थाला थांबविले. त्याचे आभार मानून आपल्या यशाची कहाणी त्याला सांगण्याची त्याची इच्छा होती. त्याच वेळी त्याच्या पाठोपाठ एक नर्स धावत धावत येऊन तिने त्या वृद्ध गृहस्थाला पकडलेच.

''बरे झाले मी यांना पकडू शकले'' रडत रडत ती बोलत होती, ''मला आशा आहे की यांनी तुम्हाला काही त्रास दिला नाही. हे नेहमीच माझ्या हातून नर्सिंग होममधून सुटून जातात. जो भेटेल त्याला सांगत सुटतात की, ते जॉन डी. रॉकेलफेअर आहेत म्हणून.'' आणि ती त्याच्या दंडाला धरून त्याला ओढतच घेऊन गेली. तो व्यावसायिक आश्चर्यचकित होऊन तो गेला त्या वाटेकडे पाहत उभा राहिला. गेले वर्षभर तो लोकांबरोबर चर्चा करीत, अखंड प्रवास करीत, खरेदी विक्रीचा उच्चांक गाठीत होता. त्याच्या सुप्त मनात एकच विचार असायचा की आपल्याला गरज पडल्यास आपल्याजवळ त्या चेकने मिळालेले पाच लाख डॉलर्स आहेत. एकाएकी त्याचा भ्रमनिरास होऊन त्याला समजले की, त्याच्याजवळ असणारा चेक म्हणजे पैसे नव्हते, तर ते काल्पनिक पैशाचे पाठबळ होते. पण त्यानी त्याचे आयुष्याचे गणितच बदलून टाकले होते, स्वत:बद्दलचा विश्वास त्याला नव्याने सापडला होता. त्या आत्मविश्वासामुळेच तो जे जे करत गेला त्यात त्याला यश प्राप्त करता आले. त्याला कळून चुकले की आत्मविश्वास म्हणजे येणाऱ्या प्रत्येक अडचणीला सामोरे जाताना सकारात्मक दूरदृष्टी ठेवून प्रयत्न करणे हाच मार्ग असतो.

हे कोणालाही त्याच्या कामावरील निष्ठा व बांधिलकी यातून प्राप्त होते. तसेच ते सर्वस्वी स्वत:च्या अंतर्गत निश्चयाचे फळ असते.

दुसऱ्याच्या जगण्याच्या झगडण्यासारखे त्याला प्रोत्साहित करणे हे प्रत्येकाचे कर्तव्य असून आणि त्याचवेळी समोर असणाऱ्या आदर्शाप्रती जाण्याचा जास्तीतजास्त प्रयत्न करणे हे जीवनाचे ध्येय बाळगावे.

**स्वामी विवेकानंद**

❋ ❋ ❋

# अवधानाचे महत्त्व

एका पशुवैद्यकीय महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांचा प्रथम वर्षाचा पहिलाच शरीरशास्त्राचा तास भरला होता. टेबलावर मेलेले डुकराचे शरीर विच्छेदनासाठी ठेवलेले होते.

पांढऱ्या सफेद कपड्यात आच्छादून विच्छेदन टेबलावर ठेवलेल्या त्या डुकराच्या भोवती विद्यार्थ्यांचा घोळका जमला होता. प्राध्यापकाने आपले पहिले लेक्चर सुरू केले. पशुवैद्यकीय शास्त्रात ज्या अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी लक्षात ठेवाव्या लागतात त्या समजावून सांगताना ते म्हणाले, ''प्रथमत: शिक्षण चालू असताना कोणत्याही प्राण्याच्या शरीरातील कोणत्याही अवयवाबद्दल व त्याच्या अवस्थेबद्दल उबग वा घृणा मनात धरून चालणार नाही.''

असे म्हणून प्राध्यापकाने पटकन त्या टेबलावर ठेवलेल्या मृत डुकराच्या शरीरावरील चादर बाजूला केली. सर्व मुलांच्या देखत आपले एक बोट प्राध्यापकाने डुकराच्या तोंडात घातले. तिथून काढून त्याने ते सरळ आपल्या तोंडात घातले व विद्यार्थ्यांना ''आता तुम्ही सगळे मी केले तसे करा'' असे त्याचे अनुकरण करण्यास सांगितले.

विद्यार्थी अचंबित होऊन अवाक झाले. कोणाच्याच तोंडून शब्द फुटेना. तसे करण्यास कोणीच पुढे होईना. मध्यंतरी थोडा वेळ गेला. अखेर शेवटी एक एक करुन प्रत्येकाने डुकराच्या तोंडात बोट घालून ते आपल्या तोंडात घातले. जेव्हा सगळ्या विद्यार्थ्यांचे तसे करून झाले तेव्हा प्राध्यापक महाशयांनी सर्व विद्यार्थ्यांवर एक कटाक्ष टाकला आणि म्हणाले, ''उत्तम शल्यचिकित्सक होण्यासाठी लागणारा दुसरा महत्त्वाचा गुण म्हणजे 'निरीक्षण'. मी माझे मधले बोट डुकराच्या तोंडात घातले होते आणि माझ्या तोंडात मात्र माझे अंगठ्याजवळचे बोट घातले होते. त्याकडे तुमचे कोणाचे लक्ष गेले नाही. यापुढे शिकताना व नंतर काळजीपूर्वक निरीक्षण करण्याची सवय करा.

**तात्पर्य** :- आयुष्यात अवघड प्रसंग येतातच पण तुम्ही खुळचट किंवा बुद्दू असता तेव्हा ते अधिकच अवघड होते.

❋ ❋ ❋

# आधुनिक लाकुडतोड्या आणि कुऱ्हाडीची गोष्ट

एकदा एक सॉफ्टवेअर इंजिनिअर आरामात एका नदीच्या काठावर झाडाच्या सावलीत बसला होता. त्याच्या मांडीवरच्या लॅपटॉपवर नवीन प्रोग्राम तयार करण्याचे काम करीत होता. असे नवीन तयार केलेले प्रोगाम विकून तो चांगले पैसे कमवित होता.

त्या दिवशी कसे कोण जाणे पण त्याच्या मांडीवरील त्या लॅपटॉपवरची त्याची पकड सुटली व तो लॅपटॉप नदीच्या प्रवाहात पडला. त्या क्षणी त्याला लहानपणी ऐकलेल्या पंचतंत्रातील 'लाकुडतोड्या व त्याची कुऱ्हाड' या कथेची आठवण झाली. कथेतील लाकुडतोड्याप्रमाणे तो नदीच्या जलदेवतेची मनोभावे प्रार्थना करू लागला.

जलदेवतेने त्याची परीक्षा घेण्याचे ठरविले. त्या इंजिनिअरने एक महिना मनोभावे प्रार्थना केल्यानंतर एक दिवस ती प्रकट झाली. इंजिनिअर खूप खूश झाला, त्याने आपला संगणक नदीच्या पात्रात पडल्याचे सांगितले.

जलदेवतेस त्याच्या सचोटीची खात्री करुन घ्यायची होती. देवतेने एक लहानशी काड्यापेटीएवढी डबी पुढे केली व त्या इंजिनिअरला विचारले, ''हाच तुझा पाण्यात पडलेला संगणक आहे का?'' जलदेवतेस संगणकाविषयी ज्ञान नाही असे समजून त्याने नाराजीने नकार दर्शविला.

यावर देवतेने खिशात मावणारा एक छोटा कॅल्क्युलेटर दाखविला. थोड्याशा गुश्श्यातच इंजिनिअर म्हणाला, ''छे ! छे !! मुळीच नाही.''

सरतेशेवटी जलदेवतेने त्या इंजिनिअरचा पाण्यात पडलेला लॅपटॉप बाहेर काढला आणि विचारले, ''हाच ना तुझा संगणक?''

इंजिनिअर महाशयांना नाइलाजाने होकार देणे भाग पडले.

त्याच्या तीनही उत्तरांमुळे जलदेवतेस त्याच्या सचोटीबाबत शंका घेण्यास जागा उरली नाही. तिने पाण्यातून बाहेर काढलेल्या तीनही वस्तू त्याला बहाल करण्याचे मनोमन ठरविले. ती काही बोलणार त्यापूर्वीच इंजिनिअर फुत्कारला, ''माझ्या प्रवाहात पडलेल्या संगणकापेक्षा जरा बरा सुधारित संगणक मला तू देशील अशी माझी अपेक्षा होती. अगदी साधी गोष्ट सुद्धा तुझ्या कशी ध्यानात आली नाही?''

ही त्याची मुक्ताफळे ऐकून जलदेवतेस संताप आला आणि ती उद्‌गारली की, ''मला कल्पना नव्हती की तू इतका षंढ, पढतमूर्ख, अज्ञानी आहेस. मी तुला देऊ केलेल्या पहिल्या दोन संगणकांची प्रगती पुढील अनेक वर्षांनंतरची होती. काळापलीकडील संगणक मी तुला बक्षिस देत होते.''

असे म्हणून त्या इंजिनिअरच्या संगणकासह तीनही संगणक घेऊन जलदेवता अंतर्धान पावली.

**तात्पर्य** :- तुम्हाला तुमच्या व्यवसायातील प्रगत तंत्रज्ञानाची ओळख नसेल तर गप्प राहण्यातच शहाणपण असते. तुमचे तोंड उघडून लोकांना अज्ञान प्रकट करण्यापेक्षा ते गुलदस्त्यात ठेवणे हे तुमच्या हिताचे ठरते.

❃ ❃ ❃

# आनंदी कसे राहावे

एका अत्यंत देखण्या, गर्भश्रीमंत, भारी किमतीचे कपडे परिधान केलेल्या एका वयस्कर स्त्रीची ही सत्यकथा आहे. ती एका मनोवैज्ञानिकाकडे त्याचा सल्ला घेण्यासाठी आलेली असते. तिला स्वत:चे आयुष्य निरर्थक वाटून खूप रिकामपण आल्यासारखे वाटत होते. काही दिवसांपूर्वी तिचे पती वारल्यानंतर तिला कशातच अभिरुची न राहून विरक्तपणा आल्यासारखे झाले होते. एवढ्या - मोठ्या घरात ती एकाकी झाली होती. विकत घेतलेल्या महागड्या जर्मन बनावटीच्या मोटारी, राजेशाही घर, उंची फर्निचर, फ्रेंच काचेची कटलरी, फ्रेंच अत्तरे, पर्शियन गालिचे, परदेशातून आणलेला पियानो, सर्व प्रसिध्द संगीत, हे सर्व तिला बिनकामाचे वाटत होते. खूप विचार केल्यानंतर यावर काहीतरी उपाय शोधायलाच हवा असे तिला वाटू लागले होते. काय करावे हे मात्र सुचत नव्हते. त्यासाठी ती स्त्री एका मानसिक समुपदेशकाकडे सल्ला घेण्याचे ठरवून आलेली असते. तिला दीर्घ काळ टिकणारा व कायमचा मिळणारा आनंद हवा असतो.

प्राथमिक बोलणे झाल्यानंतर समुपदेशक त्यांच्या ऑफिसमध्ये साफसफाई करणाऱ्या वयस्कर स्त्रीला बोलावतो. तो त्या श्रीमंत स्त्रीला सांगतो. ''मी आता आमच्याकडे काम करणाऱ्या मेरीला कायमचा आनंद कसा सापडला ते तुम्हाला सांगायला सांगणार आहे. तुम्ही फक्त तिचे बोलणे लक्ष देऊन ऐका.''

ती वृध्द झाडूकाम करणारी स्त्री आली. आपला झाडू तिने खाली ठेवला आणि खुर्चीवर बसून तिने आपली हकिकत

निवेदन केली ती अशी.

''माझे पती वारले. त्यानंतर तीन महिन्यातच माझा एकुलता एक मुलगा अपघातात मरण पावला. मला कोणीच राहिले नव्हते. माझ्याजवळ काहीच शिल्लक नव्हते. मी झोपू शकत नव्हते. मी खाऊ शकत नव्हते. कित्येक दिवस मी कोणाकडे पाहून हसू शकले नव्हते. खरे तर मी आत्महत्या करायचा विचार करीत होते. एका सायंकाळी कामावरुन परत येत असताना एक रस्त्यावरचे लहानसे मांजर माझ्या मागे घरापर्यंत आले. का कोणास ठाऊक पण मला त्याची दया आली. बाहेर खूप थंडी होती. म्हणून मी त्या मांजराला घरात घेतले. त्याला थोडे दूध प्यायला दिले. त्याने लपलप करुन ते पिऊन टाकले. प्लेट अगदी चाटून साफ केली. आनंदाने गुरगुरले आणि समाधानाच्या भावनेने माझ्या पायाला घासू लागले. कित्येक दिवसांनंतर माझ्या चेहऱ्यावर हसू उमटले.

त्यानंतर मी विचार करणे थांबविले. जर एवढ्या छोट्या मांजराच्या पिल्लाला मदत केल्यामुळे त्याने मला हसायला लावले, त्या अर्थी लोकांच्यासाठी मी काही केले तर मला जास्त आनंद मिळू शकेल. दुसऱ्या दिवशी मी काही बिस्किटे बनविली आणि शेजारी एक आजारी निजून होता त्याला नेऊन दिली. त्यानंतर प्रत्येक दिवशी मी निरनिराळे चांगले काम दुसऱ्या कोणासाठी तरी करीत असे. त्यांना झालेला आनंद पाहून मला प्रचंड आनंद होत असे. आजच्या घटकेला माझ्याहून अधिक शांत झोपलेले किंवा अधिक छान जेवलेले कोणी असेल असे मला वाटत नाही. दुसऱ्याच्या आनंदामध्ये मला माझा आनंद गवसला.

ही हकिकत ऐकताच ती धनवान स्त्री रडायला लागली. तिच्याकडे असलेल्या संपत्तीमधून ती जगातील कोणतीही ऐहिक गोष्ट विकत घेऊ शकत होती; परंतु पैशाने विकत न घेता येणाऱ्या अनेक गोष्टींना ती मुकत होती. यशस्वी आणि सुखी जीवनाचे रहस्य तुम्ही किती आनंदी आहात यात नसून तुम्ही किती जणांना आनंदी करता यावर अवलंबून असते.

ती धनवान स्त्री पुढे डलास, टेक्सास येथील एका सेवाभावी संस्थेची अध्यक्षा झाली. दिवसातील चोवीस तास तिने या कामासाठी स्वत:ला वाहून घेतले. लोकांची अखंड सेवा केली आणि आत्मिक आनंदात बुडून गेली.

❋ ❋ ❋

# आफ्रिकेचे चक्रव्यूह

आफ्रिकेतील एका छोट्या राष्ट्राचा परराष्ट्रमंत्री एकदा रशियाच्या दौऱ्यावर आला होता. तो रशियाला प्रथमच भेट देत होता. त्याच्या रशियन तोलामोलाच्या मंत्र्याने त्याचे जोरदार स्वागत केले. खाणेपिणे आणि इतर आतिथ्य, मानसन्मान राजकीय थाटामाटाने केला.

दौऱ्याच्या शेवटच्या दिवशी रशियाचा परराष्ट्रमंत्री आफ्रिकेच्या मंत्री महोदयाला घेऊन एका दालनात गेला. तिथे एका टेबलावर एक पिस्तुल ठेवले होते. आफ्रिकन मंत्र्याला उद्देशून रशियन म्हणाला, ''मित्रा, आज तुझा परत जायचा दिवस उजाडला. रशियन प्रथेप्रमाणे मी एक गोष्ट तुला दाखवायला इथे घेऊन आलो आहे. याला रशियन चक्रव्यूह असे म्हणतात. मर्दानीपणाची ही खरी परीक्षा असते. ती नक्कीच अनुभविण्यासारखी आहे. आता असे करायचे की ते पिस्तुल हातात घ्यायचे. त्याचा भाता गर्रकन फिरवायचा. नंतर ते पिस्तुल आपल्या कपाळाला लावायचे आणि चाप ओढायचा. सिलिंडरच्या सहापैकी एकाच भागात गोळी भरलेली आहे.''

आफ्रिकेचा मंत्री शूर वीर व धैर्यवान होता. मोठ्या निधड्या छातीचा होता. त्याने क्षणार्धात पिस्तुल हातात घेतले आणि भाता फिरविला, पिस्तुल कपाळाला लावले आणि चाप ओढला. पिस्तुलातून गोळी न सुटता फक्त खटका दाबल्याचा आवाज आला. सहीसलामत सुटल्याचा एक मोठा श्वास सोडला गेला.

त्याच्या या धाडसी आणि शौर्याच्या प्रदर्शनाने रशियन फार प्रभावित झाला. त्यानंतर आफ्रिकेच्या मंत्र्याचे विमान सुटेपर्यंत दोघे जण मस्त व्होडका पित बसले होते.

सहा महिन्यांनंतर रशियन मंत्री आफ्रिकेच्या त्या मंत्र्याच्या देशाच्या भेटीसाठी आला. आफ्रिकेच्या मंत्र्याला रशियन चक्रव्यूहाचा किस्सा चांगला लक्षात होता. भेटीदरम्यान रशियन मंत्र्याला त्याने एका दालनात आणले. मोठे प्रशस्त दालन होते. त्या दालनात सहा युवती नग्न अवस्थेत बसल्या होत्या.

आफ्रिकन रशियन मंत्र्याला म्हणाला, ''मित्रा, आता तुझी पाळी. तुझे धैर्य आणि तुझे पुरुषत्व सिद्ध करण्यासाठी हे आफ्रिकन चक्रव्यूह आहे. आमच्याकडील सहा वेगवेगळ्या जमातीमधील या सहा सुंदर तरुणी आहेत. तू यापैकी कोणाही एकीची निवड कर आणि तुझा रशियन पुरुषार्थ सिध्द कर.''

रशियन मंत्र्याने अजिबातच उत्सुकता न दाखवता विचारले, ''यात कसली आली आहे जोखीम आणि कसले आले आहे आव्हान? यालाच का तुम्ही चक्रव्यूह म्हणता?''

आफ्रिकन मंत्री गालातल्या गालात हसला आणि म्हणाला, ''या सहापैकी एक नरभक्षक आहे.''

❋ ❋ ❋

## आयुष्याची भक्कम पायाभरणी

वयस्कर अनुभव घर बांधणीमध्ये वाकबगार असणारा एक सुतारीचे काम करणारा कारागीर बरेच वय झाल्याकारणाने निवृत्त होण्याचे ठरवितो. आपल्या मालकाला तो तसे कळवितो. राहिलेले आयुष्य आरामात बायकोबरोबर सुखासमाधानात व्यथित करण्याचा त्याचा मानस असतो. आपली दर महिन्याची मिळकत बंद होईल; पण जमवलेल्या पुंजीमध्ये आपण दोघे आनंदाने राहू शकू, असा त्याला विश्वास वाटत असतो.

घरबांधणीच्या त्या ठेकेदाराला असा चांगला कारागीर सोडून जात होता त्याचे वाईट वाटले. त्या ठेकेदाराने त्याच्यावर उपकार म्हणून जाता जाता एक घर बांधून देण्याची त्या कारागिराला विनंती केली. कारागिराने ती विनंती मान्य केली. पण तो नेहमीसारखे मन लावून यावेळी काम करीत नव्हता, हे त्याच्या काम करण्यावरुन कोणाच्याही लक्षात येत होते. तो कसेतरी काम उरकत होता. त्याचे नेहमीचे कसब कामात दिसत नव्हते. या खेपेस त्याने वापरलेले सामान पण कमी प्रतीचे होते. आजपर्यंत त्याने निष्ठापूर्वक केलेल्या कामाची अखेर अशारितीने होणे हे मोठे दुर्भाग्यपूर्ण होते.

जेव्हा सुताराने घर बांधून पुरे केले तेव्हा ठेकेदार ते घर कसे झाले आहे ते पाहायला आला. घर पाहून झाल्यावर त्याने घराची चावी सुताराच्या हातात दिली आणि तो म्हणाला. ''ही तुझ्या घराची चावी. हे घर माझ्यातर्फे तुला बक्षीस म्हणून देत आहे.''

सुताराला धक्काच बसला. काय खेदाची गोष्ट आहे ही. जर त्याला घर बांधण्याआधी याची कल्पना असती तर नक्कीच त्याने घर फार वेगळे व चांगले बांधले असते. पण आता काय उपयोग? परत माघारी जाता येत नाही. तुम्ही तुमच्या आयुष्याचे सुतार किंवा शिल्पकार असता. प्रत्येक दिवशी तुम्ही जो हातोडा मारता, जो खिळा ठोकता, ज्या फळ्या बसविता किंवा जी भिंत बांधता, त्यासाठी तुमचा असणारा दृष्टिकोन, तुमची निवड हे सर्व तुमचे आयुष्य घडवित असते - उद्याचे ते तुमचे घर असते.

घर शहाणपणाचे बांधा. बांधताना तुमच्या घरासाठी पाया मजबूत करा.

❋ ❋ ❋

## आश्चर्य घडतच असतात......

सोनाली आपल्या खोलीत बसून होती. एकाएकी तिला कशाची तरी आठवण झाली. ती झटकन् उठली. आपल्या कपड्याच्या कपाटाचे दार तिने उघडले. मागे दडवून ठेवलेली मनी बँकची बाहुली तिने बाहेर काढली. तिच्या खाऊचे,

बक्षिसाचे पैसे तिने त्यात साठवून ठेवले होते. मनी बँकचे झाकण उघडून त्यातील नाणी तिने फरशीवर ओतली. काळजीपूर्वक ती नाणी तिने मोजली. सगळे मिळून तिचे दहा रुपये पन्नास पैसे साठले होते. तिने सगळी नाणी गोळा केली आणि ती तडक घराबाहेर पडली.

घराबाहेर पडताना कोणाला कळू नये म्हणून ती घराच्या मागच्या दाराने बाहेर पडण्यास विसरली नाही. तिच्या घरापासून ८/१० घरे सोडून एक मोठे औषधाचे दुकान होते. फ्रॉकच्या खिशातील नाणी एका हाताने घट्ट धरून तिने त्या औषधाच्या दुकानात प्रवेश केला. सकाळची लवकरची वेळ होती. दुकानात फारशी गर्दी नव्हती.

दुकानात ती काऊंटरजवळ जाऊन उभी राहिली. दुकानाच्या केमिस्टचे केव्हा लक्ष जाते याची ती वाट पाहात होती. त्यावेळी तो केमिस्ट कोणाशी तरी बोलण्यात मग्न होता. त्याचे त्या बिचारीकडे लक्षच नव्हते. थोड्या वेळाने सोनालीने पायांची चुळबुळ करून आवाज केले. घसा खाकरुन पाहिला. 'अहो, ऐकलंत का?' असे म्हणून त्याचे लक्ष वेधण्याचा बराच प्रयत्न केला. त्या कशाचाच उपयोग होत नाही असे लक्षात आल्यानंतर सोनालीने अखेरचा उपाय म्हणून खिशातल्या नाण्यापैकी एक नाणे बाहेर काढले. त्या नाण्याने सोनालीने जोरजोराने काऊंटरवर टकटक केले. तिची ही युक्ती कामाला आली. केमिस्टचे तिच्याकडे लक्ष गेले.

केमिस्टने थोड्या गुश्शातच तिच्याकडे पाहिले अन् विचारले, ''काय हवे आहे? दिसत नाही का? मी माझ्या भावाशी बोलत होतो. कित्येक दिवसांनंतर तो मला भेटायला लांबून आला आहे. इतकी कशाची तुला घाई आहे?'' ती काही बोलण्याआधीच केमिस्टने तिच्यावर प्रश्नांचा भडिमार केला होता.

सोनाली म्हणाली, ''काका, मलाही माझ्या भावाबद्दल तुमच्याशी बोलायचे आहे. त्याला खरोखरच खूप बरे नाहीये. त्याच्यासाठी एक 'चमत्कार' औषध मला विकत हवे आहे.''

केमिस्टला तिचे बोलणे न समजून त्याने उलट सोनालीला विचारले, ''काय, काय? काय हवंय म्हणालीस तू?''

''माझा मोठा भाऊ, त्याचे नाव आनंद आहे. अहो त्याच्या डोक्यात ना काहीतरी नको असणारी विचित्र गोष्टींची वाढ होते आहे. काल मी माझ्या आईबाबांचे बोलणे ऐकले. बाबा आईला सांगत होते, आता एखादे आश्चर्यच आपल्या आनंदला वाचवू शकेल. मला ते आश्चर्य माझ्या दादासाठी हवे आहे. प्लीज सांगा ना काका, ते आश्चर्य केवढ्याला मिळते हो?''

यावर तो केमिस्ट म्हणाला, ''बेटी आम्ही असे कोणत्याही प्रकारचे आश्चर्य विकत नाही. माफ कर पण मी तुला काहीच मदत करू शकणार नाही.'' हे सांगताना केमिस्टचा स्वर सुद्धा सद्‌गदित झाला होता. ''अहो काका, ते आश्चर्य, घेण्यासाठी मी पैसे आणले आहेत. हे पाहा. आणि हे जर पुरेसे नसतील तर मी जाऊन आणखी आणीन ना; पण मला ते आश्चर्य केवढ्याला विकत मिळेल ते सांगा ना प्लीज.''

त्या केमिस्टबरोबर बोलत होता तो रुबाबदार माणूस म्हणजे त्याचा भाऊ ते संभाषण ऐकत उभा होता. त्याने न राहवून सोनालीला विचारले, ''काय गं? तुझ्या भावासाठी कशाप्रकारचे आश्चर्य तुला हवे आहे? सांग ना मला.''

अश्रूंनी भरलेल्या नजरेने तिने एकदा पाहिले आणि म्हणाली, ''मला खरंच नक्की ठाऊक नाही. मला फक्त इतकेच ठाऊक आहे, माझा भाऊ खूप आजारी आहे. आणि माझी आई म्हणते, त्याचे ऑपरेशन करणे अगदी जरूरीचे आहे. पण माझ्या बाबांजवळ ते ऑपरेशन करण्यासाठी लागणारे पैसे नाहीत. म्हणून तर माझे साठलेले पैसे आणले आहेत ते आश्चर्य घेण्यासाठी.''

''ठीक आहे. तुझ्याकडे किती पैसे आहेत?'' त्याने विचारले.

हुंदका आवरून सोनाली सांगते, ''दहा रूपये पन्नास पैसे. आत्ता माझ्याकडे इतकेच आहेत, पण आणखी लागणार असतील तर मी आणीन ना काका.''

''अगं काय सांगतेस? बघ किती छान. अगदी तेवढीच आहे किंमत त्या आश्चर्याची.'' त्या गृहस्थाने सोनालीला उत्साहित केले.

त्याने सोनालीने दिलेले पैसे एका हातात घेतले. दुसऱ्या हाताने तिचा नाजूक हात आपल्या हातात घेतला व म्हणाला, ''चला तू कोठे राहतेस? मला घेऊन चल तुझ्या घरी. मला तुझ्या भावाला पाहायचे आहे आणि तुझ्या आईबाबांना भेटायचे आहे. पाहू या तर खरे तुला तुझ्या भावासाठी हवे असणारे आश्चर्य माझ्याजवळ आहे का?''

तो गृहस्थ निष्णात न्यूरो सर्जन होता. त्याने सोनालीच्या भावाचे ऑपरेशन एकही पैसा न घेता यशस्वीपणे पार पाडले. सोनालीचा आनंद पुन्हा परत आला, तो त्याच्या दुखण्यातून पूर्ण बरा होऊनच.

सोनालीचे आईबाबा त्या दिवशीच्या सकाळी घडलेल्या घटनांपासून आज उगवलेल्या आनंदाच्या दिवसाची उजळणी करीत होते. आई म्हणते, ''ते ऑपरेशन म्हणजे खरोखरच एक आश्चर्य ठरले. मला सांगा हो आपल्याला किती खर्च आला त्यासाठी?''

सोनाली त्यांच्याजवळच बसली होती. त्या आश्चर्याची किंमत तिला नक्की माहिती होती. - दहा रूपये पन्नास पैसे.

......... अर्थातच, त्या शिवाय त्या लहानग्या सोनालीचा दृढविश्वास आणि बंधुप्रेम.

.......... आपल्या आयुष्यात अशी किती आश्चर्ये येणार आहेत याची आपल्याला कधीच कल्पना करता येत नाही. अशी आश्चर्ये आपोआप घडत नाहीत तर त्याच्या मागे परमेश्वराचा वरदहस्त असतो.

.......... अर्थात, अशी आश्चर्ये तुमच्या हातून घडण्यासाठी तुम्ही सदैव तयार राहायला हवे.

❋ ❋ ❋

## आश्चर्यकारक दृष्टिकोन

आर्थर ॲश (Arthur Ashe) हा एकेकाळचा जगप्रसिद्ध टेनिस खेळातील विम्बल्डन विजेता. दुर्दैवाने त्याला कॅन्सरसारख्या दुर्दम्य रोगाने पछाडले. त्याच्या असंख्य चाहत्यांकडून त्याला सतत शुभेच्छा देणारी पत्रे येत असत. सर्व पत्राद्वारे त्याच्या प्रकृतीत सुधारणा होण्यासाठी प्रार्थना केलेली असे. त्यापैकी एका चाहत्या पत्रलेखकाने लिहिले होते, ''इतक्या वाईट व्याधीची लागण होण्यासाठी ईश्वराने इतक्या लोकांमधून तुझीच का निवड केली हे समजत नाही.''

या पत्रातील प्रश्नाला आर्थर ॲशने मोठे समर्पक उत्तर दिले ते असे .....

- सर्व जगभरात कोट्यवधी लहान मुले त्यांच्या लहान वयातच टेनिस खेळ शिकायला सुरुवात करतात.
- त्यातील फक्त पाच कोटी मुले टेनिस खेळ शिकून निष्णात होतात. त्यापैकी काही लक्ष मुलेच तरूणपणी व्यावसायिक टेनिसपटू म्हणून यश संपादन करतात.
- त्यापैकी काही हजार तरुणच ग्रांड स्लॅमच्या लढतीपर्यंत पोहोचू शकतात.
- त्यापैकी फक्त १२८ खेळाडूच विम्बल्डनच्या उंबरठ्यावर पाय लावू शकतात.
- त्यापैकी फक्त चार खेळाडू विम्बल्डनच्या उपांत्य फेरीत प्रवेश करू शकतात.
- या चारांपैकी फक्त दोघेच जण विम्बल्डनच्या अंतिम फेरीसाठी पात्र ठरतात.
- आणि त्या दोघांपैकी एकाच्याच हाती अजिंक्यपदाचा पेला अत्यंत दिमाखात उंचावताना दिसतो. त्याला तो मिरविता येतो.

ज्या क्षणी तो अजिंक्यपदाचा पेला मी माझ्या हातात घेऊन उंच धरला तेव्हा आकाशाकडे पाहून, ''तो माझ्याच हातात का आला?'' असे मी ईश्वराला विचारले नव्हते. त्याचप्रमाणे माझ्या या व्याधीच्या दुखा:साठी मीच का? असा प्रश्न मी ईश्वराला विचारण्याचा मला काय अधिकार आहे?

❋ ❋ ❋

## इंजिनिअर व व्यवस्थापक

एके दिवशी एक माणूस गॅस भरलेल्या उडत्या फुग्यामधून आकाशात तरंगत मार्गक्रमणा करीत होता. काही वेळानंतर त्याचा मार्ग चुकल्याचे व त्याचे नियोजित ठिकाण चुकले असल्याचे त्याच्या ध्यानात येते. ज्या उंचीवरुन तो उडत असतो त्या पेक्षा तो

आपले उड्डाणाचे जमिनीपासूनचे अंतर कमी करतो.

त्याला त्यावेळी जमिनीवर रस्त्यावरुन जाणारा एक मनुष्य नजरेस पडतो. आपले बलून तो आणखी जमिनीच्या व त्या माणसाच्या जवळ आणतो.

फुग्यात तरंगत असतानाच तो त्या रस्त्यावरील गृहस्थाला ओरडून विचारतो,''अरे गृहस्था, मला माफ करा. तू मला मदत करु शकतोस का? मी माझ्या एका मित्राला एका ठरावीक ठिकाणी भेटण्याचे आश्वासन दिले होते. परंतु सध्या मी कोठे जात आहे ते माझ्या लक्षात येत नाही.''

रस्त्यावर चालणारा तो गृहस्थ तत्काळ उत्तरला, ''सध्या तू त्या तरंगत्या फुग्यातून हवेत तरंगत घिरट्या घालतो आहेस. आणि तू साधारणपणे जमिनीपासून ३० फूट उंचीवरुन फिरतो आहेस. तसेच सध्या तू ४० ते ४२ अंश अक्षांश आणि ५८ ते ६० अंश रेखांश या पृथ्वीच्या पट्ट्यात फिरतो आहेस.''

हवेतील माणूस म्हणाला, ''तू नक्की इंजिनिअर असला पाहिजेस.'' रस्त्यावरील माणसाने प्रश्न केला,''होय बरोबर. पण कशावरुन? आणि तू कसे ओळखलेस?'' आकाशातून उत्तर आले, ''हे पहा तू जी काही माहिती मला पुरविलीस ती तांत्रिक अन् भौगोलिकदृष्ट्या अगदी तंतोतंत बरोबर असेल. पण त्या माहितीचा मी उपयोग कसा करायचा हे मात्र मी समजू शकत नाही. वस्तुस्थिती अशी आहे की मी अजूनही संभ्रमात आहे.''

त्यावर खालच्या माणसाने तत्काळ प्रतिसाद दिला व तो म्हणाला,''तू नक्की व्यवस्थापक असला पाहिजेस.'' फुग्यातून आवाज आला, ''हो बरोबर पण हे तुला कसे समजले?'' रस्त्यावरचा माणूस लगेच म्हणाला,''तू आत्ता कोठे आहेस हे तुला ठाऊक नाही किंवा नक्की कोठे जायचे आहे याचा तुला पत्ता नाही. तू ज्या दुसऱ्या कोणाला आश्वासन दिले आहेस ते तू कसे पाळणार आहेस याची तुला कल्पना नाही. तू तुझ्या फुग्यातून जमिनीवर पाय ठेवण्यास तयार नाहीस. तुझी अडचण कशी दूर करायची याचे उत्तर तू माझ्याकडून अपेक्षित करतो आहेस. खरे पाहिले तर आपली भेट झाली त्या पूर्वी तू ज्या परिस्थितीत होतास त्याच परिस्थितीत तू सध्याही आहेस. ही सर्व जणू काही माझीच चूक आहे......''

❁ ❁ ❁

# ईश्वर कहाँ रहता है?

अकबरने बिरबल के सामने अचानक तीन प्रश्न उछाल दिये । प्रश्न थे...'ईश्वर कहाँ रहता है? वह कैसे मिलता है? और वह क्या करता है?''

बिरबल इन प्रश्नों को सुनकर सकपका गये और बोले, ''जहाँपनाह, इन प्रश्नों के उत्तर मैं कल आपको दूँगा।''

जब बिरबल घर पर पहुँचे तो वह बहुत उदास थे । उनके पुत्र ने जब उनसे पूछा तो उन्होंने बताया, ''बेटा, आज अकबर बादशाह ने मुझसे एकसाथ तीन प्रश्न 'ईश्वर कहाँ रहा है, वह कैसे मिलता है और वह करता क्या है?' पूछे है। मुझे उनके उत्तर सूझ नहीं रहे हैं और कल दरबार में इनका उत्तर देना है।''

बिरबल के पुत्र ने कहा, ''पिताजी, कल आप मुझे दरबार में अपने साथ ले चलना । मैं बादशाके प्रश्नों के उत्तर दूँगा।'' पुत्र की हठ के कारण बीरबल अगले दिन अपने पुत्र को साथ लेकर दरबार में पहुँचे। बीरबल को देखकर बादशाहने कहाँ ''बीरबल मेरे प्रश्नों के उत्तर दो।'' बीरबलने कहा, ''जहाँपनाह आपके प्रश्नों के उत्तर तो मेरा पुत्र भी दे सकता है।'' अकबरने बीरबल के पुत्र को पहला प्रश्न पूछा, ''बताओ! ईश्वर कहाँ रहता है?''

बिरबल के पुत्र ने एक गिलास शक्कर मिला हुआ दूध बादशाह से मंगवाया और कहा, जहाँपनाह, दूध कैसा है? अकबर ने दूध चखा और कहा कि ये मीठा है। परंतु बादशाह सलामत क्या आपको इसमें शक्कर दिखाई दे रही है? बादशाह बोले नहीं । वह तो घुल गयी। जी हाँ, जहाँपनाह ईश्वर भी इसी प्रकार संसार की हर वस्तुमें रहता है। जैसे शक्कर दूध में घुल गयी है परंतु वह दिखाई

नहीं दे रही है।

बादशाहने संतुष्ट होकर अब दुसरे प्रश्न का उत्तर पूछा। ''बताओ । ईश्वर मिलता कैसे है?'' बालक ने कहा,''जहाँपनाह थोडा दही मंगवाइए।'' बादशाहने दही मंगवाया तो बीरबल के पुत्र ने कहा, ''जहाँपनाह, क्या आपको इसमे मख्खन दिखाई दे रहा है? बादशाह ने कहा, ''मख्खन तो दही में है पर इसको मथनेपर ही दिखाई देगा।'' बालक ने कहा, ''जहाँपनाह मन्थन करनेपर ही ईश्वर के दर्शन हो सकते है।''

बादशाहने संतुष्ट होकर अब अंतिम प्रश्न का उत्तर पूछा, ''बताओ, ईश्वर करता क्या है?'' बीरबल के पुत्र ने कहाँ, ''महाराजा इसके लिये मुझे आपको अपना गुरु स्वीकार करना पडेगा।'' अकबर बोले, ''ठीक है। तुम गुरू और मैं तुम्हारा शिष्य।''

अब बालक ने कहाँ, ''जहाँपनाह, गुरू तो ऊँचे आसन पर बैठता है और शिष्य नीचे।'' अकबरने बालक के लिए सिंहासन खाली कर दिया और स्वयं नीचे बैठ गये।

अब बालक ने सिंहासनपर बैठकर कहाँ, ''महाराज आपके अंतिम प्रश्न का उत्तर तो वही है।''

अकबर बोले, ''क्या मतलब? मैं कुछ समझा नहीं।''

बालक बोले, ''जहाँपनाह, ईश्वर यही करता है।'' पल भर में राजा को रंक बना देता है और भिखारी को सम्राट बना देता है।''

❋ ❋ ❋

# उच्च विचारसरणी

एक माणूस आपल्या अतिशय आलिशान व किमती कारमधून उतरतो. समोरच त्याला एक मुलगा त्याच्या कारकडे एक टक पाहत असलेला आढळतो. तो त्या मुलाला कारमधून एक चक्कर मारून आणतो.

गाडीमधून फेरफटका मारून आल्यावर तो मुलगा म्हणतो, ''वाह! काय सुंदर कार आहे. याची फार मोठी किंमत असणार. साधारण किती किंमत असेल या गाडीची?''

तो माणूस म्हणतो, ''मला खरंच ठाऊक नाही. कारण माझ्या भावाने मला ही भेट म्हणून दिली आहे.''

मुलगा म्हणतो, ''वाह! किती छान!''

माणूस त्याला म्हणतो, ''मला समजले तू काय विचार करतो आहेस तो. तुला सुद्धा असाच एक भाऊ असावा असे वाटले ना?''

त्यावर मुलगा चटकन म्हणाला, ''नाही, नाही. मला तुमच्या भावासारखे व्हायला फार आवडेल.''

**तात्पर्य :–** नेहमीच उच्च विचार आणि उच्च करणी करा. लोकांच्या अपेक्षेपेक्षाही उच्च.

❋ ❋ ❋

# उच्चपदग्रहण (काकज्ञान)

एकदा एक कावळा झाडाच्या अगदी वरच्या फांदीवर निवांतपणे दिवसभर काहीही न करता स्वस्थ बसून राहिला होता. एका पांढऱ्या शुभ्र लहानग्या सशाने त्या कावळ्याला पाहिले अन् त्याला विचारले, ''मी पण तुझ्यासारखे दिवसभर काहीही न करता स्वस्थ बसून राहू शकतो का?'' कावळा म्हणाला, ''हो का नाही?''

कावळयाचे ऐकून तो ससा त्याच झाडाखाली दिवसभर काहीही न करता विश्रांती घेत पडून राहिला. एकाएकी कोठूनतरी त्या जागी एक कोल्हा आला. त्याने सशाला स्वस्थ बसलेले पाहिले. कोल्ह्याने क्षणाचाही विलंब न करता झपकन त्या सशाला पकडले आणि मट्टकन खाऊन सुद्धा टाकले.

वर झाडावर बसून कावळा हे पाहात होता. त्याच्या मनात आले, अरेरे! बिचारा ससा, मी त्याला सांगायला विसरलो की, जर तुला काहीही न करता स्वस्थ बसायचे असेल तर प्रथम तुला खूप उंच स्थानावर (हुद्यावर) आसनस्थ व्हावे लागेल.

**तात्पर्य :–** खरं म्हणजे मला ठाऊक नाही, तरीही सतत काहीतरी करीत राहाणे चांगले असते नाही का?

चला कामाला लगेच सुरुवात करु या.

❋ ❋ ❋

# उत्तराधिकाऱ्याची निवड

**ए**क अत्यंत यशस्वी व्यावसायिक वयाने मोठा झाला होता. निवृत्तीच्या उंबरठ्यावर येऊन पोहोचला होता. आता आपला उत्तराधिकारी शोधून त्याच्या हातात व्यवसाय सोपवून आपण निवृत्त होण्याचा दिवस जवळ आला आहे हे तो जाणून होता. व्यवसायातील एखादा वरिष्ठ अधिकारी किंवा आपल्या मुलांपैकी एक कोणीतरी आपणच निवडायच्या ऐवजी काहीतरी वेगळे करून त्याची निवड करावी असे त्याने ठरविले. एक दिवस त्याने कंपनीतील सर्व उच्च पदाधिकारी व आपल्या मुलांना एकत्र बोलाविले.

सर्वांना उद्देशून तो म्हणाला, ''आता माझ्या निवृत्तीची वेळ नजिक येऊन ठेपली आहे. माझ्यानंतर कंपनीचा कारभार कोण सांभाळू शकेल अशा माणसाला मला प्रमुख म्हणून नियुक्त करायचे आहे.'' जमलेल्या लोकांपैकी तरूण अधिकाऱ्यांना धक्काच बसला. ''मी इथे जमलेल्या प्रत्येकाला एका झाडाचे बियाणे देणार आहे. ही सगळी बियाणे खास निवडून आणलेली आहेत. तुमच्यापैकी प्रत्येकाने ही बी पेरून, त्याला पाणी घालून त्याची देखभाल करावी आणि बरोबर एक वर्षानंतर परत आपण असेच एकत्र येऊ तेव्हा आपले रोपटे दाखवायला घेऊन यावे. आजपासून ठीक एक वर्षानंतर मी तुम्ही वाढविलेले रोपटे पाहून तुमच्या पैकी एकाची निवड करीन आणि तोच कंपनीचा माझ्यानंतरचा प्रमुख संचालक म्हणून नेमला जाईल.''

जमलेल्या लोकांमध्ये यशवंत नावाचा एक तरूण होता. इतरांप्रमाणे त्यालाही झाडाचे बियाणे दिले गेले. खूप उत्साहात तो घरी गेला. बायकोला सर्व हकिकत सांगितली. तिने ते झाड लावण्यासाठी एक कुंडी आणली. त्यात माती खत पाणी घालून ते बियाणे तिने लावले. दोघेही रोज त्याला पाणी घालून त्याची किती वाढ झाली हे पाहत असत. तीन आठवड्यांनंतर ऑफिसमधील इतर अधिकारी आपआपसात त्यांच्या रोपट्याबद्दल चर्चा करू लागले. बहुतेक जण आपले रोपटे कसे छान वाढत आहे हे वर्णन करून सांगत.

यशवंत रोज आपल्या कुंडीकडे पाहत असे; पण त्या बियाणाला कोंब सुद्धा फुटलेला नसे. चार आठवडे गेले, पाच आठवडे गेले पण अजून रोपटे उगवण्याची काहीच चिन्हे दिसत नव्हती. एव्हाना इतर सगळे जण त्यांच्या रोपट्याबद्दल भरभरून बोलत होते. पण यशवंतचे रोपटे उगवतच नव्हते. त्यामुळे आपण हे करण्यात अयशस्वी झालो आहोत अशी त्याची खात्री पटली होती.

सहा महिने झाले तरी यशवंतच्या कुंडीत काहीच फरक नव्हता. त्याला दिलेले बियाणे मरून गेल्याचे तो समजून चुकला होता. इतरांच्या कुंड्यातील रोपे फोफावली होती, त्याची मोठी झाडे तयार झाली होती. त्याबद्दल यशवंत आपल्या सहकाऱ्यांना काहीच बोलला नाही. तरीही मनातील आशेमुळे यशवंत कुंडीत पाणी घालत होता. खत घालीत होता. कसेही करून त्याला रोप उगवायला हवे होते.

शेवटी एक वर्ष संपले. कंपनीच्या सर्व तरूण उत्साही अधिकारी वर्गानी त्यांची रोपे तपासण्यासाठी प्रमुख संचालकाकडे आणली. यशवंतने आपल्या पत्नीला रिकामी कुंडी घेऊन तो ऑफिसला जाणार नसल्याचे सांगितले; पण तिने त्याला कुंडी घेऊन जाऊन प्रामाणिकपणे जे घडले, जे केले ते सांगावयास भाग पाडले. ऑफिसमध्ये सर्व लोकांची रोपे पाहून यशवंतच्या पोटात गोळा उभा राहिला. आपल्या आयुष्यातील हा सर्वांत फजितीचा व अपयशाचा दिवस असेल असे त्याच्या मनाने घेतले होते. तरीही त्याचा बायकोवर विश्वास होता. आणि म्हणूनच तो आपली रिकामी कुंडी घेऊन कंपनीच्या बोर्डरुममध्ये आला

होता. तिथे येताच इतरांची सुंदर सुंदर तजेलदार रोपे पाहून तो आश्चर्यचकित झाला. वेगवेगळ्या आकाराची, रंगाची टवटवीत अशी ती रोपे होती. यशवंतने जेव्हा आपली रिकामी कुंडी जमिनीवर ठेवली, तेव्हा बाकी सगळ्यांनी कुत्सितपणे हसून यशवंतची टिंगल केली. खोटी सहानुभूती व्यक्त केली.

कंपनीचा प्रमुख संचालक आल्यावर त्याने आलेल्या लोकांकडे एक नजर टाकली आणि सर्वांचे स्वागत केले. यशवंत मागच्या बाजूला न दिसेल असा उभा होता. ''वाह! काय सुंदर रोपे, झाडे, फुले तुम्ही सगळ्यांनी मशागत करून मिळविली आहेत!'' संचालक महाशय म्हणाले. ''आज तुमच्यापैकी एक जण माझ्यानंतर प्रमुख संचालकाची जागा घेणार आहे.''

असे बोलत असतानाच त्यांनी यशवंतला मागच्या बाजूला लपत छपत उभे असलेले पाहिले. त्याच्याजवळ रिकामी कुंडी असलेली पण त्यांच्या लक्षात आली. त्यांनी त्यांच्या आर्थिक संचालकाला सांगून यशवंतला पुढे येण्यास सुचविले. यशवंत मनातून घाबरून गेला. प्रमुख संचालकाला आपल्या अपयशाची कल्पना आली असावी असे त्याला वाटले. बहुतेक कंपनी सोडून जावे लागेल असेही त्याला वाटले.

यशवंत पुढे आल्यावर त्याच्या रोपाचे असे का झाले असे त्याला विचारल्यावर त्याने जे घडले ते सांगितले. प्रमुख संचालकाने सगळ्यांना बसायला सांगितले. यशवंतला जवळ बोलावून थांबायला सांगितले. त्यांनी यशवंतकडे एक नजर टाकून ''तुमच्या कंपनीचा माझ्यानंतरचा प्रमुख संचालक कोण असेल? हा पहा इथे उभा असलेला यशवंत तुमचा प्रमुख संचालक असेल'' अशी घोषणा केली. यशवंतचा आपल्या कानावर विश्वासच बसला नाही. यशवंतच्या बियाणाला कोंब सुद्धा फुटला नाही मग तो कसा प्रमुख संचालक म्हणून लायक ठरतो, असा इतरांना प्रश्न पडला.

त्यानंतर प्रमुख संचालकांनी सांगितले, ''आजपासून बरोबर एक वर्षापूर्वी, याच ठिकाणी तुम्हा सर्वांना बियाणे देऊन त्यापासून मशागत करून झाड तयार करण्यास सांगितले होते. खरे सांगायचे तर मी दिलेले बियाणे मेलेले होते. त्याच्यापासून रोपे उगवणे अशक्य होते. यशवंतखेरीज तुमच्यापैकी प्रत्येकाने मोठी झालेली फुलांनी बहरलेली झाडे आणली आहेत. दिलेल्या बियाणाला अंकुर फुटणार नसल्याचे तुम्हाला लक्षात आल्यावर तुम्ही दिलेले बियाणे बदलले. यशवंत एकटाच असा आहे की ज्याने प्रामाणिकपणाने अत्यंत धीराने रिकामी कुंडी आणण्याचे धाडस केले आणि म्हणूनच तोच पुढचा प्रमुख संचालक होण्यास लायक ठरला आहे.''

**तात्पर्य:**

तुम्ही सचोटीने वागलात तर विश्वास संपादन करू शकता.
तुम्ही इतरांशी प्रेमाने वागलात तर तुम्हाला सच्चे मित्र भेटतील.
तुम्ही विनम्रता बाळगलीत तर तुम्ही मोठेपणा मिळवाल.
तुम्ही चिकाटी दाखविलीत तर तुम्हाला समाधान मिळेल.
तुम्ही आस्था दाखविलीत तर तुम्हाला आपलेपणा मिळतो.
तुम्ही इतरांना माफ केलेत तर तुम्हाला मान्यता मिळते.
तुम्ही जसे वागाल, जे कराल त्याचे माप तुम्हाला मिळेल.
मी तुमच्या दारात जर दु:खाने रडत आलो तर तुम्ही माझी काळजी घ्याल का?
मला माझ्या अडचणीमध्ये कोणाचा आधार हवा असेल तर तुमचा खांदा मला मिळेल का?

❋ ❋ ❋

## एक नव्व्याण्णवचे जाळे

**को**णे एके काळी एक राजा होता. त्याचे खूप मोठे सामाज्य होते. त्याचे भांडार अमाप संपत्तीने भरलेले होते. सर्व राज्यावर त्याची हुकूमत होती. कसलीही चिंता नसल्याने व भरपूर संपत्ती असल्यामुळे ऐषआरामात त्याचे आयुष्य चालू होते. तरीही मनातून तो आनंदी व समाधानी नव्हता.

एक दिवस त्याच्या राजवाड्यात काम करणारा एक सामान्य नोकर त्याला नेमून दिलेले काम तन्मयतेने करीत होता. काम करीत असताना तो मजेत गात होता. राजाच्या नजरेत तो नोकर आला. राजाला फार आश्चर्य वाटले. या राज्याचा मी सार्वभौम राजा असून मी आनंदी राहू शकत नाही. मी सदैव नाराज आणि उदास असतो. आणि माझ्याच राज्यातील हा अगदी सामान्य नोकर मात्र हसत हसत गात गात मजेत काम करीत आहे. असे का असावे? न राहवून राजाने त्याला विचारले,''काय रे तू एवढा आनंदी कसा राहू शकतोस?''

त्या नोकराने उत्तर दिले,''महाराज, मी एक सामान्य नोकर आहे, पण मला आणि माझ्या कुटुंबाला जास्त कशाचीच हाव नाही. डोक्यावर छप्पर, अंग झाकण्यापुरते कपडे आणि पोट भरण्याइतके साधे अन्न रोज मिळाले तरी आम्ही खूश असतो. मग आम्हाला इतर काहीही नको असते.''

त्या उत्तराने राजाचे समाधान झाले नाही. राजा दिवसभर त्याच विचारात होता. अखेर राजाने त्याच्या मंत्रिमंडळातील सर्वांत अधिक विश्वासू मंत्र्याचा सल्ला घेतला. राजाचे गाऱ्हाणे लक्षपूर्वक ऐकून घेतल्यावर तो मंत्री म्हणाला, ''राजाधिराज, मला वाटते की तो नोकर अजून ९९च्या जाळयात अडकला नाही म्हणूनच इतका सुखी राहू शकतो आहे.''

राजाने विचारले, ''९९चे जाळे म्हणजे नेमके काय?''

मंत्र्याने सांगितले, ''महाराज, हे ९९ चे जाळे काय आहे हे कळण्यासाठी एका थैलीमध्ये सोन्याची ९९ नाणी घालून ती थैली त्या नोकराच्या घराच्या दरवाजाजवळ ठेवायची व्यवस्था करा.''

राजा तशी व्यवस्था करून त्याच्या दारात ९९ सुवर्णनाण्यांची पिशवी ठेवतो. नोकर घरी जाताना दारात ती असलेली थैली पाहतो आणि उचलून घरात घेऊन जातो. थैली उघडताच अत्यानंदाने तो एकदम ओरडतोच. इतकी सोन्याची नाणी आहेत हे त्याला खरेच वाटत नाही. तो लगेच ती नाणी मोजतो. परत परत मोजून सुद्धा ती ९९च भरतात. तो आश्चर्यचकित होऊन विचार करतो,''अशी कशी कोणीतरी ९९ नाणी थैलीत ठेवली आहेत, आणखी एक नाणे असायला हवे होते. कोठे गेले असेल ते नाणे? अशी अर्धवट ९९च नाणी कोणी ठेवणार नाही'' बाहेर येऊन तो अनेक वेळा सगळीकडे ते एक नाणे शोधायचा प्रयत्न करतो. त्याला ते सापडत नाही म्हणून तो निश्चय करतो की, आपण जास्त काम करायचे, खूप मेहनत करायची पण ते उरलेले एक नाणे मिळवायचेच. म्हणजे आपल्याजवळ बरोबर १०० नाणी जमा होतील.

त्या दिवसापासून त्या नोकराच्या आयुष्यात आमूलाग्र बदल घडून येतो. तो क्षमतेपेक्षा जास्त काम करू लागतो. जास्त श्रम केल्यामुळे तो थकून जाऊ लागला. उरलेले एक नाणे न जमल्यामुळे असंतुष्ट होऊन चिडचिड करू लागला. कुटुंबातील लोकांना ते त्याला कामात मदत करीत नाहीत असे म्हणून त्यांना धारेवर धरू लागतो. राहिलेले शंभरावे नाणे मिळविण्यासाठी तो जीवाचा आटापिटा करू लागतो. त्याची हसतहसत आणि गाणे गात काम करण्याची पूर्वीची सवय तो पार विसरून जातो.

त्याच्यामधील झालेला हा बदल पाहून राजाला त्याचे कारण उमजेना. त्याने परत आपल्या मंत्र्याला त्याबद्दल विचारले. मंत्री म्हणाला, ''महाराज, आता तो नोकर पुरता ९९च्या चक्रात अडकला आहे. त्यातून तो आता बाहेर पडणे कठीण आहे. त्याचा आनंदी जगण्याला पूर्णविराम मिळाला आहे.''

तो पुढे म्हणाला,''९९चे जाळे असेच लोकांना अडकून ठेवते. त्यात अडकलेल्या लोकांकडे त्यांना जरूरीपुरते सर्व काही असते, पण त्यावर त्यांचे समाधान कधीच होत नाही. प्रयत्नांची पराकाष्ठा करून नसलेली गोष्ट ते मिळविण्याचा ध्यास घेतात. 'ते राहिलेले एक' मिळविण्यासाठी ते अस्वस्थ होतात. ते 'एक' मला मिळाले की मग मी अत्यंत सुखी होईन अशी त्यांनी मनाची खूणगाठ बांधलेली असते.''

❋ ❋ ❋

# एका कोट्यधीश व्यावसायिकाचे विचार - पैशाची किंमत

**मी** माझ्या व्यावसायिक कारणास्तव नेहमी जगभर प्रवास करीत असतो. माझ्या व्यवसायातील कर्मचारीवर्गासाठी मला मलेशिया, थायलंड, इंडोनेशिया, चायना अशा अनेक देशांना भेटी द्याव्या लागतात. दर एका आड एक आठवड्याला मी कोणत्या तरी विमानतळावर असतोच. त्यावेळी अनेक माणसे मला येऊन भेटतात. ते बहुतेक जण माझ्या कोणत्या ना कोणत्या

तरी व्याख्यानाला पूर्वी उपस्थित राहिलेले असतात किंवा त्यापैकी अनेकांनी माझी पुस्तके वाचलेली असतात. असाच एकदा एका विमानप्रवासात एक माणूस मला येऊन भेटला. मला पाहताच तो मनातून दचकला होता. जवळ येऊन त्याने मला आश्चर्याने विचारले, ''नमस्कार, तुमच्यासारखा धनवान गर्भश्रीमंत व्यावसायिक आमच्यासारख्या सर्वसामान्य श्रेणीच्या कक्षातून कसा काय प्रवास करतो? आपण तर बिझिनेस किंवा पहिल्या वर्गातून प्रवास करणे अपेक्षित आहे.'' मी ताबडतोब त्या गृहस्थाला उत्तर दिले, ''म्हणून तर मी धनवान व गर्भश्रीमंत बनलो आहे.'' हे माझे बोलणे ऐकूनही तो गोंधळलेल्या मन:स्थितीतच दिसला.

यावरून धनाढ्य लोकांच्या राहणीविषयी असलेल्या गैरसमजांना दुजोरा मिळाला. मी त्याविषयी माझ्या 'सिक्रेटस् ऑफ सेल्फ मेड मिलिओनर्स' या पुस्तकात लिहिले आहे. अनेक लोकांच्या मनात गैरसमज असतो की धनाढ्य लोकांनी फक्त ब्रँडेड कंपन्यांचे कपडे, घड्याळे, पादत्राणे वापरले पाहिजेत. त्यांनी नेहमी उच्चवर्गातूनच विमानप्रवास केला पाहिजे, तरच त्यांची श्रीमंती दिसून येईल.

परंतु यामुळे खूप लोक श्रीमंत होऊ शकत नाहीत. ज्या क्षणी त्यांचे उत्पन्न जास्त होते त्या क्षणी जास्त खर्च करणे हे स्वाभाविक व नैसर्गिक आहे. या अवास्तव खर्चामुळे ते परत त्यांच्या पूर्वीच्याच अवस्थेत पोहोचतात. वास्तविक वस्तुस्थिती अशी आहे की, धनाढ्य किंवा कोट्यधीश माणसे अतिशय काटकसरी किंवा मितव्ययी असतात. ते फक्त आवश्यक आणि योग्य असेल तेवढेच खर्च करतात. त्यामुळेच त्यांची इस्टेट साठत जाते व ती दामदुप्पट होत राहते व तीही अतिशय कमी वेळात व वेगाने.

यापूर्वी गेली सात वर्षे मी माझ्या मिळकतीपैकी साधारण ८० टक्के रक्कम बचत करीत असे. पण आजकाल माझ्याकडे पत्नी, तिची आई, दोन घरकाम करणारी माणसे, दोन मुले इ. माझ्यावर अवलंबून असलेले राहतात. त्यामुळे मी फक्त मिळकतीच्या साठ टक्केच बचत करु शकतो. तरीसुद्धा मला वाटते सर्वसाधारण माणसापेक्षा ती बचत थोडी जास्तच असावी. माझ्या माहितीप्रमाणे सर्वसाधारण माणूस फक्त दहा टक्केच बचत करतो. हे सुद्धा ते जर नीट विचार करून खर्च करीत असतील तर.

मी कधीच विमानाचा प्रवास पहिल्या वर्गातून करीत नाही. कोणतेही महागाचे ब्रँडनेमचे कपडे वापरीत नाही. कारण मला ते अनावश्यक खर्च वाटतात. पैशाचा अपव्यय वाटतो; परंतु याच वेळी माझ्या लहान मुलीला एखाद्या उत्तम दर्जाच्या सेमिनारला अथवा व्याख्यानाला किंवा उत्कृष्ट नाटकाचे महागाचे तिकीट काढून पाठवायला मागे पुढे पाहत नाही. त्यासाठी मला आनंदच होतो.

'Young Entrepreneur's Orgn'. ही एक एकमेव अशी संस्था आहे की जिचे सर्व सभासद चाळीस वयापर्यंतचे असून त्यांचे त्यांच्या व्यवसायातील वार्षिक उत्पन्न एक कोटीपेक्षा जास्त असते. माझ्या लक्षात आले की त्या सगळयांचे विचार माझ्या विषयाशी मिळतेजुळते असतात. त्यापैकी ज्या बरेच जणांची एकूण संपत्ती पाच कोटीपेक्षा जास्त आहे असे बहुतेक जण माझ्याप्रमाणेच विमानाच्या इकॉनॉमी क्लासने प्रवास करतात. कित्येकजण ऑडी, मर्सिडीज, बीएम्डब्ल्यूसारख्या महागडया गाडया न वापरता, टोयाटा किंवा निसानसारख्या साध्या गाडया वापरतात.

त्या क्लबमध्ये काही मंत्र्यांची मुले किंवा मोठ्या व्यावसायिक व्यक्तिंची मुले सुद्धा सभासद होती. त्यांच्याबाबतीत मला असे लक्षात आले की पैसे मिळविण्यासाठी त्यांना कधीच कष्ट पडलेले नाहीत. असे लोक मात्र वारेमाप पैसे खर्च करीत. ते करताना त्यांना उद्याचा दिवस आहे असे वाटतच नसे. ज्यांच्याकडे मुळातच अमाप संपत्ती असेल व जेव्हा तुम्हाला शून्यातून स्वर्ग निर्माण करायचा नसेल तर तुम्हाला पैशाची खरी किंमत कळणारच नाही. याच कारणास्तव कुटुंबाची संपत्ती कितीही मोठी असली तरी ती संपत्ती तिसऱ्या पिढीनंतर शिल्लक राहात नसावी.

माझ्या वडिलांना या भयंकर सत्याची जाणीव होती आणि म्हणूनच की काय त्यांनी व्यवसाय सुरू करण्यासाठी मला एक फुटकी कवडीसुद्धा भांडवल म्हणून दिली नाही. खरे तर हे देवाचे उपकारच मानायला हवेत. मला अनेकजण विचारतात, की जर तुम्हाला पैसे खर्च करून आनंद घेण्यात रस नसेल तर मग इतके पैसे मिळवायचे तरी कशाला? मला खरोखरच विमानाचा पहिल्या वर्गाचा प्रवास, उंची कपडे, दागदागिने घालणे यात खरोखरच आनंद मिळत नाही. भौतिक उपभोगातील आनंद हा

चिरकाल न टिकणारा असतो. तो तुम्हाला तात्पुरता आनंद देतो. काही वेळानंतर तुम्हाला परत कसलीतरी लालसा निर्माण होतेच. ती नवीन आसक्ती निर्माण झालेली गोष्ट मिळाली म्हणजे तुम्ही सुखी व्हाल असा तुमचा गैरसमज होतो. भौतिक उपभोगाच्या भोवऱ्यात सापडलेला माणूस त्या गर्तेतच अडकून कधीच सुखी होऊ शकत नाही व कायम असमाधानी आयुष्य जगतो. या भौतिक उपभोगाच्या आनंदापेक्षा माझी मुले खळखळून हसताना, खेळताना, बागडताना किंवा नवीन काहीतरी शिकताना मी पाहतो तेव्हा मला जास्त मानसिक समाधान मिळते. माझा व्यवसाय दिवसागणिक विस्तारलेला, दर दिवशी माझी एका नवीन प्रांतात व देशात व्यवसायाची सुरूवात होते तेव्हा मला जास्त आनंद मिळतो. मी लिहिलेली पुस्तके जेव्हा जास्त लोक वाचतात, माझ्या सेमिनारला जेव्हा जास्तीतजास्त उपस्थिती असते तेव्हा मला जास्त आनंद मिळतो. या सर्व लोकांकडून मला जेव्हा भरभरून तृप्त झाल्याचे इमेल संदेश येतात, तेव्हा तो आनंद इतर कोणत्याही आनंदापेक्षा अधिक असतो. माझ्या भाषणामुळे व सेमिनारमुळे जर कोणी भावविवश झाला व त्याला जर काही करण्याची प्रेरणा मिळाली तर त्या परते दुसरे मला समाधान नसते. हा आनंद, हे समाधान मला पुढे अनेक काळ पुरते व ते कोणत्याही मौल्यवान वस्तूपेक्षा मला अधिक मोलाचे असते. शेवटी मला इतकेच सांगावेसे वाटते की, आनंद किंवा सुख हे तुम्ही आयुष्यात ठरवून घेतलेल्या कामाच्या पूर्ततेतून येते. मग ते काम शिकविण्याचे, इमारती बांधण्याचे, रस्ते तयार करण्याचे, व्यापार करण्याचे किंवा देशासाठी खेळून विजय प्राप्त करण्याचे असो. ते उत्तम केले की त्यातून मिळणारा पैसा ही दुय्यम व आनुषंगिक व क्रमप्राप्त गोष्ट असते. जर त्या कामावर नाराज होऊन तुम्ही काम केलेत, त्यातून फक्त पैसे मिळविण्यासाठी धडपड केलीत व मिळालेल्या पैशातून ऐहिक सुखाच्या चैनीच्या वस्तू विकत घेतल्यात तर तुमच्या आयुष्याला अर्थच उरणार नाही. बेचव निरर्थक आयुष्य तुम्ही जगाल.

❋ ❋ ❋

## एका झाडाची गोष्ट

**फा**र वर्षांपूर्वी तिथे एक आंब्याचे झाड होते. एका लहान मुलाला त्या झाडाभोवती खेळायला खूप आवडत असे. तो झाडावर खूप उंच टोकापर्यंत चढत असे. झाडावरचे आंबे मनसोक्त खात असे. पोट भरले की, निवांतपणे झाडाच्या सावलीत झोपत असे. त्याला त्या झाडाबरोबर खेळायला आणि गप्पा मारायला खूप आवडत असे. तो लहानगा आला की ते झाडसुद्धा आनंदाने फुलून येत असे. असे दिवसामागून दिवस गेले.

तो लहानगा मुलगा मोठा झाला. मग तो रोज रोज त्या झाडापाशी खेळायला येईनासा झाला. एके दिवशी तो मुलगा त्या झाडाजवळ आला पण त्या दिवशी तो थोडासा नाराज दिसत होता. ते झाड त्याला म्हणाले, 'ये बाळ माझ्याशी खेळ ना रे'. मुलगा उत्तरला, 'झाडाभोवती खेळायला मी काही आता लहान राहिलो नाही. मला खेळायला छान छान खेळणी हवी आहेत; पण ती विकत घेण्यासाठी माझ्याजवळ पैसे नाहीत.'

झाड म्हणाले,'माफ कर. माझ्याजवळ तुला देण्यासाठी पैसे नाहीत. पण तू माझ्याजवळचे सगळे आंबे घे. ते बाजारात नेऊन विक, म्हणजे तुला पैसे मिळतील. मग तू त्या पैशांची हवी ती खेळणी विकत घे.' तो मुलगा एकदम खूश झाला. त्याने भराभर त्या झाडावरचे सगळे आंबे तोडून घेतले आणि आनंदाने पळाला. त्यानंतर पुन्हा काही तो बरेच दिवस झाडाकडे परत आला नाही. झाडाला खूप वाईट वाटले.

परंतु काही दिवसांनंतर तो मुलगा त्या झाडाजवळ आला. ते झाड आनंदाने डोलू लागले.

आनंदाच्या भरात झाड त्या मुलाला म्हणाले,'ये ना रे खेळ माझ्याबरोबर.' मुलगा म्हणाला, 'छे छे! खेळत बसायला माझ्याजवळ मुळीच वेळ नाही. मला माझ्या कुटुंबासाठी काम करायला हवे. आम्हाला आमच्या डोक्यावर छप्पर हवे आहे. म्हणजेच आम्हाला आमचे घर बांधायचे आहे. त्यासाठी तू मला मदत करू शकतोस का?' झाड म्हणाले, 'अस्स! पण मला क्षमा कर. माझ्याजवळ तुला देण्यासाठी घर नाही; पण तू माझ्या फांद्या तोडून घेऊन जाऊ शकतोस. त्या तुला घर बांधायला नक्की उपयोगी पडतील.'

क्षणाचीही उसंत न घेता त्या मुलाने त्या झाडाच्या सगळया फांद्या सपासप तोडून घेतल्या, आणि अतिशय खुशीत निघून गेला. जाताना त्याने झाडाचे आभारही मानले नाहीत. मात्र त्याची खुशी पाहून झाड हर्षभरीत झाले. त्यानंतर बराच काळ लोटला तरी तो मुलगा झाडाकडे फिरकला नाही. झाडाला खूप एकाकीपणा जाणवला. झाड मनातून खूप दुखावले.

बऱ्याच दिवसांनंतर तो मुलगा उन्हाळ्याच्या दिवसातील भर रणरणत्या उन्हांत त्या झाडाजवळ आला. झाडाला परमानंद झाला. तत्काळ ते म्हणाले, 'ये रे अरे आपण मिळून खेळूया.' तो मुलगा म्हणाला, 'मी सध्या फार दु:खी अवस्थेत आहे. माझे आता वय होत चालले आहे. मला बोटीने दूरवर सफारीसाठी जावेसे वाटते आहे. त्यामुळे माझे मन रमेल व मी पुन्हा उल्हसित होईन. मला विश्रांती मिळेल. त्यासाठी तू मला बोट/ नाव घेऊन देशील का?' झाड आनंदाने म्हणाले, 'इतकेच ना? असे कर. तू माझे खोड घेऊन जा. त्याची सुंदरशी बोट बनव. त्यातून खूप लांब तुला पर्यटनाला जाता येईल. त्याने क्षणाचा विलंब न लावता त्या झाडाच्या खोडावर कुऱ्हाडीने घाव घातले आणि ते तोडून घेतले. त्याने तत्काळ त्याची छानशी बोट बनविली आणि तो दूरच्या प्रवासाला निघून गेला. त्याने पुन्हा काही त्या झाडाला तोंड दाखविले नाही. अनेक महिन्यांचा, वर्षांचा काळ लोटला. एक दिवस अचानक तो झाडाजवळ आला.

झाड म्हणाले, 'अरे माझ्या लाडक्या बाळा, मला माफ कर. पण आता मात्र तुला देण्यासाठी माझ्याजवळ काहीच शिल्लक राहिले नाही. माझ्याजवळ पूर्वीसारखे आंबे तर नाहीतच.' त्यावर तो मुलगा म्हणाला, 'पण आता मी पूर्वीसारखे आंबे खाऊही शकणार नाही.' झाड पुढे म्हणाले, 'आता माझे खोड पण शिल्लक राहिले नाही. तुला वर चढता येणार नाही.' त्याने सांगितले, 'माझेसुद्धा आता झाडावर चढण्याचे वय राहिले नाही.' झाड अतिशय दु:खी झाले आणि सद्‌गदित होऊन म्हणाले, 'अरे माझ्याजवळ तुला देण्यासारखे काहीच शिल्लक नाही रे. आता फक्त क्षीण होत चाललेला माझा बुंधा आणि कशीतरी तग धरून राहिलेली माझी पाळेमुळे शिल्लक आहेत.' हे सांगताना त्या झाडाच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले होते.

त्यावर मुलगा म्हणाला,'मला सुद्धा खरं म्हणजे फारशी कोणत्याच गोष्टींची गरज उरलेली नाही. आता मला जरूरी आहे ती केवळ विश्रांती घेण्यासाठी थोड्याशा जागेची. गेल्या अनेक वर्षांच्या धडपडींमुळे मी अगदी थकून गेलो आहे.'

झाडाला खूप आनंद झाला आणि ते म्हणाले, 'अरे वा! फारच छान. माझ्या जुन्या पुराण्या बुंध्याला रेलून भोवताली पसरलेल्या मुळांवर बसून तुला छान विश्रांती घेता येईल. ये ये लवकर आरामशीर टेकून बस बरे.' तो लगेच बुंध्याला टेकून विसावला आणि झाडाने डोळयातील आसवांना वाट मोकळी करून दिली.

ही कहाणी आपल्यापैकी प्रत्येकाचीच आहे. झाडाच्या स्वरूपात आपले आईवडील आहेत. आपल्या बालवयात आपल्या आईवडिलांबरोबर खेळण्याचा आपण प्रचंड आनंद घेतलेला असतो. प्रत्येकाला ते खूप आवडते. आपले बालपण संपताच आपण त्यांच्यापासून दूर जातो. आपल्याला एखाद्या गोष्टीची गरज भासली किंवा आपण एखाद्या अडचणीत सापडलो तर त्याच वेळी त्यांची आपल्याला जरूरी लागले. अशावेळी आपले आईवडील कसे आहेत, त्यांची काय परिस्थिती आहे किंबहुना त्यांची आपल्याला मदत करण्याची किती क्षमता आहे हा प्रश्नच आपल्या मनात येत नाही. आपल्याला सुखी झालेले पाहण्यासाठी त्यांच्याजवळ असलेले सर्वस्व देण्यास ते तत्पर असतात. त्या वेळी सुद्धा सर्व शक्तीनिशी ते आपल्या सुखासाठी धडपडतात.

तुम्हाला त्या मुलाचे झाडाबरोबरचे वागणे हे फार निर्दयपणाचे व कठोर वाटले असेल; पण मनाशी नीट विचार करा. आपल्या आईवडिलांबरोबरचे आपले वागणे याहून काही वेगळे असते का? नाही ना? मग आता तरी आईवडिलांवर जिवाभावे प्रेम करा.

❋ ❋ ❋

# एका शहाण्याची गोष्ट

एका गावात एक विद्वान अर्थतज्ज्ञ राहत होता. त्याची ख्याती सर्वदूर पसरलेली होती. तिथल्या राजाने त्याला एकदा चर्चा करायला बोलावले. तो विद्वान राजाला भेटायला गेला. भरपूर वेळ चर्चा झाली, मग राजा विद्वानाला म्हणाला,''महाशय तुम्ही अर्थशास्त्रात खरेच फार विद्वान आहात मग तुमचा मुलगा असा बावळट कसा? त्याला काही शिकवा. त्याला सोने आणि चांदी यात जास्त मौल्यवान काय इतके साधे सुद्धा समजत नाही.'' आणि मोठ्याने हसू लागला. हे ऐकून त्या विद्वानाला फार वाईट वाटले.

घरी गेल्यावर त्याने मुलाला विचारले, ''बाळा, मौल्यवान काय आहे सोने की चांदी?'' ''सोने'' क्षणाचाही विलंब न लावता मुलगा उत्तरला. ''हो. बरोबर आहे तुझे उत्तर. मग तो राजा असा का हसला? म्हणाला, तुला सोने आणि चांदी यात मौल्यवान काय ते माहीत नाही. त्याने तुझ्यावर असला आरोप का लावला? या आधीपण लोक मला या बाबीवरून हसायचे; पण आता माझी चार लोकांत खिल्ली उडवली जाते. तुला माहीत आहे मौल्यवान काय आहे मग लोक असे का करतात ते सांग मला.''

''लोकांवर रूबाब करण्यासाठी आणि प्रतिष्ठा जपायसाठी राजा रोज त्याच्या वाड्याजवळ खोटा दरबार भरवतो. रोज मी शाळेत जातो त्या रस्त्यातच राजाचा वाडा आहे. मी दिसताच राजा मला बोलावून घेतो. त्याच्या सोबत गावातील सारे प्रतिष्ठित लोक तिथेच असतात. राजा एका हातात सोन्याचे नाणे आणि एका हातात चांदीचे नाणे माझ्या समोर धरतो आणि मला सांगतो यातले सगळ्यात किमती नाणे उचल आणि मी चांदीचे नाणे उचलतो. त्यामुळे तिथे असलेले सगळे मोठ्याने हसतात. साऱ्यांना मजा वाटते. असे रोज घडते पण मला सोने आणि चांदी याचे मूल्य कळत नाही असे त्यांनी तुम्हाला का सांगितले ते मला खरेच माहीत नाही.''

मुलाचे हे उत्तर ऐकून विद्वान विचारात पडला. मुलाला सोने चांदी यातला फरक कळतो तरी हा रोज असे का करतो. चांदीचे नाणे मौल्यवान म्हणून उचलतो हे मात्र त्याला उमजत नाही. न राहून त्याने मुलाला विचारले, ''मग तू सोन्याचे नाणे का उचलत नाही? असला मूर्खपणा करून माझी अब्रू चार लोकांत का काढतो?''

मुलगा जरा हसला मग विद्वानाचा हात धरून त्याला आत घेऊन गेला. कपाटातून त्याने एक पेटी काढली आणि उघडली. ती पेटी चांदीच्या नाण्यांनी भरलेली होती हे पाहून विद्वान अवाकच झाला. मुलगा म्हणाला, ''ज्या दिवशी मी सोन्याचे नाणे उचलेन त्या दिवशी हा खेळ बंद होईल. त्यांना मला मूर्ख सिद्ध करून मजा येत असेल तर येऊ द्या; पण जेव्हा मी हुशार होईन तेव्हा मला काहीच मिळणार नाही. मूर्ख असणे वेगळे आणि मूर्ख समजणे वेगळे.''

जीवनात असे बऱ्याच वेळा होते. कोणाला तरी मूर्खात काढण्यासाठी आपण विनाकारण आपले नुकसान करून घेतो आणि कधी कोणी विनाकारण आपणास मूर्खात काढते त्यातून आपला फायदाच होतो. हा एक खेळच असतो. कोणी हारत जिंकते आणि कोणी फक्त जिंकते. कोणी जिंकताना दिसते आणि कोणी न दिसताच जिंकते. कोणत्याही बाजूला राहून खेळा. मात्र नेहमीच सकारात्मक असा. कोणी आपणास कितीही मूर्खात काढले तरी उगाच मनाला त्रास करून घेऊ नका. या गोष्टीला सकारात्मकतेने सामोरे जा आणि सोन्याची एक संधी साधण्यापेक्षा प्रत्येक संधीचे सोने करा.

❋ ❋ ❋

# ऐंशीवा मजला

एका उंच इमारतीच्या ऐंशीव्या मजल्यावर दोन भाऊ एकत्र राहत होते. एक दिवस कामावरून परत आल्यावर लिफ्ट नादुरूस्त असल्याचे त्यांच्या लक्षात आले. आता घरी पोहोचण्यासाठी ऐंशी मजल्याच्या पायऱ्या आपल्याला चढून जाव्या

लागतील असे लक्षात आल्यामुळे ते दोघेही गोंधळून गेले. २० व्या मजल्यावर पोहोचेपर्यंतच ते दोघे दमून गेले. त्यांच्या हातात सामानाच्या बॅगांचे ओझे पण होते. त्या बॅगा तिथेच सोडून वर जाण्याचे त्यांनी ठरविले व दुसऱ्या दिवशी बॅगा घेऊन जायचे असे नक्की केले. बॅगांशिवाय ते थकतभागत वर चढू लागले.

थांबत थांबत कसेतरी ते चाळिसाव्या मजल्यावर पोहोचले. तोपर्यंत ते गलितगात्र होऊन वैतागून गेले होते. लहान भाऊ फारच कुरकुर करायला लागला होता. दोनही भावात वादावादी सुरू झाली होती. भांडत भांडत जिने चढण्याची मारामारी सुरूच होती. थोडयाच वेळात ते साठाव्या मजल्यावर येऊन पोहोचले.

इतके वर चढून आल्यावर त्यांच्या लक्षात आले की आता फक्त वीसच मजले चढून जाणे बाकी राहिले आहे. तिथून पुढे न भांडता शांतपणे वर चढून जाण्याचे त्यांनी ठरविले. त्यानंतर धीराने व शांतपणे ते राहिलेले वीस मजले चढून घरापाशी आले. दोघेही घराच्या दाराकडे तोंड करून शांतपणे उभे राहिले. दुसरा केव्हा एकदा दार उघडतो याची वाट पाहत उभे होते. काही वेळ गेल्यावर दोघांच्याही लक्षात आले की घराची चावी बॅगेत राहिली आहे आणि दोघांच्याही बॅगा विसाव्या मजल्यावर ठेवून ते वर चढून आले आहेत.

ही गोष्ट आजच्या जमान्यात आपल्याला लागू पडणारी आहे. ऐंशी मजल्याची उंच इमारत म्हणजे आपले लांबत चाललेले आयुष्य. बरेच जण ऐंशी मजल्यापर्यंत चढून जातात तर काही जण खालच्या मजल्यावर थांबतात. पुष्कळ जण आपल्या सोबत्याच्या साथीने सगळे मजले चढून जातात.

हे ८० मजले चढून जाणे म्हणजेच आपल्या आयुष्याची ८० वर्षे जगणे. २० व्या मजल्यावर पोहोचणे म्हणजेच आयुष्याची वीस वर्षे आपण आपल्या आईवडील व मित्रांबरोबर जगलेला काळ असतो. ती वर्षे आपल्या मनातील मनसुबे रचण्याची, उत्साहाची व खूप महत्त्वाकांक्षी स्वप्ने पाहण्याची असतात. त्या काळात आपल्याला विचार करायला पण फुरसद नसते.

त्यानंतरच्या वीस वर्षांच्या काळात आपला जोडीदार व इतर सगेसोयरे आपल्याबरोबर असतात. आपल्याला ज्या गोष्टी मनापासून आवडतात व आपण त्या करायला खूप उत्सुक असतो. अशा अनेक गोष्टी करताना आपली दमछाक होते, त्या आपल्याला करताच येत नाहीत. आपण इतक्या मानसिक तणाव व दबावाखाली जगत असतो की चाळिसाव्या वर्षी आपण थकून जातो. हे सगळे मनसुबे गुंडाळून ठेवतो. त्यानंतर आपल्या आयुष्याची वाटचाल फार धिम्या गतीने होत असते. आपण वयाच्या साठाव्या वर्षाला पोहोचतो. आपली दूरदृष्टी लोप पावून आपली स्वप्ने विरून जातात. आपण असमाधानी होतो. सतत तक्रारीचा सूर सुरू होतो. दुसऱ्याबद्दल चिकित्सा करण्याची सवय लागते. एकूणच आपला सर्व गोष्टीतील इंटरेस्ट संपलेला असतो. निर्विकार व निरिच्छपणाने आला दिवस आपण ढकलत असतो. साठीच्या वयाला आपल्याला कळून चुकते की आता फारसे काही करण्याचे शिल्लक राहिले नाही. काही करण्याची शक्यता नाही. आणि मग आपण आपल्या शेवटच्या टप्प्यातील प्रवासाला शांतपणे मार्गस्थ होतो. आपली अनेक स्वप्ने अपुरी राहिल्याकारणाने आपण निराश अवस्थेत असतो; पण काहीही करू शकत नाही.

यासाठीच जे काही करायचे ठरविलेले असते, ज्या काही योजना मनात असतात त्याची सुरुवात धडाक्याने पहिल्या वीस वर्षातच करणे शहाणपणाचे असते. आपल्या प्रत्येकाजवळ ती जिद्द असते, उत्साह असतो.

❋ ❋ ❋

# काकनीति

एके दिवशी एक कावळा व त्याचे पिल्लू झाडावर बसले होते. पिल्लू वडिलांना म्हणाले, ''मी आजपर्यंत सगळ्या प्रकारचे मांस खाल्ले... पण दोन पायांच्या माणसाचे मांस कधीच खाल्ले नाही. बाबा, कसा स्वाद असतो हो माणसाच्या मांसाचा?''

कावळा म्हणाला, ''आजपर्यंत जीवनात मी खूप वेळा माणसाचे मांस खाल्ले आहे. खूपच चविष्ट असते ते!'' पिल्लू लगेच हट्ट करू लागले, ''मला पण त्याची चव घ्यायची आहे.'' कावळा म्हणाला, ''ठीक आहे, पण थोडा वेळ वाट पाहावी लागेल

आणि मी सांगेन तसे तुला करावे लागेल. ही चतुराई मी माझ्या बाबांकडून शिकलो आहे. तुला आता शिकायला हरकत नाही. थोडा धीर धर.''

पिल्लू म्हणाले, ''ठीक आहे. वाट पाहतो.''

नंतर कावळ्याने मुलाला एका जागी बसवले व तो उडून निघून गेला. परत येताना मांसाचे दोन तुकडे तोंडात घेऊन आला. एक तुकडा स्वत:च्या तोंडात धरला व दुसरा तुकडा पिल्लाच्या तोंडात दिला. पिल्लू म्हणाले, ''शी, हे किती घाणेरडे आहे. मला नको.''

कावळा म्हणाला, ''थांब, तू म्हणतोस ते बरोबर आहे, हा तुकडा खाण्यासाठी नाहीच आहे. तो फेकण्यासाठीच आहे!! बेटा गंमत यापुढेच आहे.'' पिल्लू म्हणाले, ''म्हणजे?'' त्यावर कावळा म्हणाला, ''उद्यापर्यंत वाट बघ. हा एक तुकडा टाकून आपण मांसाचे ढीग तयार करणार आहोत.''

पिल्लाला हे काही कळले नाही; पण बापाच्या हुशारीवर त्याचा विश्वास होता. थोड्या वेळाने कावळा एक तुकडा घेऊन आकाशात उडाला आणि त्याने तो तुकडा एका मंदिरात टाकला. परत येऊन दुसरा तुकडा उचलला व तो दुसरा तुकडा एका मशिदीच्या आंत टाकला, आणि शांतपणे झाडावर येऊन बसला. पिल्लाला बघून म्हणाला, ''आता आपली चंगळ आहे. मांसच मांस. अगदी स्वादिष्ट..!'' पिल्लाला नीटसे समजले नाही पण पिल्लाचा आनंद गगनात मावेना.

आणि इतक्यात.....

सगळीकडे गलका झाला. ना कोणाला कोणाचे ऐकू येत होते, ना कोणी कोणाचे ऐकून घेत होते. आमच्या धर्माचा अपमान झाला आहे त्याचा बदला आम्ही घेणारच. फक्त असेच शब्द दोन घोळक्यांतून ऐकू येते होते. शब्दाने शब्द वाढत होते. प्रकरण हातघाईवर आले. हाणामारी चालू झाली. धर्माच्या नावाखाली एकमेकांवर वार चालू झाले. नि:ष्पाप लोकांचे नाहक जीव जाऊ लागले. चोहीकडे रक्ताचे सडे पडले. रस्ते, मंदिर, मसजिदीची आवारे लाल रक्तानी माखली गेली.

या लाल रंगात कोठल्याही धर्माची छटा नव्हती....

खूप वेळ निघून गेला. पोलिसांच्या गाडीचे सायरन ऐकू येऊ लागले. पांगापांग झाली. गाव निर्मनुष्य भकास झाले. या रक्तपाताचे दोन साक्षीदार झाडावर बसून आपले इमले मनातल्या मनात मांडत होते.

बाप पिल्लाला म्हणाला, ''बेटा, कळले का तुला, शिंक्याचे तुटले, बोक्याचे फावले'. आता या पुढचे चार दिवस केवळ आपल्या चैनीचे.''!!

❃ ❃ ❃

# काचेची बरणी

अनेक वेळा तुमच्या आयुष्यात एकाच वेळी अनेक गोष्टी करण्यासाठी समोर असतात. अशा परिस्थितीत तुम्हाला दिवसाचे २४ तास अपुरे आहेत असे जाणवू लागते. नेमक्या या अवस्थेत तुम्ही पुढे येणारी 'काचेची बरणी' या गोष्टीची आठवण करा. ती गोष्ट अशी आहे.

विद्यापिठात तत्त्वज्ञान विषयाचा तास भरलेला असतो. वर्गात प्राध्यापक येऊन मुलांना नवीन धडा शिकविणार असतो. त्याच्यासमोर टेबलावर त्यांनी काही वस्तू मांडून ठेवलेल्या असतात. क्लासमध्ये शांतता पसरलेली असते. प्राध्यापक काय बोलतात याकडे सर्वांचे लक्ष लागलेले असते. टेबलावर असलेल्या वस्तूंपैकी प्राध्यापक काचेची बरणी उचलतात. त्या बरणीत जवळच असलेल्या टोपलीतील गोल्फचे छोटे छोटे बॉल एक एक करून भरतात. बरणीत वरपर्यंत बॉल भरले जातात.

वर्गाला ती बरणी दाखवून प्राध्यापक विचारतात, ''तुम्हाला ही बरणी भरलेली दिसते आहे का?'' अर्थातच विद्यार्थी होकार दर्शवितात.

टेबलावर एका खोक्यात गारगोट्या ठेवलेल्या असतात. प्राध्यापक त्या गारगोट्या हळूहळू त्या बॉलनी भरलेल्या बरणीमध्ये टाकतात. ती बरणी उचलून गोलाकार फिरवितात. साहजिकच बरणीतील बॉल नंतर आत सोडलेल्या गारगोट्यांना जागा करून देतात व त्या गारगोट्या त्या बरणीत बॉलच्या मधे असलेल्या जागेत अलगद सामावल्या जातात.

त्यानंतर प्राध्यापक पुन्हा विद्यार्थ्यांना विचारतात आता बरणी पूर्ण भरलेली दिसते का? विद्यार्थी हो म्हणतात. प्राध्यापक परत एक खोके उचलतात. त्यात वाळू भरलेली असते. प्राध्यापक ती वाळू त्या भरलेल्या बरणीत ओततात. अर्थातच, वाळू घरंगळत मिळेल त्या जागेत जाऊन बरणीत जाऊन बसते.

पुन्हा एकदा प्राध्यापक तोच प्रश्न विचारतात की बरणी आता तरी पूर्ण भरली का? एका आवाजात विद्यार्थी होकार देतात.

टेबलाखाली प्राध्यापक महाशयांनी आणखी एक गोष्ट ठेवलेली असते. एका किटलीमध्ये दोन कप कॉफी असते ती ते वर्गाला दाखवितात आणि ती बरणीमध्ये सावकाशपणे ओततात. बरणीमध्ये भरलेल्या इतर गोष्टी व विशेषत: बारीक वाळूच्या कणांमध्ये जी जागा होती त्यात ती ओतलेली कॉफी सहज जाऊन बसली. ते पाहून सगळे विद्यार्थी खळखळून हसले.

त्यांचे हसणे थोडेसे निवळल्यावर प्राध्यापक खऱ्या अर्थाने आजच्या अभ्यासक्रमाकडे वळले. ते म्हणाले, ‘‘ही बरणी तुमच्या आयुष्याचे प्रतिकात्मक स्वरूप आहे हे तुम्ही लक्षात घ्या. गोल्फचे चेंडू हे तुमच्या आयुष्यातील महत्त्वाचे घटक आहेत. ते म्हणजे, तुमचे कुटुंब, मुले जे तुमची प्रकृती, मित्र आणि तुमचे आवडते छंद. आयुष्यात इतर सर्व गोष्टी जरी तुम्ही गमावल्यात आणि या जर समाधान देणाऱ्या असतील तरी तुमचे आयुष्य सार्थकी लागल्यासारखे तुम्हाला वाटेल.

‘‘बरणीमध्ये आपण भरलेल्या गारगोट्या म्हणजे, तुमच्या आयुष्यातील दुय्यम गोष्टी जश्या तुमचा व्यवसाय, नोकरी, घर किंवा कार.

‘‘बाकीच्या राहिलेल्या किरकोळ गोष्टी म्हणजेच आपण बरणीमध्ये भरलेली वाळू. त्या नगण्य असतात.

‘‘जर सर्वांत प्रथम बरणीमध्ये वाळू भरलीत तर इतर कोणत्याही गोष्टींना बरणीमध्ये जागाच शिल्लक राहणार नाही. मग गोल्फचे चेंडू, गारगोट्या आत जाऊच शकणार नाहीत. बरोबर हीच गोष्ट तुमच्या आयुष्याला लागू पडते.

‘‘तुम्ही तुमचा बहुमूल्य वेळ किरकोळ व नगण्य बाबींमध्ये वाया घालविला तर महत्त्वाच्या गोष्टींसाठी तुम्हाला वेळच शिल्लक राहणार नाही.

‘‘म्हणूनच......

‘‘ज्यामुळे तुम्हाला मनस्वी आनंद मिळतो त्या तुमच्या आत्यंतिक आवश्यक गोष्टींवर लक्ष केंद्रित करा.

‘‘तुमच्या मुलांबरोबर भरपूर वेळ घालवा. प्रकृती नीट राहण्यासाठी नियमितपणे तपासणी करून योग्य तो सल्ला घ्या. तुमच्या कुटुंबाबरोबर बाहेर जा. त्यांना घेऊन एखाद्या रेस्टॉरंटमध्ये जेवायला जा.

‘‘मधून मधून घर स्वच्छ करा व घरातील नको असलेल्या वस्तू काढून टाकून नव्या वस्तूंना जागा करा.

‘‘गोल्फच्या बॉल्सची सर्वांत जास्त काळजी घ्या. त्या तुमच्यासाठी अत्यंत महत्त्वाच्या असतील. तुमच्या गरजेचे अग्रक्रम नक्की करा. उरलेल्या गोष्टी वाळूप्रमाणे किरकोळ असतील.’’

त्यानंतर एका विद्यार्थ्याने विचारले,‘‘सर सर्व गोष्टींचे संदर्भ समजले, पण कॉफीचे काय प्रयोजन ते समजले नाही.’’

प्राध्यापक मनापासून हसले आणि म्हणाले, ‘‘तुम्हाला हा प्रश्न पडला याचा मला खूप आनंद झाला. कॉफीमुळे एक गोष्ट सिद्ध होते. इतर सर्व गोष्टीमुळे तुमचे आयुष्य कितीही समाधानी व समृद्ध झाले तरी कॉफी आणि त्याबरोबर तुमचे मित्र त्यांच्याबरोबरच्या गप्पा यासुद्धा तुमचे आयुष्य आनंदी करण्यास आवश्यक असतात.’’

❋ ❋ ❋

# कावळा, पोपट आणि मोर

एक कावळा रानामध्ये स्वच्छंदी आयुष्य मजेत जगत होता; पण एके दिवशी त्याने राजहंसाला पाहिले. तो मनात म्हणाला, ''वाहा! किती पांढरा सफेद रंग आहे त्या राजहंसाचा. आणि मी मात्र काळा ढुस्स आहे.... तो राजहंस या जगात सर्वांत सुखी पक्षी असेल.''

त्याने हा मनात आलेला विचार राजहंसाजवळ जाऊन बोलून दाखविला. राजहंस म्हणाला, ''हो ना, मी पण पोपटाला पाहीपर्यंत सगळ्यात सुखी पक्षी आहे; असेच समजत होतो. पोपटाला दोन रंग असतात. मला वाटते पोपट हाच जगात सर्वांत सुखी पक्षी असेल.''

कावळा ते ऐकून पोपटाकडे गेला. पोपट कावळ्याला म्हणाला,''मी मोराला पाहण्यापूर्वी असेच समजत होतो की, मीच सगळयात सुंदर व सर्वांत सुखी पक्षी आहे. पण एक दिवस मी मोराला पाहिले आणि वाटले मला तर दोनच रंग आहेत. मोराला कितीतरी वेगवेगळे रंग आहेत.''

त्यानंतर कावळा मोराला भेटायला पक्षी आणि प्राणी संग्रहालयात गेला. तिथे मोराला पाहायला शेकडो लोक त्याच्या पिंजऱ्याभोवती जमले होते. सगळे लोक गेल्यानंतर कावळा मोराला म्हणाला, ''हाय मोर मित्रा, तू फारच देखणा दिसत आहेस, दर दिवशी हजारो लोक तुला पाहायला येतात. लोक मला जेव्हा पाहतात तेव्हा ते मला ताबडतोब हाकलून देतात. मला उडून जाण्यास भाग पाडतात. या जगात सर्वांत सुखी पक्षी तूच आहेस.''

मोर कावळ्याला म्हणाला, ''मला नेहमी वाटत असे की या अवकाशात माझ्याइतका सुंदर व सुखी दुसरा कोणीच नसेल. पण खरे सांगू? या माझ्या सुंदर दिसण्यामुळेच मला या प्राणी संग्रहालयात पिंजऱ्यात कोंडून राहावे लागते आहे. मी सगळे संग्रहालय काळजीपूर्वक तपासले. मला खात्री पटली की कावळा हा एकच पक्षी असा आहे की जो पिंजऱ्यात बंद करून ठेवलेला नाही. म्हणूनच गेले अनेक दिवस मला वाटते आहे की मी कावळा असतो तर मलाही त्याच्याप्रमाणे आनंदाने आकाशात भराऱ्या मारता आल्या असत्या.''

आपली पण हीच समस्या असते. आपण विनाकारण इतरांशी तुलना करतो आणि मग दु:ख ओढवून घेतो. देवाने आपल्याला काय दिले आहे याचा आपण विचारच करीत नाही. हे एक प्रकारचे नाराज होण्याचे दुष्टचक्र आहे. आनंदी राहण्याचे तंत्र माहिती करून घ्या व तसे राहण्याचा प्रयत्न करा.

❋ ❋ ❋

# कुजलेल्या बटाट्याचा दुर्गंध

एका बालवर्गाची शिक्षिका तिच्या वर्गात एक प्रयोग करण्याचे ठरविते. वर्गातील मुलांना दुसऱ्या दिवशी येताना एका प्लास्टिकच्या पिशवीमधून थोडेसे बटाटे आणण्यास सांगते. प्रत्येक विद्यार्थी त्याला स्वत:ला ज्या व्यक्तीचा राग येत असेल किंवा ज्या व्यक्तीचा तो विद्यार्थी किंवा ती विद्यार्थिनी तिरस्कार करीत असेल अशा व्यक्तीचे नाव आपल्या एका एका बटाट्याला देण्याचेही सांगते. याचाच अर्थ असा की विद्यार्थी जितक्या व्यक्तींबद्दल नाराज असेल तितके बटाटे त्याच्या पिशवीत असावेत.

दुसऱ्या दिवशी शिक्षिकेने सांगितल्याप्रमाणे प्रत्येक विद्यार्थी त्याला आवडत नसलेल्या व्यक्तींच्या इतके बटाटे पिशवीत भरून घेऊन येतात. काही जणांच्या पिशवीत दोन तर काहींच्या पिशवीत तीन तर काहींच्या पिशवीत पाच सुद्धा बटाटे आलेले असतात. वर्गात शिक्षिका सांगते की पुढील एक आठवडा सर्व विद्यार्थी जिथे जिथे जातील तिथे तिथे त्यांनी ती बटाट्याची पिशवी जवळ बाळगून न्यायची.

एका मागून एक दिवस पुढे सरकतो. हळूहळू पिशवीतील बटाटे कुजायला सुरुवात होते. त्याला नष्ट वास येऊ लागतो. त्या असह्य दुर्गंधीमुळे वैतागून विद्यार्थी तक्रार करू लागतात. त्यांना त्यांच्या रोजच्या वजनदार दप्तराबरोबर त्या कुजून वाढलेल्या वजनाच्या बटाट्याच्या पिशवीचे ओझे पण बाळगावे लागत होते.

एका आठवड्यानंतर शिक्षिकेने वर्गाला विचारले, ''काय? मागचा एक आठवडा कुजक्या बटाट्याची पिशवी सतत जवळ बाळगताना कसे वाटले?'' सर्व विद्यार्थ्यांनी एकच गलका करुन ती कुजक्या बटाट्याची पिशवी जवळ बाळगताना झालेल्या त्रासाची तक्रार केली. आठवडाभर आलेले नैराश्य त्यांनी जोरदार व्यक्त केले. त्यानंतर शिक्षिकेने तसे करायला सांगण्यामागचे खरे कारण ऐकविले. शिक्षिका म्हणाली, ''बाळांनो, तुम्ही तुमच्या मनात सतत बाळगत असलेली एखाद्या व्यक्तीबद्दलची नाराजी, तिरस्कार, राग या कुजलेल्या बटाट्यासारखीच परिस्थिती निर्माण करीत असते. तुमच्या मनातील भावना अशीच खदखदत राहते. ही तिरस्काराची, रागाची भावना तुमच्या मनाला व हृदयाला दूषित करत राहते. तुम्ही जाल तिथे ती मनाची अवस्था कायम असते. कुजलेल्या बटाट्याचा दर्प तुम्ही एक आठवडासुद्धा सहन करू शकला नाहीत. मग कल्पना करा तुम्ही बाळगत असलेला राग किंवा तिरस्कार वर्षानुवर्ष तुम्ही सहन करू शकाल का?''

**तात्पर्य** : तुमच्या मनात असलेला राग किंवा तिरस्कार मनातून काढून टाका. आयुष्यभराचे हे ओझे व पाप यापासून मुक्त व्हा. दुसऱ्याला माफ करणे हा दृष्टिकोन ठेवा. दुसरा कोणी आवडत नसेल तरी त्याच्यावर प्रेम करायला शिका.

सर्वार्थाने परिपूर्ण माणसावर केलेले प्रेम यात विशेष असे काहीच नसते, तर कमीपणा असणाऱ्या माणसावर प्रेम करणे हे खरे उचित असते.

❋ ❋ ❋

# कुत्र्याचे जगणे.....

**दु**कान बंद करण्याची वेळ झालेली असते. एका खाटकाच्या दुकानात त्याच वेळी एक कुत्रा शिरतो. त्या कुत्र्याला पाहून तो खाटीक चक्रावून जातो. तो त्या कुत्र्याला घालवून देण्याचा प्रयत्न करतो, परंतु कुत्रा बाहेर जातच नाही. अखेर तो खाटीक कुत्र्याजवळ जातो. पाहतो तर त्याने तोंडात एक चिठ्ठी पकडून आणलेली असते. तो ती चिठ्ठी घेतो आणि वाचतो. त्यांत लिहिलेले असते, 'अर्धा किलो मटण आणि थोडे कलेजा तुकडे मिळतील का?' त्या चिठ्ठीबरोबर त्यासाठी लागणारे पैसेही असतात. खाटीक ते पैसे घेतो आणि चिठ्ठीप्रमाणे मटण व कलेजा पिशवीत घालतो. ती पिशवी तो त्या कुत्र्याच्या तोंडात धरायला देतो. त्या खाटकाला भयंकर आश्चर्य वाटते. दुकान बंद करण्याची वेळ झालेली असते, त्यामुळे दुकान बंद करून तो खाटीक त्या कुत्र्यापाठोपाठ जाण्याचे ठरवितो.

कुत्रा पुढे आणि त्याच्या पाठोपाठ तो खाटीक चालत जात असतात. रस्त्याने जाताना ट्रॅफिक सिग्नल येतो. लाल दिवा असतो. कुत्रा थांबतो. तोंडातील पिशवी खाली ठेवतो. रस्ता ओलांडण्यासाठी हिरवा दिवा येताच रस्ता क्रॉस करतो. त्याआधी खाली ठेवलेली पिशवी उचलायला तो विसरत नाही. त्याच्या मागे तो खाटीकही रस्ता ओलांडून येतो.

पुढे आल्यानंतर कुत्रा एका बसस्टॉपजवळ थांबतो. बसस्टॉपजवळ बस येताच कुत्रा आपला डावा पाय उचलून बस थांबविण्यासाठी खूण करतो. बस थांबल्यावर सराईतपणे कुत्रा बसमध्ये चढतो. खाटीक अवाक् होऊन पण यांत्रिकपणे त्या कुत्र्यापाठोपाठ बसमध्ये चढतो. बसमध्ये शिरताच कुत्रा त्याच्या पट्ट्याला बांधलेला बसचा पास त्या बसच्या कंडक्टरला दाखवितो. हे पाहून तो खाटीकच नव्हे तर बसमधील सर्व प्रवासी सुद्धा आश्चर्यचकित होतात. त्या खाटकाला तर फीटच यायची वेळ येते. कुत्रा नेहमीच्या सवयीप्रमाणे ड्रायव्हरच्या शेजारी जाऊन बसतो व आपल्याला हव्या असणाऱ्या बसस्टॉपची वाट पाहू लागतो. ओळखीचा परिसर येताक्षणी उभा राहतो आणि बस थांबविण्यासाठी शेपटी हालवून खूण करतो. बसस्टॉप जवळ येताच बस थांबण्याच्या आधीच उडी मारून कुत्रा खाली उतरतो आणि जवळच असलेल्या एका घराच्या दिशेने जातो.

बंगल्याचा बाहेरचा लोखंडी दरवाजा ढकलून उघडतो आणि घराच्या मुख्य दरवाजाजवळ जाऊन थबकतो. तो जसा घराच्या मुख्य दरवाजाजवळ जातो तसा दोन मिनिटे विचार केल्यासारखा स्तब्ध उभा राहून आपला बेत बदलतो आणि बंगल्याच्या बागेच्या बाजूला वळतो. मागील खिडकीजवळ जातो आणि खिडकीच्या जाळीवर डोक्याने धक्के देऊन आवाज करतो. बऱ्याच वेळा तसा आवाज केल्यानंतर परत वळतो आणि पुन्हा घराच्या दरवाजाजवळ येऊन थांबतो. खाटीक हे सर्व पाहातच असतो. एवढ्यांत घरातील एक मोठा माणूस घराचे दार उघडतो आणि तावातावाने कुत्र्याला रागवायला लागतो. शिव्या द्यायला लागतो. इतके करून न थांबता तो कुत्र्याला दोन सणसणीत दणके देतो. त्याच्याकडे खूप चवताळून पाहतो. त्या खाटकाला त्या माणसाच्या या वागण्याचे भयंकर नवल वाटून तो धावतच पुढे येतो. त्या माणसाला कुत्र्याला आणखी मारण्यापासून थोपवितो, विनवण्या करतो. ''अहो आपण हे काय करता आहात? कृपा करून असे करू नका. हा तुमचा कुत्रा किती इमानदार, समजूतदार आणि हुशार आहे हो! अहो त्याला टीव्ही वर वगैरे प्रसिद्धी द्यायला हवी.''

यावर तो कुत्र्याचा मालक म्हणतो,''याला तुम्ही हुशार म्हणता? ह्या मूर्ख कुत्र्याने या आठवड्यात दोन वेळा बाहेर जाताना स्वत:ची घराची चावी घरीच विसरली.''

**तात्पर्य :** तुम्हाला पाहणाऱ्या लोकांच्या अपेक्षेपेक्षा तुम्ही कितीही पटीने उत्तम काम करीत असाल तरीही तुमच्या साहेबांच्या नजरेत तुम्ही कुचकामी, कामचुकार, विसराळू व आळशीच असता. शेवटी नोकरी म्हणजे एखाद्या कुत्र्याचेच जिणे असते ना?

❋ ❋ ❋

# केकचा चविष्ट तुकडा

कधी कधी आपल्यावर येणाऱ्या आपत्तींमुळे आपल्याला प्रश्न पडतो की हे सगळे एका पाठोपाठ एक माझ्याच वाटेला का येत आहे? माझ्या हातून असा काय अपराध घडतो आहे की ज्याची शिक्षा मला देव देत आहे? असा प्रश्न बरेच वेळा पडला की अस्वस्थ होऊन जायला होते. त्याचेच एक उदाहरण द्यावेसे वाटते ते असे.

एक दिवस मधुरा तणतणतच शाळेतून घरी आली. घरात शिरल्याबरोबर शाळेचे दप्तर बेडवरच फेकून देऊन तिने आईला हाक दिली. थोड्याशा रडवेल्या पण खूप रागावलेल्या सुरात तिने आईला प्रश्न केला, ''माझ्याच बाबतीत असे का घडते ते मला समजत नाही. सगळ्या गोष्टी माझ्या विरुद्ध का घडतात?'' तिला गणित विषयात अपेक्षेपेक्षा खूपच कमी मार्क पडले होते. तिच्या बऱ्याच जवळच्या मित्राने दुसऱ्या एका मुलीसाठी तिची मैत्री सोडली होती. या सगळ्या घटनांमुळे ती स्वत:वरच भयंकर चिडली होती.

अशा अवघड प्रसंगामध्ये मुलीला कसे शांत करायचे हे तिच्या आईला चांगले ठाऊक होते. आई म्हणाली, ''चल तुला मस्त केक करते'' असे म्हणून आईने मुलीला घट्ट जवळ घेतले आणि थोपटले. तसेच तिला कुशीत घेऊन ती स्वयंपाकघरात गेली. मधुराचा रागावलेला व गेलेला मूड थोडासा बदलला. तिच्या चेहऱ्यावर हसू फुटले. केक तयार करण्यासाठीची सगळी भांडी व साहित्य आईने भराभर स्वयंपाकाच्या टेबलावर काढून ठेवले. मधुरा समोरच बसून सर्व लक्ष देऊन पाहत होती. आईने मग प्रेमाने मधुराला विचारले, ''बबडे, तुला केकचा लहानसा तुकडा खायला आवडेल ना?''

मधुरा खुशीत येऊन म्हणाली, ''हो, नक्कीच. अगं आई तुला माहीत आहे ना मला केक किती आवडतो ते.'' ''ठीक आहे. तर मग या भांड्यातील थोडेसे तूप पिऊन टाक.'' आई म्हणाली, ''अगं काहीतरीच काय सांगतेस? मुळीच नाही हं!'' मधुराला धक्का बसून ती ओरडलीच.

त्याकडे लक्ष न देता आईने विचारले,''बरे तर मग जरा दोन कच्ची अंडी फोडून तोंडात टाक.''

तिच्या त्या आज्ञेने अवाक् होऊन मधुराने आईला विचारले,''आई, तू माझी चेष्टा तर करीत नाहीस ना?''

त्यावरही आईने निर्विकार मुद्रेने विचारले, ''जाऊ दे. बाळा, थोडासा मैदा तरी खाणार का?''

आता मात्र मधुरा किंचाळलीच. ''आई, तू जे काही मला करायला सांगते आहेस, ती माझी चेष्टा तर करीत नाहीस ना? त्यामुळे मी आजारी पडेन हे तुझ्या लक्षात येते आहे का?''

आईने समजावणीच्या सुरात सांगितले, ''आता आले का लक्षात? या सर्वच गोष्टी मूळ स्वरूपात त्यावर काहीही प्रक्रीया न करता जर खाल्ल्यास तर त्यांची चव आपल्याला अजिबात आवडत नाही. पण त्याच गोष्टी एकत्र करून त्यावर स्वयंपाकाचे संस्कार केले की त्या लगेच चविष्ट बनतात. त्यालाच आपण केक केला असे म्हणतो.'' याप्रमाणेच परमेश्वर योजना करीत असतो. आपण अनेक वेळा संभ्रमात पडतो की, मला एकापाठोपाठ इतक्या अडचणी येत आहेत. समजत नाही यातून काय निष्पन्न होणार आहे, आणि आपली काय परिस्थिती होणार आहे. ते त्या परमेश्वरालाच ठाऊक असते आणि अशा अडचणीतून तोच मार्ग दाखवून देतो. अडचणीतून बाहेर काढतो. आपण या कच्च्या वस्तूंमध्ये न अडकून पडता, त्यापासून होणाऱ्या केकची आठवण ठेवली पाहिजे. येणाऱ्या अडचणीच्या वेळी आपण देवावर विश्वास ठेवला पाहिजे. त्यातूनच काहीतरी अद्‌भुतरम्य घटना घडणार असते.

परमेश्वर आपल्यावर एवढी माया करतो, तो दर वसंतऋतूमध्ये आपल्यासाठी सुंदर फुले निर्माण करतो, प्रत्येक सकाळी आपल्यासाठी सूर्य उगवून प्रकाश देतो.

आपण देवाची केव्हाही मनोभावे प्रार्थना केली तर तो आपल्या हाकेला लगेच धावून येतो.

परमेश्वर या विश्वात कोठेही असला तरी तो कायम आपल्या हृदयात वसलेला असतो. त्याला वंदन कर.

❋ ❋ ❋

# केल्या कर्माचे फळ

एका खेड्यात एक स्त्री रोज आपल्या कुटुंबासाठी चपात्या करीत असे. कुटुंबासाठी लागणाऱ्या एकूण चपात्यांपेक्षा ती एक चपाती जादा करीत असे व ती गरजू माणसासाठी राखून ठेवित असे. ती चपाती रोज ती स्त्री घराच्या रस्त्याच्या बाजूच्या खिडकीच्या चौकटीत ठेवित असे. तिथून ज्याला जरूर असेल त्याला ती घेणे सोयीचे होते. गेले बरेच दिवस एक कुबडा गरीब बिचारा ती चपाती नित्यनियमाने घेऊन जात असे. चपाती घेताना तो कधीच देणाऱ्या त्या स्त्रीचे उपकार बोलून मान्य करीत नसे. त्याऐवजी तो रोज नियमाने एकच वाक्य मोठ्याने म्हणून जात असे. ते म्हणजे, ''तुम्ही केलेले वाईट कर्म तुमच्या जवळच राहाते; पण तुम्ही केलेले उपकाराचे चांगले कर्म उलटून तुमच्याकडे परत येते.'' याचाच अर्थ जसे करावे तसे भरावे असा होता.

हा परिपाठ गेले कित्येक दिवस असाच अव्याहतपणे चालू होता. दर दिवशी ती खिडकीतील चपाती घ्यायला तो कुबडा येणार व ते वाक्य मोठ्याने बोलून जाणार हे घडतच होते. काही दिवसांनंतर त्या स्त्रीला रोज हे ऐकून चिडायला झाले. ती मनात म्हणाली, ''काय म्हणावं याला? कृतज्ञता व्यक्त करणे तर राहिलेच. पण रोज हा कुबड्या हे एक वाक्य बडबडतो आणि चपाती घेऊन जातो. वैताग आला आहे. काय म्हणायचे आहे त्याला समजतच नाही.''

एक दिवस ती या प्रकारामुळे खूपच प्रक्षुब्ध होऊन त्या कुबड्याच्या त्रासातून मुक्त होण्याचे ठरविते. आणि तिने काय केले ठाऊक आहे? त्याच्यासाठी बनविलेल्या चपातीमध्ये तिने विष कालविले. ती चपाती त्या दिवशी कुबड्यासाठी खिडकीच्या चौकटीत ती ठेवायला निघाली; पण तिचे हात थरथरायला लागले. मन तयार होईना. तिच्या मनात आले, ''अरे बापरे! आपण हे काय करायला निघालो आहोत?'' क्षणार्धात ती मागे वळली. ती चपाती झटकन तिने चुलीच्या आगीत टाकून दिली. जाळून टाकली. दुसरी ताजी चपाती तयार केली आणि ती चपाती तिने खिडकीच्या चौकटीत नेऊन ठेवली. नित्यनियमाप्रमाणे तो कुबडा आला, त्याने ती चपाती घेतली, त्याचे नेहमीचे वाक्य तो बोलला आणि चपाती घेऊन दिसेनासा झाला. त्याला त्या स्त्रीच्या मनात चाललेले द्वंद्व समजलेच नाही. ते शक्यही नव्हते. प्रत्येक दिवशी ती स्त्री चपाती खिडकीच्या चौकटीत ठेवीत असे आणि लगेच तिच्या मुलाच्या भल्यासाठी ती देवाची करूणा भाकत असे. तिचा मुलगा दूरदेशी त्याचे नशिब आजमावण्यासाठी गेला होता. त्याला जाऊन बरेच महिने झाले होते. त्याच्याकडून काहीच खुशाली समजली नव्हती. त्या दिवशी सुद्धा तिने तो

सुखरूप परत येण्यासाठी देवाची प्रार्थना केली.

त्या दिवशी सायंकाळी घराच्या दारावर कोणीतरी टकटक केली. तिने दार उघडताच ती आश्चर्यचकित झाली. दारात अचानक तिचा मुलगा येऊन उभा होता. तो खूप अशक्त झाला होता. दमलेला दिसत होता. उपाशी दिसत होता. त्याचे कपडे मळलेले व फाटलेले होते. आपल्या आईला पाहताच तो म्हणाला, ''आई, मी घरी येऊन पोहोचलो हा चमत्कारच म्हणावा लागेल. मी आपल्या घरापासून फार तर एक दोन मैलांवर होतो. भयंकर भुकेमुळे गलितगात्र झालो होतो. मी जमिनीवर कोसळलोच होतो. माझी अगदी मरणावस्था झाली होती. इतक्यात कुठून तरी एक म्हातारा कुबडा त्या वाटेने जात होता. मी त्याच्याजवळ खायला दोन घास भीक मागितली. आणि त्याने दया येऊन मला त्याच्याजवळची एक चपाती दिली. त्याने ती मला दिली आणि तो म्हणाला, ''मी रोज अशीच चपाती खातो. आज मी ती तुला देत आहे कारण आज माझ्यापेक्षा तुला त्याची जास्त गरज आहे.''

आईने त्याचे ते शब्द ऐकले आणि तिचा चेहरा गोरामोरा झाला. दाराच्या आधाराने ती कशीबशी उभी राहिली. तिला सकाळी तिने विष घालून बनवलेली केलेली चपाती आठवली. ती जर वेळीच तिने जाळून टाकली नसती तर तीच चपाती तिच्या मुलाच्या वाट्याला गेली असती. भुकेपोटी त्याने ती खाल्ली असती तर त्याने प्राण गमावले असते. त्याच क्षणी त्या कुबड्याचे रोज ऐकू येणारे ते शब्द तिला आठवले.

''तुम्ही केलेले वाईट कर्म तुमच्याजवळच राहते; पण तुम्ही केलेले उपकाराचे चांगले कर्म उलटून तुमच्याकडे परत येते.''

❋ ❋ ❋

# कौशल्याची प्रगती

एक लाकूडतोड्या खूप मेहनती व कणखर होता. त्याला कामाची गरज होती त्यासाठी तो एका लाकडाच्या वखारीच्या मालकाकडे गेला. त्याला जंगलातून झाडे तोडून आणण्याचे काम मिळाले. मालकाने त्याला एकूण मजुरी व इतर सवलती पण भरपूर मान्य केल्या. लाकूडतोड्या त्यामुळे खूश झाला. त्याने उत्तम काम करण्याचा निश्चय केला. वखारीच्या मालकाने एक चांगली कुऱ्हाड त्याला दिली. त्याने कोणत्या भागातून झाडे तोडायची तेही समजावून सांगितले.

लाकूडतोड्याने पहिल्या दिवशी मोठ्या उत्साहात काम करून १५ झाडे कापून त्याचे लाकूड आणले. मालक खूश होऊन म्हणाला, ''वाह! छान. अभिनंदन. असेच काम चालू ठेव.'' मिळालेल्या या प्रोत्साहनाने लाकूडतोड्या अधिकच जोमाने कामाला लागला. पण दुसऱ्या दिवशी त्याला फक्त १० च झाडे तोडता आली. तिसऱ्या दिवशी तर त्याहून कमी म्हणजे सातच झाडे तो तोडू शकला. दिवसामागून दिवस जात होते तसतसे त्याचा कामाचा वेग व मिळणारे यश कमी कमी होऊ लागले. आपली काम करण्याची ताकद कमी होत आहे असा त्याचा समज होऊ लागला. त्याने मालकाकडे जाऊन माफी मागितली व म्हणाला, ''मला कळत नाही काय होते आहे ते; पण गेले काही दिवस मी माझ्या मनासारखे काम करू शकत नाही.''

मालकाने त्याला विचारले,''अरे तू तुझ्या कुऱ्हाडीला धार केव्हा लावून घेतली होतीस?''

''मला कुऱ्हाडीला धार लावायला वेळच झाला नाही. मी जास्तीतजास्त झाडे तोडण्याचाच प्रयत्न करीत होतो.''

**तात्पर्य** : आपल्यापैकी बरेच लोक अंगचे असणारे कौशल्य तसेच ठेवून त्याचा वापर करीत असतात. त्या कौशल्याचे नूतनीकरण करून त्यात अधिक प्रगती वेळोवेळी करणे हे फार आवश्यक असते. चांगले हे काही काळानंतर चांगले राहत नाही. ते उत्तम होणे जरूरीचे असते. अंगच्या कौशल्याचे आधुनिकीकरण करणे हाच यशाचा मार्ग असतो.

❋ ❋ ❋

# खजिना शोध

**गे**ल्या शतकातील ही गोष्ट आहे. अमेरिकेच्या टेक्सास परगण्यामधील एक शेतकरी कठीण आर्थिक परिस्थितीतून जात होता. उत्पन्न कमी असल्यामुळे कुटुंबाच्या पालनपोषणासाठी स्वत:च्या जमिनीपैकी काही भाग विकणे त्याला अत्यावश्यक होऊन बसले होते. यासाठी खरीददार शोधित असतानाच त्याला एका तेल कंपनीकडून विचारणा करण्यात आली. तेल कंपनीने त्या शेतकऱ्याला कळविले की, त्याच्या मालकीच्या जमिनीच्या भागात तळाशी तेलाचा खूप मोठा साठा असण्याची दाट शक्यता आहे. तरी शेतकऱ्याने तेल कंपनीला शेतामध्ये उत्खननास परवानगी दिल्यास तेल कंपनी त्या शेतकऱ्याला भरपूर मोबदला देण्यास तयार होती. शेतकऱ्याचे काहीच नुकसान न होता त्याला भरपूर अर्थप्राप्ती होणार होती. त्याने तत्काळ तेल कंपनीच्या प्रस्तावाला मान्यता दिली. त्याच्या व तेल कंपनीच्या सुदैवाने तेल कंपनीला उत्खननात तेलाचा खूप मोठा साठा असलेली विहीर मिळाली. त्या विहिरीत एवढा प्रचंड तेलाचा साठा होता की त्यांनी ती विहीर बुजविण्यापूर्वी हजारो पिंपे भरून तेल वर काढण्यात यश मिळविले होते. एका तेल कंपनीने इतका मोठा तेलाचा साठा एका विहिरीतून मिळविण्याचा तेल उत्खननाच्या इतिहासामधील हा उच्चांक ठरला.

अर्थात, तो शेतमालक तत्काळ कोट्यधीश बनला. तो खरोखरच त्या घटनेनंतर कोट्यधीश बनला का? खरे उत्तर 'नाही' असेच येईल. कारण असे पाहा, जेव्हापासून तो त्या जमिनीचा मालक होता तेव्हापासूनच तो खऱ्या अर्थाने कोट्यधीश होता. तेलाचा साठा त्या वेळीही त्या भूमीच्या पोटात होताच; परंतु दुर्दैवाने त्या भूमिगत खजिन्याची त्या शेतकऱ्याला कल्पनाच नव्हती. त्यामुळे त्या वस्तुस्थितीचे त्याने भांडवल केले नव्हते.

याप्रमाणेच आपल्यापैकी प्रत्येकाच्या आंतरपटात प्रचंड अविश्वसनीय, कर्तृत्व, योग्यता आणि गुणांचा साठा असतो. त्यापैकी बराचसा भाग आपण ओळखलेला नसतो. त्यामुळे त्या सुप्तशक्तींचा आपण वापरही करीत नाही. म्हणूनच स्वत:ला स्वत:ची पूर्ण ओळख करून द्या. तुम्ही ओळखलेले कर्तृत्व व गुणवत्ता जोपासा. त्याचा विकास करा. वाढीस लावा आणि त्याचा वापर करायला शिका. ते सर्व तुमच्यापाशी आधीपासूनच असते. तेलाच्या भूमिगत साठ्याप्रमाणे ते सर्व तुमच्यातील तळामध्ये दडून राहिलेले असते. स्वत:ला जरासे ढवळून काढून स्वत:चा शोध घेण्यात व स्वत:ला तावून, सुलाखून, पारखून घेण्यात तुमचे काहीच नुकसान नसते.

❋ ❋ ❋

# खर्चिक व संचयी वृत्ती

**ज**गात नेहमीच दोन विचारसरणीचे लोक असतात. एक खूप खर्चिक असतात तर दुसरे जपून जपून खर्च करून संचयी वृत्तीचे असतात. साधारण वीस वर्षांच्या कालावधीमध्ये खर्चिक प्रवृत्तीचे लोक कफल्लक झालेले असतात. त्या उलट संचयी वृत्तीचे लोक धनाढ्य झालेले असतात. आपल्यापैकी कोणालाच आपल्या संध्याछायेच्या आयुष्यात पोटाची खळगी भरण्यासाठी काबाडकष्ट करून पैसे मिळविण्यासाठी धडपड करणे मुळीच आवडणार नाही.

वर वर्णन केलेली दोन्ही प्रवृत्तीची माणसे सुरूवातीच्या काळात समान पातळीवर असतात. खर्चिक लोक खर्च करण्यासाठी जास्तीतजास्त पैसे जमा करण्याचा प्रयत्न करतात. पण तसे पैसे साठविण्यासाठी त्यांच्याजवळ पैसे शिल्लकच राहात नाहीत. उत्पन्नाच्या प्रत्येक वर्गांमध्ये दोनही प्रवृत्तीची माणसे असतात.

मग या दोन वृत्तीच्या लोकांत फरक काय असतो? खर्चिक लोक प्रथम मनसोक्त खर्च करतात आणि शेवटी जी गंगाजळी शिल्लक राहील ती बचत करण्याचा प्रयत्न करतात. याउलट बचतीचा ओढा असणारे प्रथमत: नक्की केलेली रक्कम मिळकतीमधून बाजूला करून बचत करतात. नंतरच उरलेली रक्कम खर्च करतात. यामध्ये त्यांनाही खर्च करायला कमी पैसे उरतात.

आपल्याला कोणत्या गोष्टीला प्राधान्य द्यायचे आहे ते प्रथमत: ठरवून त्या गोष्टी करणे हाच तो फरक असतो. तुम्हाला खर्चिक होणे आवडेल की संचित वृत्तीचे होणे आवडेल? तुमचे प्राधान्य कशाला आहे ते तुमचे तुम्हीच ठरवायचे आहे.

❋ ❋ ❋

## खाणीतील सोने

कोणत्याही मोठ्या कारखानदाराची सुरूवात एखाद्या छोट्याशा उद्योगापासून झालेली असते. त्याच्या आवाक्याची वाढ होत असताना त्याने अनेक व्यक्तींबरोबर व्यवहार केलेला असतो. त्याच्या या प्रवासात त्याला अनेक माणसांबरोबर काम करण्याचा योग आलेला असतो. अशाच एका कोट्यधीश कारखानदारासाठी असंख्य लक्षाधीश काम करीत होते. त्या कारखानदाराला एका जिज्ञासूने विचारले, ''तुम्ही इतक्या सर्व लोकांबरोबर इतक्या शिताफीने काम कसे करू शकता?''

त्या धनाढ्य कारखानदाराने उत्तर दिले,''लोकांबरोबर काम करणे हे सोन्याच्या खाणीमधून सोने बाहेर काढण्यासारखे असते. एक औंस सोने खाणीमधून मिळविण्यासाठी तुम्हाला हजारो मणांचा चिखल प्रथम बाहेर काढावा लागतो. खाणीचे खोदकाम करताना आपल्याला पक्के ध्यानात ठेवावे लागते की तुम्ही खाणीतून बाहेर पडणाऱ्या चिखलासाठी खोदकाम करीत नाही आहात तर त्यातून तुम्हाला सोने बाहेर काढायचे असते आणि हाच नियम माणसांबरोबर काम करताना तुम्ही मनात बाळगायला हवा.''

❋ ❋ ❋

## गरीब विक्रेता आणि दुधाचा एक ग्लास

एक लहान मुलगा किरकोळ वस्तू दारोदार हिंडून विकण्याचा व्यवसाय करीत असे. तो अत्यंत गरीब असल्याने त्याला शाळेच्या शिक्षणासाठी हा व्यवसाय करणे भाग पडत असे. असाच एक दिवस तो विक्रीसाठी भटकत असताना त्याला खूप भूक लागली ; पण खिशात तर पुरेसे पैसे नसल्याचे त्याच्या लक्षात आले. पोटात भुकेची आग लागल्यामुळे आता ज्या घराजवळ जाईन तिथे खायला काहीतरी मागून घ्यायचे असे त्याच्या मनाने ठरविले. पुढच्या घराची बेल त्याने वाजविली. सुंदर व ऐटबाज तरूणीने दार उघडले. तिला पाहताच त्याचे खायला मागण्याचे धारिष्ट्य गळून गेले.

धीर करून जेवणाऐवजी त्याने तिला फक्त पाणी मागितले. त्या स्त्रीला तो मुलगा खूप दमलेला व भुकेला असल्याचे जाणवले. म्हणून तिने आपण होऊन पाण्याऐवजी दुधाचा एक मोठा ग्लास त्याच्यासाठी आणला. शांत चित्ताने त्याने ते दूध प्यायले. क्षणभर थांबून त्याने त्या स्त्रीला विचारले, ''मी किती पैसे देऊ या दुधाचे?''

''नको. काहीही नकोत. दानधर्म केलेल्या गोष्टीची किंमत न घेण्याची शिकवण मला माझ्या आईने दिली आहे.'' तिने नम्रपणे त्याला सांगितले.

मुलगा पण तितक्याच नम्रपणे म्हणाला,''धन्यवाद. मी अगदी मनापासून आपला आभारी आहे.''

त्या मुलाचे नाव होते हॉवर्ड केली. तो त्या घरातून बाहेर पडला तो पोट भरल्यामुळे तृप्त होऊन. त्याच्या अंगात पुन्हा काम करण्याचे बळ आले होते. त्याच्या फक्त शरीराची ताकदच वाढली नव्हती तर मनाने पण तो जास्त सशक्त झाला होता. त्याचा देवावरचा आणि त्याबरोबरच माणुसकीवरचा विश्वास दृढावला होता.

त्यानंतर पुष्कळ वर्षे लोटली. त्या सुंदर व ऐटबाज तरूणीला आजाराने पछाडले होते. तिची प्रकृती बरीच गुंतागुंतीची व नाजूक, गंभीर झाली होती. स्थानिक डॉक्टरांनी उपायांची शर्थ केली; पण त्यात यश येत नसल्याचे पाहून त्या तरूणीला उपचारासाठी मोठ्या शहरात नेण्याचे ठरविले.

मधल्या काळात तो गरीब विक्रेता – हॉवर्ड केली – अपार मेहेनत करून वैद्यकीय अभ्यास पूर्ण करून एक निष्णात सर्जन म्हणून त्याच शहरात काम करीत होता.

त्या तरूणीला मोठ्या शहरात आणल्यानंतर तज्ज्ञ डॉक्टरांचा सल्ला घेण्याचे ठरले. योगायोगाने डॉ. हॉवर्ड केली यांनाच पाचारण करण्यात आले. त्या स्त्रीचे नाव, मूळ ठिकाण समजल्यानंतर डॉ. हॉवर्डच्या जुन्या स्मृती जाग्या होऊन त्यांचे डोळे एकदम चमकले. तत्काळ त्यांनी आपला डॉक्टरचा पोषाख चढविला. तडक ते त्या स्त्रीला ठेवले होते त्या दवाखान्याच्या रूममध्ये गेले. त्यांनी तिला तपासले. एका सेकंदात त्यांना तिची ओळख पटली. तपासणीनंतर ते परत आपल्या कन्सल्टिंग रूममध्ये गेले. त्यांनी मनोमन सर्व उपायांची पराकाष्ठा करून त्या स्त्रीचे प्राण वाचवायचा निश्चय केला. त्या दिवसापासून त्यांनी जातीने तिच्या उपचारावर लक्ष केंद्रित केले. खूप दिवसांच्या अथक परिश्रमानंतर त्यांना यश मिळाले. त्या स्त्रीची प्रकृती सुधारली. तिच्या जीवावरचा धोका टळला.

दवाखान्यातून तिला घरी जाण्याचा दिवस जवळ आला. डॉ. केली यांनी दवाखान्याच्या ऑफिसला सूचना केली की, त्या स्त्रीच्या उपचाराचे पक्के बील करण्यापूर्वी ते त्यांच्याकडे मान्यतेसाठी पाठविण्यात यावे. त्याप्रमाणे बील त्यांच्याकडे आले. त्यांनी ते तपासून पाहिले. त्यावर एका कोपऱ्यात स्वत:च्या हस्ताक्षरात काही मजकूर लिहिला आणि मग ते बील त्या स्त्रीच्या रूममध्ये नेण्यास सांगितले.

हातात दवाखान्याचे बील येताच तिला ते पाकीट उघडून पाहण्याचा धीर होईना. तिला खात्री होती की बिलाची रक्कम एवढी मोठी असेल की ते पैसे देण्यासाठी तिला राहिलेल्या आयुष्यातील कमाई पुरणार नाही. शेवटी मनाचा धीर करून तिने ते पाकीट उघडून त्यातील बील पाहिले. तिची नजर अचानक त्या कोपऱ्याकडे गेली.

मजकूर तिने वाचला......

''बिलाची संपूर्ण रक्कम एका दुधाच्या ग्लासने मिळाली.'' त्याखाली डॉ. हॉवर्ड केली यांनी सही केली होती.

तिच्या तोंडातून शब्द फुटेना. घसा कोरडा झाला. आनंदाश्रू अखंड झऱ्याप्रमाणे गालावर ओघळत होते. तिने हात जोडून ईश्वराचे स्मरण केले आणि मनात म्हणाली, ''हे परमेश्वरा, तुझी लीला अगाध आहे. तुझी करूणा आणि माणुसकीचा ओघ असाच सर्व मानवांच्या मनात व हातात सदैव खळाळता राहो, हीच प्रार्थना.''

म्हणूनच म्हणतात ना? जसे करावे तसे तुम्हाला परत मिळते. पाण्यावर टाकलेला ब्रेड उलटा तुमच्याकडे वाहात येतो. आज केलेल्या चांगल्या कर्माचे फळ तुम्हाला किंवा तुम्ही प्रेम करीत असलेल्या तुमच्या प्रियजनाला लवकरच प्राप्त होते. तुम्हाला स्वत:ला जरी केल्या कर्माचे फळ दृश्य स्वरुपात दिसले नाही तरी हे जग सुखी, समाधानी करण्यास तुम्ही थोडेफार तरी कारणीभूत झालेले असता आणि शेवटी आयुष्यात हेच मिळविण्याची धडपड असते ना?

❋ ❋ ❋

# गरुडाचा पुनर्जन्म

गरुड हा त्याच्या जातीच्या पक्षांमध्ये सर्वांत जास्त जगणारा पक्षी आहे. तो ७० वर्षांपर्यंत जगू शकतो. पण या ७० वर्षांपर्यंत जगण्यासाठी त्याला त्याच्या ४० व्या वयाला एक फार मोठा अवघड निर्णय घ्यावा लागतो. या वयाला त्याची अणकुचीदार आणि लवचिक नखे आता त्याला हवे असलेले भक्ष्य विनासायास पकडू शकत नाहीत. ते भक्ष्य त्याचे रोजचे अन्न असते. त्याची लांब आणि तीक्ष्ण चोच वाकून गेलेली असते. त्याचे पंख जड होऊन त्याची पिसे त्याच्या छातीला चिकटून बसतात. त्यामुळे त्याला आकाशात भरारी घेणे अशक्य होते.

त्यावेळी गरुडाला दोनच पर्याय शिल्लक राहतात. मरण पत्करायचे किंवा १५० दिवसांचे खडतर बदल घडवून आणण्यासाठी शारीरिक यातना भोगण्याचे दिव्य पार पाडायचे. त्यासाठी गरुडाला उंच पहाडावर जाऊन राहावे लागते. तिथे तो आपले घरटे

तयार करून राहतो. तो पहाडाच्या कड्याला आपली चोच रोज घासून घासून ती मोडून काढतो. ती मोडलेली चोच परत येण्यासाठी गरूड काही दिवस थांबतो. नवीन चोच आली की तिच्या साहाय्याने तो आपली कमकुवत झालेली नखे तोडून टाकतो. नवी नखे येण्यास थोडे दिवस लागतात. ती नखे आली की त्यांच्या साहाय्याने तो आपले जुने व जाड झालेले पंख उपटून टाकतो. अशारितीने पाच महिने झाल्यानंतर एक ताकदवान गरूड नव्याने जन्माला येतो. त्याबरोबर तो त्याची प्रसिद्ध गरूड भरारी घेतो. तिथून पुढे तो तीस वर्षे उत्तम आयुष्य जगतो.

आपल्याला बदल का हवा असतो? पुष्कळ वेळा आपले अस्तित्व टिकविण्यासाठी आपल्याला बदल घडवून आणणे आवश्यक असते. जुन्या नको वाटणाऱ्या आठवणी आपल्याला विसरायच्या असतात. वाईट सवयी आणि काही अनिष्ट प्रथा मोडायच्या असतात. या जुन्या पुराण्या ओझ्यातून मुक्त होण्यासाठी आपण वर्तमानकाळाचा आधार घेणे उचित ठरेल.

❋ ❋ ❋

# गुणांचे अधिमूल्यन

**या** निवेदनातून आजच्या आधुनिक समाजाला दिलेला एक महत्त्वाचा संदेश दिला गेला आहे. आपण आपला दृष्टिकोन व विचारांची दिशा हरवून गेल्यासारखे झाले आहे.

शैक्षणिकदृष्ट्या गुणसंपन्न असलेल्या एका तरूणाने एका नामांकित कंपनीत वरिष्ठ पदासाठी अर्ज केलेला असतो. पहिल्या मुलाखतीनंतर त्याला कंपनीच्या प्रमुख संचालकाने मुलाखतीसाठी आमंत्रित केलेले असते. मुलाखतीपूर्वीच मुलाखत घेणाऱ्या संचालकाच्या लक्षात येते की, त्या तरूणाची अगदी माध्यमिक शाळेपासून ते पदवी नंतर केलेल्या संशोधन कार्यापर्यंत प्रत्येक परीक्षेत उच्च श्रेणी कधीही चुकली नाही.

मुलाखती दरम्यान संचालक त्या तरूणाला विचारतो,''तुला शालेय शिक्षणासाठी कधी शिष्यवृत्ती मिळाली होती का?'' तरूणाने कधीच तशी शिष्यवृत्ती मिळाली नसल्याचे सांगितले.

त्यावर संचालकाने विचारले,''मग तुझा शालेय शिक्षणाचा सर्व खर्च तुझ्या वडिलांनीच केला काय?'' त्यावर त्या तरूणाने सांगितले, ''माझे वडील मी एक वर्षाचा असतानाच वारले. त्यामुळे माझ्या शिक्षणाचा सगळा खर्च माझ्या आईनेच केला.''

''तुझ्या आईचे चरितार्थाचे साधन काय होते?'' तरूणाने उत्तर दिले, ''माझी आई धुण्याभांड्याची, मोलमजुरीची कामे करीत होती.''

ते ऐकताच संचालकाने त्या तरूणाला त्याचे तळहात दाखविण्यास सांगितले. त्याचे हात अगदी मऊ व काहीही चरे न पडलेले होते. ते पाहून संचालकाने प्रश्न केला, ''आतापर्यंत तू कधी तुझ्या आईला तिच्या कपडे व भांडी धुण्याच्या कामात मदत केली आहेस का?''

''नाही. कधीच नाही. कारण माझ्या आईला नेहमीच मी जितका वेळ मिळेल तितका वेळ अभ्यास करावा, शक्य होतील तेवढी अधिक पुस्तके वाचावित असे वाटत होते. शिवाय माझी आई माझ्यापेक्षा कितीतरी कमी वेळात कपडे धुवीत होती व आहे.'' तरूणाने उत्तर दिले.

हे ऐकून संचालकाने त्या मुलाखती दरम्यान त्या तरूणाला सांगितले की,''तू घरी गेल्यानंतर तुझ्या आईचे दोनही हात स्वच्छ धू आणि उद्या मला येऊन भेट.''

घरी गेल्यावर तो तरूण आईचे हात धुताना त्या मातेला कसेतरीच झाले; पण थोडेसे बरे पण वाटले. एका वेगळ्याच व मिश्र भावनेने तिने आपले हात पुत्राला दाखविले. तरूणाने हळुवारपणे आईचे हात पुसून कोरडे केले. तो क्षणभर मातेचे हात हातात घेऊन उभा असतानाच त्याच्या डोळ्यांतून ओघळलेले अश्रू आईच्या तळहातावर पडले. आयुष्यात प्रथमच ते हात पाहत असताना त्या हातावर किती चरे पडले आहेत, किती सुरकुत्या झाल्या आहेत हे त्याच्या लक्षात आले. हाताला अनेक ठिकाणी खरचटून जखमा झालेल्या होत्या. काही जखमा इतक्या चिघळलेल्या होत्या की हात साफ करताना व कोरडे करताना त्या

जखमा खूप दुखून ती कळवळून जात होती. ते हात पाहत असतानाच त्या तरूणाला जाणीव झाली की याच दोन हातांनी अविश्रांत काबाडकष्ट करून आपल्या शिक्षणासाठी लागलेला अमाप खर्च सोसला आहे. त्याच्या पदवीसाठी, शैक्षणिक यशासाठी आणि त्याचे उज्ज्वल भविष्य घडविण्यासाठीच आईने हातावर झेललेले हे कष्ट, त्या जखमा सहन करून त्याची किंमत चुकविली आहे.

आईचे हात धुवून पुसून झाल्यावर काहीही न बोलता त्याने आईच्या कामापैकी उरलेले कपडे धुतले. त्या रात्री आई आणि मुलाला किती बोलू आणि किती नको असे होऊन गेले होते. खूप वेळ ते बोलत बसले होते. दुसऱ्या दिवशी सकाळी ठरल्याप्रमाणे तो तरूण कंपनीच्या संचालकास भेटण्यास गेला. आत जाताक्षणीच त्या तरूणाच्या डोळ्यांत तरळलेले अश्रू संचालकाला दिसले. त्याने विचारले, ''काल घरी गेल्यावर तू काय केलेस व तू त्यापासून काय शिकलास?''

तरूणाने सांगितले, ''मी घरी जाऊन आईचे हात स्वच्छ धुतले व त्यानंतर तिच्या कामापैकी राहिलेले सगळे कपडे धुतले.''

''तुला त्या वेळी काय वाटले?'' संचालकाने विचारले.

त्या तरूणाने सांगितले, १. दुसऱ्याच्या कष्टाची कदर करणे म्हणजे काय हे मला आज चांगले उमजले. माझ्या आईने जे कष्ट घेतले त्यामुळेच केवळ मी आज जे यश संपादन केले ते करू शकलो. २. काल आईबरोबर तिच्या कामात तिला मदत केल्यानंतरच काबाडकष्ट करून आपले उद्दिष्ट साध्य करणे किती कठीण आहे ते समजले. ३. कुटुंबातील व्यक्तीच्या कष्टाची कदर करून आपसातले संबंध दृढ करण्याचे महत्त्व मला जाणवले. त्यावर संचालक संतुष्ट होऊन म्हणाले,''छान, मला अशाच माणसाची ऑफिस व्यवस्थापक म्हणून गरज होती. दुसऱ्यांनी केलेल्या मदतीची जाणीव ठेवून त्याची कदर करणारा माणूसच मला हवा होता. दुसऱ्या माणसांनी केलेल्या कष्टाचे मूल्यमापन करून त्यासाठी त्याचे कौतुक करणाराच अधिक यशस्वी होऊ शकतो. अशाच माणसाच्या हातात कंपनीचा पैसा सुरक्षित राहून कंपनी आपली उद्दिष्टे साध्य करू शकते. कंपनीची उन्नती होते. आमच्या कंपनीमध्ये काम करायला तू योग्य आहेस. तेव्हा तुझी मी निवड केली आहे.''

त्यानंतर त्या तरूणाने अत्यंत परिश्रमपूर्वक कंपनीचे काम केले. हाताखालच्या लोकांकडून त्याला खूप मान मिळाला, सगळे हाताखालचे लोक एकदिलाने व मेहनतीने काम करीत. या सर्व गोष्टींमुळे कंपनीची कामगिरी उत्तम झाली. नफ्यात वाढ झाली.

लहान वयात ज्या मुलांना जरूरीपेक्षा जास्त लाडात वाढविले जाते व ते म्हणतात ते आणून दिले जाते, त्यांची आपण मागू ते लगेच मिळालेच पाहिजे अशी समजूत होऊन जाते. त्याला स्वत:च्या हव्यासापुढे इतर कशाचीही पर्वा वाटत नाही. त्यांना त्यांच्या आईवडिलांच्या कष्टाची जाणीव राहत नाही. मोठेपणी ते जेव्हा काम करायला सुरू करतात तेव्हा हाताखालच्या लोकांना काय तसदी पडते हे त्यांच्या मुळी लक्षातच येत नाही. त्यांच्या चुका काढण्यातच फक्त ते धन्यता मानतात. अशी माणसे शैक्षणिकदृष्ट्या कितीही कर्तृत्ववान असली तरी कधीच समाधानी होऊ शकत नाहीत. सदान्‌कदा ते कुरकुर करीत राहतात. सतत दुसऱ्याचा दु:स्वास करीत भांडत राहतात. जर आपण आपल्या पाल्याचे जरूरीपेक्षा जास्त संरक्षण करीत असाल किंवा लाड करीत असाल तर तुम्ही तुमच्या पाल्याचे नुकसान करीत आहात हे ध्यानात ठेवा.

तुम्ही तुमच्या मुलांसाठी मोठे घर घ्या, त्यांचे खाण्यापिण्याचे लाड करा, त्यांना त्यांच्या आवडीचे वाद्य शिकू द्या, त्यांना मोठ्या टीव्हीवर कार्यक्रम पाहू द्या. पण जेव्हा तुम्ही काही मेहनतीचे काम घरात करत असाल तेव्हा त्यांना पण त्यात हातभार लावायला शिकवा. जेवणानंतर त्यांच्या भावाबहिणींबरोबर टेबल आवरून भांडी साफ करण्याची सवय लावा. तुम्हाला या कामाला माणूस ठेवणे परवडत नाही म्हणून नव्हे तर त्यांना या कामाला किती कष्ट पडतात ते समजणे महत्त्वाचे आहे. त्यांना हे पण कळले पाहिजे की त्यांचे आईवडील सुद्धा एक दिवस म्हातारे होणार आहेत. मुख्य म्हणजे दुसऱ्याच्या कष्टाची त्यांना जाणीव असली पाहिजे. त्यांनी स्वत: त्याचा अनुभव घेऊन ते किती कठीण आहे हे समजून घेतले पाहिजे. दुसऱ्याकडून काम करून घेणे व इतरांबरोबरीने काम करणे हे त्यांना येणे आवश्यक आहे. ते जे काही घडले त्यासाठी आईवडिलांचे कष्ट कारणीभूत आहेत हे त्यांनी मनात कोरून ठेवायला हवे.

❋ ❋ ❋

## ग्लासामधील पाणी

एका विद्यापीठातून एकत्र शिक्षण घेऊन काही विद्यार्थी वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या व्यवसायात आपआपले काम सांभाळीत होते. काही दिवसांनंतर ते सगळे जण एकत्र भेटत होते. त्या सर्वांनी आपल्या विद्यापीठातील एका प्रोफेसरांना भेटायचे ठरविले. त्यांच्याशी वेळ ठरवून ते सर्वजण त्या प्रोफेसरांकडे गेले. जुने विद्यार्थी आवर्जून भेटायला आल्यामुळे त्या प्रोफेसरांनाही खूप आनंद झाला. गप्पांमध्ये जुन्या आठवणींना उजाळा मिळाला. गप्पांच्या ओघात विद्यार्थ्यांचा नाराजीचा, तक्रारीचा सूर आला. त्यातील बहुतेकांची तक्रार होती ती सध्याच्या धावपळीच्या, स्पर्धेच्या जीवनाविषयी. त्यात रोज भेडसावणाऱ्या प्रश्नांची. रोजच्या दिवसांतील अडचणींची. घरच्या तसेच नोकरी किंवा व्यवसायाच्या ठिकाणी तोंड द्याव्या लागणाऱ्या ताणतणावाची. प्रत्येकजण आपापली गाऱ्हाणी, आपापले अनुभव सांगत होते.

हे सर्व बोलणे प्रोफेसर शांतपणे ऐकून घेऊन मनात विचार करीत होते. तोंडावर किंचित आलेले हसू ठेवून प्रोफेसर उठून आतल्या खोलीत गेले. तिथून त्यांनी वेगवेगळ्या आकाराचे, प्रकारचे, रंगांचे ग्लास आणले. विद्यार्थ्यांच्या संख्येपेक्षा त्यांनी आणलेले ग्लास थोडे जास्तच होते. त्यापैकी काही चिनी मातीचे, काही काचेचे, काही प्लास्टिकचे, काही थर्माकोलचे होते. तसेच त्यांचे रंग व त्यावरील नक्षीकामही वेगळे होते. त्यातील काही आकर्षक होते तर काही जुनाट व टाकाऊ होते. प्रोफेसरांनी मुलांसाठी पाणी पण आणले होते. प्रोफेसरांनी मुलांना पिण्यासाठी पाणी घेण्यास विनंती केली. सर्व विद्यार्थ्यांनी त्यातील ग्लास उचलून हातात घेतले त्यावेळी प्रोफेसरांनी बोलायला सुरुवात केली. ''पाहा हं ! मुलांनो तुम्ही सर्वांनी ग्लास उचलून घेतलेत; परंतु ते घेताना त्यातील चांगले दिसणारे, सुंदर ग्लासच प्रत्येकाने निवडले. त्यातल्यात्यात जुन्या, खराब व न आवडलेल्या ग्लासना कोणीही हात लावला नाही. तेच ग्लास शिल्लक राहिले आहेत. हे मान्य आहे की, प्रत्येक माणसाला जे समोर असेल त्यापैकी उत्तम व सुंदर असेल तेच हवे असते. तुम्हाला भेडसावित असलेल्या प्रश्नांचे, अडचणींचे, ताणतणावाचे हेच तर मूलभूत कारण आहे. तुम्हा सर्वांना काय हवे होते तर प्यायला पाणी; पण ते घेण्यासाठी तुम्ही निवड करीत बसलात ते तुमच्या ओठापर्यंत पाणी आणणाऱ्या ग्लासची. हे तुम्ही अगदी तुमच्या नकळत केलेत. ह्याचप्रमाणे तुमचे आयुष्य म्हणजे पाणी आहे आणि तुमची नोकरी, तुमचे व्यवसाय, तुमची जनमानसामधील प्रतिष्ठा, प्रतिमा, तुमचा हवा असणारा पैसा हे सर्व काही या ग्लाससारखे आहे. या इतर सगळ्या गोष्टी तुमचे आयुष्य घडविण्यासाठी, ते टिकवून धरण्यासाठी असलेली साधने आहेत. या बाह्य गोष्टींमुळे तुमच्या आयुष्याच्या क्वालिटीमध्ये फरक पडत नाही. नक्की आयुष्य कसे हवे ते तुम्हीच ठरविणे आवश्यक असते.

आपण जर जीवन सुखी होण्याच्या साधनांकडेच आपले लक्ष केंद्रित केले तर जीवनाचा खराखुरा आनंद उपभोगायला आपण विसरुनच जाऊ.''

लक्षात ठेवा, ज्याच्याजवळ सर्व गोष्टी आहेत असा मनुष्य सर्वांत श्रीमंत असतो असे नाही तर ज्याला सर्वांत कमी गरजा असतात तोच मनुष्य श्रीमंत असतो.

❋ ❋ ❋

## चक्रम असला तरी निर्बुध्द नाही

एका वेड्याच्या हॉस्पिटलमध्ये एक ट्रक ड्रायव्हर रोज त्यांना लागणारे सामान पोहोचविण्याचे काम करीत असे. असाच एक दिवस तो हॉस्पिटलच्या बाहेर असणाऱ्या उघड्या गटारालगत ट्रक उभा करून सामान काढीत होता. तिथून निघण्याच्या तयारीत असतानाच ट्रकचा एक टायर पंक्चर झाल्याचे त्याच्या लक्षात आले. टायरचे पंक्चर काढण्यासाठी जॅक लावून त्याने तो टायर काढला. त्या जागी त्याला दुसरा पर्यायी टायर लावायचा होता. पर्यायी टायर ट्रकला लावून तो नटबोल्टने फिक्स करणार एव्हढ्यात त्याच्या हातून चारही नटबोल्ट त्या उघड्या गटारात पडले. त्या वाहत्या गटाराच्या पाण्यातून त्याला ते पडलेले बोल्ट

हाताला लागणे शक्यच नव्हते. साहजिकच तो अत्यंत हताश झाला. अस्वस्थपणाने काय करावे ते त्याला सुचेना.

त्याच वेळी हॉस्पिटलमधील एक वेडा रूग्ण त्याच्या जवळून जात होता. त्या अस्वस्थ ड्रायव्हरला त्याने विचारले, ''काय हो? काय झाले एव्हढी चिंता करायला?'' ड्रायव्हरच्या डोक्यात आले की तो काहीच करू शकत नाही तर तो वेडा काय करणार? त्या वेड्यापासून सुटका करून घेण्यासाठी त्याने झालेला सगळा प्रकार त्या वेड्याला सांगितला. त्याच्याकडे अत्यंत निराशपणे पाहत राहिला.

त्यावर तो वेडा खळखळून हसला आणि त्या ड्रायव्हरला कुत्सितपणे म्हणाला, ''हात्तीच्या! एव्हढीशी गोष्ट तुला सुचत नाही. कमाल आहे. म्हणूनच तू आयुष्यभर ड्रायव्हर एके ड्रायव्हरच राहिलास. यात काहीच आश्चर्य नाही.''

त्याच्या त्या शालजोडीतील उद्गारामुळे ड्रायव्हर आ वासून बघतच राहिला. त्या वेड्याने त्यावर तोडगा सुचविला. ''अरे, बाकीच्या तीन चाकाच्या टायरचे प्रत्येकी एक नटबोल्ट काढून या चौथ्या चाकाच्या टायरला लाव. अशारितीने तू ट्रक जवळच्या पंक्चर काढण्याच्या दुकानापर्यंत सहज जाऊ शकशील. त्याच्याकडे तू सगळेच नटबोल्ट लावू शकशील की. ही इतकी साधी गोष्ट आहे.''

त्याच्या त्या बोलण्याचे कौतुक वाटून तो नि:शब्द झाला. इतक्या सोप्या पद्धतीने अडचण दूर झाल्याने त्याला आनंद झाला. त्याने त्या माणसाला विचारले,''तू इतका हुशार आहेस, स्मार्ट आहेस तरीही तू या वेड्यांच्या हॉस्पिटलमध्ये कसा काय आहेस?''

त्यावर त्याने उत्तर दिले, ''मित्रा, मी चक्रम आहे म्हणून इथे आहे, पण मी निर्बुद्ध नक्कीच नाही.''

जगात ट्रक ड्रायव्हरसारखे वागणारे, अनेक लोक असतात, जे इतरांना निर्बुद्ध समजतात. तेव्हा लोकांकडे डोळे उघडे ठेवून बघायला शिका. तुम्ही पुष्कळ शिकलेले व हुशार असाल पण आसपास अनेक चक्रम लोक वावरत असतात. ते बऱ्याच वेळा तुम्हाला पडणाऱ्या प्रश्नांना उपाय सुचवू शकतात. तुमची बुद्धी त्यावेळी निकालात काढलेली असते.

**तात्पर्य :** तुम्हाला सर्वच गोष्टींचे ज्ञान असते असा गैरसमज करून घेऊ नका. लोकांच्या केवळ दिसण्यावरून व त्यांच्या शैक्षणिक पदवीवर त्यांचे मोजमाप करून त्यांच्याबद्दल तत्काळ मत बनवू नका.

❋ ❋ ❋

# चहाच्या कपाचे आत्मवृत्त

**मी** काही मुळात चहाचा कप नव्हतो. माझ्या आयुष्यात पूर्वी मी म्हणजे फक्त एक चिकणमातीचा गोळा होतो. माझ्या मालकाने एक दिवस मला घेतले आणि धोपटायला सुरुवात केली. साच्यात घालून मला आकार देण्यास सुरुवात केली. मला असह्य वेदना होत होत्या. मी मालकाला थांबायला विनवित होतो; पण तो नुसता हसला आणि म्हणाला, ''इतक्यात नाही.'' मी भयंकर वैतागलो होतो. मला वाटत होते आत्ता संपले; पण छे. शेवटी एकदा मला त्याने बाजूला ठेवले. थोड्या वेळाने त्याने मला एका फिरत्या चाकावर गरगर फिरविले.

ते झाल्यावर मला समजत नव्हते की हा मला का भाजायला निघाला आहे. मी ओरडून त्याला थांबण्याची भीक मागत होतो. मला बाहेर काढण्यासाठी सारखे ओरडून सांगत होतो. मी त्या भट्टीच्या दाराच्या काचेतून पाहत होतो. तो फक्त हसत होता. त्याने मानेनेच नाही म्हटले आणि पुढे म्हणाला, ''इतक्यात नाही.'' यानंतर अचानक मालकाने मला उचलले आणि सँड पेपरने आणि ब्रशने माझे सर्वांग घासायला सुरू केली. मग त्याने रंगाच्या ब्रशने माझ्या सर्वांगावर रंग देण्यास सुरूवात केली. त्या रंगाचा वास आणि त्यातून निघणाऱ्या झळा इतक्या उग्र व क्लेशकारक होत्या की मला मरणच आठवले. मी त्याला परत थांबण्यासाठी सांगत होतो; पण त्याचे आपले हसणे चालू होते आणि तो म्हणाला,''इतक्यात नाही.''

नंतर त्याने मला एका दुसऱ्या भट्टीत घातले. यावेळी तर पहिल्यापेक्षा अनेक पट गरम होते. मी गुदमरून जाईन असे मला

वाटले. मी त्याला हात जोडले, पाया पडलो, रडलो पण तो फक्त म्हणाला, ''इतक्यात नाही.''

मी यातून सहीसलामत सुटेन असे मला बिलकुल वाटत नव्हते. आता सगळे संपले असे मला वाटत होते. मी जगण्याची आशा सोडून दिली होती. इतक्यात भट्टीचे दार उघडले आणि मला ऐकू आले, ''इतक्यात नाही.'' त्याने मला उचलले आणि एका शेल्फवर ठेवले. तो जाऊन एक आरसा घेऊन आला. मला त्या आरशात बघायला सांगितले. मी आरशात पाहिले अन् काय? माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसला नाही. मी म्हटले, ''वाह! काय छान चहाचा कप आहे.''

माझ्या मालकाने मला समजावले , ''तुला धोपटत होतो, साच्यात घातले तेव्हा तुला खूप त्रास होत होता, हे मला ठाऊक होते. मी हे तुला समजायला हवे होते. फिरत्या चाकावर गरगर फिरताना तुला चक्कर येणे स्वाभाविक होते; पण मी तुझे म्हणणे ऐकून तुला सोडून दिले असते तर तू अजूनही तसाच चिकणमातीचा गोळाच राहिला असतास. तुझ्या आयुष्यात तुला तुझे असे व्यक्तिमत्त्व लाभले नसते. पहिल्या भट्टीत तुला ठेवले तेव्हा मला माहीत होते की तिथे खूप गरम आहे; पण मी तसे केले नसते तर तुझा लोळागोळा झाला असता. तुला ब्रशिंग करताना आणि रंग देताना तुला होणारा त्रास तू सहन करू शकत नव्हतास हे मी पाहत होतो; पण मी तसे केले नसते तर तुझ्या आयुष्यात काहीच रंग भरले नसते. दुसरी भट्टी तर तुझ्यासाठी फारच यातनादायक होती. पण मी जर तुला त्यात ठेवून भाजले नसते तर तू एकूण बाहेरच्या दबावाला बळी पडला असतास. तुझी ताकद अपुरी पडली असती. तुझ्या अंगातील शक्ती फार काळ तग धरू शकली नसती त्यामुळे तू जास्त दिवस राहिला नसतास. म्हणून जेव्हा तुला फार असह्य होत होते तेव्हा मी तुला माझ्या देखरेखीखाली ठेवले होते. तू कसा व काय होणार आहेस याची मला पहिल्यापासून पूर्ण कल्पना होती. तुझा मातीचा गोळा हातात घेतला त्या क्षणापासून तुझे अंतिम स्वरूप कसे असणार आहे ते माझ्या डोळ्यांसमोर होते.''

आपल्याला सगळ्यांनाच या त्रासातून जावेच लागते. जर आपल्याला हा त्रास सहन करण्याने चांगला माणूस बनण्यास उपयोग होत असेल तर आपला दिवस कारणी लागला असे समजावे.

## चार बायका

एका श्रीमंत व्यापाऱ्याला चार बायका होत्या. चारही बायकांशी त्याचे संबंध व प्रेम वेगवेगळे होते.

चौथी बायको: तिच्यावर त्याचे सर्वात जास्त प्रेम होते. त्याने तिला अमाप सोनेनाण्यांनी व उंची वस्त्रांनी मढवले होते. तिला तो खूप चांगले चांगले खाऊ घालायचा. तिची तो खूप काळजी घेत असे आणि तिला भरपूर विश्रांती देत असे.

तिसरी बायको: या बायकोवर पण त्याचे खूप प्रेम होते. तिच्याबद्दल त्याला खूप अभिमान वाटत असे. तिला तो मित्रांमध्ये मिरवित असे. तरी ती दुसऱ्या कोणाबरोबर तरी पळून जाईल अशी त्याच्या मनात सतत भीती असे.

दुसरी बायको: या पत्नीवरही त्याचे प्रेम होते. ती खूप समजूतदार होती, शांत स्वभावाची होती. खऱ्या अर्थाने ती त्या व्यापाऱ्याची सखी होती. ज्या ज्या वेळी व्यापाऱ्याला काही अडचण येत असे तेव्हा तो या पत्नीचा सल्ला घेत असे आणि ती पण त्याला मदत करून अडचणीतून मार्ग काढीत असे.

पहिली बायको: त्याची ही सर्वांत इमानदार पत्नी होती. त्याची प्रकृती, त्याचा व्यवसाय आणि घर हे सर्व नीट सांभाळण्यात तिचा फार मोठा वाटा होता. इतके असूनही व्यापाऱ्याचे या पत्नीवर फारसे प्रेम नव्हते. तिचे मात्र त्याच्यावर मनापासून प्रेम होते. एकूणच तिच्याकडे त्याचे फारसे लक्ष दिले जात नसे.

एक दिवस तो व्यापारी आजारी पडला. लवकरच आपल्याला मरण येणार हे त्याला कळून चुकले होते. त्याने व्यथित केलेले ऐषआरामी आयुष्य त्याच्या नजरेसमोर आले. त्याला एका विचाराने घेरले. आता मला चार बायका साथ द्यायला आहेत पण आपण मेल्यानंतर आपण एकटे पडू. तो एकटेपणा फार भयंकर असेल. म्हणून त्याने चौथ्या बायकोला विचारले, ''मी तुझ्यावर अतिशय प्रेम केले. तुला सोन्याचांदीने मढविले, उंची कपडे दिले. तुझी सर्वांत जास्त काळजी घेतली. मी आता मरणाच्या दारात उभा आहे. माझ्या मरणानंतर तू माझ्याबरोबर येशील का? मला साथ देशील का?'' ''छे मुळीच नाही.'' तिने ताडकन उत्तर दिले

आणि ती एकही शब्द न बोलता निघून गेली. तिच्या या उत्तराने व्यापाऱ्याच्या हृदयाला सुरी मारल्यासारखे दु:ख झाले.

त्याने आपल्या तिसऱ्या बायकोला विचारले, ''आयुष्यभर मी तुझ्यावर अतोनात प्रेम केले. मी मेल्यानंतर माझ्याबरोबर येऊन मला साथ देशील का?'' तिने लगेच सांगितले, ''नाही, इथे किती मजेत आयुष्य जगते आहे. तू मेल्यावर मी दुसऱ्या कोणाबरोबर तरी लग्न करून असेच आनंदाने जगेन.'' हे ऐकून व्यापाऱ्याचे मन दु:खाने बधीर होऊन गेले.

दु:खी अंत:करणाने त्याने दुसऱ्या बायकोला तसेच विचारले, ''माझ्या प्रत्येक अडचणीच्या वेळी तुझ्यावर भिस्त असे. आताही मला तुझी मदत हवी आहे. मी मरणाच्या दारात उभा आहे. मी मेल्यानंतर मला साथ देण्यासाठी तू माझ्याबरोबर येशील ना?'' तिनेही नकारार्थी उत्तर देताना सांगितले, ''माफ करा, या वेळी मी मदत करू शकणार नाही. मी जास्तीतजास्त तुला तुझ्या थडग्यापर्यंत सोबत करीन.'' तिच्या उत्तराने त्याच्यावर कुऱ्हाड कोसळल्यासारखे त्याला वाटले. तो मनातून उद्ध्वस्त होऊन गेला.

तो त्या अवस्थेत असतानाच त्याला अचानक आवाज ऐकू आला. ''मी कायमच तुमच्याजवळ राहिले आहे. तुम्ही जिथे कोठे जाल तिथे मी तुमच्या बरोबर येईन.'' त्याने आवाजाच्या दिशेने पाहिले तर त्याला त्याची पहिली बायको दिसली. ती अत्यंत कृश दिसत होती. अनेक दिवसांच्या कुपोषणामुळे तिची तब्बेत खालावलेली दिसत होती. ते पाहून अतिशय वाईट वाटून व्यापारी तिला म्हणाला, ''मी तुझी अधिक काळजी घ्यायला हवी होती.''

तसे पाहिले तर आपल्या सर्वांनाच चार बायका असतात. चौथी बायको म्हणजे आपले शरीर. आपण कितीही प्रयत्न करून ती आकारात, शक्तिशाली व सुडौल ठेवली तरी ती आपल्याबरोबर मरणानंतर राहत नाही. तिसरी बायको म्हणजे आपल्या चीजवस्तू, मालमत्ता, आपला दर्जा. जेव्हा आपण मरतो तेव्हा ते दुसऱ्या कोणाकडे तरी जाते. दुसरी बायको म्हणजे आपले कुटुंब, आपले मित्रमंडळ. आपल्या आयुष्यात ते कितीही जवळचे असोत, ते आपल्याबरोबर फक्त स्मशानभूमीपर्यंतच येऊ शकतात.

पहिली बायको म्हणजेच आपला आत्मा, जो आपण कधीही पाहू शकत नाही. ऐहिक सुखाचा पाठपुरावा करता करता आणि इंद्रियसुखामागे धावताना आपण आत्म्याची नीट काळजी घेत नाही. आपला आत्मा हाच फक्त आपल्याबरोबर आपण जाऊ तिथे, अगदी मृत्युनंतर सुद्धा येत असतो. तेव्हा आधीपासूनच त्याची नीट काळजी घेऊन त्याला धडधाकट करणे हे जास्त चांगले आहे. अगदी मरणाच्या दारात गेल्यावर त्याच्याकडे लक्ष देऊन काही फायदा होत नाही.

❃ ❃ ❃

## चार मेणबत्त्या

एकाच वेळी चार मेणबत्त्या तेवत होत्या. त्यांच्या प्रकाशात सर्व वातावरण कसे सुखद होऊन गेले होते.

त्यापैकी पहिली मेणबत्ती म्हणाली, ''मी शांततेचे प्रतीक आहे. जगात सगळीकडे अशांतता, वैराचार आणि झगडे सुरू आहेत. त्या परिस्थितीत मला कोणीही असे तेवत ठेवणार नाही. त्यानंतर ती शांततेचा दूत असलेली मेणबत्ती विझून गेली.

दुसरी मेणबत्ती म्हणाली मी विश्वासाचे द्योतक आहे. मी आता कोणासाठीही अत्यावश्यक राहिलेली नाही. माझी कोणालाच जरूरी वाटत नाही. तेव्हा मला आता यापुढे असे जळत राहून काहीच उपयोग नाही. त्यानंतर वाऱ्याच्या हलक्याश्या झुळकेबरोबर ती मेणबत्ती विझून गेली.

हे सगळे पाहून तिसऱ्या मेणबत्तीला अतीव दु:ख झाले. त्या दु:खाच्या उमाळ्यातच ती म्हणाली, मी म्हणजे प्रेमाची भावना. लोकांना माझे महत्त्व पटतच नाही. लोक मला बाजूला सारून टाकतात. आपल्या अत्यंत जवळच्या लोकांवर प्रेम करणेसुद्धा ते पार विसरुन जातात. असे म्हणून त्याच दु:खी मनाने तिने स्वत:ला मिटवून घेतले. इतक्यात एक लहान मुलगा तिथे आला. त्या विझून गेलेल्या तीन मेणबत्त्या पाहून तो अतिशय कळवळून म्हणाला, ''तुम्ही तिन्ही मेणबत्त्या शेवटपर्यंत जळत राहायला हव्यात. का मालवून गेलात तुम्ही?'' असे म्हणून तो लहान मुलगा हमसून हमसून रडायला लागला.

त्याला रडताना पाहून चौथी मेणबत्ती मोठ्या मायेने म्हणाली, ''काळजी करु नकोस अगर घाबरू नकोस. मी आहे ना अजून. माझ्या रुपाने 'आशा' जिवंत आहे. मी जळते आहे तोवर तू त्या तिन्ही मेणबत्त्या परत पेटवू शकशील.''

त्या मुलाचे डोळे चमकले आणि त्याने त्या चौथ्या 'आशा' मेणबत्तीला हातात घेऊन तिच्या ज्योतीने इतर तीनही मेणबत्त्या परत एकदा पेटविल्या. त्याबरोबर सगळे वातावरण उजळून निघाले.

या चारही भावनांपैकी प्रेम ही सर्वांत महत्त्वाची भावना आहे. मनात आशा जिवंत असली की आपण शांतपणे जगण्याचा विश्वास बाळगू शकतो. सर्वांचे प्रेम संपादन करू शकतो. त्यासाठी तुमच्या आयुष्यात आशेचा किरण सतत तळपत राहिला पाहिजे.

त्या आशेच्या किरणावरच आपण शांततेत विश्वासाचे व प्रेमाने जीवन जगू शकतो.

❋ ❋ ❋

# चिंता

**फा**र वर्षांपूर्वी विमान वाहतुकीच्या सुरुवातीच्या काळात एकच वैमानिक हा त्या विमानाने जगभर विमान उड्डाण करीत असे. त्यायोगे तो संपूर्ण जगाला फेरी मारीत असे. असाच एक वैमानिक जगप्रवासाला जात असताना मधेच एका विमानतळावरून उड्डाण केल्यानंतर साधारण दोन तासांच्या अंतराळ प्रवासानंतर विमानाच्या कॉकपिटमध्ये त्याला एक वेगळा आवाज ऐकू येऊ लागला. नीट कान देऊन तो आवाज ऐकल्यानंतर त्याच्या लक्षात आले की, तो उंदराच्या कुरतडण्याचा आवाज होता. वैमानिकाच्या हेही ध्यानात आले की, मागच्या विमानतळावर विमान उतरविल्यानंतर तिथेच तो उंदीर विमानात शिरला असला पाहिजे. तो उंदीर विमानामधील महत्त्वाचे वायरिंग कुरतडत असला पाहिजे आणि याचा विमानाच्या पुढच्या प्रवासात धोका पोहोचण्याची शक्यता आहे, हे पण त्याला समजून येण्यास फारसा अवधी लागला नाही.

एकंदरीतच फार भयंकर परिस्थिती निर्माण झाली होती. प्रथमत: या परिस्थितीत काय करावे हे त्या वैमानिकाला सुचेना. परत मागच्या विमानतळावर जावे तर तो किमान दोन तासांचा हवाईप्रवास होता. पुढच्या विमानतळावर विमान उतरविण्यासाठी दोन तासांहून थोडा अधिक अवधी लागणार होता. प्रवासाच्या मध्यावर असल्यामुळे नक्की काय करावे हे त्याला सुचेना.

काही वेळ शांतपणे विचार केल्यानंतर त्याला आठवले की, उंदीर हा त्याच्या तीक्ष्ण दातांनी कुरतडणारा प्राणी असून तो जमिनीपासून जास्त उंचीवर फार काळ जिवंत राहू शकत नाही. उंदीर हा जमिनीलगत किंवा जमिनीखालीच जास्त सुखाने राहू शकतो. हे ध्यानात येताच त्या वैमानिकाने विमानाची हवेत उड्डाणाची उंची वाढवायला सुरूवात केली. पुढील प्रवास जास्तीत जास्त उंचावरून करण्याची त्याने सर्व आखणी केली. हळू हळू विमान जमिनीपासून खूप उंचीवरून प्रवास करू लागले. एक हजार, पाच हजार, दहा हजार असे करता करता विमान वीस हजार फुटाच्या उंचीवरून उड्डाण करू लागले. काही वेळातच उंदराच्या कुरतडण्याचा आवाज बंद झाला. उंदीर मरण पावला होता. इतक्या उंचीवरील वातावरणामध्ये तो उंदीर तग धरू शकला नाही. जवळ जवळ दोन तासांहून अधिक विमान प्रवासानंतर पुढच्या नियोजित विमानतळावर वैमानिकाने सुरक्षितपणे विमान जमिनीवर उतरविले. जमिनीला विमान टेकल्याबरोबर हायसे वाटून वैमानिकाने त्या मेलेल्या उंदराला शोधून विमानाबाहेर काढले.

सतत चिंता करणे हे सुद्धा अगदी उंदराच्या तीक्ष्ण दातांनी सतत कुरतड्यासारखेच असते. त्या वेळच्या परिस्थितीत आपल्या मनात विचारांचे काहूर माजलेले असते. त्या विचारांची दिशा योग्य केली तसेच क्रियाशील विचारांची पातळी उंचीवर नेली तर चिंता शिल्लक म्हणून राहात नाही. मनोनिग्रह आणि मन एकाग्र करून एक प्रकारची ध्यानधारणा केली तर चिंता नाहीशी होऊन जाते.

❋ ❋ ❋

# जगण्याचा दृष्टिकोन

एका मोठ्या शहरात एक धनाढ्य व्यापारी होता. आपल्या मुलाला बाहेरचे जग आणि विशेषत: खेडेगावात गरीब कुटुंबे कशी राहतात ते दाखवावे असे त्याला वाटले. त्यासाठी आपल्या मुलाला घेऊन तो एका खेडेगावी पोहोचला. त्या खेडेगावातील एका गरीब शेतकऱ्याच्या घरी ते बापलेक दोन दिवस व दोन रात्री राहिले. घरी परत आल्यावर त्या व्यापाऱ्याने आपल्या मुलाला विचारले, ''बाळा, तुला त्या लोकांच्या घरात राहायला कसे वाटले?''

मुलाने तत्काळ उत्तर दिले, ''वा!! बाबा फारच मजा आली. अगदी छान अनुभव होता तो.''

''ते गरीब कुटुंब कसे राहते ते पाहिलेस ना तू?''

''हो खरंच हो बाबा,'' मुलगा उत्तरला.

यावर वडिलांनी प्रश्न केला, ''मग सांग बरे, या दोन दिवसांच्या अनुभवावरून तुला काय शिकायला मिळाले?''

मुलाने जे पाहिले, अनुभविले त्यावरून सांगितले, ''बाबा, मी असे पाहिले की आपल्याकडे एकच कुत्रा आहे. त्यांच्याकडे तर चार कुत्री आहेत. आपल्या बागेतील तळे बागेच्या अर्ध्या हद्दीपर्यंतच पसरले आहे. याउलट त्यांच्या शेतालगत असलेल्या खाडीचा दुसरा किनारा दिसतच नाही. त्याचा विस्तार क्षितिजापर्यंत गेला आहे.

''आपण आपल्या बागेत लावलेले दिवे, शोभेचे पण विकत आणलेले आहेत. पण बाबा, त्यांच्या शेतात कृत्रिम दिव्यांची आवश्यकताच नव्हती. शेताच्या वर संपूर्ण आकाशातील चमचमणारे तारे त्यांच्या प्रकाशाने साऱ्या दिशा उजळून टाकीत होते. आपल्या घरासमोरील अंगण किती छोटेसे आहे. तर त्यांच्या घरासमोरच्या आवाराला सीमाच नाहीत. डोळे पोहोचणार नाहीत इतके दूरवर ते पसरलेले आहे. आपल्या घराची जमीन फुटाच्या मापात मोजता येते, तर त्यांच्या जागेच्या कुंपणावर आपण नजरेनेही पोहोचू शकणार नाही.''

''आपल्याकडे अनेक नोकर सेवेसाठी हजर असतात. याउलट त्यांचे संपूर्ण कुटुंबच लोकांच्या सेवेत आनंद मानित असते.''

''आपण आपले खाण्याचे धान्य बाजारातून विकत आणतो. मात्र त्यांना लागणारे धान्य, पदार्थ, भाजी ते स्वत:च शेतात उगवतात. संरक्षणासाठी आपण आपल्या घराभोवती भिंत व कुंपण उभे केले आहे. त्यांना मात्र त्याची आवश्यकता भासत नाही कारण त्यांचा मित्रवर्गच त्यांचे रक्षण करतो.''

हे ऐकल्यावर मुलाचे वडील अवाक् होऊन त्याच्याकडे पाहातच राहिले. त्यावर तो फक्त म्हणाला, ''बाबा, तुम्ही फार चांगले केलेत. आपण तिथे राहिल्यामुळे आपण त्यांच्यापेक्षा किती गरीब आहोत याची मला पूर्ण जाणीव झाली.''

हा दृष्टिकोन किती वेगळा, सुंदर आणि उदात्त आहे नाही का? आपल्याजवळ जे आहे त्याबद्दल कृतज्ञ राहून जे आपल्याजवळ नाही त्याचा हव्यास करणे सोडून दिले तर आपल्या प्रत्येकाचे आयुष्य कितीतरी सुखाचे व आनंदाचे होऊन जाईल.

काय पटते ना?

❋ ❋ ❋

# जशास तसे

पूर्व आणि पश्चिम बर्लिनमध्ये दुभाजक भिंत अस्तित्वात होती तेव्हाची ही गोष्ट आहे. एक दिवस पूर्व बर्लिनमधील लोकांनी पश्चिम बर्लिनमधील प्रतिकूल लोकांसाठी एक छोटीशी परंतु अगदी वेगळी अशी भेट पाठविण्याचे ठरविले. पूर्व बर्लिनमधील लोकांनी एका मोठ्या ट्रकमध्ये कचरा, विटांचे तुकडे, दगड, माती, बांधकामाचे जुनेपुराणे सामान, अगर इतर अनेक नगण्य किंमतशून्य वस्तू भरल्या. त्यांनी तो ट्रक पश्चिम बर्लिनमध्ये सीमापार केला. ती भेट पाहून पश्चिम बर्लिनचे लोक मनातून फार दुखावले. अगदी चिडलेसुद्धा. अशा पद्धतीची डिवचणारी भेट पाहून त्यांच्या मनात तशाच पद्धतीने परत भेट करण्याची प्रबळ इच्छा निर्माण झाली. परंतु अत्यंत नशिबाने काही सद्गृहस्थांनी सद्सद्विवेकबुद्धीमुळे एक चांगला विचार मांडला. त्यांनी

मांडलेल्या प्रस्तावाप्रमाणे पश्चिम बर्लिनच्या लोकांनी उत्तम प्रतिसाद दिला. त्यांनी तेव्हढाच मोठा ट्रक आणला. त्यामध्ये पूर्व बर्लिनमध्ये तुटवडा असलेले उत्तम अन्नपदार्थ, जरूरी असणारे पण उपलब्ध नसणारे कपडे, दुर्मीळ पण अत्यावश्यक असलेली औषधे आणि इतर अनेक जीवनापयोगी वस्तूंनी तो ट्रक शिगोशिग भरला. त्यांनी तो ट्रक सीमापार नेला आणि त्यातील सर्व सामान काळजीपूर्वक उतरविले.

या सर्व सामानाबरोबर त्यांनी एक निरोप देणारा संदेश देणारा असा एक फलक पण लावला. ''प्रत्येक जण आपआपल्या कुवतीप्रमाणे व बुद्धिप्रमाणे दुसऱ्याला देत असतो.'' या निरोपातून दिल्या गेलेल्या संदेशाचा अपेक्षेप्रमाणे हवा तसा परिणाम घडून आला. पूर्व बर्लिनचे प्रजाजन मनातून खजिल झाले. पश्चिम बर्लिनच्या चांगुलपणाने पूर्व बर्लिनच्या वर्मावरच घाव घातला होता. दु:ष्कर्माला उत्तर दु:ष्कर्माने देऊ नये हे त्यांनाही समजून आले. दुसऱ्याच्या अपप्रवृत्तीला मनाच्या उदारपणाने उत्तर देणे हाच केव्हाही शहाणपणा ठरतो. जशास तसे पण औदार्याचे उत्तर देणे उत्तम.

❋ ❋ ❋

# जशी करणी तशी भरणी

लिलीचे लग्न होऊन ती प्रथेप्रमाणे नवऱ्याबरोबर त्याच्या घरी राहायला जाते. तिची सासू पण त्यांच्याकडेच राहात असे. थोड्याच दिवसात लिलीला सासूबाईंच्या अनेक सवयी आवडेनाशा वाटू लागतात. तिला त्या सवयी सहन होईनात. त्यातच सासूबाई लिलीच्या वागण्यातील चुका काढून सतत तिला घालूनपाडून बोलत असत.

दिवस जात होते, महिने जात होते. पण लिली आणि तिच्या सासूबाई यांचे एकमेकींशी संबंध सुधारण्याचे चिन्ह दिसत नव्हते. सतत एकमेकींविषयी कुरबुर, तक्रार व भांडणे चालूच होती. जुन्या जमान्यातील रितीरिवाजानुसार लिलीला सतत सासुबाईंच्या पाया पडावे लागत होते. त्यांचे प्रत्येक म्हणणे ऐकावे लागत होते. या सर्वांतून लिलीची सासुबाईंबरोबर नेहमी वादावादी सुरू असे. या सगळ्या वातावरणाचा लिलीच्या नवऱ्याला अतिशय त्रास होऊ लागला होता.

सरतेशेवटी लिलीला सासूबाईंचा हा सासुरवास, त्यांचे सतत काही ना काही कारणावरून रागावणे, चिडणे आणि मुख्य म्हणजे त्यांचा हुकुमशाहीचा आवाज सहन होईनासा झाला. यावर काहीतरी तोडगा काढला पाहिजे हे तिच्या मनाने पक्के ठरविले. तिच्या वडिलांचा एक जुना दोस्त होता. तो आयुर्वेदाचार्य होता. जडीबुटी औषधे तयार करून तो विकत असे. एक दिवस लिली त्याला भेटायला गेली. त्याच्याजवळ लिलीने आपले मन मोकळे केले. सर्व परिस्थितीची त्याला कल्पना दिली. तिला किती त्रास होतो आहे हे पण तिने थोडे जास्त करून सांगितले. त्याच्याकडे लिलीने विष असलेल्या औषधाची मागणी केली. ती ते औषध सासूबाईंना देणार असल्याचे त्याला बोलली. तिच्यामते म्हणजे सगळेच प्रश्न सुटून जातील.

त्या वैद्यराजांनी लिलीला एक औषध बनवून दिले आणि सांगितले, 'या औषधाचे विष तुझ्या सासूबाईंच्या शरीरात हळूहळू पसरेल. रोज तू त्यांच्यासाठी काहीतरी चमचमीत, त्यांच्या आवडीचा पदार्थ बनवित जा. त्या पदार्थात हे औषध मिसळून त्यांना देत जा. त्यांच्या शरीरावर त्याचा परिणाम होत जाईल.' त्यांनी पुढे असेही सांगितले की, 'सासूबाई मेल्यावर कोणाला संशय येऊ नये यासाठी तू त्यांच्याशी अतिशय प्रेमाने वाग. त्यांची काळजी घे. त्यांच्याशी वाद घालीत बसू नकोस. त्या सांगतील त्या आज्ञेचे पालन कर. त्यांची इच्छा प्रमाण मान. त्यांना अगदी एखाद्या सम्राज्ञीसारखी सांभाळ.'

औषध हातात पडल्यावर लिली खूप सुखावली. तिने वैद्यराजांचे आभार मानले. कायद्याच्या चौकटीत बसणारा सासुबाईंच्या खुनाचा प्लॅन लगेच अमलात आणण्यासाठी ती तडक घरी परतली. वैद्यराजांनी सांगितलेल्या सूचनेप्रमाणे वागताना तिने स्वत:च्या वागण्याला मर्यादा घालून घेतल्या. सासुबाईंबरोबर होणारे वाद अजिबात टाळायला सुरुवात केली आणि त्याच्याशी स्वत:च्या आईसारखेच वागायला लागली.

अशा बदललेल्या वातावरणाचे सहा महिने उलटून गेले. या सहा महिन्यांत घरात एक वेगळेच एकोप्याचे वातावरण निर्माण

झाले. लिली आता खूपच शांत व समजूतदारपणे वागत होती. सासूसुनेमध्ये सहा महिन्यांत एकदाही वाद झाले नाहीत. दोघींनी एकमेकींना शब्दाने कधी दुखावले नाही. अर्थातच, त्यामुळे लिलीचा रागाचा पारा केव्हाही चढला नाही. तिच्या डोक्याला कधीही त्रास झाला नाही. सासुबाईंची पण लिलीकडे पाहण्याची पद्धत बदलली. तिच्याबद्दलची त्यांची मते बदलली. त्या लिलीवर मुलीसारखी प्रेम करू लागल्या. चारचौघांत त्या लिलीचे वारेमाप कौतुक करू लागल्या. मैत्रिणींना आणि नातेवाईकांना त्या मोठ्या अभिमानाने सांगत की त्यांची सून लाखात एक आहे. शोधूनही अशी सून सापडणार नाही. त्या दोघी मायलेकीसारख्या एकमेकींवर प्रेम करू लागल्या. हा सगळा बदल पाहून लिलीचा नवरा मनातून एकदम खूश झाला.

एक दिवस लिली परत त्या वैद्यराजाकडे मदत मागायला गेली. तिने त्यांना विनंती केली, काका, तुम्ही दिलेले सासुबाईंचे औषध बंद करता येईल अशी मला मदत करा. कारण त्यांना आता मारायचे नाही. त्या आता माझ्याशी फारच चांगल्या वागू लागल्या आहेत. त्या एक आदर्श सासुबाई झाल्या आहेत. मला पण आता त्यांच्याबद्दल प्रेम वाटू लागले आहे. त्यामुळे मी दिलेल्या औषधामुळे त्यांना मरण आलेले मला पटणार नाही. वैद्यकाका खूश होऊन त्यांनी हसत हसत मान डोलावली आणि म्हणाले, ''काळजी करण्याचे काहीच कारण नाही. अगं, मी तुला सासुबाईंना देण्यासाठी विष देणे कसे शक्य होते? मी त्यांच्यासाठी दिलेले औषध म्हणजे तब्ब्येत तंदुरुस्त राहण्यासाठी घेण्याचे व्हिटॅमिन – जीवनसत्त्व होते. खरे विष होते ते तुझ्या मनात व त्यांच्याबद्दल तुझ्या दृष्टिकोनात होते. पण आता ते पार पळून गेले आहे. शिल्लक राहिले आहे ते तुझ्या मनातील त्यांच्याविषयीचे प्रेम. जे तू त्यांच्यावर सतत पाखडत आहेस. तेव्हा आता काहीच प्रॉब्लेम राहिलेला नाही.''

तुमच्या लक्षात आले असेलच की जसे तुम्ही इतरांबरोबर वागता तसेच ते तुमच्याशी वागतात. जो दुसऱ्यावर प्रेम करतो त्याला इतरांकडून भरभरुन प्रेमच मिळते.

❋ ❋ ❋

# जसे करावे तसे भरावे

एका थंडीच्या दिवसातील सायंकाळी एका माणसाला रस्त्याच्या कडेला एक वयस्कर स्त्री अवघडून उभी राहिलेली दिसली. तिच्या उभे राहण्यावरून व भिरभिरत्या नजरेवरूनच त्या गृहस्थाला ती स्त्री अडचणीत असून तिला मदतीची गरज असल्याचे समजले. लगेच त्याने त्याची गाडी तिच्या मर्सिडीजसमोर आणून उभी केली. गाडीतून उतरून तो तिच्या जवळ आला. त्याची पाँटीयाक गाडी थांबविल्यानंतर अजूनही फटफट आवाज करीत होती. त्याच्या चेहऱ्यावर असलेले हसू पाहिल्यानंतरही ती स्त्री थोडी साशंकच होती. गेल्या एक तासाभरात एक माणूस सुद्धा चौकशीसाठी थांबले नाही. मग हाच का थांबला असावा? तो दिसायला गरीब आणि भुकेला दिसत होता. त्याच्यापासून आपल्याला काही धोका तर नाही ना? तो मला काही इजा तर करणार नाही ना? असे नाना विचार आणि शंका तिच्या मनात आल्या.

ती घाबरलेली आहे हे त्याच्याही लक्षात आले. त्यात ती उघड्यावर कडाक्याच्या थंडीत उभी होती. तिला मनातून काय वाटत असेल याची त्याला कल्पना आली. त्या कडाक्याच्या थंडीमध्ये कोणालाही गारठून जायला झाले असते. तो तिला म्हणाला, ''मॅडम, मी तुम्हाला मदत करण्यासाठी थांबलो आहे. आपण माझ्या कारमध्ये का जाऊन बसत नाही? तिथे तुम्हाला थोडी ऊब मिळू शकेल आणि तुमची थंडी थोडी कमी होईल. बाय द वे, माझे नाव ब्रायन अँडरसन.''

तिच्या कारचे एक चाक पंक्चर झाले होते इतकेच; पण तिच्यासारख्या वयस्कर स्त्रीसाठी ते बदलणे खूपच अवघड होते. ब्रायन कारच्या खाली जाऊन त्याने चाक काढण्यासाठी जॅक कोठे लावावा याचा अंदाज घेतला. लवकरच त्याने पंक्चर झालेले टायर बदलले. पण ते करताना त्याचे कपडे खूप खराब होऊन गेले होते. त्याच्या हाताला पण थोडे लागले होते.

वर उभा राहून तो चाकाचे स्क्रू आणि नट बोल्टस् घट्ट करीत असताना त्या स्त्रीने ब्रायनच्या कारच्या खिडकीची काच खाली केली आणि तिने बोलायला सुरूवात केली. ती सेंट लुईसची असून या रस्त्याने जात होती. तिला त्याचे आभार मानायला पुरेसा

वेळ मिळाला नाही. ब्रायनने तिची डिकी बंद केली आणि तो हसला. तेव्हढ्यात त्या स्त्रीने विचारले, ''किती पैसे देऊ?'' किती रक्कम सांगितली असती तरी ती कमीच होती. तिला ती सहज शक्यही होती. ब्रायन तिच्या मदतीला थांबला नसता तर काय भयंकर संकटे येऊ शकत होती, याची तिला पूर्ण कल्पना होती. ब्रायनला मात्र तिच्याकडून कामाचे पैसे घ्यावे असे एकदाही वाटले नाही. हा काही त्याचा पैसे कमावण्याचा व्यवसाय नव्हता. हे फक्त एखाद्याला गरज असताना मदत करणे होते. देवदयेने आतापर्यंत त्याला आयुष्यात अनेक जणांनी मदत केली होती. याच तत्त्वानुसार तो आजवरचे जीवन जगला होता. त्याहून वेगळे वागायचे त्याच्या मनातही आले नाही.

त्याने तिला तसे स्पष्ट सांगितले व पुढे म्हणाला, ''जर तुम्हाला खरोखरच मला काही पैसे द्यावे असे वाटत असेल तर यानंतर जर मदतीची जरुरी असणारी एखादी व्यक्ती आढळली तर त्या व्यक्तीला हवी असलेली मदत करा आणि त्या वेळी माझी आठवण करा.''

तिने आपली कार सुरू करून ती मार्गस्थ होईपर्यंत ब्रायन थांबला होता. तो दिवस खूपच थंड आणि भकासवाणा होता. पण आपण कोणाला तरी मदतीचा हात देऊ शकलो याचे त्याला समाधान मिळाले होते. सायंकाळच्या त्या संधिप्रकाशात संथपणे तोही आपल्या घराकडे निघून गेला.

थोडे अंतर गेल्यावर त्या स्त्रीला रस्त्याच्या कडेला एक छोटेसे रेस्टॉरंट दिसले. थोडेसे काही खाण्यासाठी आणि थंडीमध्ये जरा उबदार होण्यासाठी ती त्या रेस्टारंटमध्ये शिरली. तसा तिच्या घरी पोहोचण्यापूर्वीचा हा शेवटचा टप्पा होता. ते जरासे जुनाट मळके दिसणारे असे रेस्टॉरंट होते. बाहेरच्या बाजूला दोन गॅसस्टेशन्स होती. तो सगळा परिसर तिला अनोळखी होता. ती बसल्यानंतर एक वेट्रेस आली. येताना तिने एक टॉवेल आणला होता. तो तिने त्या स्त्रीला तिचे ओले झालेले केस पुसण्यासाठी दिला. येताक्षणीच त्या वेट्रेसने एक तोंडभरून गोड स्मित केले. दिवसभर उभ्याने काम करूनही तिचे ते गोड स्मितहास्य मावळले नव्हते. ती आठ महिन्यांची गर्भवती होती हे त्या स्त्रीच्या नजरेतून सुटले नाही. त्या अवस्थेतही तिची कामातील सचोटी कमी झाली नव्हती किंवा शारीरिक अवस्थेमुळे तिच्या लोकांची सेवा करण्याच्या वृत्तीत फरक पडला नव्हता. काही माणसे फार कष्ट करूनही इतकी कमी कमाई होत असतानाही, येणारे ग्राहक अपरिचित असूनही ते उत्तम सेवा कशी देऊ शकतात, याचे त्या वयस्कर स्त्रीला राहून राहून आश्चर्य वाटत होते. त्याच क्षणी तिला ब्रायनची आठवण झाली. आपले खाणे झाल्यानंतर त्या स्त्रीने बिलाच्या रकमेपोटी १०० डॉलरची नोट ठेवली. वेट्रेस त्याचे सुटे पैसे आणण्यासाठी जाऊन परत येते तोवर ही स्त्री दारातून बाहेर पडून निघूनही गेली होती. वेट्रेस येण्याआधीच ती गेल्याकारणाने ती कोठे गेली हे ती वेट्रेस शोधू लागली; पण तिला पत्ता लागला नाही. टेबल आवरताना तिला पेपर नॅपकिनवर काहीतरी लिहिलेले आढळले.

मजकूर वाचून तिच्या डोळ्यांत पाणी आले. ''तू मला काहीही देणे लागत नाहीस. मला पण याचा अनुभव आला आहे. मला ज्या माणसाने मदत केली होती त्या माणसाने शिकविलेला धडा मी गिरवित आहे. तुला जर खरोखरच मला काही देण्याची इच्छा असेल तर एकच कर. ही प्रेमबंधाची साखळी तुटू न देता अशीच पुढे सुरू ठेव.'' टेबलावर रुमालाखाली आणखी चार शंभर डॉलरच्या नोटा होत्या.

त्यानंतर तिला बरीच कामे होती. राहिलेली टेबले साफ करायची होती. रिकामी झालेली साखरेची भांडी भरायची होती. नवीन आलेल्या लोकांना हवे नको पाहायचे होते. पण राहिलेला दिवस जिद्दीने काम करून तिने पुरा केला. त्या दिवशी काम संपूवन ती घरी गेल्यावर जेव्हा बेडवर आडवी झाली तेव्हा ती आज मिळालेल्या पैशाबद्दल व त्या स्त्रीने जे लिहिले होते त्याचा विचार करीत होती. मला आणि माझ्या नवऱ्याला किती पैशाची गरज आहे हे तिला कसे समजले. पुढच्या महिन्यात येणाऱ्या बाळासाठी खर्च करणे खूप कठीण होणार होते.

तिचा नवरा किती चिंता करीत असेल याची पण तिला कल्पना होती. तिच्या शेजारीच तो बेडवर शांत झोपलेला होता. त्याच्याजवळ जाऊन हलकेच त्याच्या कानात तिने पुटपुटले,''सगळे काही व्यवस्थित होणार आहे. तू काळजी करु नकोस. माझे तुझ्यावर खूप प्रेम आहे माझ्या ब्रायन अँडरसन.''

जुनी एक म्हण आहे. जशी करणी तशी भरणी. हा प्रेमाचा दिवा असाच तेवत राहो. परमेश्वर त्याचे काम गूढपणे करीत असतो. त्याच कारणासाठी काही वेळा काही माणसे आपल्या आयुष्यात येत असतात.

❋ ❋ ❋

# जिव्हारी लागणारा शेवटचा प्रहार

एक मनुष्य रोज रोज कामावर जायचे, दमूनभागून घरी यायचे आणि बायकोने मात्र घरीच बसायचे याने कंटाळून गेला होता. आपल्या बायकोला आपण किती त्रास सहन करतो ते समजायलाच हवे, या उद्देशाने देवाला तो एक प्रार्थना करतो.

देवा, मी रोज कामाला जातो आणि आठ तास मर मर मरतो. त्यावेळी माझी बायको मात्र नुसती घरात बसून असते. मला किती कष्ट पडतात ते तिला एकदा समजलेच पाहिजे. तेव्हा एक दिवस आमच्या देहाची आणि कामाची अदलाबदल कर.

त्यावर देव त्याच्या अपरंपार प्रज्ञेने त्याची इच्छा पुरी करतो.

दुसऱ्या दिवशी सकाळी तो मनुष्य त्याच्या बायकोच्या रूपातच जागा होतो. तो उठतो, सर्वांसाठी नाश्ता बनवितो. मुलांना झोपेतून उठवितो. त्यांच्या शाळेसाठी त्यांना तयार करतो. कपडे घालून तयार करतो. नाश्ता खायला देतो. शाळेतील जेवणाचे डबे भरून देतो. गाडीने त्यांना शाळेत सोडतो. घरी येतो. धोब्याला देण्याचे कपडे गोळा करतो. ते धोब्याला नेऊन देतो. येताना बँकेत जाऊन पैसे जमा करतो. वाटेवर वाणसामान घेण्यासाठी दुकानात जातो. घरी येऊन आणलेले वाणसामान आणि भाजी जागेवर ठेवतो. महिन्याची बिले ऑनलाईन भरतो. हिशेब लिहितो. मांजराचे टोपले साफ करतो. कुत्र्याला आंघोळ घालतो.

तोपर्यंत दुपारचा एक वाजलेला असतो. राहून गेलेले रात्रीचे बेड नीट करतो. त्यानंतर घरातील ड्रायक्लिनरमध्ये कपडे धुतो. घरात व्हॅक्युमक्लिनरने कार्पेट साफ करतो. स्वयंपाकघर झाडूने व पोछाने साफ करतो. घरातील फर्निचरवरची धूळ साफ करतो. घाईने जाऊन मुलांना शाळेतून घरी घेऊन येतो. वाटेत त्यांच्याशी शाळेविषयी व अभ्यासाविषयी चर्चा करतो. घरी आल्यावर मुलांना दूध व कुकीज देतो. त्यानंतर त्यांना गृहपाठास बसवतो. एकीकडे धुतलेल्या कपड्यांना इस्त्री करतो. त्याच वेळी एकीकडे जमेल तसा टीव्ही पाहतो. बरोबर साडेचार वाजता तो बटाटे उकडतो, सोलतो, भाजी साफ करतो. सलाडची तयारी करतो, सायंकाळच्या जेवणाचे पदार्थ बनवितो.

जेवणानंतर तो टेबल व स्वयंपाकघर साफ करतो. भांडी साफ करण्यासाठी डिशवॉशर लावतो. वॉशिंग मशिनमधील सुकलेल्या कपड्यांच्या घड्या करून जागेवर ठेवतो. मुलांच्या आंघोळी उरकतो आणि मग बेडवर आडवा होतो. बायको थांबलेली असते. दमला असला तरी तिला खूश करतो. दुसऱ्या दिवशी सकाळी बेडवरून ताडकन उठतो आणि देवाला प्रार्थना करतो,

हे देवा, मला समजत नाही मी असा का विचार करीत होतो. मी उगाचच बायकोचा मत्सर करीत होतो. माझी ती चूक होत होती. दिवसभर घरात राहून घरचे काम करणे सोपे नाही. ओ देवा, परत आपले आम्हा दोघांना स्वत:चे देहात रूपांतर कर. आमची आम्हाला कामे करू दे.

देव त्याच्या अपरंपार प्रज्ञेच्या जोरावर उत्तर देतो, ‘‘हे पहा, मला वाटते तुला चांगला धडा मिळाला आहे. तुम्ही दोघे तुमच्या मूळच्या रूपात जायला मला सुद्धा आवडेल. पण आता नऊ महिने थांबावे लागेल. कारण काल तू गरोदर राहिला आहेस.’’

❋ ❋ ❋

# जीवनातील आनंद

मराठी माणसाच्या नाटकाचे वेड सर्व दुनियेला ठाऊक आहे. रंगभूमीच्या सुवर्णयुगापासून मराठीचे अनेक मोहरे रंगभूमीने पाहिले. बालगंधर्व, गणपतराव बोडस, दीनानाथ, केशवराव भोसले, केशवराव दाते, मा. दत्ताराम, मामा पेंडसे, नानासाहेब फाटक, अशी कितीतरी नावे घेता येतील. या सर्वांचे बालपणापासूनचे नाटक वेडच त्यांना रंगभूमीवर उत्तम नट म्हणून पाय रोवून उभे राहण्यास उपयोगी पडले. यापैकी बहुतेक जणांनी बालपणात नाटक मंडळींमध्ये पडेल ते काम करीतच नाट्यशास्त्राचे धडे गिरविले. प्रत्येकाच्या आयुष्यात रंगभूमीवर येण्याची संधी अडचणीतून अचानक चालून आली आणि संधी मिळताच त्यांच्यातील सुप्तगुण विजेप्रमाणे लख्खकन् चमकून बाहेर आले.

डोअरकीपरचे काम करता करता प्रसिद्ध लोकप्रिय विनोदी सिनेनट राजा गोसावी केव्हा उदयास आले ते समजले सुद्धा नाही. नाटकाचे पडदे ओढणारे प्रभाकर पणशीकर हे 'तो मी नव्हेच' मधील लखोबा लोखंडे म्हणून केव्हा जनमानसात रूजले ते समजलेच नाही.

जी गोष्ट या नटमंडळींची तीच गोष्ट सर्कशीमधील दामू धोत्रे यांची. प्राण्यांची देखभाल करता करता सर्कशीतील प्राण्यांचा एक निष्णात ट्रेनर म्हणून त्यांची ख्याती पसरली. सर्कशीबरोबर दामू धोत्र्यांचे नाव कायम जोडले गेले.

या जनमान्य विविध कलाक्षेत्रातील कलाकारांप्रमाणेच तुमच्या आमच्या प्रत्येकाच्या अंगी काही ना काही गुण, कौशल्य दडलेले असते. असे गुण किंवा कौशल्ये अदृश्य, वापर न केलेली किंवा शोध न घेतलेली राहतात. असेच कलागुण तुमच्यामध्येही लपलेले असतात. कदाचित इतरांसारखी कला तुम्ही लोकांसमोर सादर करू शकणार नाही. पण या गुणांच्या जोरावर इतरांच्या कलेचा आस्वाद तर तुम्ही घेऊ शकाल. प्रत्येकाने स्वत:मध्ये लपलेल्या या गुणांचा किंवा कौशल्याचा शोध घ्यायलाच हवा. त्यामुळे संपूर्ण आयुष्याला अर्थ प्राप्त होऊ शकेल. आयुष्य सुखी, समाधानी, आनंदी व समृद्ध होईल.

❋ ❋ ❋

# जेव्हा स्त्री खोटे बोलते तेव्हा

एके दिवशी एक व्यावसायिक शिवणकाम करणारी स्त्री नदीच्या काठावर बसून शिवणकाम करीत होती. काम करता करता तिच्या अंगठ्याचे अंगुष्ठान नदीच्या पाण्यात पडले. ती खूप रडायला लागली. तिला रडताना पाहून देव प्रकट झाला आणि तिला विचारले, ''माझ्या लाडक्या लेकरा, तू का रडते आहेस?'' त्या स्त्रीने सांगितले, ''माझे अंगुष्ठान चुकून नदीच्या पाण्यात पडले. आता मला शिवणकाम करताना अडचण येईल. माझ्या नवऱ्याला आमचे कुटुंब पोसायला मदत करण्यासाठी मी हे काम करते.'' तिची दया येऊन देवाने पाण्यात हात घालून एक सोन्याचे अंगुष्ठान बाहेर काढले. त्याला नीलमणी लावलेला होता.

हे तुझे अंगुष्ठान आहे का? देवाने विचारताच त्या स्त्रीने नाही म्हणून सांगितले.

देवाने पुन्हा पाण्यात हात घालून दुसरे सोन्याचेच अंगुष्ठान बाहेर काढले. ते माणिक रत्नजडित होते. देवाने हे अंगुष्ठान तुझे आहे का असे त्या स्त्रीला विचारल्यानंतर तिने परत नाही म्हणून सांगितले.

देवाने परत पाण्यात हात घालून एक कातड्याचे अंगुष्ठान काढून त्या स्त्रीला दाखविले व ते तिचे आहे का असे विचारले. स्त्रीने हो म्हणून सांगितले. देव तिच्या प्रामाणिकपणावर खूश होऊन त्याने तिला ती तीनही अंगुष्ठाने बक्षीस म्हणून दिली. ती स्त्री अतिशय आनंदाने घरी गेली.

त्यानंतर काही वर्षांनंतर ती स्त्री आपल्या नवऱ्याबरोबर नदीकाठाने जात असताना तिचा नवरा पाय घसरून नदीच्या पाण्यात पडतो. पाण्याच्या प्रवाहात तो दिसेनासा होतो. स्त्री खूप रडायला लागते. ती रडत असताना परत देव प्रगट होतो आणि तिला रडण्याचे कारण विचारतो. ती स्त्री अत्यंत दु:खाने तिचा नवरा नदीच्या पाण्यात पडल्याचे सांगते.

देव पाण्यातून एका अत्यंत रूबाबदार तरूणाला बाहेर काढतो आणि त्या स्त्रीला विचारतो, ''हाच तुझा नवरा आहे ना?'' ती स्त्री त्याला पाहून चटकन हो म्हणते. तिने खोटे बोलल्यामुळे देव चिडतो. ''तू खोटे सांगितलेस हे बरे नाही.'' ती स्त्री देवाच्या पाया पडून म्हणाली, ''हे देवाधी देवा, मला माफ कर. माझा गैरसमज झाला. मी जर नाही म्हणाले असते तर तू आणखी एक तरूण बाहेर काढून माझ्या समोर आणला असतास. मी त्यालाही नाही म्हणताच तू माझ्या नवऱ्याला बाहेर काढले असतेस आणि त्या वेळी मी प्रामाणिकपणे हो म्हटले असते तर तू मला तीनही नवरे म्हणून दिले असतेस. देवा माझे आता वय झाले आहे. तीन नवरे मी सांभाळू शकले नसते. आणि म्हणून मी प्रथमच हो म्हणाले.''

देवाला तिचे म्हणणे पटले आणि त्याने तिच्या नवऱ्याला तिच्या ताब्यात दिले.

**तात्पर्य :** ज्या वेळी स्त्री जाणूनबुजून खोटे बोलते तेव्हा ती तिच्या आणि इतरांच्या भल्यासाठीच खोटे बोलते.

❋ ❋ ❋

# टिपू नावाच्या कुत्र्याची गोष्ट

एकदा एक टिपू नावाचा कुत्रा होता. दिवसभर तो भटकंती करीत असे.

असाच भटकत असताना एक दिवस त्याला खूप भूक लागते. चालता चालता तो एका कुंपणाजवळ येतो.

त्या कुंपणाच्या दुसऱ्या बाजूला एक हाडाचा मोठा तुकडा पडलेला त्याच्या नजरेस पडतो.

पोटात पडलेल्या भुकेमुळे त्याचे डोळे चकाकतात. तो हाडाचा तुकडा मिळविण्यासाठी त्याची धडपड सुरू होते.

प्रथम तो त्या कुंपणावरून उडी मारून पलीकडे जाण्याचा प्रयत्न करतो. कुंपणाच्या उंचीमुळे त्याला कुंपणापलीकडे जाणे शक्य होत नाही. मग तो कुंपणाखालून खड्डा करून त्या मार्गाने दुसऱ्या बाजूस जाण्याचा प्रयत्न करतो. पण त्याचा हाही प्रयत्न सफल होत नाही. शेवटी अत्यंत निराश होऊन तो त्या कुंपणाच्या बाजूने चालायला लागतो.

थोडे अंतर चालून गेल्यावर अचानकपणे त्याला कुंपणापलीकडे जाण्याची वाट नजरेस पडते. तो हर्षभरित होऊन चटकन त्या हाडाच्या तुकड्यापर्यंत पोहोचतो. जवळ जाताच मटकन ते हाड टिपू गट्ट करून टाकतो.

नंतर समाधानाने आपल्या नेहमीच्या जागी जाऊन बसतो.

दुसऱ्या दिवशी....

कालच्याच रस्त्याने टिपू पुन्हा भटकंती करायला निघतो.

थोड्याच वेळात टिपू कालच्या कुंपणाजवळ येऊन पोहोचतो. पाहतो तर काय? आजही कुंपणापलीकडे त्याला हाडाचा तुकडा दिसतो. त्याचे डोळे चमकतात. मात्र तो कालच्याप्रमाणे कुंपणावरून उडी मारण्याचा अगर कुंपणाखाली खड्डा खणून रस्ता काढण्याचा प्रयत्न करीत नाही. कालचा मार्ग त्याला आठवतो. विचार न करता तो चालत जाऊन कालच्याच मार्गाने कुंपणापलीकडील त्या हाडापर्यंत पोहोचतो. क्षणार्धात तो ते हाड पोटात रिचवून तृप्त होतो.

टिपू ज्या मार्गाने गेला तिथे जाण्यासाठी दुसरा एखादा मार्ग होता का? हो...

तो दुसरा मार्ग अधिक जवळचा व सोपा होता. मग टिपूने हा दुसरा जवळचा व सोपा मार्ग शोधायचा प्रयत्न का बरे केला नाही ?

टिपू असा प्रयत्न करणारच नाही. का बरे?

कारण टिपूला एका बाजूने जाऊन ते खाद्य मिळविण्यात पहिल्या दिवशी यश मिळाले होते.

त्याने त्या यशाची चवच चाखली होती.

याचाच अर्थ मिळालेले यश तुमच्या प्रयत्नांना, कल्पनाशक्तीला किंवा धडपडीला मारक ठरते का?

तुमच्या क्रियाशीलतेला ते बाधा आणू शकते का?

म्हणून सतत क्रियाशील, कल्पक राहाण्यासाठी, हातूत सतत काहीतरी नवीन घडण्यासाठी आपण कोणत्याही परिस्थितीत मनाला एकच प्रश्न विचारीत राहायला हवे, आणि तो म्हणजे,

ही गोष्ट करण्यासाठी अगर साध्य करण्यासाठी याहून चांगला, सोपा आणि लवकरचा मार्ग आहे का ?

त्यातच तुमची प्रगती होऊ शकते.

❋ ❋ ❋

# टेक्सबेरी इन्स्टिट्यूट मधील सफाई कामगार स्त्री

**डॉ.** फ्रॅंक मे हे टेक्स्बेरी इन्स्टिटयूटमधील आवारातून फेरफटका मारीत होते. अनवधाने त्यांची एका वयस्कर सफाई कामगार स्त्री बरोबर टक्कर झाली. आपली चूक सावरून घेऊन त्या अवघड प्रसंगातून बाहेर पडण्याच्या निमित्ताने डॉ. मे यांनी त्या स्त्रीला विचारले, ''तुम्ही या ठिकाणी किती वर्षे काम करीत आहात?''

त्या स्त्रीने सांगितले, ''मी जवळ जवळ ही संस्था सुरू झाली तेव्हापासून येथे काम करीत आहे.''

''हो का? मग या वास्तूच्या सुरूवातीपासूनच्या इतिहासाची कल्पना तुम्ही मला देऊ शकाल का?''

''मला नाही वाटत मी तसे काही तुम्हाला सांगू शकेन. पण एक दुसरे ठिकाण मात्र नक्की दाखवू शकेन.'' असे म्हणून तिने संस्थेच्या अगदी जुन्या इमारतीच्या तळघरात त्यांना नेले. तिथे कोपऱ्यात जुनापुराणा, लोखंडी गज असलेला, आता गंज चढलेल्या अवस्थेतील तुरुंगासारखा भासणारा एक पिंजरा तिने दाखविला.

''याच पिंजऱ्यात ते लोक ॲनी सुलीवान या मुलीला डांबून ठेवित असत.'' त्या स्त्रीने माहिती पुरविली. ''ॲनी ही एक लहानगी मुलगी होती. तिच्या वागणुकीत सुधारणा होणे अशक्य ठरल्यावरून तिला इथे आणून डांबून ठेवले होते. तिला सुधारणे कोणालाच शक्य होत नव्हते. जवळ जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीवर ती ओरडत असे आणि त्याला चावून लचका तोडीत असे. तिला दिलेले अन्न सुद्धा ती रागाने भिरकावून देत असे. डॉक्टर व परिचारिका यांना ती जवळ जाऊन तपासून देत नसे. उपचार करणे तर दूरच राहत होते. ती त्यांच्या अंगावर थुंकताना आणि किंचाळताना मी तिला पाहिली आहे. सर्वांनी तिच्यापुढे हात टेकले होते.''

''मी तिच्यापेक्षा वयाने थोडी लहान होते. मला नेहमी वाटत असे की आपल्याला असे जर डांबून ठेवले तर किती यातना होतील. मला ते नक्कीच आवडले नसते. या विचारामुळेच तिला मदत करण्याची मला इच्छा होत होती ; पण कशी मदत करता येईल ते सुचत नव्हते. कारण इतके मोठे डॉक्टर व नर्स जर काही करू शकत नव्हते तर माझ्यासारखी सामान्य मुलगी काय करू शकणार?''

''काय करावे असा विचार करीत राहिले आणि मग त्या रात्री कामावरून घरी गेल्यावर थोड्या कुकी बनविल्या. दुसऱ्या दिवशी येताना त्या घेऊनच आले. हलके हलके चालत मी तिच्या पिंजऱ्यापाशी गेले आणि म्हणाले, ''ॲनी, हे बघ मी तुझ्यासाठी मुद्दाम कुकी बनवून आणल्या आहेत. मी त्या पिंजऱ्याच्या या कोपऱ्यात ठेवित आहे. तुला जर वाटले तर तू इथे येऊन त्या घेऊ शकतेस.''

''त्यानंतर जितक्या लवकर शक्य होईल तितक्या लवकर मी तिथून दूर निघून आले. कारण नेहमीप्रमाणे ती त्या कुकीज फेकून देईल अशी भीती मला वाटली होती. पण आश्चर्य म्हणजे तिने तसे केले नाही. उलट तिने त्यापैकी कुकीज घेऊन खाल्ल्या. त्या प्रसंगानंतर ती माझ्याशी थोडी नरमाईने वागायला लागली. काही वेळा मी तिच्याशी थोडेसे बोलतही असे. एकदा तर मी तिला चक्क हसताना पाहिले.''

''आमचे हे जुळलेले नाते एका नर्सच्या लक्षात आले. तिने ते डॉक्टरांच्या कानावर घातले. मी ॲनीच्या केसमध्ये त्यांना मदत करायला तयार आहे का असे त्यांनी मला विचारले. मला शक्य झाले तर मदत करायला नक्कीच आवडेल असे मी सांगितले. अशा सगळ्या घटना घडत गेल्या. त्यानंतर ज्या ज्या वेळी डॉक्टरांना ॲनीला तपासायचे असेल किंवा उपचार करायचे असतील त्या त्या वेळी मी सर्वप्रथम ॲनीजवळ जात असे. तिला समजावून शांत करीत असे. तिचा हात माझ्या हातात घेऊन तिला थोपटत असे. त्यावेळी तिला डोळ्यांनी दिसत नसल्याचे त्यांच्या ध्यानात आले.''

''त्यानंतर काही दिवस डॉक्टर तिच्यावर उपचार करण्याचा प्रयत्न करीत होते; पण अशा पद्धतीने काम करणे त्यांना फार दिवस शक्य झाले नाही. त्याच सुमारास आंधळ्या लोकांसाठी काम करणारी पर्किन्स इन्स्टिट्यूशन अस्तित्वात आली होती. ॲनी तिथे गेली आणि शिक्षणात रमली. पुढे तिने शिक्षिका म्हणून काम केले.''

काही वर्षांनंतर ॲनी परत या संस्थेमध्ये भेट देण्यासाठी आली होती. इथल्या लोकांसाठी काही करता येईल का हे तिला अजमावयाचे होते. प्रथमत: संस्थेच्या संचालकांना काहीच सुचले नाही. पण थोड्याच वेळात संस्थेला आलेल्या एका पत्राची त्यांना आठवण झाली. एका अभागी माणसाने त्याच्या मुलीसाठी मदत मिळण्यासाठी ते पत्र लिहिले होते. त्याची मुलगी कमालीची दंगलखोर होती. तिचे वागणे अमानुषपणाचे असायचे. ती पूर्णत: मुकी, आंधळी आणि भ्रमिष्ट होती. तिला सांभाळणे हे त्याच्या बुद्धिपलीकडे गेले होते. तरीही तो तिला मनोरुग्णासाठी असलेल्या उपचार केंद्रात ठेवायला तयार नव्हता. त्यासाठी त्याने संस्थेला, कायम त्याच्या मुलीजवळ तिला सोबत म्हणून राहून काम करू शकेल अशी एखादी मुलगी आहे का, अशी विचारणा केली होती.''

आणि अशा रीतीने ॲनी सुलीवान ही हेलन केलरची आयुष्यभराची सखी सोबतीण झाली. जेव्हा हेलन केलरला नोबेल पुरस्कार मिळाला तेव्हा तिला विचारले होते, ''तुमच्या आयुष्यावर सर्वांत कोणत्या व्यक्तीचा प्रभाव पडला आहे?'' तेव्हा तिने ॲनी सुलीवानचे नाव घेतले होते. त्याच वेळी ॲनी सुलीवान म्हणाली,''नाही हेलन. आपल्या दोघींच्याही आयुष्यावर प्रभाव करणारी दुसरी तिसरी कोणी नसून टेक्सबेरी इन्स्टिट्यूटमधील ती सफाई काम करणारी स्त्री आहे.''

❋ ❋ ❋

# तीन चाचण्या

**प्रा**चीन काळात ग्रीस देशात असणारा सॉक्रेटिस हा अत्यंत विद्वान, सर्वमान्य, आदरणीय बुद्धिमान तत्त्ववेत्ता म्हणून ओळखला जात होता. एक दिवस या विद्वान तत्त्वज्ञाला त्याचा परिचित गृहस्थ भेटला. तो म्हणाला, ''मी तुझ्या प्रिय मित्राबद्दल जे नुकतेच ऐकले आहे ते तुला ठाऊक आहे का?''

सॉक्रेटिस उत्तरला, ''जरा एक मिनिट थांब. तू मला काही सांगण्यापूर्वी मला तुझी परीक्षा घेणे जरूरीचे वाटते. ही परीक्षा म्हणजे मला हव्या त्या तीन गोष्टींचा तुझ्याकडून खुलासा करून घेणे, हे मी आवश्यक समजतो. याला तीन चाचण्या किंवा तीन पडताळे म्हणता येईल.'' तो परिचित गृहस्थ म्हणाला ''म्हणजे काय?''

''जरा थांब. सांगतो.'' सॉक्रेटिस त्याला समजावित म्हणाला. ''तू मला माझ्या प्रिय मित्राबद्दल जे काही सांगणार आहेस त्याआधी मी तुझी त्रिपदरी किंवा त्रिसूत्री चाचणी घेऊ इच्छितो. त्यापैकी प्रथम चाचणी त्या माहितीच्या सत्यतेबद्दलची आहे. तू मला जे सांगणार आहेस त्याच्या सत्यतेबाबत तू स्वत: पूर्ण खात्री करून घेतली आहेस का?''

''नाही. खरे म्हणजे मी याबद्दल नुकतेच ऐकले आणि.....'' परिचित म्हणाला. सॉक्रेटिस त्याला थांबवून म्हणाला, ''ठीक आहे. म्हणजे ती माहिती खरी आहे की खोटी आहे हे तुला ठाऊक नाही. तर आता दुसरी चाचणी. ती चाचणी आहे त्या माहितीच्या चांगल्या अगर वाईटपणाबद्दल. तू माझ्या मित्राबद्दल जी माहिती सांगणार आहेस ती त्याच्या चांगल्या बाजूची आहे की वाईट बाजूची आहे?''

''नाही खरं तर...'' सॉक्रेटिस पुन्हा एकदा त्या परिचित गृहस्थाला अडवून म्हणतो, ''अस्सं! म्हणजे माझ्या प्रिय मित्राची वाईट बाजू तू मला सांगू इच्छितोस तर! पण त्याच्या सत्यतेबद्दल तुझी खात्री नाही. ठीक आहे अजूनही तिसरी चाचणी बाकी आहे. या तिसऱ्या चाचणीचे उत्तर जरी तू मला अनुकूल दिलेस तरी तुला जे मला सांगायचे आहे ते तू मला सांगू शकतोस. त्या तिसऱ्या चाचणीप्रमाणे, तू माझ्या प्रिय मित्राबद्दल मला जे सांगणार आहेस ते मला उपयोगी पडणारे आहे का हे तू मला सांग.''

तो परिचित गृहस्थ खाली मान घालून उत्तर देतो, ''खरं म्हणजे नाही.'' त्यानंतर सॉक्रेटिस त्या गृहस्थाला लगेच सांगतो,

''म्हणजे जे तू मला सांगणार होतास ते खरे नाही, चांगले नाही आणि मला त्याचा काहीही उपयोग नाही. मग ते तू मला सांगतोस तरी कशाला?''

तो गृहस्थ खाली मान घालून आपली वाट चालू लागला. म्हणूनच सॉक्रेटिस हा सर्वश्रेष्ठ विद्वान तत्त्ववेत्ता म्हणून अजरामर झाला आहे.

❋ ❋ ❋

## तुझे आहे तुजपाशी

आत्महत्या करण्यासाठी एक माणूस कड्यावरून खाली उडी मारणार होता, तेवढ्यात एक साधू त्याला अडवतो. साधू म्हणतो, ''आयुष्याला इतका वैतागला आहेस तर एक काम कर. माझ्याबरोबर इथल्या राजाकडे चल. तो आपल्या दोघांना मालामाल करेल.''

दोघेजण राजासमोर उभे राहतात. साधू राजाला सगळी हकिकत सांगतो. राजा त्या माणसाला म्हणतो, 'तू तुझे डोळे काढून मला दे, मी तुला पन्नास हजार रूपये देईन. तुझे दोन हात तोडून दे, मी तुला पंचवीस हजार रूपये देईन. पाय, मूत्रपिंड, हृदय, आतडी, किडणी, जठर या सगळ्याचे मिळून एक लाख रुपये!'' माणूस चिडून म्हणतो, ''माझ्या अमूल्य अवयवांची किंमत करताना तुम्हाला लाज नाही वाटत? मी माझा एकही अवयव विकणार नाही.''

राजा हसून म्हणतो,''इतक्या अमूल्य गोष्टी जवळ आहेत हे माहीत असून तुला तुझ्या आयुष्याचा कंटाळा का आला?''

माणसाला त्याची चूक समजते आणि तो रडू लागतो.

साधू म्हणतो, ''तू कुठल्या कारणासाठी आत्महत्या करणार होतास ते मला माहीत नाही; पण तुझ्याजवळ ज्या अमूल्य गोष्टी आहेत त्यांचा योग्य वापर करून एक नवं आयुष्य सुरू कर.''

When wealth is lost, something is lost.
When health is lost, everything is lost.
When everything is lost.... Future still remains!

❋ ❋ ❋

## तुम्ही भिकारी आहात का?... अतृप्त भिक्षापात्र

प्रत्येक माणूस आयुष्यभर भिकारी असतो. त्याला कशाची ना कशाची लालसा सतत भेडसावित असते. प्रत्येक इच्छा त्याला अस्वस्थ करीत असते. जेव्हा एखादी इच्छा पूर्ण होते तेव्हा लगेच दुसरी इच्छा तिची जागा घेते. जेव्हा तुम्हाला समजून येते की तुमची इच्छा पुरी होणार नाही, तेव्हा तुम्ही हताश होता व तुमच्या आयुष्याला वेगळेच वळण लागते. कोणे एके काळी एक राजा होता. तो रोज सकाळी राजवाड्याबाहेर सकाळचा फेरफटका मारायला जात असे. एके दिवशी असाच फेरफटका मारीत असताना त्याला राजवाड्याबाहेर एक भिकारी भिक्षा मागण्यासाठी आपली कटोरी घेऊन उभा असलेला दिसतो. त्याला पाहताच राजाने त्याला विचारले, ''तुला काय हवे आहे?'' तो भिकारी हसला आणि राजाला म्हणाला, ''आपण मला असे विचारले आहे की जणू काही आपण माझी इच्छा पुरी करू शकणार आहात.''

राजाला तो स्वत:चा अपमान वाटला. राजा म्हणाला, ''अर्थातच! मी तुझी कोणतीही इच्छा पुरी करू शकेन याची मला खात्री आहे. तुझी काय इच्छा आहे ते तू मला फक्त सांग.''

यावर भिकारी म्हणाला, ''पहा बरे महाराज, मला शब्द देण्यापूर्वी आपण दोन वेळा विचार करावा हे बरे.''

तो भिकारी कोणी साधासुधा भिकारी नव्हता तर तो राजाच्या पूर्वजन्मीचा हितकर्ता किंवा तारणकर्ता होता. मागच्या जन्मी त्याने राजाला अभिवचन दिले होते की, ''तुझ्या पुढील जन्मात मी परत तुला वेळोवेळी जागे करायला येईन. या जन्मी तुला जे हुकले त्यासाठी मी पुढच्या जन्मी नक्की येईन.'' पण मागच्या जन्माचे कोणाला आठवत असते? त्याप्रमाणे महाराज ही गोष्ट पार विसरून गेले होते. यामुळेच राजाने मोठ्या गर्वाने त्या भिकाऱ्याला परत बजावले, ''मी तुझी प्रत्येक मागणी पुरी करेन. मी अत्यंत पराक्रमी व बलाढ्य महाराजा आहे. तू कोणतीही इच्छा कर. अशी कोणती तुझी मागणी असणार आहे की जी मी पुरी करू शकणार नाही.''

भिकारी राजाला नम्रपणे म्हणाला, ''माझी मागणी अगदी साधी आहे. हा माझा कटोरा आपल्याला दिसतो आहे तो भरून जाईल असे काहीतरी दान मला पदरात घालावे.''

राजाने त्याची साधी मागणी मान्य करून त्याने आपल्या एका सरदाराला बोलावले आणि आज्ञा केली, ''या भिकाऱ्याची ही कटोरी भरभरून त्याला पैसे व नाणी द्या.'' सरदाराने तत्काळ पैसे आणले व त्याच्या कटोरीत ते ओतले. पण काय आश्चर्य ते द्रव्य क्षणार्धात अदृश्य झाले. सरदाराने पुन्हा आणखी द्रव्य कटोरीत भरले. पण कटोरी काही भरेना. ज्या क्षणी सरदार कटोरीत द्रव्य ओतीत होता त्या क्षणीच ते दिसेनासे होत असे आणि परत तो भिकाऱ्याचा कटोरा रिकामाच राहात होता.

ही नवलाईची गोष्ट पाहायला राजावाड्यातील तमाम लोक तिथे जमा झाले. राजवाड्याबाहेर इतकेच नव्हे तर राजधानीबाहेर ही वार्ता वाऱ्यासारखी पसरली. खूप मोठा जनसागर तिथे जमा झाला. राजाची इभ्रत कशी वाचवावी असा प्रश्न निर्माण झाला. राजाची अब्रू पणाला लागली होती.

राजाने आपल्या सरदाराला हुकूम सोडला, ''माझा संपूर्ण खजिना ओतावा लागला तरी चालेल. माझा राजवाडा गेला तरी बेहत्तर, पण या भिकाऱ्याकडून मी हार मानायला तयार नाही.''

राजाचा खजिना, त्यातील हिरेमाणके, जडजवाहिर सर्व मौल्यवान वस्तू भिकाऱ्याच्या कटोरीत पडून तिथून गायब होऊ लागल्या. जणूकाही त्या भिक्षापात्राला खाली बूडच नव्हते. त्यामध्ये जे जे पडले ते ते क्षणार्धात हवेत विरून जात होते, नाहीसे होत होते. दिवसभर हा प्रकार अव्याहत सुरू होता आणि हे पहायला आलेले लोक दिग्मूढ होऊन नि:शब्द झाले होते. अखेर शेवटी राजा त्या भिकाऱ्याला शरण आला. त्याच्या पायावर लोटांगण घालून त्याने आपला पराभव मान्य केला. काकुळतीला येऊन राजा भिकाऱ्याला म्हणाला, ''तू जिंकलेस. मी हरलो. मान्य आहे. पण कृपया जाण्यापूर्वी माझ्या एक जिज्ञासेचे समाधान कर. सतत रिता होणारे हे भिक्षापात्र कशाचे बनले आहे ते तरी मला सांग.''

भिकारी मनापासून हसला आणि म्हणाला, ''महाराज हे भिक्षापात्र माणसाच्या मनाचे बनले आहे. यात काहीच नवल किंवा रहस्य नाही. हे साधेसुधे माणसाच्या इच्छेचे बनविले आहे.''

या कटोरीमागचे तत्त्व लक्षात घेतले तर आयुष्यात परिवर्तन घडून येईल. तुमच्या मनात एखादी इच्छा निर्माण झाली की एक चक्र सुरू होते. प्रथमत: तुम्हाला खूप उत्सुकता अस्वस्थ करते, त्या कल्पनेने तुमच्या अंगावर रोमांच उभे राहतात, तुमची उत्कंठा शिगेला पोहोचते. तुम्हाला याची एक प्रकारची नशा चढते. काहीतरी अद्‌भुत घडणार आहे याची तुम्हाला जाणीव होते. सरतेशेवटी तुम्ही इच्छा केलेली गोष्ट घडते. उदाहरणार्थ, तुम्हाला हवी असलेली कार तुमच्या दारात येऊन उभी राहते. तुम्हाला मनासारखी नोकरी मिळते, तुम्हाला आवडेल अशी पत्नी मिळते आणि अचानक हे सर्व निरर्थक वाटायला लागते. या सर्वांमधील तुमची अभिरुची नाहीशी होते. असे काय घडते? या सर्व गोष्टींमधील तुमची आसक्ती संपुष्टात येते. दाराशी कार उभी असते पण त्याची उत्सुकता नसते. ती अस्वस्थ करणारी उत्सुकता फक्त कार दारात येईपर्यंतच असते. तुम्ही त्या इच्छेच्या नशेमध्ये स्वत:ला पार हरवून टाकता. ती इच्छा पुरी झाली की तुमच्या मनात एक प्रकारची भयानक पोकळी निर्माण होते. कार मिळाली, लग्न झाले, भरपूर पैसा बँक खात्यात जमा झाला. सगळी उत्सुकता संपली. त्यानंतर येणारी मनाची पोकळी तुम्हाला खायला उठते. पुन्हा तेच चक्र सुरू व्हावे लागते. नवीन इच्छा मनात निर्माण व्हावी लागते. या दुष्टचक्रातून बाहेर पडायला हाच एक

उपाय दिसतो.

अशाप्रकारे माणूस एकामागून एक इच्छा करीत जातो. या इच्छांनी विणलेल्या जाळ्यात तुम्ही सतत भिकारी राहता. तुमची इच्छा आयुष्यभर हेच सिद्ध करते. प्रत्येक नवीन इच्छा तुम्हाला निराशेच्या भोवऱ्यात खोलात नेते आणि जेव्हा तुमची इच्छा पूर्ण होते तेव्हा तुम्ही दुसरी इच्छा करता. ज्या दिवशी तुम्ही मनात केलेली इच्छा पुरी होणार नाही याची तुम्हाला जाणीव होते तो दिवस तुमच्या आयुष्याला वेगळे वळण देणारा ठरतो.

❃ ❃ ❃

# तुरूंगातील स्त्रीचे पलायन

एक आकर्षक तरूणी तुरूंगात तिने केलेल्या गुन्ह्याची शिक्षा भोगित होती. तिला दिलेल्या शिक्षेमुळे व झालेल्या अन्यायाच्या भावनेमुळे, तुरूंगात होणाऱ्या कष्टांमुळे ती वैतागून गेली होती. अशारितीने तुरुंगात खितपत पडण्याऐवजी मरण पत्करण्याची तिची मनाची तयारी होती.

गेल्या काही दिवसातील तुरूंगातील वास्तव्यात तिने एका राखणदाराशी मैत्री केली होती. त्याच्या इतर कामाबरोबर त्याचे आणखी एक काम होते. तुरूंगातील एखादा कैदी मेल्यानंतर त्याचे दफन करण्याचे काम त्याला दिले होते. तुरुंगाच्या भिंतीला लागून असलेल्या स्मशानभूमीमध्ये तो दफन करीत असे. तुरूंगात कोणालाही मृत्यु आला तर राखणदार एक विशिष्ट घंटानाद करीत असे, जो सर्वांना ऐकू जात असे. त्यानंतर राखणदार मेलेल्या कैद्याची बॉडी तयार असणाऱ्या शवपेटीत ठेवित असे. त्या शवपेटीला खिळे ठोकून ती बंद करण्यापूर्वी तो ऑफिसमध्ये जाऊन मरणाऱ्याची नोंद करून मृत्युचा दाखला घेण्याचे काम पुरे करीत असे. ते झाल्यावर तो परत येऊन शवपेटी बंद करून ती शववाहिनीतून स्मशानभूमीत नेत असे.

ही सर्व नेहमीची कार्यपद्धती त्या स्त्रीला माहीत झाली होती. त्याचा फायदा घेऊन तुरूंगातून पळून जाण्याची तिने एक नामी योजना आखली. त्या योजनेची तिने रखवालदाराला कल्पना दिली. पुढच्या वेळी जेव्हा घंटानाद होईल तेव्हा ती तिच्या खोलीतून बाहेर सटकेल आणि ज्या ठिकाणी शवपेट्या ठेवलेल्या असतात, त्या जागी पोहोचेल. तिथे गेल्यावर ज्या शवपेटीत डेड बॉडी असेल त्या शवपेटीत शिरून त्या मेलेल्या माणसाबरोबर पडून राहील. शिरस्त्याप्रमाणे रखवालदार ती शवपेटी हलके बंद करून त्याचे दफन करील. हे करीत असताना शवपेटीत पुरेसा उजेड व हवा जाईल याची तो काळजी घेईल. सायंकाळी अंधाराचा फायदा घेऊन रखवालदार परत स्मशानभूमीवर येऊन ती शवपेटी बाहेर काढेल, उघडेल व त्याचबरोबर ती स्त्री तुरुंगातून मुक्त होईल, अशी ती योजना होती. रखवालदार सुरुवातीस याला तयार नव्हता; पण दोघांच्या झालेल्या मैत्रीमुळे त्याला नाही म्हणणे शक्य झाले नाही. त्याने तिला मदत करायचे मान्य केले.

त्यानंतर बरेच आठवडे गेले. तुरूंगात कोणी मरण पावला नाही. एक दिवस ती खोलीत झोपली असताना ती वाट पाहत असलेला घंटानाद झाला. ती ताबडतोब उठून त्या अंधाऱ्या खोलीकडे जाऊ लागली. यापूर्वी बरेच वेळा पळून जाण्याच्या प्रयत्नात ती पकडली गेली होती. त्यामुळे ती थोडीशी धास्तावली होती. तिचे हृदयाचे ठोके जलद पडत होते. अखेर ती त्या अंधाऱ्या खोलीपर्यंत पोहोचली. शव ठेवलेली शवपेटी तिला सापडली. हळूच ती त्या शवपेटीत जाऊन आतील शवासोबत झोपली आणि शवपेटीचे झाकण हलक्या हाताने बंद करून घेतले. थोड्या वेळात रखवालदार येऊन खिळे ठोकण्याची वाट पाहत ती पडून होती.

लवकरच रखवालदार आल्याचा पावलांचा आवाज तिला ऐकू आला. खिळे ठोकतानाचा हातोड्याचा आवाजही तिने ऐकला. त्या शवपेटीत ती शवाशेजारी आडवी पडून असताना खूप अस्वस्थ होती; पण काही वेळातच आपण सुटणार आहोत या कल्पनेने ती ते सहन करत होती. शववाहिनीतून ती शवपेटी स्मशानात आणली गेली. नंतर ती शवपेटी खणलेल्या खड्ड्यात दणकन खाली ठेवण्यात आल्याचे तिला समजले. जाणूनबुजून तिने त्यावेळी सुद्धा बिलकुल आवाज केला नाही. सरतेशेवटी

शवपेटीवर खड्डा भरण्यासाठी टाकलेल्या मातीचा आवाजही तिने ऐकला. आता मात्र आपल्या सुटकेला फार थोडा वेळ बाकी आहे या कल्पनेने ती सुखावली. नंतरचे बरेच क्षण नीरव शांततेत गेले. सुटकेच्या कल्पनेने ती मोठमोठ्याने हसायला लागली. मी सुटणार, मी सुटणार असे स्वत:शीच ओरडून ती सांगत होती. शेजारी कोणाचे शव आहे या उत्सुकतेने तिने जवळचा फ्लॅश उघडला आणि तिला एकाएकी भयंकर धक्का बसला. शेजारचे शव दुसऱ्या कोणाचे नसून तिच्या योजनेत सामील होणार होता त्या रखवालदाराचेच होते.

❋ ❋ ❋

# थांबू नका पुढे जात राहा

एक तरूणी आपल्या वडिलांबरोबर कार चालवित जात होती. कार चालवित असतानाच त्या रस्त्याला वादळ सुरू झाले होते. वादळाच्या तडाख्यात सापडल्यानंतर तिने शेजारी बसलेल्या वडिलांना विचारले, ''आता मी काय करू?'' त्यानी तिला न थांबता गाडी चालवित राहायचा सल्ला दिला.

रस्त्यातील इतर गाड्या रस्त्याच्या कडेला थांबून राहात होत्या. वादळ जास्तच जोराने सुरू झाले होते. परत त्या तरूणीने विचारले, ''आता तरी थांबू का?'' वडील परत म्हणाले, ''नको, नको. तू गाडी चालवित राहा. पुढे जात राहा.''

काही अंतर गाडी चालविल्यावर तिने पाहिले की मोठेमोठे ट्रक्स सुद्धा रस्त्याच्या कडेला थांबत आहेत. तिने थोडसं घाबरून परत एकदा वडिलांना विचारले, ''बाबा, आता मात्र मला थांबायलाच हवे. मला पुढचा रस्ता फारसा दिसतही नाही. भयंकर परिस्थिती आहे. रस्त्यातील सगळी वाहने थांबत आहेत.''

वडिलांनी धीर देत सांगितले, ''अजिबात तू करीत असलेला प्रयत्न सोडू नकोस. शांतपणे गाडी सुरू ठेव.''

अजूनही वादळ जोरात सुरू होते, तरीही तिने गाडी चालविणे थांबविले नाही. लवकरच रस्ता खूपसा स्पष्ट दिसू लागला होता. तीन चार मैल अंतर गेल्यावर सूर्य ढगातून बाहेर आला. रस्ता कोरडा दिसू लागला.

तेव्हा तिच्या वडिलांनी तिला गाडी थांबविण्यास सांगितले. ''गाडी बाजूला घे आणि खाली उतर.''

तिने विचारले, ''आता कशाला थांबायचे?'' ''जेव्हा तू खाली उतरशील तेव्हा जरा मागे वळून पाहा. किती लोकांनी प्रयत्न सोडला आणि थांबल्यामुळे ते अजूनही वादळाच्या तडाख्यातच अडकले आहेत. तू मात्र धीराने गाडी चालवित राहिलीस. तू वादळाच्या बाहेर पडली आहेस.''

जे लोक त्यांच्या आयुष्यात कठीण प्रसंगातून जात असतात, त्यांच्यासाठी हे एक उत्तम उदाहरण आहे. केवळ इतर कोणी थांबले आहे म्हणून किंवा अगदी सर्वांत कर्तृत्ववान थांबला म्हणून तुम्ही थांबायलाच हवे असे नाही. जर तुम्ही तुमचे काम करीत राहिलात तर तुम्ही तुमच्या अडचणीतून नक्की सहीसलामत बाहेर पडू शकाल. तुमच्यावर आलेले वादळ लवकरच शमेल. तुम्हाला सूर्योदयाचा आनंदप्रकाश नक्की मिळेल. सूर्यप्रकाशात तुमचा चेहरा उजळून निघेल.

❋ ❋ ❋

# थोडक्यात व्यवस्थापनाचे धडे

धडा पहिला....

एका शेतावर एक बैल आणि एक टर्की गप्पा करीत उभे होते. बोलता बोलता टर्की बैलाला म्हणाला, ''खरं सांगू मला या झाडाच्या वरच्या टोकाच्या फांदीवर जाऊन बसायला खूप आवडेल; पण इतके वर जाण्यासाठी माझ्या अंगात ताकद नाही.''

असे म्हणून त्याने एक सुस्कारा सोडला.

बैल त्याला म्हणाला, ''असे का? अरे मग तू इथे पडलेल्या माझ्या विष्ठेचे थोडेसे चाटण का करीत नाहीस? त्यात ताकद येण्यासाठी आवश्यक असणारी पोषकद्रव्ये आहेत.''

ते ऐकून टर्कीने बैलाच्या विष्ठेच्या गोळ्याला चोचीने टोचून थोडेसे गट्ट केले. टर्कीला थोडीशी ताकद येऊन उत्साह आला. लगेच तो सगळ्यात खालच्या फांदीवर चढून बसला.

दुसऱ्या दिवशी टर्कीने आणखी थोडा बैलाच्या विष्ठेचा भाग खाल्ला. त्यानंतर तो काल बसला होता त्या फांदीच्या वर असलेल्या एका फांदीवर चढून बसला. असे करत करत चौथ्या दिवशी टर्की झाडाच्या सर्वांत वरच्या फांदीवर चढून विसावला. तिथे पोहोचल्यावर त्याची मान अभिमानाने ताठ झाली.

पण त्याच वेळी शेतकऱ्याच्या नजरेत टर्की चटकन भरला. त्याने लगेच टर्कीला गोळी घालून खाली पाडले.

**तात्पर्य :** बैलाची विष्ठा (केलेली थापाथापी) तुम्हाला उच्चपदावर नेऊन बसविते पण तिथे तुम्ही जास्त काळ टिकू शकत नाही.

एक लहानसा पक्षी थंडीपासून दूर जाण्यासाठी दक्षिणेकडे उडत जात होता. कडाक्याच्या थंडीमुळे तो पक्षी गारठून गेला होता. पंखातील जोर कमी झाल्यामुळे उडता उडता तो माळरानात जमिनीवर कोसळला. तो गारठलेला पक्षी निपचित पडलेला असतानाच एक गाय त्याच्या जवळून जाताना नेमकी त्याच्या अंगावर आपली विष्ठा टाकून गेली.

तो गारठून गेलेला पक्षी त्या गायीच्या विष्ठेच्या ढिगाखाली निपचित अवस्थेत तसाच पडून राहिला. त्या ढिगाखाली त्याला खूपच उबदार वाटू लागले होते. काही वेळानंतर अंगातील थंडी जाऊन ऊब आल्यामुळे तो आनंदाने गायला लागला.

त्याचवेळी नेमके एक मांजर तिथून जात होते. त्या पक्षाचे गाणे तिच्या कानावर पडले. गाण्याच्या आवाजाचा शोध घेताना ते मांजर त्या पक्षाजवळ पोहोचले. खरा प्रकार लक्षात येताच ढिगाखालच्या पक्षाला मांजराने क्षणार्धात खाऊन टाकले.

**तात्पर्य : १.** तुमच्या अंगावर घाण टाकणारा (गरळ ओकणारा) प्रत्येक माणूस तुमचा शत्रू नसतो. २. तुम्हाला घाणीतून बाहेर काढणारा (अडचणीतून सोडविणारा) प्रत्येक माणूस तुमचा मित्र असतोच असे नाही. ३. तुम्ही जेव्हा एखाद्या संकटाखाली दबलेले असता, तेव्हा तोंडाला कुलूप घालून स्वस्थ राहणे हे उत्तम.

❋ ❋ ❋

# दडलेला खजिना

एक माणूस समुद्रकिनाऱ्यावरच्या लेण्यांमध्ये संशोधनाचे काम करीत होता. एका लेणीमध्ये काम करताना त्याला एका कॅन्व्हास बॅगमध्ये कडक झालेले मातीचे गोळे आढळले. कोणीतरी मुद्दाम ते गोळे तयार करून तळपत्या उन्हात वाळविले असावेत असे दिसत होते. एकूण ते फार काही कामाचे असावेत असे त्याला वाटले नाही. तरी त्याबद्दल त्याला बरेच कुतूहल वाटले म्हणून लेणीतून बाहेर पडताना त्याने ती बॅग बरोबर घेतली. समुद्रकिनाऱ्यावर रमतगमत फिरताना पिशवीतील एक एक गोळा काढून तो समुद्राच्या पाण्यात जमेल तितका लांब फेकण्याचा प्रयत्न करीत होता.

त्यातील काही गोळे फेकून दिल्यावर त्याबद्दल तो फारसा विचार करीत नव्हता. एक गोळा त्याच्या हातून चुकून खाली दगडावर पडला आणि फुटला. त्यातील दडलेले मौल्यवान खडे बाहेर पडले आणि चमकले. त्यामुळे उत्सुकता वाढून तो राहिलेले सर्व गोळे मुद्दाम फोडून पाहू लागला. प्रत्येक गोळ्यात त्याला तसाच मौल्यवान खजिना आढळून आला. उरलेल्या फक्त २५ ते ४० गोळ्यांमधून त्याला हजारो डॉलर्सचे जवाहिर हाताला लागले. त्याच वेळी त्याच्या डोक्यात एक विचार आला.

तो त्या समुद्रकिनाऱ्यावर बराच वेळ हिंडत होता त्या वेळात त्याने कमीतकमी ५० ते ६० गोळे समुद्राच्या पाण्यात फेकून

दिले असणार. त्यामध्ये असलेली कितीतरी मौल्यवान किमतीची संपत्ती त्याच्या हातून समुद्राच्या लाटेवर फेकली गेली होती. जी काही संपत्ती त्याला हाती लागली त्याहून कितीतरी पट म्हणजे कोट्यावधी डॉलर्सची संपत्ती त्याने समुद्रात फेकून दिली होती. खरे तर ती त्याला घरी नेता आली असती.

आपल्या भोवतालच्या, लोकांबाबतीत हेच होते. आपण लोकांकडे किंबहुना स्वत:कडे तेव्हा फक्त बाह्य स्वरूपाकडे पाहत असतो. ते त्या मातीच्या कवचासारखेच असते. ते नेहमीच देखणे किंवा चमकणारे नसते. त्यामुळे आपण त्याच्याकडे दुर्लक्ष करतो. आपल्याला तो इसम कमी महत्त्वाचा भासतो. कारण तो इतरांपेक्षा कमी देखणा, कमी रुबाबदार, कमी प्रसिद्ध किंवा कमी धनवान वाटतो. परंतु त्याच्याकडे असलेले सुप्तगुण, त्याच्याकडे असलेला दडलेला खजिना पाहायला आपण पुरेसा वेळ देत नाही. असा दडलेला खजिना प्रत्येकाकडे असतोच. आपण थोडे कष्ट घेऊन त्या माणसाचे सुप्तगुण व खजिना पाहण्याचा प्रयत्न केला तर त्याचे बाह्य कवच गळून पडेल व त्याच्याजवळचा ओजस्वी जवाहर चमकून डोळ्यांत भरेल. तसे न केल्यास आपल्या सान्निध्यात असलेल्या या मौल्यवान मित्रांचा ठेवा बाहेरच्या बेगडी कवचामुळे आपण मातीमोल वाया दवडला, असे आपल्या आयुष्याच्या अखेरच्या पर्वात आपल्याला प्रकर्षाने जाणवेल.

❋ ❋ ❋

## दिव्य यशाची प्राप्ती

आयुष्यात काहीतरी विलक्षण, अलौकिक प्राप्त करण्याच्या यशाचे मानकरी होताना आपल्याला हे समजावून घेतले पाहिजे की यश मिळविणे हे जादूच्या कांडीने कोणालाही शक्य होत नाही. या भौतिक जगात यश हे फक्त कृती करणाऱ्यांना प्राप्त होते. दूर अंतरावर उभे राहून इतरांची कृती केवळ पाहात बसणाऱ्यांना यश कधीही प्राप्त होत नाही. जो घोडा गाडीला बांधलेला असतो व जो गाडी ओढत नेऊ शकतो तो कधीही दुगाण्या झाडीत नाही; परंतु ज्या घोड्याला लाथा मारायचीच सवय आहे तो कधीही गाडी ओढू शकणार नाही. म्हणूनच आपण सतत स्पर्धेमध्ये भाग घेतला पाहिजे. नुसत्या लाथाळ्या झाडून फायदा होणार नाही.

कठोर परिश्रमाला पर्याय नसतो. कठोर परिश्रमावाचून यश मिळणे अशक्य असते. प्रकृतीने पक्षांसाठी सुद्धा चारा अन्नपाणी निर्माण केले आहे; परंतु तो चारा पक्षाच्या घरट्यात आपोआप येत नाही. त्यातूनच सामान्यातून असामान्य निर्माण करणे हे तर फारच अवघड असते. इंग्रजी भाषेची डिक्शनरी तयार करण्यास तब्बल ३६ वर्षे कष्ट करावे लागले होते.

जागतिक कीर्तीच्या रवीशंकर यांच्या सतारीच्या रंगलेल्या एका मैफिलीनंतर मंत्रमुग्ध झालेला एक श्रोता त्यांच्याजवळ गेला आणि त्यांना म्हणाला, ''तुमच्यासारखे सतारवादन मला करता आले तर मी माझे सारे आयुष्य त्यासाठीच ओवाळून टाकीन.'' रवीशंकर तत्काळ उत्तरले, ''मी माझे आयुष्य त्यासाठीच ओवाळून टाकले आहे.''

शून्यातून काहीतरी विलक्षण, अलौकिक निर्मितीसाठी असेच सर्वस्व पणाला लावावे लागते. यालाच उभ्या जन्मातील सर्वांत कष्टाने, मेहनतीने केलेले काम म्हणता येईल.

❋ ❋ ❋

## दृष्टिकोनातील फरक .... विचारांच्या तीन दिशा

आपल्या कामाकडे पाहण्याच्या दृष्टिकोनातूनच करीत असलेल्या कामाचे अंतिम उद्दिष्ट काय आहे हे समजू शकते. हे सिद्ध करणारी खाली दिलेली तीन उदाहरणे आहेत. यामुळेच तुम्ही पोटार्थी कमाईसाठी नेमून दिलेले काम करता, की दिलेले काम उत्तम कसे होईल हे पाहता, का तुमच्या कामामुळे तुमचा ठसा कायम राहील या भावनेने तुम्ही काम करता, हे दर्शविणारी ही तीन उदाहरणे आहेत. तुमच्या मनात असलेली सकारात्मक वृत्ती आणि उच्च प्रतीच्या उद्दिष्टाचा दृष्टिकोन हे अंतिम साध्यासाठी फार महत्त्वाचे ठरतात.

एके दिवशी एक मार्गस्थ एका रस्त्यावरून जाताना त्याला दगडाचे कोरीव काम करण्याचे शिल्पकला केंद्र नजरेस पडले. तिथे तीन कारागीर दगडावर कोरीव काम करीत होते. ते कारागीर काय करीत आहेत या उत्सुकतेने त्या वाटसरूने त्यातील एका कारागिराला विचारले, 'तू काय करीत आहेस?' त्याने उत्तर दिले, ''मी दगड फोडण्याचे काम करीत आहे.''

तरीही त्याच उत्सुकतेने त्या वाटसरूने दुसऱ्या कारागिराला विचारले, 'तू काय करीत आहेस?'

दुसऱ्याने थोड्याशा उत्साहाने सांगितले, ''मी या मोठ्या दगडांचे हवे त्या आकारात चौकोनी तुकडे असे करतो आहे की ते चौकोन पाहिजे त्या ठिकाणी एकसारखे दिसून एक नेटकी दगडाची भिंत तयार होईल.'

त्याच्या उत्तराने थोडेफार लक्षात येऊनही काय करीत आहेत याची पूर्ण कल्पना न आल्याकारणाने त्या माणसाने तिसऱ्या कारागिराला तोच प्रश्न विचारला. तो तिसरा कारागिर स्वत:च्या कामावर समाधानी दिसला. त्याने अभिमानपूर्वक उत्तर दिले की, ''मी एक बिल्डिंगचे बांधकाम करीत आहे. ती बिल्डिंग एका चर्चची आहे.''

या गोष्टीवरून आपल्याला निश्चितपणे नेतृत्वाच्या महत्त्वाच्या गुणधर्माची जाणीव होते. तो गुणधर्म म्हणजे उच्च प्रतीच्या उद्दिष्टांचा दृष्टिकोन. तीनही पाथरवट सारखेच काम दगडावर करीत होते; पण प्रत्येकाने दिलेले उत्तर निराळे होते.

तीनही पाथरवटांना त्या दिलेल्या कामाचे उत्तम ज्ञान होते. तरीही तिसऱ्या कारागिराचे उत्तर इतर दोघांपेक्षा वेगळे का आले? तो इतर दोघांपेक्षा वेगळा का वाटला?

कदाचित नोकरीत असलेले काम त्याला फक्त कसे व काय एवढेच नव्हे तर तो ते काम 'का' करतो आहे याची पण जाण होती. त्याला त्याच्या कामाचा हिस्सा तर ठाऊक होताच, त्याचबरोबर त्याच्याजवळ अंतिम मोठी ध्येयपूर्ती पाहण्याची दूरदृष्टी होती.

केवळ नेमून दिलेले काम पुरे करण्यापलीकडील कामाच्या पूर्णत्वाच्या अर्थपूर्णतेची त्याला जाणीव होती.

त्याने केलेल्या कामाचा ठसा चर्चच्या इमारतीच्या रूपात तसेच चर्चला भेट देणाऱ्या लोकांच्या मनावर कायमचा उमटेल हे तो पक्के जाणून होता.

❋ ❋ ❋

# दृष्टीआड सृष्टी

**ज**रा आठवून पाहा बरे, तुमच्याकडे कोणाचेही लक्ष नसताना तुम्ही जे काम करीत असता ते तुम्ही अगदी प्रामाणिकपणे आणि सर्व शक्ती पणाला लावून करता का? तुम्ही तुमचे काम तितक्याच विश्वासार्हपणे करता का? किंवा तुमच्या कामामुळे तुम्ही पूर्णपणे विश्वासास पात्र असता का? तुमचे काम तुम्ही पूर्ण जबाबदारीने करता का? अशा वेळी तुम्ही इतरांबद्दल योग्य तितक्या सहानुभूतिपर विचार करता का? हे सर्व कोणाचेही तुमच्यावर लक्ष नसताना बरे का !

खरे तर इतर कोणाचे लक्ष नसताना जे काम करता तीच तुमची खरी कसोटी असते. कारण इतर कोणाचेही लक्ष नसताना तुम्ही करीत असलेले काम हे तुमच्या इच्छेनुसार तुम्ही करीत असता. त्यासाठी स्वत:ला प्रवृत्त करून मनापासून केलेले ते काम असते. स्वत:बद्दल तुमच्या मनात ज्या कल्पना, अपेक्षा असतात त्यानुसारच त्यावेळी ते काम तुमच्या हातून घडत असते. स्वत:बद्दल तुमच्या मनात ज्या कल्पना, अपेक्षा असतात त्यानुसारच त्या वेळी ते काम तुमच्या हातून घडत असते. स्वत:बद्दल केलेली अपेक्षा म्हणजेच पर्यायाने तुम्हाला कोण व्हायचे आहे किंवा काय साध्य करायचे आहे ते ठरविण्याची दिशा असते. कोणाचेही लक्ष नसताना तुम्ही स्वत:ला फसविण्याचा प्रयत्न केलात तर शेवटी तुम्हीच तुमच्या भविष्याला फसविल्यासारखे होते. प्रत्येक बाबतीत जाऊ दे, चालायचेच असा पवित्रा ठेवला तर मग सगळ्याच गोष्टी हाताबाहेर चालल्या जातील. कोणतेही ध्येय साध्य करण्याची बीजे, कोणाचेही लक्ष नसताना प्रामाणिकपणे तुम्ही करीत असलेल्या कामामध्येच पेरली गेलेली असतात.

ऑलिंपिक खेळांच्या स्पर्धेमध्ये जेव्हा एखादा खेळाडू सुवर्णपदक मिळवितो, तेव्हा त्याच्या खेळाकडे लक्षावधी प्रेक्षकांचे डोळे लागलेले असतात; परंतु त्यासाठी केलेली गेल्या अनेक वर्षांची मेहनत पाहायला मात्र त्यांच्यापैकी कोणीही प्रेक्षक हजर

राहिलेला नसतो. आपल्या कर्तृत्वाने स्वत:च्या उद्योगात अफाट यश मिळवून कोट्यधीश झालेला उद्योगपती सर्वांच्या डोळ्यांत भरतो; परंतु त्यासाठी त्याने सुरूवातीला कित्येक वर्षे रात्रंदिवस मेहनत मजुरी केलेली असते. त्या काळात मात्र तो कोणाच्याच नजरेत भरलेला नसतो.

तुमच्या कामावर कोणाची नजर नाही ना? मग हीच वेळ आहे. तुम्ही तुमच्या पात्रतेनुसार किंवा पूर्ण क्षमतेनुसार काम करा. त्याच योगे तुम्ही भोवतालच्या तुडुंब गर्दीमध्ये उठून दिसाल, वेगळे वाटाल आणि मगच सर्वांच्या नजरा तुमच्यावर खिळून राहतील.

❋ ❋ ❋

# दोघांतील फरक....

एक नामांकित हार्ट सर्जन आपली कार घेऊन एका नामांकित मोटार गॅरेजमध्ये जातो. मोटार मेकॅनिक ती कार दुरुस्त करायला घेतो. त्याच वेळी त्याने दुसऱ्या एका कारचे इंजिन दुरूस्त करण्यासाठी उघडलेले असते. इंजिनचे नट, बोल्ट, काही भाग त्याने सुटे केलेले असतात. हार्ट सर्जन त्याच्या कारच्या दुरुस्तीचा नंबर केव्हा येईल त्याची वाट पाहाण्यासाठी थांबलेला असतो.

इतक्यात तो गॅरेजचा मेकॅनिक डॉक्टरला उद्देशून म्हणतो, ''डॉक्टर मी तुम्हाला एक प्रश्न विचारु का?''

डॉक्टरला आश्चर्य वाटून तो त्याच्या जवळ जातो.

मेकॅनिक हातातले काम सोडून तेलाने भरलेले आपले हात फडक्याने साफ करतो. ताठ उभा राहतो आणि प्रश्न करतो, ''हे पाहा डॉक्टर मी हे गाडीचे इंजिन पूर्ण खोलू शकतो. इंजिनच्या वायर्स, स्क्रू इ. काढून त्याचे व्हॉल्व्हज् सुटे करू शकतो. काम झाले की पुन्हा जिथल्या तिथे लावू शकतो. त्यानंतर हे इंजिन नव्या इंजिनसारखे काम करायला लागते. पाहा ना तुमचे आणि माझे काम किती एकसारखे आहे. असे असताना मला कामासाठी इतका कमी मोबदला मिळतो आणि तुम्हांला मात्र माझ्यापेक्षा कितीतरी पटीने जास्त फी मिळते. समान कामासाठी मिळणाऱ्या बिदागीत एवढा फरक का असावा?''

हार्ट सर्जन थोडा वेळ स्तब्ध होतो . त्याच्या चेहऱ्यावर मिश्किल हास्य येते आणि मग डॉक्टर त्या मेकॅनिकला हलकेच म्हणतो, ''तू म्हणतोस ते खरे आहे. पण तू करीत असलेले इंजिनचे काम कार चालू असताना करून पाहा ना.''

❋ ❋ ❋

# दोन गारगोट्यांची गोष्ट

एका खेडेगावात एक गरीब शेतकरी होता. त्याने त्या खेडेगावातील अगदी घाणेरड्या व लोभी माणसाकडून बरेच पैसे कर्जाने घेतले होते. शेतकऱ्याला एक सुंदर मुलगी होती. तो कुरूप आणि लोभी सावकार त्या मुलीवर नजर ठेवून होता. त्याला तिच्याशी लग्न करायचे होते. त्याने शेतकऱ्यासमोर एक प्रस्ताव मांडला. शेतकऱ्याच्या मुलीने जर त्याच्याशी लग्न केले तर तो शेतकऱ्याने घेतलेले कर्ज माफ करेल. शेतकरी आणि त्याची मुलगी दोघेही जण या प्रस्तावाने भयचकित होऊन गेले. हा प्रस्ताव त्यांना मान्य होणे शक्यच नसते.

त्या सावकाराने या संकटातून सुटण्यासाठी एक योजना सुचविली. सावकार एका पैशाच्या रिकाम्या थैलीमध्ये दोन गारगोट्या ठेवेल. त्यापैकी एक काळी व एक पांढरी असेल. शेतकऱ्याच्या मुलीने त्या थैलीत हात घालून कोणती गारगोटी आहे हे न पाहता एक गारगोटी बाहेर काढायची. मुलीने जर काळी गारगोटी बाहेर काढली तर तिने तक्रार न करता सावकाराशी लग्न करायचे. त्या बदल्यात सावकार शेतकऱ्याचे कर्ज माफ करेल. मुलीने जर पांढरी गारगोटी बाहेर काढली तर मुलीला त्याच्याशी लग्न करायची आवश्यकता नाही; पण सावकार शेतकऱ्याचे कर्ज माफ करील. तिसऱ्या पर्यायानुसार जर मुलीने लग्नाला नकार दिला तर तो कर्ज

माफ न करता शेतकऱ्याला तुरूंगात पाठवेल.

हे बोलणे चालू असतानाच सावकाराने दोन गारगोट्या हाताने उचलल्या. त्याने गारगोट्या उचलताना चलाखी करून दोनही गारगोट्या काळ्याच उचलल्याचे त्या चलाख मुलीच्या लक्षात आले. पण ती काहीच न बोलता गप्प बसली. सावकाराने मुलीला थैलीतून एक गारगोटी उचलून बाहेर काढायला सांगितले. हे सगळे बोलणे व सौदा शेतकऱ्याच्या घरासमोरच्या रस्त्यावर सुरू होता. तो रस्ता माती व गारगोट्यांनी भरलेला होता. अशा परिस्थितीत तुम्ही काय केले असतेत? तुम्ही मुलीला काय करण्याचा सल्ला दिला असतात? या परिस्थितीत तीन शक्यता होत्या. मुलगी लग्नास नकार देऊ शकली असती. मुलीने दोन्ही गारगोट्या थैलीतून काढून सावकाराचा खोटेपणा उघडा पाडला असता आणि मुलीने लग्नाला होकार देऊन वडिलांसाठी स्वत:च्या सुखाचा त्याग केला असता. शेतकरी कर्जमुक्त झाला असता व तुरूंगात जाण्यापासून वाचला असता.

परिस्थितीचा परत एकदा विचार करून पाहा. ही गोष्ट म्हणजे सारासार विचार करण्याचा वस्तुपाठ आहे. तर्कशुद्ध विचार व वास्तविक स्थितीवर आधारित योग्य विचार यातील फरक दाखवून देणारे हे कोडे आहे. मुलीच्या द्विधा मन:स्थितीवर रामबाण उत्तर नेहमीचे तर्कशास्त्र देऊ शकणार नाही... तीनही पर्यायांचा नीट विचार केला तर तीनही पर्यायांमध्ये धोका नाकारता येत नाही.

त्या मुलीने काय केले ते असे. तिने थैलीत हात घालून एक गारगोटी बाहेर काढली. काढताना गलथानपणे काढली असे भासवून ती हातातील गोटी इतरांच्या नकळत खाली जमिनीवर दगडमातीत पडेल अशी काळजी घेतली ती कोणत्या रंगाची गोटी होती हे कोणाच्या लक्षात येण्याआधीच ती जमिनीवरील गारगोट्यांमध्ये मिसळून गेली. ''अरे देवा! आता काय करणार? मी खरंच वेंधळेपणा केला. पण हरकत नाही. मी एक गारगोटी थैलीतून काढली आहे, आता थैलीमध्ये कोणती गारगोटी आहे ते पाहिले की खाली पडलेली म्हणजेच मी काढलेली कोणती गारगोटी होती ते आपल्याला कळेल. हो की नाही? तुम्हाला काय वाटते?''

म्हाताऱ्या सावकाराला आपली लबाडी उघडपणे सांगता येईना. त्या हुशार मुलीने तिच्यावर आलेले संकट अशक्य वाटणाऱ्या पेचातून अतिशय शिताफीने टाळले. स्वत:ला अतिशय फायदेशीर अशी तडजोड घडवून आणली.

**तात्पर्य :** प्रत्येक अडचणीमधून बाहेर पडायला मार्ग असतोच. तो शोधण्यासाठी आपण परिस्थितीचा सर्वांगाने विचार करीत नाही. तो करायला पाहिजे.

❋ ❋ ❋

# दोन प्रवासी देवदूत

**दो**न प्रवासी देवदूत एक दिवस आपल्या फिरस्तीदरम्यान एका धनाढ्य व्यापाऱ्याकडे रात्रीच्या मुक्कामाला थांबले. ते कुटुंब असभ्य वर्तनाचे व उद्धट बोलणारे होते. पाहुणे म्हणून आलेल्या दोन देवदूतांना त्या कुटुंबाने आपल्या हवेलीमधील अतिथीगृहात रात्री झोपू देण्यास नकार दिला. त्याऐवजी देवदूतांना तळघरातील अंधाऱ्या अडगळीच्या व थंड जागेत झोपायला जागा दिली.

खाली जमिनीवर सतरंजी पसरून ते दोघे झोपले असताना त्यातील मोठ्या देवदूताला समोरच्या भिंतीला एक भगदाड असलेले लक्षात आले. त्याने ते तत्काळ बुजविले. दोघातील लहान देवदूताने जेव्हा मोठ्याला तसे का केले म्हणून जेव्हा विचारले तेव्हा मोठा म्हणाला, ''सर्वच गोष्टी जशा दिसतात तशा नसतात.''

दुसऱ्या दिवशी ते देवदूत एका अत्यंत गरीब अशा शेतकऱ्याच्या घरी रात्रीच्या मुक्कामाला राहिले. त्या शेतकऱ्याने व त्याच्या बायकोने मोठ्या आदरपूर्वक त्यांचे स्वागत केले. त्या शेतकरी कुटुंबाने जे काही त्या दिवशी शक्य होते ते जेवण करून चौघांनी मिळून खाल्ले. जेवणानंतर देवदूतांना स्वत:च्या झोपण्याच्या जागी झोपण्यास जागा करून दिली. सकाळी उठल्यावर देवदूत पाहतात तो शेतकरी नवरा बायको दोघेही रडत होती. रात्री त्यांची गाय मरून गेली होती. ती गाय भरपूर दूध देणारी होती व त्या कुटुंबाला त्याचा आर्थिक आधार होता.

लहान देवदूत संतापून गेला होता. त्याने मोठ्याला विचारले, ''तू असे कसे घडू दिलेस? कालच्या माणसाकडे गडगंज होते तरी तू त्याला मदत केलीस. आजचे कुटुंब गरीब पण कनवाळू होते. त्यांच्याकडे देण्यासाठी पुरेसे नव्हते तरी जे होते, त्यात

आपल्याला त्यांनी वाटेकरी केले. त्यांची गाय मात्र मरताना तू काहीच केले नाहीस.''

''सर्वच गोष्टी जशा दिसतात तशा नसतात.'' मोठ्याने परत एकदा तेच लहानाला ऐकविले. ''आपण जेव्हा त्या श्रीमंत माणसाच्या तळघरात झोपलो होतो, तेव्हा माझ्या असे लक्षात आले की त्या भिंतीच्या भगदाडात त्याने सोनेनाणे लपवून ठेवले आहे. तो श्रीमंत माणूस खूपच लोभी होता. त्याचे नशिब इतके चांगले असून व त्याच्याकडे इतके गडगंज असूनही तो आपली व्यवस्था करायला राजी नव्हता. मी ते भगदाड असे बंद केले आहे की त्याला ते सोनेनाणे परत हाताला लागणार नाही.''

''काल रात्री आपण शेतकऱ्याच्या बेडवर झोपलो असताना त्याच्या बायकोला नेण्यासाठी यमदूत आला होता. त्याला मी शेतकऱ्याच्या बायकोऐवजी त्याची गाय नेण्यास सांगितले. म्हणूनच मी म्हणतो, सर्वच गोष्टी जशा दिसतात तशा नसतात.''

पुष्कळ वेळा असेच घडते. अनेक गोष्टी आपल्याला जशा घडाव्या वाटतात तशा घडत नाहीत. मात्र तुम्ही विश्वास बाळगला पाहिजे. होणारी प्रत्येक गोष्ट तुमच्या भल्यासाठीच होते आहे, यावर तुमचा भरवसा हवा. ती गोष्ट घडेपर्यंत तुम्हाला त्याची कल्पना पण येणार नाही.

काही माणसे आपल्या आयुष्यात येतात आणि लगेच जातात पण काही आपले मित्र बनतात. ते आपल्याजवळ कायम असतात. आपल्या मनावर कायमचा सुंदर ठसा उमटवून जातात. माझ्या दृष्टीने खास गोष्ट आहे, ती मनावर कोरून ठेवा.

कोणीतरी तुमचा विचार करीत असते. कोणीतरी तुमची काळजी करीत असते. कोणाला तरी तुमची अनुपस्थिती जाणवत असते. कोणाला तरी तुमच्याशी बोलायचे असते. कोणाला तरी तुमचा सहवास हवा असतो. कोणाला तरी तुम्ही अडचणीत सापडू नये असे वाटत असते. कोणीतरी तुम्ही केलेल्या मदतीसाठी कृतज्ञ असते.

कोणाला तरी तुमच्या हाताचा आधार हवा असतो. कोणीतरी तुमचे सगळे मंगल व्हावे अशी इच्छा करीत असते.

कोणाला तरी तुम्ही सुखी असलेले हवे असते. कोणीतरी तो अगर ती तुमच्या मैत्रीची वाट पाहत असतात.

कोणीतरी तुमचे यश साजरे करण्यास उत्सुक असतात. कोणाला तरी तुम्हाला बक्षीस द्यायचे असते. कोणाला तरी तुम्ही हेच त्याच्यासाठी उपहार वाटत असता. कोणीतरी तुमच्यावर मनापासून प्रेम करीत असते. कोणाला तरी तुमच्या कुवतीचे कौतुक वाटत असते. कोणीतरी तुमच्या हास्याची वाट पाहत असते. कोणाला तरी तुमचा खांद्याचा आधार त्यांचे दु:ख मोकळे करायला हवा असतो.

कोणाच्याही आशेला तडा जाऊ देऊ नका, कारण तेवढीच एक त्यांची अपेक्षा असते.

❃ ❃ ❃

# दोन भिक्षुक आणि नाजूक तरुणी

**मो**ठा भिक्षुक आणि छोटा भिक्षुक बरोबर प्रवास करीत होते. प्रवासात एका नदीजवळ येताच त्यांना नदी पार करण्यासाठी असलेला पूल मोडकळीस आलेला आढळला. अडचणीतून मार्ग काढून त्यांना नदी पार करुन जावे लागणार होते.

त्या मोडकळीस आलेल्या पुलाजवळ एक नाजुक तरूणी उभी असलेली त्यांना आढळली. तिला पूल मोडल्यामुळे नदी ओलांडून जाता येत नव्हते. तिला मदत करण्यासाठी मोठ्या भिक्षुकाने त्याच्या पाठीवरून तिला पलीकडे नेण्याची तयारी दर्शविली. तिने मान्यता दिली. लहान भिक्षुकाला मात्र मोठ्याच्या या देऊ केलेल्या मदतीने धक्का बसला. त्याला सारखे वाटत होते की, आपल्या नियमाप्रमाणे कोणत्याही स्त्रीशी जवळीक करायला परवानगी नसते. मग मोठा भिक्षुक त्या स्त्रीला पाठीवर घेऊन नदी पार करण्याचे आश्वासन कसे देऊ शकतो? पण तो गप्प राहिला.

मोठ्या भिक्षुकाने त्या तरूणीला खांद्यावर घेऊन नदी ओलांडली. लहान नाखूश होऊन त्याच्या पाठोपाठ नदी पार करून गेला. पलीकडच्या किनाऱ्यावर गेल्यावर भिक्षुक आणि त्या तरूणीचे मार्ग वेगवेगळे होते. मोठ्या भिक्षुकाने तिला खांद्यावरून खाली उतरविल्यानंतर ते आपापल्या मार्गाने चालायला लागले.

तिथून पुढच्या अनेक मैलांच्या प्रवासात लहान भिक्षुकाच्या डोक्यात मोठ्या भिक्षुकाच्या वागण्याच्या विचाराने नाराजी होती. त्याच्या मनात मोठ्याबद्दल नाना शंकाकुशंका येऊन त्याच्यावर अनेक दोषारोप तो मनातच करीत होता. त्या सगळ्या

विचारामुळे तो जास्त जास्तच वेडापिसा होऊन गेला होता; परंतु मोठा भिक्षुक मात्र कोणतेही स्पष्टीकरण देऊ इच्छित नव्हता.

सरतेशेवटी बऱ्याच तासांनंतर एका विश्रांतीच्या स्थळी पोहोचल्यानंतर लहान भिक्षुकाला शांत बसणे अशक्य वाटू लागले. शेवटी तो रागाच्या उमाळ्याने मोठ्या भिक्षुकावर गरजला, ''मिळालेल्या पहिल्याच संधीचा फायदा घेऊन तू एका तरूणीला व विशेषत: ती तरूणी आकर्षक असताना कसा काय स्पर्श करू शकलास? असे वागून तू स्वत:ला धर्मनिष्ठ कसे म्हणून घेऊ शकतोस? मला तू दिलेली सगळी शिक्षा दांभिक आहे असे वाटते.''

मोठ्या भिक्षुकाला फार आश्चर्य वाटले आणि तो म्हणाला, ''मी त्या तरूणीला माझ्या खांद्यावरून नदी पार केल्यानंतर लगेचच उतरविले होते. त्याला बरेच तास होऊन गेले. पण तू मात्र तिला घेऊन अजुन का बरे मार्ग आक्रमत आहेस?''

**तात्पर्य :** बऱ्याच लोकांचे असे होते. आपल्या रोजच्या जीवनात आपण अनेक नापसंत गोष्टींना सामोरे जात असतो. त्या घटना आपल्याला सतत चिडवित असतात. राग आणत असतात. त्या लहान भिक्षुकाप्रमाणेच आपण त्याचा विचार करणे सोडत नाही. एकदा का ती अप्रिय घटना घडून गेली की नंतर त्याबद्दल मनात नाराजी धरून बसण्याचा काहीच फायदा नसतो. आयुष्यात पुढे जायला शिकले पाहिजे.

❋ ❋ ❋

# दोन लांडगे

एक दिवस आजोबा आपल्या नातवाला समजावून सांगत होते. प्रत्येक माणसाच्या मनात एक झगडा सुरू असतो. ते म्हणाले, ''बाळा, आपल्या प्रत्येकाच्या मनात दोन लांडग्यांचा तीव्र झगडा चालू असतो.''

त्या दोन लांडग्यांपैकी एक म्हणजे, दुर्गुण. मग तो रागीटपणा, मत्सर, असूया, दु:ख, खेद, खंत, लोभ, अहंकार, कीव, अपराध, दुष्कृत्य, संताप, कमीपणा, खोटेपणा, दुराभिमान, वर्चस्व आणि अहंकार यापैकी कोणताही असू शकतो.

दुसरा लांडगा म्हणजे चांगुलपणा, तो म्हणजे, आनंद, मन:शांती, प्रेम, आशा, धीरगंभीरता, विनम्रता, दयाळूपणा, परोपकार, सहानुभूती, औदार्य, खरेपणा, अनुकंपा आणि विश्वास यापैकी एका स्वरूपात असतो.

नातू एकाग्रतेने ऐकत होता. ऐकून झाल्यावर त्याने आजोबांना विचारले, ''दोनपैकी कोणता लांडगा जिंकतो?''

आजोबांनी सांगितले, ''अर्थातच तू ज्याला खायला घालून धष्टपुष्ट करशील तो जिंकतो.''

❋ ❋ ❋

# दोषातून फुललेले फुलांचे ताटवे

एका खेडेगावात एक पाणक्या त्याच्या मालकाच्या घरी दूरवरच्या झऱ्यामधून पाणी आणून भरीत असे. तो खांद्यावरच्या कावडीला दोन बाजूला दोन मडकी बांधून त्यातून पाणी घेऊन येत असे. त्या दोन मडक्यांपैकी एका मडक्याला एक बारीक चीर गेलेली होती. दुसरे मडके मात्र पूर्ण शाबूत होते. त्या शाबूत मडक्यामधून पूर्ण मडके भरुन पाणी मालकाच्या घरी नेले जात होते. दूरवर असणाऱ्या त्या झऱ्यापासून मालकाच्या घरी पोहोचेपर्यंत त्या गळक्या मडक्यात फक्त अर्धे मडकेच पाणी शिल्लक राहात असे. त्या पाणक्याचे पाणी भरण्याचे काम खंड न पडता सतत दोन वर्षे चालू होते. मात्र या सर्व काळात त्या पाणक्याने दररोज फक्त दिड मडके भरूनच पाणी वाहून आणलेले असते. अर्थातच, जे मडके धड होते ते मनातून अत्यंत समाधानी होते. कारण त्याला नेमून दिलेले मडके भरून पाणी आणण्याचे काम त्याने न चुकता चोख केलेले असते.

परंतु चीर पडलेल्या त्या मडक्याला मात्र स्वत:ची लाज वाटत होती. आपल्या असमर्थतेबद्दल त्याला खेद होत होता. खेदाची गोष्ट अशी होती की, त्याच्या वाटेच्या कामापैकी ते मडके फक्त अर्धेच काम करू शकत होते. दोन वर्षांतील स्वत:च्या

कामातील हे अपयश लक्षात आल्यानंतर ते चीर पडलेले मडके, त्या पाणक्याला झऱ्याकाठी पाणी भरीत असताना म्हणाले, ''मला स्वत:ची अत्यंत लाज वाटते आहे. मी तुझी मनापासून माफी मागतो.''

पाणक्याने विचारले, ''का बरे? तुला लाज वाटण्याचे काय कारण?'' मडके उत्तरले, ''माझ्या शरीराला पडलेल्या चिरेमुळे गेली दोन वर्षे माझ्याकडून अपेक्षा असणाऱ्या व तू भरत असलेल्या पाण्यापैकी, मी फक्त अर्धे पाणीच तुझ्या मालकाच्या घरी वाहून नेऊ शकलो. बाकीचे अर्धे पाणी वाटेतच वाहून गेले. माझ्यातील वैगुण्यामुळे तुला तुझे काम असे अर्धवट करावे लागले. तू करीत होतास त्या कष्टांचे पुरेपूर फळ तुला मिळू शकले नाही.''

त्या पाणक्याला त्या चीर गेलेल्या मडक्याची दया आली. त्या करुणेपोटी तो म्हणाला, ''आता आपण मालकाच्या घराकडे जाताना वाटेवर दृष्टीस पडणारे फुलांचे ताटवे तू मुद्दाम पाहा.'' खरोखरच परतीच्या डोंगराळ वाटेवरुन जाताना त्या मडक्याने पाहिले की रंगीबेरंगी, सुंदर, टवटवीत फुलांचे ताटवे वाऱ्यावर डोलत होते. सूर्याच्या किरणामध्ये न्हाऊन डौलदार दिसत होते. ते पाहूनच ते मडके आनंदून गेले. पण वाट संपताच ते मडके पुन्हा हिरमुसले झाले. कारण आजही त्या मडक्याला अर्धेच पाणी वाहून आणता आले होते. त्याने पुन्हा एकदा पाणक्याची क्षमा मागितली.

तो पाणक्या त्या मडक्याला म्हणाला, ''अरे वाटेतून येताना तू पाहिले नाहीस का? फक्त तुझ्याच बाजूला ते फुलांचे सुंदर ताटवे डोलत होते. दुसऱ्या बाजूला मात्र ओसाड दिसत होते. याचे कारण तुला ठाऊक आहे का? तुझ्या शरीरामधील दोष मला आधीपासूनच माहिती होता. मी त्याचा फायदा घेण्याचे ठरविले. तुझ्या बाजूच्या वाटेवर मी फुलांचे बियाणे पेरीत होतो. गेली दोन वर्षे परतीच्या वाटेवर तू त्यांना पाणी घालीत होतास मी तीच फुले माझ्या मालकाच्या घरी आणतो आहे. त्याच फुलांनी घर सजवितो आहे. तू जसा आहेस तसाच तुझ्या दोषासकट नसतास तर माझ्या मालकाचे घर सजविणे मला शक्य झाले असते का?''

**तात्पर्य** : आपल्यापैकी प्रत्येकामध्ये काही ना काही दोष असतोच. त्या दोषांना समजावून घेत चला. त्याचाच वापर करुन आपण हे विश्वच सुंदर करु शकतो. आपल्या दुर्बलतेमधूनच आपल्याला शक्ती निर्माण करता यायला हवी.

❋ ❋ ❋

## नकारात्मक विषयातील सकारात्मकता

एक स्त्री टेबलावर बसून काही राहिलेल्या कामासंबंधी आखणी करीत होती. ते करत असताना तिला एक प्रकारचा मानसिक तणाव जाणवत होता. अजून आपला इन्कम टॅक्स भरायचा राहिला आहे, घरातील बरेच काम करायचे बाकी आहे, काही बिले देण्याची बाकी आहेत, पुढच्या आठवड्यात येणाऱ्या पाहुण्यांसाठी काही सोयी करायच्या आहेत इ. इ. या सगळ्या गोष्टी वेळेत कशा पुऱ्या होतील याचाच तिला ताण आला होता.

मधेच तिचे लक्ष तिच्या मुलीकडे गेले. ती बसून तिच्या शाळेचा अभ्यास करीत होती. रागारागाने तिच्या वहीत काहीतरी खरडत होती. ''माझ्या टीचरने गृहपाठासाठी आम्हाला 'नकारात्मक गोष्टींसाठी आभार प्रदर्शन' अशा चमत्कारिक विषयावर एक पान लिहून आणायला सांगितले आहे. टीचरने सांगितले आहे की पुष्कळ गोष्टी आपल्याला आधी पटत किंवा आवडत नाहीत, पण नंतर त्याच आपल्याला चांगल्या वाटू लागतात. त्या गोष्टींसाठी तुम्ही आभार मानले पाहिजेत. अशा गोष्टी आम्हाला लिहायच्या आहेत.''

त्या स्त्रीला विषयाचे आश्चर्य वाटून तिने मुलीने काय लिहिले आहे याची उत्सुकता म्हणून तिच्या वहीत पाहिले. त्या मुलीने लिहिले होते, ''मी शाळेच्या वर्षअखेरच्या परीक्षेचे आभार मानते, कारण त्यानंतर शाळेला सुट्टी लागणार आहे. मी कडू

औषधांच्या गोळ्यांचे आभार मानते कारण त्या घेतल्यानंतर मला बरे वाटणार आहे. मी गजर करून सकाळी उठविल्याबद्दल घड्याळाचे आभार मानते कारण त्यामुळे मी जिवंत असल्याचे मला कळले.''

ते वाचून त्या स्त्रीच्या डोक्यात प्रकाश पडला की, आपल्याला सुद्धा अनेक न आवडणाऱ्या गोष्टींसाठी आभार मानायला हवेत. तिला इन्कम टॅक्स भरायला हवा होता पण त्याचा अर्थ तिला नोकरी करून पगार मिळत होता. त्यासाठी ती नशिबवान होती. तिला घरकाम करावे लागत होते पण त्यासाठी प्रथम तिला राहण्यासाठी स्वत:चे घर होते हे फार महत्त्वाचे होते. तिला पाहुण्यांची व्यवस्था करायची होती पण याचा अर्थ तिच्याकडे प्रेमाने येणारे पाहुणे होते आणि ते आल्यावर त्यांच्याबरोबर तिला मजा करता येणार होती.

**तात्पर्य :** साधारणपणे आपण रोजच्या जगण्यात नकारात्मक गोष्टींसाठी तक्रारी करीत असतो; पण त्यांच्याकडे आपण सकारात्मक दृष्टिकोनातून पाहत नाही. प्रत्येक नकारात्मक घटनेमध्ये काहीतरी सकारात्मक मुद्दा लपलेला असतोच. आयुष्यातील चांगल्या भागाकडे पाहायला शिका. आयुष्य अधिक आनंदाचे होईल.

❋ ❋ ❋

# नियमांचा अतिरेक

कित्येक वेळा आपल्याला केवळ पुस्तकी ज्ञानावर जगणाऱ्या काही माणसांना सामोरे जावे लागते. अशा माणसांचा नक्की काय करायचे असते किंवा नक्की काय साध्य करायचे असते याबाबत गोंधळ उडालेला असतो. अशाप्रकारच्या नोकरशाहीचे किंवा झापड लावून काम करणाऱ्या माणसांचे एक उदाहरण म्हणून पुढे दिलेल्या प्रसंगाकडे पाहता येईल.

एकदा एक मान्यवर प्रतिष्ठित अशी व्यक्ती एका बँकेच्या एका शाखेमध्ये प्रवेश करते. त्या दिवशी त्या व्यक्तीने अगदी साधा वेष म्हणजे निळी जिन पँट व टी शर्ट परिधान केलेला असतो. बँकेत प्रवेश करताच ती व्यक्ती काऊंटरवरील एका टेलरकडे जाते. त्या दिवशी बँकेमध्ये त्याला जो व्यवहार करायचा होता त्याबद्दल तो काऊंटरवरील टेलरपाशी बोलतो. बँकेतील काऊंटरवरील कारकून दिलगिरी व्यक्त करतो. त्या गृहस्थाला जो व्यवहार करायचा असतो तो पूर्ण करण्याची माहिती असणारा बँकेचा कर्मचारी त्या दिवशी कामावर हजर नसतो. त्यामुळे त्या दिवशी तो व्यवहार होऊ शकणार नसतो. पुन्हा एकदा बँकेचा टेलर क्षमा मागतो. बँकेच्या प्रतिष्ठित ग्राहकाला त्या दिवशी तेवढा एकच व्यवहार करायचा असतो. त्यामुळे तो बँकेतून बाहेर जायला निघतो. निघण्यापूर्वी तो गृहस्थ बँकेच्या टेलरकडे आपली कार बँकेच्या कारपार्कमधून विनामूल्य बाहेर काढता येणाऱ्या कुपनची मागणी करतो. अशाप्रकारची विनामूल्य कार पार्क करण्याची सोय बँकेच्या ग्राहकांना उपलब्ध असते.

बँकेचा टेलर ग्राहकाच्या त्या विनंतीला अत्यंत अदबीने पण ठामपणे नकार देतो. नकाराचे कारण देताना बँकेमध्ये एकतरी आर्थिक व्यवहार करणाऱ्या ग्राहकासच असे विनामूल्य कार पार्क करण्याचे तिकीट देण्याची बँकेची पद्धत व सूचना असल्याचे तो टेलर स्पष्ट करतो. त्यावर ती प्रतिष्ठित व्यक्ती आपले म्हणणे मांडते. त्याला जो आर्थिक व्यवहार आज करायचाच होता, तो करण्याची त्याची पूर्ण इच्छा व तयारी असूनही त्या दिवशी तो व्यवहार पूर्ण होऊ शकला नाही. यासाठी बँकच संपूर्णपणे जबाबदार होती. कारण तो व्यवहार पूर्ण करणारा बँक कर्मचारी त्या दिवशी गैरहजर होता. तरीही त्या बँकेच्या काऊंटरवरील टेलरने पुन्हा एकदा दिलगिरी व्यक्त करून बँकेची तशी पद्धत नसल्याचे सांगितले व ग्राहकाची साधी मागणी फेटाळून लावली.

त्या कारकुनाच्या अशाप्रकारच्या अत्यंत ताठर, कायदेशीर भाषेमुळे व आडमुठेपणामुळे तो प्रतिष्ठित ग्राहक फार नाराज होतो. नाइलाजाने त्या दिवशी तो बँकेच्या शाखेत फक्त एकच आर्थिक व्यवहार पूर्ण करतो.

अत्यंत साधा दिसणारा तो बँकेचा प्रतिष्ठित ग्राहक दुसरा तिसरा कोणी नव्हता तर प्रसिद्ध अशा आयबीएम् कंपनीचा अध्यक्ष होता. त्याने एकाच आर्थिक व्यवहाराच्या फटक्याने त्या बँकेच्या आपल्या खात्यामधून सर्व रक्कम म्हणजे जवळजवळ १.५ मिलीयन डॉलर्स काढून घेतले. त्या दिवशीच्या एका व्यवहारासाठी बँकेच्या नियमात बसणारे विनामूल्य कारपार्कचे तिकीट न

विसरता घेऊनच त्याने बँकेच्या बाहेर पाऊल ठेवले.

त्याचबरोबर त्या बँकेमधील तो कठोरपणे कायदा पालन करणारा कारकूनही बँकेच्या हजेरीपटावरून बाहेर केला गेला. मात्र पुढच्या नोकरीमध्ये कायद्याचे इतके काटेकोर पालन न करण्याचे त्याने आपल्या मनाशी पक्के केले होते.

❋ ❋ ❋

# निवड

एखादी उत्तम गोष्ट प्राप्त करण्यासाठी दुसऱ्या एखाद्या चांगल्या गोष्टीकडे नेहमीच पाठ फिरवावी लागते. आपल्यापैकी प्रत्येकाने उपहारगृहात खादाडी केली असेल किंवा हॉटेलमध्ये बुफे(Buffet) जेवण घेतलेले असेल. या पद्धतीच्या जेवणामध्ये सर्वांत महत्त्वाची एक व्यवस्था असते. त्यायोगे त्या दिवशी त्या वेळी तुम्हाला कोणते अन्नपदार्थ चवीने खाता येतील ते आधीच मांडून ठेवलेले असतात. तुम्ही त्यातून तुमच्या आवडीच्या पदार्थाची निवड करू शकता. मांडलेल्या खाद्यपदार्थांच्या टेबलाजवळून जाताना तुम्ही पदार्थांची निवड करू शकता. त्याच वेळी तुम्हाला हेही ठाऊक असते की, आवडणाऱ्या प्रत्येक पदार्थांचा थोडा थोडा भाग म्हटला तरी सर्वच आवडीचे पदार्थ तुम्ही चाखून पाहू शकणार नाही. तुम्हाला तुमच्या थाळीत अगदी निवडक पदार्थ घ्यावे लागतात. ते निवडक पदार्थ घेण्यासाठी इतर अनेक चांगल्या पदार्थांकडे तुम्हाला पाठ फिरवावी लागते.

उपहारगृहाच्या जेवणाच्या या पद्धतीत आणि तुमच्या जगण्याच्या पद्धतीत बरेच साधर्म्य असते. या जगामध्ये माणसाच्या एका आयुष्यात उपलब्ध सर्वच गोष्टी आपण मिळवू शकत नाही किंवा सर्वच शक्य वाटणाऱ्या गोष्टी आपण करू शकत नाही. माणसाला त्यापैकी उत्तम वाटणाऱ्या गोष्टींचीच निवड करावी लागते. अशी निवड तुमचे आयुष्य सुखी, समृद्ध करू शकते. तुमच्यासाठी उत्तम काय आहे हे तुमचे तुम्ही ठरवायचे असते. अशी निवड करताना इतर अनेक चांगल्या गोष्टींना मुकण्यासाठी मनाची तयारी करावी लागते.

म्हणूनच हव्या असलेल्या 'उत्तम' गोष्टी प्राप्त करण्यासाठी तुम्हाला प्रथमत: काही चांगल्या गोष्टींना 'नाही' म्हणायला शिकणे आवश्यक असते.

❋ ❋ ❋

# पक्षाची शिकार आणि तीन लाथांचा नियम

एका मोठ्या शहरातील एका बडा वकील महाशय जवळच्या खेड्यात पक्षांची शिकार करण्यासाठी जातो. त्याच्या नेमाने मारलेल्या गोळीने एक पक्षी खाली मरून पडतो. पण खाली पडताना शिकारी ज्या शेतात उभा असतो त्या शेताच्या शेजारच्या शेतात कुंपणापलीकडे तो जाऊन पडतो.

खाली पडलेला पक्षी घेण्यासाठी वकील शेजारच्या कुंपणावर चढून पलीकडे उडी मारण्याच्या तयारीत असतो. पलीकडच्या शेताचा मालक आपल्या ट्रॅक्टरवर बसून शेतात काम करीत असतो. वकीलाला कुंपणावर चढलेला पाहून तो तसाच ट्रॅक्टर चालवित त्याच्या जवळ येतो आणि वकीलाला तुम्ही काय करता आहात असे विचारतो. वकील सांगतो, ''मी एक पक्षी मारला आणि तो मरून तुमच्या शेतात पडला आहे. तो घेण्यासाठी मी तिकडे येत आहे.''

तो म्हातारा शेतकरी म्हणतो, ''हे माझ्या मालकीचे शेत आहे. आपण अशाप्रकारे माझ्या शेतात अनधिकृत प्रवेश करू शकत नाही.''

त्याच्या बोलण्यामुळे चिडलेला वकील उत्तरतो, ''हे पाहा मी एक निष्णात वकील आहे. माझा पक्षी मला जर घेऊ दिला

नाहीस तर मी तुला कोर्टात खेचिन आणि मग मी तुझी ही सगळी इस्टेट हशील करीन.''

म्हातारा शेतकरी गालातल्या गालात हसला आणि म्हणाला, ''मला वाटते या भागातील आम्ही शेतकरी आमच्यातील तंटे बखेडे कसे सोडवितो याची आपल्याला कल्पना दिसत नाही. कोणा दोघांमध्ये असहमती उद्‌भवली तर एका विशिष्ट पद्धतीने ते वाद मिटविले जातात. त्याला 'तीन लाथांचा नियम' असे म्हणतात.''

वकील महाशय मोठ्या उत्सुकतेने विचारतात, ''तीन लाथांचा नियम म्हणजे नक्की काय?''

शेतकरी सांगतो, ''असे आहे, माझ्या मालकीच्या शेतात जेव्हा भांडण सुरू होते तेव्हा माझा हक्क अग्रक्रमाने असतो.

मला विरुद्ध पार्टीला तीन लाथा प्रथम मारता येतात. मग समोरचा मला मारतो. नंतर परत तसेच करायचे. जेव्हापर्यंत दोघांपैकी एक जण हार मानीत नाही तोपर्यंत हे लाथा घालणे असेच चालू ठेवायचे.''

वकील विचार करतो आणि मनात ठरवितो, आपण सहज या म्हाताऱ्याला हरवू शकू. त्याच्या लाथांमध्ये काही जोर नसेल. त्या स्थानिक न्यायव्यवस्थेला तो वकील मान्यता देतो.

तो म्हातारा शेतकरी आपल्या ट्रॅक्टरच्या उच्च स्थानावरून जमिनीवर उतरतो. धीमी पावले टाकीत तो वकीलाजवळ येतो. शेतात काम करण्यासाठी शेतकऱ्याने पायाच्या बोटांना संरक्षण म्हणून लावलेल्या जड धातूच्या आवरणाचे बूट घातलेले असतात. त्या मजबूत बुटाची पहिलीच लाथ वकीलाच्या जांघेत जबरदस्त प्रहार करते. त्यासरशी तो वकील कळवळून गुडघ्यावर मटकन बसतो. दुसरी लाथ वकीलाच्या पोटात अशी सणसणीत बसते की त्याने सकाळपासून खाल्लेले सगळे अन्न तोंडावाटे बाहेर पडते. शेतकरी त्याची तिसरी लाथ वकीलाच्या पृष्ठभागावर दणकन देतो, त्याबरोबर वकील चारी मुंड्या चित होऊन जमिनीवर पालथा पडतो. तो खाली पडतो ते त्याचे तोंड जमिनीवरील बैलाच्या शेणाने माखलेले असते.

सर्व शक्ती एकवटून व उरलेसुरले अवसान आणून वकील कसाबसा आपल्या दोन पायांवर उभा राहतो. शेणाने भरलेले आपले थोबाड कोटाच्या बाहीने साफ करायचा प्रयत्न करतो. अडखळत बोलत तो शेतकऱ्याला म्हणतो, ''ठीक आहे आता माझी पाळी तुला लाथा घालण्याची.''

म्हातारा शेतकरी मिश्किलपणे हसतो आणि लगेच म्हणतो, ''छे! छे! मी आता माघार घेत आहे. तुला त्रास घेण्याची जरूरी नाही. तू तुझा पक्षी घेऊन जाऊ शकतोस.''

याचा अर्थ, तुम्ही सुशिक्षित असता तेव्हा ऐकता त्याच्या निम्म्या कथनावरच विश्वास ठेवता. पण जेव्हा तुम्ही सुशिक्षित व चलाख असता तेव्हा ऐकल्यापैकी कोणत्या अर्ध्यावर विश्वास ठेवायचा ते तुम्हाला पक्के ठाऊक असते.

❋ ❋ ❋

# पक्षांचा पिंजरा आणि पाद्री

एका लहानशा गावात एका चर्चमध्ये जॉर्ज पास्टर म्हणून काम करीत होता. ईस्टरच्या एका रविवारी तो चर्चमध्ये हातात एक जुना, गंजलेला, मोडका असा पक्षांचा रिकामा पिंजरा घेऊन येतो. तो पिंजरा चर्चच्या प्रवचनाच्या व्यासपीठावर ठेवतो. ते पाहून जमलेल्या सर्व लोकांच्या भुवया उंचावतात. जॉर्ज बोलायला सुरूवात करतो. ''काल मी आपल्या शहरातील एका रस्त्यावरून जात असताना एक लहान मुलगा हातातील हा पिंजरा हलवत हलवत झोके देत माझ्या जवळ आला. या पिंजऱ्यात तीन रानातील पक्षी गारठून आणि भीतिने थरथरत होते. मी त्या मुलाला थांबवून विचारले, 'बाळा तुझ्याजवळ हे काय आहे?' हे तीन साधे रानपक्षी आहेत. मुलाने सांगितले. त्यावर मी विचारले, 'तू त्यांचे काय करणार आहेस?' मुलाने सांगितले, 'मी त्यांना घरी घेऊन जाणार आहे आणि त्यांच्याबरोबर मजा करणार आहे. त्यांना डिवचून, चिडवून त्रास देणार आहे. मग मी त्यांचे पंख कापून टाकणार आहे. त्यांना आपआपसात लढायला लावणार आहे. हे करत असताना माझी फार करमणूक होणार आहे.'

'हे सगळे करीत असताना तुला काही वेळानंतर कंटाळा येईल. त्यानंतर तू या पक्षांचे काय करशील?' 'तेव्हा ना? माझ्याकडे मांजरे आहेत. त्यांना पक्षी खायला खूप आवडते. मी पक्षी त्या मांजराना देऊन टाकीन.'

पास्टर काही क्षण स्तब्धपणे उभा राहिला. त्याने मुलाला विचारले, 'तुला या पक्षांसाठी किती रक्कम अपेक्षित आहे?' 'का हो? तुम्हाला हवे आहेत का हे पक्षी? हे तर साधे रानपक्षी आहेत. त्यांना ना रंग ना रूप. त्यांना गाता येत नाही.' 'तरी किती किंमत आहे या पक्षांची?' पास्टरने विचारले. मुलाने पास्टर खुळा आहे असे समजून अंदाज घेण्यासाठी पक्षांची किंमत सांगितली, दहा डॉलर. पास्टरने क्षणार्धात खिशातून दहा डॉलरची नोट काढली आणि त्या मुलाच्या हातावर ठेवली. एक मिनिटही तिथे न थांबता तो मुलगा पसार झाला.

पास्टर पुढे हकिकत सांगत होता. ''मी तो पिंजरा उचलला आणि झोके न देता जवळच्या गल्लीत गेलो. तिथे एका गवताळ भागात एक झाड होते. मी पिंजऱ्याचे दार उघडले. हलक्या हाताने पिंजऱ्याच्या बाहेर टकटक केले. त्यांना पिंजऱ्याबाहेर पडायला उद्युक्त केले. ते पक्षी पिंजऱ्याबाहेर पडून मोकळे झाले.''

त्या व्यासपीठावर ठेवलेल्या पिंजऱ्याची ही गोष्ट होती. पिंजरा बाजूला ठेवून मग पास्टरने आपले भाषण केले.

''एक दिवस सैतान आणि जीजस बोलत होते. सैतान नुकताच पृथ्वीवरील एका बागेतून परत गेला होता. तो त्याला झालेला आसुरी आनंद लपवू शकत नव्हता. ''मी आताच एका पृथ्वीवरील जागेवर असंख्य लोक एकत्र आलेले पाहिले. त्यांना गंडविण्यासाठी एक कारस्थान करून कचाट्यात पकडले. मला कळून चुकले की आता ते कसलाही प्रतिकार करू शकणार नाहीत. सर्वांना पकडून आणले आहे.''

जीजसने विचारले, ''पण आता तू त्यांचे काय करणार आहेस?''

सैतानाने सांगितले, ''मी त्यांच्याबरोबर खेळ करून स्वत:ची करमणूक करून घेणार आहे. मी त्यांना लग्न कसे करायचे आणि घटस्फोट कसा घ्यायचा हे पण शिकविणार आहे. एकमेकांचा मत्सर करून शिव्यागाळी कशी करायची ते शिकविणार आहे. सिगरेट पिऊन दारूच्या धुंदीत एकमेकांबद्दल अपशब्द कसे काढायचे ते शिकविणार आहे. मोठमोठ्या बंदुका आणि बॉंब तयार करून एकमेकांना कसे ठार मारायचे ते शिकविणार आहे. मला मोठी मजा येणार आहे.''

जीजसने त्यावर प्रश्न केला,''हे सगळे केल्यानंतर तुला त्यापासून काय मिळणार आहे?''

''अर्थातच मी त्या सर्वांना जिवे मारणार आहे.'' असे म्हणून सैतान जीजसकडे मग्रूरपणे विजयी मुद्रेने पाहू लागला. ''या बदल्यात तुला काय मिळावे अशी तुझी अपेक्षा आहे?'' जीजसने असे विचारताच सैतान विकट हास्य करून म्हणाला, ''ओह! तुला ही माणसे कशाला हवी आहेत? ती चांगली माणसे नाहीत. तू त्यांना जवळ करशील आणि ते मात्र तुझा तिरस्कार करतील. ते तुझ्या तोंडावर थुंकतील. तुला अपशब्द सुनावतील. तुला ते ठार सुद्धा करतील. तू मुळीच त्या माणसांना जवळ करू नकोस.''

''तरीही किती आणि काय हवे ते सांग.'' जीजसने परत सैतानाला विनंती केली.

सैतानाने एक वेळ जीजसकडे पाहिले आणि उपहासाने म्हणाला, ''तुझे सगळे रक्त, सगळे अश्रू आणि तुझे संपूर्ण आयुष्य.'' जीजसने आनंदाने त्याला होकार दिला, आणि त्या माणसांची किंमत चुकती केली.

असे सांगून पास्टरने व्यासपिठावरील पिंजरा उचलला आणि तडक आंतरभागात चालू लागला.

**प्रार्थना :** तुझ्या कृपेने मला मिळालेल्या या आयुष्यासाठी मी तुझे आभार मानतो. मी काही श्रीमंत होऊ इच्छित नाही. मला राहायला राजवाडा नको. मला उत्तम अशा ऐहिक वस्तुंची गरज नाही. परंतु मला उत्तम आरोग्य, डोक्यावर छप्पर, माझे अंग झाकण्यापुरते कपडे, पोटाची भूक भागण्याइतके अन्न आणि माझ्यावर सतत प्रेम करणारे माझे कुटुंब, त्याचबरोबर आयुष्यभराची साथ देणारे जिवाभावाचे मित्र असावेत एव्हढीच माझी अपेक्षा आहे. मी तुझे शतश: आभार मानतो.

❋ ❋ ❋

# पपी आणि लहान मुलगा

**ए**का शेतकऱ्याच्या कुत्रीला पिल्ले झाली होती. अर्थातच त्याला ती पिल्ले विकायची होती. त्याने त्यासाठी एक पोस्टर तयार केले. ते पोस्टर तो त्याच्या शेताच्या बांधावरील कुंपणावर लावित होता. त्याचे पोस्टर लावण्याचे काम जवळजवळ होत आले होते. हातातील काम संपवून तो खाली उतरत असतानाच त्याच्या पायाला कोणीतरी धरून तो हालवत असल्याचे त्याच्या लक्षात आले. त्याने खाली पाहिले तर तिथे एक छोटा मुलगा दिसला. शेतकरी त्या मुलाच्या डोळ्यांतील भाव पाहतच राहिला. तो मुलगा म्हणाला, ''काका, मला तुमच्याकडच्या पिल्लांपैकी एक पिल्लू हवे आहे.''

मानेवर आलेला घाम पुसत पुसत खाली येऊन शेतकरी म्हणाला, ''ठीक आहे. पण ही पिल्ले फार चांगल्या जातीची आहेत. त्यामुळे त्यांची किंमत जास्त आहे.''

मुलाने थोडा विचार केला. मान खाली नेली आणि पँटच्या खिशात हात घालून काही सुटे पैसे – नाणी बाहेर काढली आणि ती शेतकऱ्याला दाखवित त्याने विचारले, ''हे पहा माझ्याकडे इतके पैसे आहेत. त्या पिल्लांना पाहायला तेव्हढे पुरेत ना?'' हो नक्कीच असे म्हणत त्याने एक शिट्टी वाजविली आणि डॉली इकडे ये अशी हाक मारली. हाक मारल्याबरोबर जवळच असलेल्या कुत्र्याच्या घरातून एक कुत्री आणि तिच्या पाठोपाठ लोकरीच्या गोळ्यासारखी दिसणारी चार कुत्र्यांची पिल्ले कुंपणाजवळ आली.

त्या पिल्लांना पाहून तो मुलगा त्या कुंपणावर थोडासा रेलला. त्याचे डोळे आनंदाने आणि विस्मयाने चमकले. डोळ्यांत आनंदाचा आणि कुतूहलाचा नाच सुरू झाला. ते कुत्र्यांचे टोळके कुंपणाजवळ येत असतानाच त्या मुलाला कुत्र्यांच्या घरात एक चित्तथरारक आणि लक्ष वेधून टाकणारे काहीतरी दिसले. थोड्याच वेळात आणखी एक लोकरीचा गोळा बाहेर आला. इतर गोळ्यांपेक्षा तो आकाराने छोटा होता. कुंपणापर्यंत तो गोळा घसरत घसरत आला. थोड्या अंतरावर येताच ते पिल्लू लंगडत लंगडत सर्वांना गाठण्याचा प्रयत्न करीत होते.

त्या पिल्लाला पाहताच तो लहान मुलगा हर्षभरित होऊन म्हणाला, ''मला ते पिल्लू हवे आहे.'' शेतकरी त्या मुलाजवळ गुढगे टेकून बसला आणि म्हणाला, ''बाळ , तू ते पिल्लू घेऊ नकोस कारण ते इतर पिल्लांसारखे तुझ्याबरोबर खेळू शकणार नाही. पळू शकणार नाही.''

ते ऐकून तो लहान मुलगा दोन पावले मागे सरकला. हाताने डाव्या पायाची पँटची खालची पट्टी धरून वर केली. त्या बरोबर त्याच्या त्या पायावर बसवलेली लोखंडी आधाराची जाळी दिसली. त्याच्या अधू पायाला बळकटी देणारे ते वैद्यकीय साधन होते. पायाच्या दोनही बाजूने येणारी ती पट्टी त्याच्या खास बनवलेल्या बुटांना जोडलेली होती. शेतकऱ्याला आपला तो पाय दाखवित लहानगा म्हणाला, ''हे पहा, मी सुद्धा जोरात पळू शकत नाही. त्या पिल्लाला कोणीतरी समजावून घेणारा हवा ना?''

शेतकऱ्याच्या डोळ्यांत पाणी आले. तो खाली वाकला. त्या दुबळ्या पिल्लाला हातात उचलून घेतले. काळजीपूर्वक ते हातात घेऊन ते पिल्लू त्याने लहान मुलाकडे सोपवले.

मुलाने भाबडेपणाने विचारले, 'किती पैसे द्यायचे?' शेतकरी भावनाविवश होऊन म्हणाला, ''काहीही नाही. बेटा प्रेमाला किंमत नसते.''

**तात्पर्य :** जगात अशी अनेक माणसे असतात ज्यांना समजावून घेणारे कोणीतरी हवे असते.

❋ ❋ ❋

# परमेश्वर आणि सफाई कामगार

**ए**का प्रसिद्ध मंदिरामध्ये एक सफाई कामगार होता. तो अत्यंत प्रामाणिक व श्रद्धाळू होता. रोज असंख्य भक्तगण देवाची पूजा करायला येताना तो पाहत असे. त्या सगळ्यांची प्रार्थना होईपर्यंत परमेश्वर उभा राहून भक्तांना मदत करीत आहे असे तो पाहत असे. त्यामुळे परमेश्वर दमून जात असेल अशी त्याच्या मनाची समजूत झाली होती. ते न पटून त्याने हिंमत करून एक

दिवस देवाला विचारले, ''देवा एक दिवस मी तुझ्या जागेवर उभा राहिलो तर तुला एक दिवस पूर्ण विश्रांती मिळेल.''

सर्वसाक्षी परमेश्वर म्हणाला, ''अशी विश्रांती घ्यायला माझी काहीच अडचण नाही. त्यासाठी मी तुझे माझ्यासारखे रूपांतर करून टाकीन. पण एक अट आहे. तुला माझ्यासारखे इथे उभे राहावे लागेल. येणाऱ्या प्रत्येकाकडे पाहून हसून आशीर्वाद द्यावे लागतील. तू कशातही बदल करू नकोस आणि काहीही बोलू नकोस. लक्षात ठेव की तू देव असणार आहेस आणि मी सगळ्या गोष्टींसाठी एक कायमस्वरूपी योजना आखली आहे. त्या झाडूवाल्याने हे मान्य केले.

दुसऱ्या दिवशी तो झाडूवाला देवाच्या जागी उभा राहिला. एका श्रीमंत माणसाने परमेश्वराची प्रार्थना केली, देवाला मोठे दान केले आणि त्याच्या व्यवसायाची भरभराट होऊ दे अशी प्रार्थना केली. हे करीत असताना तो श्रीमंत गृहस्थ त्याची पैशाने भरलेली थैली देवाच्या पायापाशीच विसरून गेला. देवाच्या रूपात असलेल्या झाडूवाल्याच्या हे लक्षात आले पण देवाचे रुप असल्याने त्या गृहस्थाला त्याला हाका मारता आल्या नाहीत. स्वत:वर ताबा राखीत तो गप्प राहिला.

त्यानंतर एक गरीब मनुष्य आला आणि त्याने जवळचे एक नाणे दानपेटीत टाकले. त्याने देवाला प्रार्थना करताना सांगितले, माझ्याकडून हे इतकेच दान मी करू शकलो. पण देवा तुझी प्रार्थना अशीच कायम करण्याची मला ताकद व बुद्धी दे. देवा माझ्या कुटुंबाला काही प्राथमिक वस्तुंची गरज आहे. हे तुझ्याच हातात असून मला तू त्यासाठी काहीतरी उपाय उपलब्ध कर अशी प्रार्थना आहे.

प्रार्थनेनंतर त्या गरीब माणसाने जेव्हा डोळे उघडले तेव्हा त्याला श्रीमंत माणसाची विसरलेली पैशाची थैली नजरेस पडली. ती पाहून त्याने देवाने कृपा केली या समजुतीने ती थैली साळसूदपणे उचलली. देवाच्या रुपात उभ्या असलेल्या झाडूवाल्याला काहीच करता आले नाही. तो गप्प उभा राहिला.

त्याच वेळी देवाच्या पायाशी एक खलाशी आला. त्याची प्रार्थना सुरू असतानाच तो श्रीमंत माणूस पोलिसांना घेऊन आला. कोणीतरी त्याची पैशाची थैली चोरली असल्याची त्याने तक्रार केली होती. खलाशाला तिथे पाहून त्यानेच चोरी केली असे वाटून त्याने त्या खलाशाला अटक करायला पोलिसांना विनंती केली.

देव स्वरुपात असलेल्या झाडूवाल्याला तो खलाशी चोर नाही हे सांगावेसे वाटत होते; पण तो काहीच म्हणू शकला नाही. त्यामुळे त्याला खूप नैराश्य आले. त्या खलाशाने देवाकडे पाहून विचारले, माझ्यासारख्या पापभिरू माणसालाच ही शिक्षा का? श्रीमंत माणसाने चोर लगेच सापडून दिल्याबद्दल देवाचे आभार मानले.

आता मात्र देवस्वरुपातील झाडूवाल्याला हे सहन करणे अशक्य होऊन गेले. त्याने विचार केला प्रत्यक्ष देव जरी उभा असता तरी त्याने हस्तक्षेप केला असता, असे वाटून तो बोलू लागला. खलाशी चोर नसून त्या गरीब माणसाने पैशाची थैली नेली असल्याचे स्पष्ट केले. श्रीमंत माणूस आणि तो खलाशी दोघेही खूश झाले.

तो दिवस संपल्यावर परमेश्वर आपली जागा घेण्यासाठी परत आला. त्याने झाडूवाल्याला दिवस कसा गेला असे विचारले. झाडूवाल्याने कबूल केले की, ''मला वाटले होते की तुझे काम करणे मला सोपे जाईल, पण तसे नाही. आता मला कळले की तुझे काम फार कठीण आहे. पण मी एक चांगली गोष्ट केली आहे.'' असे म्हणून त्याने दिवसभरात घडलेल्या घटना देवाला सांगितल्या.

ते ऐकून देव अस्वस्थ झाला. झाडूवाल्याला मात्र वाटले देव त्याला त्याने केलेल्या कामासाठी शाबासकी देईल. परमेश्वर म्हणाला, ''आपल्या ठरलेल्या योजनेनुसार तू का नाही वागलास? तुझा माझ्यावर विश्वास नव्हता. तुला असे वाटते का की इथे येणाऱ्या सगळया लोकांच्या मनातील भावना व विचार मला समजत नाहीत. श्रीमंत माणसाने माझ्या पायाशी केलेले दान हे सगळे त्याने वाईट मार्गाने मिळविलेल्या पैशातून केलेले दान होते. ते सुद्धा त्याने जमा केलेल्या पैशाचा एक छोटासा भाग होता. याउलट त्या गरीब माणसाने दानपेटीत टाकलेले नाणे हे त्याच्या स्वकमाईपैकी शेवटचे उरलेले नाणे होते. तेही माझ्यावरच्या श्रद्धेपोटी मला अर्पण केले.

खलाशाने कोणतीच चूक केली नव्हती; पण तो त्या रात्री समुद्रावर लांबच्या प्रवासासाठी निघणार होता. त्या रात्रीच्या वाईट

हवामानामुळे त्याच्या जीवाला धोका होता. तो प्रवासास न जाता जर त्याला अटक झाली असती तर त्याच्यावर आलेल्या भयंकर आपत्तीतून तो वाचला असता. पैशाची थैली अनायसे त्या गरीब माणसाच्या हातात गेली असती. त्याने तो पैसा माझ्या सेवेसाठीच वापरला असता. मी त्या श्रीमंत माणसाचे कुकर्माचे गांभीर्य थोडेसे कमी करणार होतो. खलाशाचे प्राण वाचविणार होतो. तू माझ्या साऱ्या योजनेला सुरुंग लावलास. कारण तुला वाटत होते की तुला माझी सगळी योजना ठाऊक आहे. आणि म्हणून तू तुझ्या मनात आलेल्या योजना अमलात आणल्यास.''

परमेश्वराच्या मनात सर्व योजना तयार असतात. त्याच्या मनात सर्वांना न्याय देण्याचे योजलेले असते.

आपल्याला फक्त त्याच्यावर विश्वास, श्रद्धा हवी आणि आपण फक्त धीर धरला पाहिजे.

❋ ❋ ❋

# परमेश्वर कधीही चुकत नाही

कोणे एके काळी एक राजा देवाच्या देवत्त्वावर विश्वास न ठेवणारा होता. त्याच्या पदरी असलेला एका गुलामाचा मात्र देवाच्या देवत्त्वावर दृढ विश्वास होता. तो नेहमी म्हणायचा, ''कोणत्याही परिस्थितीत नाउमेद होऊ नका. कारण परमेश्वर नेहमी बरोबर असतो. तो कधीही चूक करीत नाही.'' एक दिवस राजा गुलामाला बरोबर घेऊन शिकारीला गेला. शिकारीदरम्यान जंगलातील हिंस्र श्वापदाने राजावर हल्ला केला. बरोबर असलेल्या गुलामाने चतुराईने तो हल्ला स्वत:वर झेलला आणि त्या रानटी जनावराला ठार करण्यात यश मिळविले; परंतु त्या हल्ल्यामध्ये राजाला आपले हाताचे एक बोट गमवावे लागले.

त्यामुळे संतापलेला राजा गुलामाने स्वत:वर संकट ओढवून घेऊन राजाने प्राण वाचविले हे विसरून गेला. त्याने विचारले, ''आहे का तुझा देव दयाळू? तसा असता तर माझ्यावर रानटी जनावराने हल्ला कसा केला असता? आणि मग माझे हाताचे बोट मला गमवावे लागले नसते.''

गुलाम म्हणाला,''महाराज, हे सर्व घडून गेल्यावर सुद्धा मी आपल्याला खात्रीपूर्वक सांगतो की, हे असे का घडले त्याची देवाला पूर्ण कल्पना असणार. त्याच्या नियोजनाप्रमाणेच हे घडले असणार. देव कधीही चूक करीत नाही.''

गुलामाचे हे उत्तर ऐकून राजा जास्तच रागावला आणि त्याने गुलामाला बंदिवान करण्याचा हुकूम केला.

त्यानंतर राजा परत एकदा शिकारीसाठी रानात गेला. या खेपेला राजा रानटी जमातीच्या तावडीत सापडला. ती जमात माणसांचा देवाला बळी देत असत. राजाला त्यांनी बळी करण्याचे ठरविले. वाजतगाजत त्याला बळी देण्याच्या उच्च स्थानावर चढविले. परंतु राजाला एक हाताला एक बोट नसल्याचे त्यांच्या लक्षात आले. हा मानव परिपूर्ण नाही व त्यामुळे परमेश्वराला अर्पण करता येणार नाही या कारणासाठी त्यांनी राजाला बळी देण्याचे रद्द केले व राजाला सोडून दिले.

राजवाड्यात परत आल्यावर राजाने त्या गुलामाला बंदिवासातून मुक्त करायची आज्ञा केली. राजा गुलामाला म्हणाला,''देव खरोखरच माझ्याबाबतीत दयाळू आहे. ते रानटी लोक मला खरोखरच मारायला निघाले होते. पण माझ्या हाताला एक बोट नसल्यामुळे मी वाचलो. त्यांनी माझी सुटका केली. पण मला एक प्रश्न पडला आहे. ''देव जर दयाळू असेल तर त्याने मला तुला बंदिवान करण्याची बुद्धी का दिली?'' ते ऐकून गुलाम म्हणाला, ''राजाधिराज, मी मोकळा राहून जर तुमच्याबरोबर परत रानात आलो असतो तर त्यांनी माझी हत्या नक्की केली असती. कारण माझी सर्व बोटे शाबूत असल्यामुळे त्यांना मी परिपूर्ण वाटलो असतो. तेव्हा आता खात्री बाळगा की परमेश्वर सगळे काही ठरलेल्या योजनेनुसार घडवित असतो. देव कधीही चूक करीत नाही.

❋ ❋ ❋

# परमेश्वर दर्शन

एका लहान मुलाला परमेश्वराला भेटण्याची खूप इच्छा होती.परमेश्वर आपल्यापासून खूप दूर राहतो ही त्याची खात्री होती. तरीही त्याला भेटायला तो उत्सुक होता. त्यासाठी एके दिवशी सकाळी लवकर उठून त्याने आपली बॅग भरली. बॅगेत स्वत:च्या आवडीचे लाडू आणि सहा सरबताच्या बाटल्या घ्यायला तो विसरला नाही. घरापासून थोड्याच अंतरावर असलेल्या एका बागेत तो पोहोचला. तिथे एका बाकावर बसलेला एक वयस्कर माणूस त्याला दिसला. बसल्या बसल्या तो पक्षांना दाणे टाकत होता. तो मुलगा बाकावर त्याच्या शेजारी जाऊन बसला. आपली बॅग उघडली. तो बरोबर आणलेल्या सरबतापैकी एक बाटली काढून पिणार एवढ्यात त्याचे त्या शेजारच्या गृहस्थाकडे लक्ष गेले. तो बराच भुकेला असा त्याला वाटला म्हणून त्याने बॅगेतील लाडू काढून त्याच्या पुढे केला.

त्या आजोबांनी तो आनंदाने घेतला आणि खाल्ला. मुलाकडे पाहून एक समाधानाचे हास्य केले. लहानग्या मुलाला त्याचे ते हसणे इतके भावले की त्याला तसे पुन्हा एकदा पाहावेसे वाटले. त्यासाठी त्याने आजोबांना जवळचे सरबत घेण्यासाठी पुढे केले. त्याही वेळी आजोबा तोंडभरून हसले. मुलगा अत्यंत आनंदित झाला. त्यानंतर दुपारभर ते दोघे त्या बाकावर बसून लाडू खात होते आणि सरबत पित होते. दोघेही आंतरिक समाधानाने मनापासून हसत होते. इतका वेळ एकत्र बसूनही दोघेजण एकमेकांशी एक शब्द सुद्धा बोलले नाहीत.

सायंकाळ झाली. सूर्य मावळला. अंधार पडायला लागला. मुलगा एव्हाना थकून गेला होता. तो घरी परत जायला निघाला. बाकापासून दहा पावले तो दूर गेला असेल तेव्हा त्याला काय वाटले कोण जाणे; पण तो तसाच माघारी धावत आजोबांजवळ आला आणि त्यांना एक घट्ट मिठी मारली. आजोबांनी पण त्याला आतापर्यंतच्या हास्यापेक्षा दिलखुलास आणि प्रसन्न हास्य दिले.

लहानगा घराचे दार उघडून घरात आला. थोड्याच वेळात त्याच्या आईचे त्याच्याकडे लक्ष गेले. त्याच्या तोंडावरील प्रचंड समाधान व हास्य पाहून तिला खूप आश्चर्य वाटले. तिने विचारले, ''काय रे, दिवसभर कोठे गेला होतास आणि इतकी खुशी कशाची झाली आहे?''

मुलाने उत्तर दिले, ''मी आज परमेश्वराबरोबर दुपारचे जेवण केले.'' आईने पुढे काही विचारण्याआधीच तो म्हणाला, ''बरे का आई त्याच्याइतके प्रसन्न हसणे मी आजपर्यंत कधीही पाहिले नव्हते. देवाचे ते हसणे मी कधीच विसरणार नाही.''

बागेमधून ते वयस्कर गृहस्थ पण काही वेळातच आपल्या घरी पोहोचले. त्यांच्या चेहऱ्यावरून उत्साह आणि हास्य ओसंडून वाहात होते. त्यांचा फुललेला आणि समाधानी चेहरा पाहून त्यांच्या मुलाने त्यांना विचारले, ''बाबा तुम्ही आज दिवसभर काय केले ज्यामुळे तुमचा चेहरा एव्हढा टवटवीत झाला आहे? तुम्हाला झालेला आनंद तुमच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत आहे.''

आजोबांनी उत्तर दिले, ''बेटा, बागेत बसून देवाने दिलेले लाडू मी खाल्ले.'' मुलाला पुढे काहीही बोलू न देता ते म्हणाले, ''अरे तुला माहीत नाही. माझ्या अपेक्षेपेक्षा परमेश्वर खूपच लहान आहे.''

पुष्कळ वेळा आपण स्पर्शसुखाची ताकद, मनापासूनचे तोंडभरून हसणे, दुसऱ्याची काळजी घेणे, दुसऱ्याचे म्हणणे ऐकणे, मोकळ्या मनाने दिलेले धन्यवाद, मनापासून दुसऱ्याची केलेली प्रशंसा हे सर्व विसरून जातो. पण या सगळ्यात आयुष्याला वेगळे वळण मिळण्याचे सामर्थ्य असते. आपल्या आयुष्यात वेगवेगळी माणसे वेगवेगळ्या कारणासाठी, वेगवेगळ्या टप्प्यावर तर काहीजण आयुष्यभर साथीला येतात. त्या सर्वांना सारखेच महत्त्व देऊन त्यांचा स्वीकार करा.

❋ ❋ ❋

# परमेश्वराने निर्मिलेली गुलाबाची कळी

**च**र्चमध्ये प्रवचन करणारे दोन पाद्री बागेतून हिंडत होते. आपल्या आयुष्यात काय लिहून ठेवले आहे याबद्दल थोडीशी चिंता व काहीसे कुतूहल वाटून विचार करत असलेला लहान पाद्री मोठ्याला सल्ला घेण्यासाठी विचारतो, ''माझ्या आयुष्यात काय घडणार असेल?''

काहीही न बोलता मोठा पाद्री गुलाबाच्या ताटव्याजवळ जातो. झाडावरची एक गुलाबाची कळी लहान पाद्र्याच्या हातात देतो. फुलाची एकही पाकळी न तुटता किंवा न फाटता एकएक पाकळी उघडायला तो लहान्याला सांगतो. आपण विचारलेल्या प्रश्नाचा, देवाने आपल्या आयुष्यात काय वाढून ठेवले आहे हे जाणून घेण्याच्या आपल्या इच्छेचा आणि या गुलाबाच्या पाकळीचा काय संबंध हे न समजल्यामुळे लहान थोड्या साशंक नजरेने मोठ्याकडे पाहतो. परंतु मोठ्याबद्दल वाटणाऱ्या प्रचंड आदरापोटी तो त्या गुलाबाच्या पाकळ्या हळुवारपणे एक एक करून उघडण्याचा प्रयत्न करतो. ते करीत असताना कोणतीही पाकळी खराब होणार नाही याची तो काळजी घेत असतो; परंतु तसे करणे अशक्य आहे हे समजायला त्याला फारसा वेळ लागत नाही.

लहान पाद्री आपण सांगितल्याप्रमाणे फुलाच्या पाकळ्या उघडण्यात यशस्वी होत नाही हे पाहून व ते त्याला समजल्याचे ध्यानात आल्यानंतर मोठा त्याला सांगू लागला,

''ही तर देवाने निर्माण केलेली लहानशी गुलाबाची कळी आहे. माझ्या या बेढब हातांनी ह्या कळीच्या पाकळ्या मी उघडू शकत नाही. माझ्यासारख्या सामान्य माणसाला पाकळ्या उमलण्याचे रहस्य ठाऊक नाही. देवाला मात्र अगदी सहजपणे या पाकळ्या उमलवता येतात. मी प्रयत्न केला तर त्या पाकळ्या मरून जातात. मला जर या पाकळ्या उमलविण्याची साधी गोष्ट जमत नाही तर मग माझ्या आयुष्याच्या भवितव्याबाबत कळण्याइतकी माझी बुद्धी तल्लख कशी असेल? म्हणूनच मी आयुष्याच्या प्रत्येक क्षणासाठी परमेश्वरावर विश्वास व श्रद्धा ठेवतो. प्रत्येक पाऊल टाकताना परमेश्वराचे मार्गदर्शन घेतो. माझ्या आयुष्याच्या प्रवासातील सर्व टप्पे त्या एका देवालाच फक्त माहीत असतात. तेव्हा त्याच्यावर भरवसा ठेव.

❋ ❋ ❋

# पाचशे रूपयाच्या नोटेवरून व्यवस्थापनाचे धडे

**लो**कांच्या प्रेरणा जागृत करण्यासाठी एका व्यवस्थापन विषयातील विद्वान वक्त्याचे भाषण होते. वक्ता व्यासपिठावर आल्याबरोबर त्याने खिशातून एक पाचशे रुपयांची नोट काढली आणि हात वर करून हवेत हलवली. जमलेल्या श्रोत्यांना विचारले, ''ही पाचशे रुपयांची नोट कोणाला हवी आहे?'' अनेक हात हवेत वर गेले. हलके हलके लोकांचा आवाजही येऊ लागला. ''मला, मला'' म्हणून गलका सुरू झाला.

प्रत्येकाच्या मनात एकच प्रश्न होता. कोणा नशिबवान माणसाला व्याख्याता मेहेरनजर होऊन ते पैसे देईल? सभेत ''मला हवी आहे'' हा ओरडा वाढतच होता. इतक्यात एक तरूणी मधल्या जागेतून धावत पुढे जाऊन एकदम व्यासपीठावर चढली आणि क्षणार्धात तिने व्याख्यात्याच्या हातातील ती पाचशेची नोट अधाशीपणे झडप घालून ओढून घेतली.

''वाह! तुम्ही हे फार चांगले केलेत.'' त्या तरूणीचे कौतुक करण्यासाठी व्याख्याता म्हणाला. ''आपल्यापैकी बहुतेक जण चांगले काहीतरी घडण्याची वाट पाहत थांबतात. त्याचा काहीच उपयोग नसतो. तुम्ही स्वत: चांगली गोष्ट घडवून आणली पाहिजे.'' व्याख्यात्याचे हे शब्द त्या छोट्याशा प्रसंगामुळे सर्वांच्या मनात कोरले गेले. नुसते काहीतरी केले पाहिजे असा नुसता विचार करून काहीही घडत नसते. आपले आयुष्य असेच असते. आपल्यासभोवती अनेक संधी आ वासून उपलब्ध असतात. आपल्याला सगळ्या चांगल्या गोष्टी हव्या असतात; पण त्या मिळविण्यासाठी आपण आवश्यक कृती करीत नाही. सर्वांना

पाचशे रुपयांची देऊ केलेली नोट हवी होती पण ती मिळविण्यासाठी कोणीच हालचाल केली नाही. पाचशे रुपयांची देऊ केलेली ती नोट मिळावी या अभिलाषेने कोणाला त्याचा लाभ होणार याचा फक्त विचार करीत बसलो. आपले नशिब आपण घडवायला हवे होते. आपल्यापैकी अनेकांना पुढे येऊन ती नोट हिसकावून घेण्याचा विचार मनात आला असेल; पण असे केले तर इतरांना काय वाटेल याची चिंता करण्यात वेळ वाया घालवला.

आपल्यासमोर अनेक यशस्वी उद्योजकांनी नवनवीन उत्पादने काढून त्याचा उत्तम धंदा केलेला आपण पाहत असतो. अनेकांनी नवीन व्यवसाय सुरू करून त्याची भरभराट झालेली पाहिलेली असते. अनेक वर्षांपूर्वी आपल्याही डोक्यात हीच कल्पना आली होती याची आपल्याला त्यांच्याकडे पाहताना आठवण येते; पण आता त्याचा काहीच फायदा नसतो. तुमच्या डोक्यात ती कल्पना सर्वप्रथम आली असेल पण दुसऱ्या कोणीतरी ती प्रत्यक्षात प्रथम आणलेली असते आणि त्याची फळे तो खातच असतो. पुढच्या वेळी जेव्हा तुम्हाला एखादी नवीन कल्पना सुचेल तेव्हा नुसतेच काहीतरी केले पाहिजे, असे नुसते म्हणत बसू नका. कामाला लागा. पुढच्या वेळी तुमच्यासमोर जेव्हा संधी येईल तेव्हा त्या तरूणीची आठवण करा. उठून त्यावर लगेच कृती करा. इतरांचा विचार करत बसू नका.

❃ ❃ ❃

# पाण्याचा ग्लास आणि महत्त्वाचा पाठ

आपल्याला आलेली कोणतीही अडचण दूर करण्यासाठी सर्वांत प्रथम चिंता करणे सोडून दिले पाहिजे. एक दिवस रसायन शास्त्राच्या प्राध्यापकाने वर्गात एक पाठ वेगळ्या पद्धतीने विद्यार्थ्यांना शिकविण्याचे ठरविले होते. वर्गात आल्यावर त्यांनी पाण्याचा भरलेला ग्लास हातात घेतला आणि उंच धरून विद्यार्थ्यांना विचारले, ''या ग्लासचे वजन किती असेल असे तुम्हाला वाटते?'' '५०० ग्रॅम' एक आवाज आला. '६०० ग्रॅम' मागून दुसरा आवाज आला.

मला नक्की ठाऊक नाही. असे म्हणून त्यानी तो ग्लास पुन्हा सर्वांना दिसेल असा वर धरला. ''मोजून पाहिल्याखेरीज आपल्याला समजणार नाही याचे वजन किती आहे ते.'' ग्लास तसाच हातात ठेवून ताणून धरत प्राध्यापकांनी विचारले, ''मी जर हा ग्लास असाच काही वेळ हातात धरून ठेवला तर काय होईल बरे?''

''काहीच होणार नाही'' उत्तर आले. ''पण समजा मी हा ग्लास असाच हातात घेऊन एक तास उभा राहिलो तर काय होईल असे वाटते?'' ''तुमचा हात दुखायला लागेल'' एकाने उत्तर दिले. ''अगदी बरोबर. आणि जर मी हा ग्लास हातात धरून असाच हात २४ तास वर ठेवला तर काय होईल?''

''तुम्हाला असह्य वेदना होऊ लागतील.'' लगेच एकाने सांगितले, ''तुमचा हात कदाचित बधिर होईल'' आणखी एकाने सांगितले. ''तुमचा हात पॅरलाइझ सुद्धा होऊ शकेल. तुम्हाला उपचारासाठी तातडीने दवाखान्यात जावे लागेल.'' शेवटच्या बाकावरील विद्यार्थी म्हणाला.

''अगदी बरोबर. पण एक गोष्ट तुमच्या लक्षात आली आहे का? या सर्व वेळात ग्लासच्या वजनात काहीही फरक पडलेला नाही. मग हातावर परिणाम होण्याचे काय कारण असावे असे तुम्हाला वाटते?'' कोणीच उत्तर दिले नाही. सगळे गप्प बसले होते. विद्यार्थी विचारात पडले होते. शांतताभंग करून प्राध्यापकांनी प्रश्न केला, ''या हाताला होणाऱ्या संभाव्य त्रासावर काय उपाय करता येईल?'' ''तो ग्लास खाली ठेवावा लागेल.'' चटकन एक विद्यार्थी म्हणाला.

''खरे आहे तू म्हटलेस ते'' प्राध्यापकाने प्रश्नाच्या मुळावर आल्यासारखे म्हटले. ''हेच तर आज मला तुम्हाला सांगायचे होते. हेच तर तुम्ही ध्यानात ठेवणे आवश्यक आहे. अडचणी आणि चिंता या ग्लासमधील पाण्याप्रमाणे असतात. त्या अडचणींबद्दल थोडा वेळ विचार केलात तर फारसे बिघडत नाही. पण जर तुम्ही थोडा जास्त वेळ विचार करीत राहिलात तर तुम्हाला त्या सतावित राहतील. त्याही पुढे जाऊन तुम्ही जर दिवसभर त्या अडचणी डोक्यात ठेवून त्यावर विचार करीत बसलात तर तुमचे डोके बधीर होऊन जाईल. तुम्ही दुसरे काहीही करू शकणार नाही. सुन्न होऊन जाल. तुमच्या डोक्यातून ती अडचण काढून

टाकणे आवश्यक आहे हे पक्के ध्यानात घ्या. जसे हातात घेतलेला तो ग्लास खाली ठेवणे आवश्यक वाटले तसेच.''

आपण त्या दिवशीच्या त्या वर्गात शिकायला नव्हतो; पण आपण हा धडा पक्का लक्षात ठेवायला हवा. ग्लास खाली ठेवण्याचा प्रत्येक वेळी तो अडचण व चिंता याचा विचार नसेल. कधी कधी आपण दुखावले जातो किंवा कोण्या मित्राने आपल्याशी प्रतारणा केलेली असते आणि ही मनाची टोचणी आपण आयुष्यभर बाळगीत बसतो. ती टोचणी वाढतच जाते आणि मनाला क्लेश देत राहते. सतावत राहते. क्षमा करून विसरून जाणे हे फक्त इतर लोकांसाठी चांगले आहे असे नव्हे तर स्वत:साठी अत्यावश्यक आहे.

नेल्सन मंडेलांनी २७ वर्षे तुरूंगात काढली. ते जेव्हा सुटून बाहेर पडले तेव्हा विचार करा त्यांना किती राग यायला हवा होता. किती सूड घेण्याची इच्छा निर्माण झाली असेल. त्यांची मनाची काय अवस्था झाली असेल. पण तुम्हाला ठाऊक आहे? त्यांनी जेव्हा राष्ट्राध्यक्ष म्हणून शपथ घेतली तेव्हा त्या समारंभासाठी जेलरला सुद्धा मुद्दाम आमंत्रित केले आणि ते देखील खास आमंत्रित म्हणून पुढच्या रांगेत. केवढा मनाचा मोठेपणा. २७ वर्षांच्या कारागृहातील दु:ख सहन केल्यानंतर जर ते क्षमा करू शकतात तर आपण का करू शकणार नाही?

आपल्या मनातील भीतिबद्दल हेच म्हणता येईल. लहानपणी एखाद्या गोष्टीत आलेले अपयश किंवा एखाद्या प्रसंगामुळे मनात बसलेली भीती मनात कायम घर करून बसलेली असते. लोकांसमोर भाषण करण्याची भीती, गणित विषयाची भीती, नाकारले जाण्याची भीती, तुम्ही कोणतीही भीती सांगा, ती अनेकांना सतावत असते.

आपण लहान असतानाच कोणीतरी तो पाण्याने भरलेला ग्लास आपल्या हातात दिलेला असतो. 'तुम्ही बावळट आहात, तुम्ही काही कामाचे नाही, तुम्हाला हे जमणारच नाही' असा शिक्का तुमच्यावर मारला की तो आपण आयुष्यभर खरा समजून वावरत असतो. 'मला जमणार नाही' हा विचार तुमच्या मनातून जात नाही. तो जास्तच पक्का होत जातो. आणि मग तो विचार आपल्याला पूर्ण पॅरलाइझ करून टाकतो. हीच वेळ ग्लास खाली ठेवण्याची असते.

या संदर्भात एक गोष्ट आठवते. एक अत्यंत कष्टाळू माणूस त्याच्या बायको आणि मुलांबरोबर समाधानाने राहत होता. प्रत्येक दिवशी सायंकाळी कामावरून घरी परतला की न चुकता एक परिपाठ तो करीत असे. घराच्या मुख्य दाराबाहेर त्याने तीन खुंट्या लावून घेतल्या होत्या. घरात शिरण्यापूर्वी पहिल्या खुंटीवर तो आपली टोपी अडकवून ठेवित असे. दुसऱ्या खुंटीवर तो आपला कोट काढून ठेवित असे. तिसऱ्या खुंटीवर तो आपल्या डोक्यावरचा काल्पनिक फेटा सोडून ठेवित असे. एकदा त्याच्या मित्राने त्याला असे करताना बघितले आणि आश्चर्याने विचारले, 'हे तू खुंटीवर काय ठेवलेस?'

त्या माणसाने मित्राला सांगितले, ''ह्या माझ्या अडचणी, त्यामुळे वाटणाऱ्या चिंता आणि आलेला राग असतो. माझ्या कामाच्या वेळी हे सर्व माझ्या डोक्याला खूप त्रास देत असते; पण मी घरात शिरताना आठवणीने त्या सर्व बाहेरच टांगून ठेवतो. माझ्याबरोबर त्यांना मी घरात येऊ देत नाही.''

आपणही त्या माणसाकडून तसे करायला शिकले पाहिजे. आजपासूनच ग्लास खाली ठेवू या आणि मग काय फरक पडतो ते पाहा.

❋ ❋ ❋

# आजचा सुविचार - पाण्यात उठणारे तरंग

एक माणूस तळ्याकाठी शांतपणे बसला होता. थोड्या थोड्या वेळाने तो तळ्यामध्ये काठावर पडलेल्या गारगोट्या फेकत होता. त्याच रस्त्याने एक लहान मुलगा जात होता. त्या माणसाच्या थोड्या थोड्या वेळाने तळ्यामध्ये गारगोटी फेकणे पाहून तो थोडासा चक्रावून गेला होता.

तो लहान मुलगा न राहवून त्या माणसाजवळ गेला आणि त्याने त्याला म्हटले, ''वा! वेळ घालविण्यासाठी हा छान खेळ आहे. नाही का?'' तो माणूस काहीच न बोलता स्वस्थ बसून राहिला. त्याच्या विचारात त्याची तंद्री लागली होती.

दुसरीकडे लक्ष देऊन त्याची एकाग्रता त्याला भंग करायची इच्छा नव्हती.

तरीही थोड्या वेळाने त्या माणसाने अगदी मुदु स्वरात त्या मुलाला सांगितले, ''आता या पाण्याकडे नीट पाहा. किती शांत व स्थिर झाले आहे पाणी, पाहिलेस?'' मुलगा म्हणाला, ''हो खरेच की.''

काही वेळानंतर त्या माणसाने परत एक गारगोटी पाण्यात भिरकावली व म्हणाला, ''पाणी शांत व स्थिर मी परत गारगोटी पाण्यात फेकेपर्यंतच होते. आता परत पाण्यात तरंग निर्माण झाले आहेत पाहा.''

''हो ना. ते वाढतच जात आहेत आणि आजूबाजूला फैलावत आहेत.''

''लक्ष दे. पाणी परत स्थिर व शांत होईल काही वेळाने.''

''हो खरेच तसेच होईल. पाण्यावरचे तरंग थांबून पाणी स्थिर होईल.''

तो तळ्याकाठी बसलेला माणूस पुढे म्हणाला, ''हे पाण्यात तयार होणारे तरंग जर थांबवायचे असतील तर आपल्याला काय करावे लागेल बरे? हे तरंग निर्माण होण्याचे मूळ कारण काय तर आपण टाकलेली गारगोटी. चला तो दगड आपण पाण्याच्या बाहेर काढूया. जा बरे तुला तो दगड हाताला लागतो का ते पाहा बरे. तो पाण्याच्या बाहेर काढ.''

मुलाने पाण्यात हात घातला. हाताने तो दगड शोधून पाण्याबाहेर काढला. पण तसे करण्यामुळे आधी निर्माण झाले होते त्यापेक्षा जास्तच तरंग पाण्याच्या पृष्ठभागावर तयार झाले.

तो विचारी माणूस त्या मुलाला म्हणाला,'' एकदा तुम्ही पाण्यात गारगोटी फेकली की नंतर मग त्यामुळे होणारे तरंग थांबविणे अशक्य असते. पण आपण सुरुवातीलाच पाण्यात गारगोटी फेकली नाही तर पाण्यावर तरंग येणे आपण अजिबात टाळू शकतो. याचप्रमाणे मानवी मनाचे असते. माणसाच्या मनात एकदा विचार आला की मग तो मनात असंख्य विचारांच्या लहरी निर्माण करतो. तो विचार मनात वादळ घडवून आणू शकतो. हे वादळ थांबविण्याचा एकच उपाय असतो. असा अनावश्यक आणि अस्वस्थ करणारा विचार मनात येऊ न देता, त्याला बाहेरच्या बाहेर थोपविणे हा तो उपाय असतो. असा विचारच मनातील विचारांच्या वादळाचे मूळ कारण असतो. एकदा का हा अनावश्यक व अस्वस्थ करणारा विचार मनात शिरला की तो बाहेर जायला त्याला हवा तेव्हढा वेळ तो घेतो. असे परस्परविरोधी अनेक विचार मनात ठाण देऊन बसले तर आपल्याला फारच अस्वस्थ करून सोडतात.

अशाप्रकारे अस्वस्थ झालेल्या अनावश्यक विचारांना ओहोटी लागायला फार काळ द्यावा लागतो. अशावेळी जर तुम्ही जबरदस्तीने नको असलेले विचार बंद करायचा प्रयत्न केला तर मनाची अशांतता अधिकच तीव्र होते. त्यासाठी वेळ जाणे हा उपाय असतो; पण नंतरच्या उपायापेक्षा प्रथमत:च प्रतिबंध करणे उत्तम ठरते.

कोणताही विचार मनात घट्ट बसण्यापूर्वी त्याला तीन दृष्टीने पारखून घ्या. त्या विचाराचा तुम्हाला होणारा फायदा, त्या विचारातील चांगलेपणा आणि त्याचे तुमच्या दृष्टीने असलेले महत्त्व.

❋ ❋ ❋

# पुनर्जन्मावरील असलेला भारतीयांचा पूर्ण विश्वास

देवदूत गॅब्रियल परमेश्वराकडे गाऱ्हाणे घेऊन येतो. ''मला थोडे आपल्याशी बोलायचे आहे. आपल्या स्वर्गात काही भारतीय आहेत. ते मला फारच अडचणी निर्माण करीत आहेत. इथल्या मोत्यांनी वेढलेल्या कमानीवर ते झोके घेतात. माझ्या दोन शिंगांपैकी एक शिंग कोठेतरी गायब झाले आहे. त्यांना दिलेल्या सफेद गाऊनऐवजी ते चुडीदार व गरबा साड्या नेसतात. ते रथाऐवजी मर्सिडीज आणि बीएम्डब्ल्यू मधून सतत हिंडतात. त्यांना दिलेले नांगर ते इतरांना सवलतीच्या किमतीत विकत आहेत. स्वर्गात येण्याचा रस्ता मोकळा व स्वच्छ ठेवण्याचे चक्क नाकारतात. त्याऐवजी तो रस्ता ते मधेच अडवून ठेवतात. रस्त्यातच ते सामोसे खातात आणि एकसारखा चहा पित असतात. काही जण त्यांच्या फक्त एकाच पंखाने चालतात. कोणतीही

शिस्त पाळणे हे त्यांना मान्यच नाही. कोठेही रांग मोडून ते घुसघोरी करत असतात.''

त्यावर परमेश्वर म्हणाला, ''भारतीय हे वेगळेच आहेत. माझा स्वर्ग हा माझ्या सर्व लेकरांना समान आहे. जर तुला खऱ्या अडचणी जाणून घ्यायच्या असतील तर तू सैतानाशी बोलून घे.''

सैतान फोनवर बोलतो, ''हॅलो, मी नरकातून बोलतो आहे. एक मिनिट होल्ड करा.'' एक मिनिटानंतर सैतान परत फोनवर येतो, ''बोला, मी आलो आहे. मी तुमच्यासाठी काय करू शकतो?''

गॅब्रियल, ''तुला कशा प्रकारच्या अडचणींना खाली नरकात तोंड द्यावे लागत आहे ते मी जाणू इच्छितो.''

सैतान, ''जरा थांब मला काही गोष्टीमध्ये लगेच लक्ष घालणे आवश्यक आहे. आलोच मी.''

पाच मिनिटांनंतर सैतान परत फोन वर येतो. ''मी आता परत आलो आहे. तू परत एकदा तुझा प्रश्न विचार.''

गॅब्रियल, ''तिथे खाली नरकात काय प्रकारच्या अडचणी येत आहेत?''

सैतान, ''अरे माझा विश्वासच बसत नाही.'' पुन्हा अचानक सैतान गायब होतो ते पंधरा मिनिटांनंतर उगवतो.

सैतान, ''माफ कर गॅब्रियल, पण हे भारतीय लोक एअर कंडीशनर बसवून नरक राहण्यासाठी सुसह्य करीत आहेत. त्यासाठी ते इथल्या आगीच्या भट्ट्या विझवून टाकीत आहेत. खरे तर त्या त्यांना इथे आरामदायक वाटू नये यासाठी केल्या आहेत. ते तांत्रिकदृष्ट्या इतके बुद्धिवान आहेत की ते स्वर्ग आणि नरक यात आणि मी व परमेश्वर यात टेलिफोन आणि टीव्ही सुरू करीत आहेत. त्यांनी इथे सार्वजनिक इंटरनेट सुविधा सुरू केली आहे. त्याचा उपयोग ते ज्या लोकांना त्रास होतो त्यांच्या तक्रार निवारण्यासाठी करत आहेत. त्यांचा कर्मावर पूर्ण विश्वास असून दुसऱ्यांना पटवून देण्यात ते अतिशय तरबेज आहेत. काही जणांनी येथे चहा व भजी, चनाभटुरा, इडली डोसा, समोसा, बर्फी, चकली आणि ढोकळा याचे स्टॉल सुरू केले होते. ते मी ते बंद करायला भाग पाडले. बहुतेकांना घाणीमध्ये राहण्याचे काहीच वाईट व वेगळे वाटत नाही. ते त्याला सरावलेले आहेत. इथे नरकात शौचालय व मुताऱ्या कमी आहेत; पण त्यावाचून त्यांचे काहीच अडत नाही. त्यासाठी ते सर्व करायला खुली हवा जास्त पसंत करतात.

हे लोक भ्रष्टाचारात वाकबगार आहेत. प्रत्येक जण माझ्या कर्मचाऱ्यांना लाच देऊन विकत घेतो. त्यामुळे माझे कर्मचारी ताब्यात ठेवणे मला अशक्य होऊ लागले आहे. ते ज्या पृथ्वीवरून आले आहेत त्यापेक्षा त्यांना नरक जास्त बरा वाटतो. त्यामुळे त्यांची कशाबद्दलच तक्रार नसते.

मला स्वत:ला फार कठीण दिवस आल्यासारखे वाटत आहे. त्यांच्यावर अंकुश ठेवणे हे अवघड काम आहे.

यासाठी माझी एक नम्र विनंती आहे,

''हे परमेश्वरा, पुनर्जन्माच्या नियमानुसार या भारतीयांना लवकरात लवकर परत पृथ्वीवर पाठव.''

आता लक्षात आले असेल ना जगात फक्त हिंदू धर्माचा पुनर्जन्मावर विश्वास आहे.

❋ ❋ ❋

# पेन्सिल आणि खोडरबर

**पे**न्सिल म्हणते ''माफ कर'' खोडरबर विचारते, ''कशासाठी? तू काहीच चूक केली नाहीस.''

पेन्सिल, ''मला माफ कर. कारण माझ्यामुळे तुला दु:ख सहन करावे लागते. माझ्याकडून जेव्हा जेव्हा चूक होते तेव्हा तेव्हा तुलाच ती निस्तरावी लागते. पण तसे करताना, माझी चूक काढून टाकताना तुला तुझा एक छोटासा भाग गमवावा लागतो. तुझा आकार दरवेळी लहान लहान होत जातो.''

खोडरबर, ''खरे आहे ते. पण मला त्यासाठी खरेच वाईट वाटत नाही. हे पाहा, माझी त्यासाठीच निर्मिती झाली आहे. तू ज्या वेळी एखादी चूक करशील त्या वेळी तुला मदत करणे हेच माझे काम व कर्तव्य आहे. एक दिवस मी पूर्णपणे नाहीसा होणार

आहे. त्यावेळी माझ्या जागी तू दुसऱ्या कोणाला तरी घेऊन येशीलच. मला नेमून दिलेल्या कामावर मी खरेच खूश आहे. तेव्हा तू काळजी करू नकोस. तुला दु:ख करताना पाहणे मला सहन होत नाही.''

पेन्सिल आणि खोडरबर यांच्यामधील हे संभाषण मला फार प्रेरणादायी वाटते. आपले आईवडील हे खोडरबरासारखे असतात आणि मुले ही पेन्सिलीप्रमाणे असतात. पालक नेहमी मुलांच्या पाठीशी असतात. मुलांच्या चुका नेहमीच पोटात घालतात. हे करताना बऱ्याच वेळा त्यांना दु:ख होते. हळूहळू ते थकून जातात आणि म्हातारे होतात. कालांतराने ते या जगातून अंतर्धान पावतात.

मुलांना काही दिवसांनंतर दुसरे माणूस जोडीदाराच्या रूपाने मिळते; पण मुलांसाठी कोणतेही कष्ट करण्यात, त्रास सहन करण्यात पालकांना सात्त्विक आनंदच मिळतो. अनमोल अशा आपल्या पाल्याला दु:खी, चिंताग्रस्त पाहणे त्यांना कधीच सहन करता येत नाही.

पेन्सिल आणि खोडरबर यांचे नाते असेच अतूट, एकमेकांशी बांधलेले असते.

एक मुलगा त्याची आजी पत्र लिहीत असताना तिला विचारतो, ''तू आपण जे केले ते लिहीत आहेस का एखादी गोष्ट लिहीत आहेस का माझ्याबद्दल काही लिहीत आहेस?'' आजीने पत्र लिहिण्याचे थांबवून आपल्या नातवाला ती म्हणाली, ''मी तुझ्याबद्दलच लिहिते आहे. खरे तर तू मोठा झाल्यावर शब्दांपेक्षा तुला ही पेन्सिलच जास्त आवडेल.''

आजीच्या बोलण्याचा नक्की अर्थ न समजल्यामुळे तो मुलगा त्या पेन्सिलीकडे पाहून म्हणाला, ''ही पेन्सिल तर मला काही खास वाटत नाही. माझ्या इतर पेन्सिलींसारखीच दिसते आहे.''

आजी त्याला पुढे समजावून सांगायला लागली, '' तुम्ही कोणत्याही गोष्टीकडे कसे पाहता आहात त्यावर सगळे अवलंबून असते. पेन्सिलीमध्ये पाच गुणधर्म आहेत. ते जर तुम्ही तुमच्या अंगात बाणवलेत तर जगात तुम्ही अत्यंत शांत व आनंद उपभोगणारा माणूस बनून जगू शकाल.''

''पहिला गुणधर्म हा आहे की, तुमच्यामध्ये कोणतीही गोष्ट करण्याची क्षमता असते, पण कोणतीही गोष्ट घडण्यासाठी त्यामागे एक आधार देणारा व मार्गदर्शन करणारा हात असावा लागतो. तो हात परमेश्वराचा असतो. तो त्याच्या पद्धतीने व वेळेनुसार आपल्याला मार्गदर्शन करतो...

''दुसरा गुणधर्म असा की दर थोड्या थोड्या वेळानंतर मला थांबावे लागते. पेन्सिलीला तासून टोक करावे लागते. ते करताना पेन्सिलीला त्रास तर होतोच पण टोक केल्यानंतर ती अधिक अणकुचीदार होते. याप्रमाणेच तुला सुद्धा दु:ख आणि यातना भोगायला शिकले पाहिजे. तसे केल्यानेच तू अधिक चांगला व ताकदवान माणूस बनू शकशील.''

''तिसरा गुणधर्म असा, पेन्सिल आपल्याला नेहमी खोडरबर वापरू देते. आपण खोडरबर वापरून झालेल्या चुका दुरूस्त करू शकतो. केलेली दुरूस्ती प्रत्येक वेळी वाईटच असते असे नाही; पण आपल्याला योग्य मार्गावर चालण्यास उपयोगी पडणारी असते.''

''पेन्सिलीचे बाह्यांग लाकडाचे असते तरी आतील शिसाची काडी ही फार महत्त्वाची असते. त्याप्रमाणेच नेहमी तुमच्या मनात सुप्तपणे काय विचार चालू आहे त्याचा शोध घेत राहा. ह्याच पेन्सिलीचा चौथा गुणधर्म आहे. ही शिसाची कांडीच तुम्ही जे लिहिता त्याचा ठसा कागदावर कायमचा उमटविते. याचप्रमाणे तुम्ही आयुष्यात जे जे कराल त्याच्या खुणा मागे राहतात. त्यामुळे तुम्ही करत असलेले प्रत्येक कामाचे वेळी जागरुक राहून डोळसपणे ते काम करा. हाच पेन्सिलीचा पाचवा व महत्त्वाचा गुणधर्म म्हणता येईल.''

''काहीतरी घडेल असे वाटणे ही आशा असते. काहीतरी नक्की घडेल हा विश्वास असतो; परंतु धाडस हेच काहीतरी म्हणजे हवे ते घडवून आणते.''

❋ ❋ ❋

# प्रकाशझोत

एका महत्त्वाच्या विषयावर एक चर्चासत्र आयोजित केले होते. या चर्चासत्रामध्ये त्या विषयातील विद्वान वक्त्यांना भाषणासाठी आमंत्रित केले होते. प्रमुख वक्त्यांखेरीज इतरही नामवंत वक्ते चर्चासत्रात भाग घेणार असल्यामुळे त्या विषयाशी निगडित व्यावसायिक आणि कारखानदार बऱ्याच संख्येने उपस्थित होते.

या चर्चासत्राच्या संयोजकांनी ते चर्चासत्र कायम स्वरूपात जतन करून ठेवण्यासाठी व्हिडिओच्या माध्यमातून त्याचे चित्रीकरण करून ठेवण्याची व्यवस्था केली होती. चित्रीकरण करणे सुरू असतानाच ते सभागृहात कोपऱ्यात लावलेल्या एका पडद्यावर प्रक्षेपित करण्यात येत होते. वक्त्यांपैकी एका वक्त्याचे भाषण चालू असताना काही श्रोते ते भाषण लक्षपूर्वक ऐकत होते; पण त्यावेळी काही श्रोते इतर वाचनात गुंगले होते, अगर स्वत:च्या कामात व्यस्त होते.

चित्रीकरण करणाऱ्या कॅमेरामनने चित्रीकरणाचा कॅमेरा भाषण करणाऱ्या व्यक्तीवरून श्रोत्यांच्या रोखाने फिरविला मात्र, त्याच क्षणी एक लक्षवेधी चमत्कार घडून आला. सभागृहामधील शंभर टक्के श्रोते ताडकन सावध होऊन ताठ बसले आणि प्रचंड एकाग्रतापूर्वक रितीने भाषण ऐकू लागले. कारण त्या सर्वांवर चित्रीकरणाचा प्रकाशझोत पडला होता. प्रत्येकाला स्वत:चेच चित्र समोरच्या पडद्यावर दिसत होते.

पुष्कळवेळा चर्चासत्रातील या घटनेप्रमाणेच बाह्य जगात आपल्याला असाच अनुभव येतो. ज्या ज्या वेळी आपल्याबाबतीत नीतिमूल्ये, वर्तन, आचार, कर्तव्य व जबाबदारी याचा प्रश्न उद्‌भवतो, त्या त्या वेळी समाजाने आपल्यावर प्रकाशझोत टाकलेला असतो. म्हणजेच सर्वांच्या नजरा आपल्यावर रोखलेल्या असतात. अशावेळी आपण अजिबात बेसावध असता कामा नये.

पर्यायाने आपले वर्तन सतत सचोटीचे ठेवून प्रामाणिकपणे जगायला आपण शिकले पाहिजे. आपल्यावर रोखलेले कॅमेरे सतत चित्रीकरण करीत असतात व आपला आवाज रेकॉर्ड करण्याचे यंत्र सतत कार्यरत असते, याची जाणीव आपण कायम बाळगायला हवी.

❋ ❋ ❋

# प्रतिकूल परिस्थितीवर मात

प्रतिवर्षीप्रमाणे इंजिनियरिंग कॉलेजच्या शेवटच्या वर्षाच्या विद्यार्थ्यांचे वर्षअखेरीनंतरच्या नोकरीसाठी घेतले जाणारे मुलाखतसत्र चालू होते. (Campas Interviews) या सत्रातील एका मोठ्या कंपनीच्या वरिष्ठ अधिकाऱ्याने सांगितलेला हा किस्सा त्याच्याच शब्दांत असा आहे.

''नुकत्याच पार पडलेल्या एका कॉलेजमधील मुलाखत सत्रात मला फार चित्तवेधक अनुभव मिळाला. जेव्हा आम्ही या मुलाखतसत्राचे निकाल जाहीर केले तेव्हा त्या सभागृहात उपस्थित असलेल्या एका विद्यार्थ्याने फार मार्मिक परंतु लक्षवेधक प्रश्न विचारला. त्याने विचारले या सर्व निवडप्रक्रियेमध्ये विद्यार्थ्यांच्या कुटुंबाच्या पूर्वपीठिकेचा किती प्रमाणात विचार केला जातो किंवा त्याला किती महत्त्व दिले जाते?

त्याच्या प्रश्नाला देण्याचे उत्तर जेव्हा मी माझ्या मनात जुळविण्यास सुरूवात केली, तेव्हा मागे एकदा माझ्या वाचनात आलेल्या काही पंक्ती आठवल्या. त्या अशा होत्या... एका माणसाने मिळविलेल्या यशाचे मोजमाप हे त्याने त्याच्या आयुष्यात गाठलेल्या अधिकार, दर्जा किंवा प्रतिष्ठा यावरून ठरविणे चुकीचे ठरेल. त्यासाठी त्याने केलेले परिश्रम, पार केलेले अडथळे, त्याने प्रतिकूल परिस्थितीशी केलेला सामना याचा विचार करून केलेले मोजमाप हे अधिक योग्य असेल. त्या विद्यार्थ्यांच्या प्रश्नाला उत्तर देताना या ओळीच माझ्या मनात घोळत होत्या. माझ्या कामासाठी मी देशभर प्रवास करीत असतो. अशा प्रकारच्या मुलाखतसत्रांमधून असंख्य विद्यार्थ्यांशी माझा संवाद घडत असतो. वयाच्या दृष्टिकोनातून ते विद्यार्थी माझ्यापेक्षा

वयाने खूपच लहान असतात. या भ्रमंतीमधील मुलाखत प्रक्रियेमध्ये विद्यार्थ्यांकडून मला पुष्कळ यशोगाथा ऐकायला मिळाल्या. त्या ऐकताना माझा मी मला अत्यंत सामान्य भासायला लागतो. या व्यवसायात असल्यामुळे मी स्वत:ला फार भाग्यवान समजतो. या व्यवसायामुळेच; मी एका नशिबाचा वरदहस्त असणाऱ्या कुटुंबात जन्माला आलो, या वास्तवतेचे मला भान राहाते. माझ्या कुटुंबातील अनुकूल परिस्थितीमुळेच मला योग्य आणि हवे ते शिक्षण घेणे शक्य झाले याची मला जाणीव होते. या उलट अत्यंत कठीण परिस्थितीशी सामना करीत शिक्षण घेत असलेले असंख्य विद्यार्थी मला भेटतात. कित्येक विद्यार्थ्यांचे पालक आर्थिक उच्चस्थितीत असत नाहीत. त्यांना जरूरी असणारं आर्थिक पाठबळ लाभत नाही. तरीही त्यांच्यापैकी अनेक जण देशभरातील विद्यार्थ्यांमधून उच्च श्रेणीचे यश संपादन करतात. शिक्षण घेत असताना अथक प्रयत्नांनी त्यांनी आपला उज्ज्वल भविष्यकाल घडविण्यात यश संपादन केलेले असते. गेल्या काही वर्षांत भारतवर्षातील दूरवरच्या खेडेगावातून येणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांच्या प्रेरणादायक यशोगाथा अकस्मातरित्या मला ऐकायला मिळाल्या. त्या बहुतेक सर्व भरधाव वेगाच्या संगणक  क्रांतीच्या ओघात समोर आलेल्या होत्या. अशा कठोर परिश्रमांनी स्वत:चे उज्ज्वल भविष्य घडविणाऱ्या या कष्टाळू विद्यार्थ्यांना माझे शतश: प्रणाम आहेत. त्यांनी उद्याच्या सुखी आयुष्याची स्वप्ने पाहिली आणि ती प्रत्यक्षात उतरविण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. त्यांचेसमोर मी नतमस्तक होतो.

सर्वांत महत्त्वाचे म्हणजे अशा माणसांना भेटण्याची, त्यांच्याबरोबर संवाद साधण्याची संधी मला प्राप्त झाली याबद्दल मी सर्व कारणीभूत असणाऱ्यांचे आभार मानतो व स्वत:ला धन्य समजतो.

❋ ❋ ❋

# प्रतिध्वनी

एक गृहस्थ आपल्या मुलाला घेऊन जवळच्या डोंगराळ प्रदेशातील जंगलात गेला होता. एकाएकी मुलाचा पाय सरकला आणि तो थोडासा दुखावला. अगदी नैसर्गिकपणे त्याच्या तोंडून विव्हळणे आले, 'ओय् ओय्' समोरच्या डोंगरावरून आवाज परतला, 'ओय् ओय्.' मुलगा आश्चर्यचकित झाला. त्याच आश्चर्यचकित झालेल्या अवस्थेत तो पुन्हा ओरडला, ''तू कोण आहेस?'' त्याला प्रत्युत्तर मिळाले, ''तू कोण आहेस?'' मिळालेल्या त्या उत्तराने त्याला आणखीनच राग आला. त्या रागातच तो ओरडला, ''तू भ्याड आहेस.'' पुन्हा एकदा त्याचेच शब्द परतले, ''तू भ्याड आहेस.'' त्या मुलाने आपल्या पित्याला विचारले, ''बाबा हे काय चालले आहे?''

बाप उत्तरला, ''मुला इकडे ध्यान दे.'' आणि वरच्या आावाजात उद्‌गारला, ''मी तुझे कौतुक करतो.'' प्रति आवाज उमटला, ''मी तुझे कौतुक करतो.'' वडील पुन्हा म्हणतात, ''तू खरोखरच आश्चर्यकारक आहेस.'' आणि प्रत्युत्तर घुमले, ''तू खरोखरच आश्चर्यकारक आहेस.'' तो मुलगा आश्चर्याने थक्क झाला. पण अजूनही त्याला काय घडत होते ते समजत नव्हते. त्याला समजविताना त्याच्या वडिलांनी सांगितले, ''अरे लोक त्याला प्रतिध्वनी किंवा पडसाद म्हणतात. पण खऱ्या अर्थाने हेच जगणे असते. जीवनामध्ये जे तुम्ही इतरांना देता तेच तुम्हाला परत केले जाते. जगणे म्हणजे तुम्ही जे जे करता, जसे वागता त्याचा आरसा आहे. तुम्हाला प्रेमाची अपेक्षा असेल तर प्रथम तुम्ही लोकांना प्रेम द्या. तुम्हाला जर कोणाचे उपकार हवे असतील तर आधी तुम्हाला उपकार करायला हवेत. जर लोकांनी तुम्हाला समजावून घ्यावेसे वाटत असेल तर तुम्ही इतरांना समजावून घ्यायला हवे. इतरांनी तुमचा मानसन्मान करावा असे वाटत असेल तर तुम्ही इतरांचा मानसन्मान करण्यास पुढे झाले पाहिजे. जर तुम्ही लोकांकडून त्यांनी सोशिक, सहनशील व आदरणीय असण्याची अपेक्षा करीत असाल तर अर्थातच तुम्हाला स्वत:ला तसे व्हावे लागेल. हाच जीवन जगण्यातील सूत्राचा प्रारंभिक नियम जगण्याच्या कोणत्याही अंगाला लागू पडतो.

जीवनामध्ये जे व जसे तुम्ही इतरांना देता, ते व तसेच तुम्हाला परत मिळते. जगणे हा योगायोग नसतो, तर तुमच्या प्रत्येक कृतीचा, वर्तनाचा प्रतिबिंब दर्शविणारा आरसाच असतो.

❋ ❋ ❋

# प्रयत्नांची पराकाष्ठा

**तो** दिवस ६ ऑगस्ट, १९२६ चा होता. त्या दिवशी इतिहासामध्ये कु. गट्रुड एडर्ली ट्रुडी (Miss Gertrude Ederle Trudy) हिच्या नावे विक्रमाची नोंद झाली. इंग्लिश खाडी पोहून जाणारी ती पहिली महिला म्हणून ओळखली जाण्याचा मान तिला मिळाला. खाडी पोहून जाण्यासाठी तिने १४ तास ३१ मिनिटांचा वेळ घेतला होता. त्यापूर्वी खाडी पोहून जाण्याचा विक्रम श्री. चार्लस् टॉफ (Mr. Charles Toff) याच्या नावे होता. ट्रुडीने हा चार्लस्‌चा विक्रम २ तास २३ मिनिटे कमी वेळ लावून मोडीत काढला होता. ट्रुडीच्या या विक्रमापासून अनेक गोष्टी शिकता येतात. कोणत्याही प्रकारच्या आगळ्यावेगळ्या मानवी प्रयत्नात प्रयत्न करणाऱ्या त्या माणसाच्या आजूबाजूचे लोक त्याला प्रोत्साहन देत राहतात. पाठिंबा देतात. पण ट्रुडीच्या बाबतीत वेगळेच घडत होते. तिच्याबरोबर तिचे वडील, तिच्या बहिणी, वृत्तवाहिन्यांचे प्रतिनिधी, तिचे शिक्षक होते. हे सर्वजण ट्रुडीला तिचा प्रयत्न व धाडस अर्ध्यावरच सोडून देण्याचा सल्ला देत होते. ती गारठून गेली होती. दमून, थकून गेली होती. पाण्याच्या लाटांनी तिचे सर्वांग ठोकून काढले होते. अकरा तासांच्या अखंड अथक प्रयत्नांमुळे ती गलितगात्र होऊन गेली होती; परंतु तरीही तिचा तक्रारीचा सूर नव्हता. ती लटपटून गेल्याची कोणतीही चिन्हे नव्हती. तिच्या एकूण प्रवाह प्रवासाच्या अंतिम टप्प्यापासून तीन मैलांवर असताना खाडीच्या लाटा तिच्यावर बेफामपणे आदळत होत्या. त्याचवेळी तिचे वडील आणि तिचे शिक्षक त्या धाडसी प्रयत्नापासून तिला परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत होते.

अशा वेळी अत्यंत लढाऊ बाण्याच्या ट्रुडीच्या उत्तराचा आवाज आसमंतात घुमला. सर्व जगाला तो आवाज ऐकू गेला. ती सांगत होती, ''काय म्हणता? या दृष्टिक्षेपातील यशाच्या अंतिम टप्प्यात अंतिम क्षणी मी माझे प्रयत्न सोडून देऊ म्हणून का सांगता आहात? मी हार पत्करू? आणि कशासाठी?''

थोड्याच अवधीत तिने धडपडत पण विजयी मुद्रेने अंतिम किनाऱ्यावर पाऊल ठेवले. आणि त्याच क्षणी तिचे नाव जागतिक विक्रमाच्या यादीत नोंदले गेले. या प्रसंगातून एक जुनी म्हण आठवते,

"When the going gets tough, the tough gets going."

जेव्हा जगणे कठीण होते तेव्हा कणखरच जगत राहतात. ट्रुडीने मिळवलेल्या यशापासून हाच धडा घ्यायला हवा.

❋ ❋ ❋

# प्रसंगावधान

**जं**गलात काम करणारा एक कामगार निर्मनुष्य रस्त्याने घराकडे परताना एका हत्यारी लुटारूने त्याला हटकले. त्याच्या जवळ गेल्या आठवड्याचा पगार होता. परिस्थितीचा अंदाज आल्यानंतर तो त्या लुटारूला म्हणाला, ''तुला पाहिजे तर माझ्याजवळचे सगळे पैसे घे पण एक उपकार कर. तुझ्या बंदुकीने माझ्या डोक्यावरच्या टोपीची चाळणी कर. कारण असे केले नाही तर माझी बायको मी लुटलो गेलो आहे यावर विश्वास ठेवणार नाही.''

लुटारूने त्याचे म्हणणे मान्य केले. त्याची टोपी हवेत उंच उडविली आणि त्यावर बंदुकीच्या गोळ्यांचा वर्षाव केला.

तो पुढे त्याला म्हणाला, ''आता असे करूया, मी पण तुला प्रतिकार करण्यासाठी तुझ्या अंगावर धावून आलो असे भासवूया. त्यासाठी तू माझ्या कोटावर खूप फैरी झाडून त्याला छिद्रे पाड.''

त्याच्या म्हणण्याप्रमाणे लुटारूने कोटावर गोळ्या झाडून छिद्रे पाडली. ''आणि आता....''

त्याला बोलून न देता लुटारू म्हणाला, ''माफ कर पण आता कशालाही छिद्रे पाडता येणार नाहीत. माझ्याजवळच्या सर्व

बंदुकीच्या गोळ्या संपल्या आहेत.''

त्याबरोबर तो कामगार म्हणाला, ''मला तेच तर हवे होते. आता मुकाटपणे माझे लुटलेले आणि तुझ्याजवळ असलेले पैसे माझ्या टोपी आणि कोटाची किंमत म्हणून मला दे. नाहीतर मी तुला मरे मरेस्तोवर पिटून काढीन.''

त्या लुटारूने घाबरून जाऊन सर्व पैसे परत करून तिथून पोबारा केला.

**तात्पर्य :** अवघड परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी कधीच उशीर झालेला नसतो.

❋ ❋ ❋

# प्रसिद्ध व्हायोलिनवादकाकडे झालेले दुर्लक्ष

एके दिवशी अमेरिकेतील वॉशिंग्टन मेट्रोच्या भुयारी मार्गावर एक माणूस आपले व्हायोलिन घेऊन आला आणि समरसून त्याने व्हायोलिनचे सूर काढण्यास सुरुवात केली. वेळ सकाळची लोकांच्या घाईगर्दीची होती. ती जानेवारी महिन्याच्या पहिल्या आठवड्यातील थंडीच्या कडाक्याची होती. तो जवळजवळ एक तास लोकांच्या अत्यंत आवडीची संगीतरचना व्हायोलिनवर वाजवित होता. सकाळची गर्दीची वेळ असल्यामुळे साधारण त्या एक तासाच्या अवधीमध्ये हजारो लोक त्या भुयारी मार्गाने आपआपल्या कामासाठी जात होते.

पाच मिनिटांनंतर त्या मार्गाने जाणाऱ्या एका मध्यमवयीन गृहस्थाचे लक्ष त्या वादकाकडे गेले. त्या ओळखीच्या सुरांमुळे तो क्षणभरच थबकला, त्याचा चालण्याचा वेग नकळत मंद झाला; पण भानावर येताच झपाट्याने पुढच्या मार्गाला लागला. त्याला त्याच्या कामावर जाण्याची घाई तिथे थांबवू शकली नाही.

त्यानंतर परत दोन मिनिटांनंतर एका वाटसरू स्त्रीला दया आली. तो पोटार्थी कमाईसाठी असे पथारी पसरून व्हायोलिन वाजवित असणार या समजुतीने तिने त्याच्या पुढ्यात एक डॉलरचे बंदे नाणे टाकले. सामाजिक कर्तव्य केले या समाधानानंतर ती आपल्या मार्गाने पुढे निघून गेली. त्या बाईने टाकलेले ते नाणे त्या वादकाची त्या दिवसाची पहिली कमाई होती.

आणखी काही क्षणानंतर एक नागरिक त्या सुरांच्या मोहाने भिंतीला हात टेकून व्हायोलिनचे मधुर स्वर ऐकायला म्हणून थांबला. त्याच्या चेहऱ्यावर सुरांचा आनंद पसरला. पण पुढच्याच क्षणी तो जागा झाला. चटकन त्याचे लक्ष त्याच्या घड्याळाकडे गेले. कामाला जायला उशीर होत असल्याची जाणीव त्याला तिथे थांबू देईना. तसाच तो झटकन निघाला आणि आपल्या वाटेला लागला.

त्यानंतर मात्र एका छोट्या मुलाचे पूर्ण लक्ष त्या व्हायोलिनवादकाकडे आकर्षित झाले. त्याच्या आईने त्याच्या हाताला घट्ट पकडून ठेवले होते. तो थांबल्याचे ध्यानात येताच ती माता त्याला बळेबळेच ओढत चल म्हणत होती; पण त्या मुलाला तिथून निघण्याची इच्छा होत नव्हती. शेवटी त्या मातेने त्याला जबरदस्तीने पुढे नेले. ते मूल पुढे गेले खरे पण जाताना मागे वळून पाहत पाहतच चालत राहिले. त्या छोट्या मुलासारखी आणखी काही गोजिरवाणी आणि निरागस मुले तशीच त्या संगीताकडे आकृष्ट होत होती आणि त्या सर्व चिमुकल्यांचे पालक त्यांना त्याच यांत्रिक पद्धतीने पुढे ओढून नेत होते.

व्हायोलिनवादकाच्या त्या एक तास व्हायोलिनवादनाच्या काळात फक्त सहा माणसे क्षणभर का होईना, त्याचे वादन ऐकण्यासाठी थांबली. त्या खेरीज इतर वीस वाटसरूंनी दया आणि कर्तव्यदक्षता या न्यायाने त्याच्या पुढच्या पदरात एक का होईना नाणे फेकले होते; पण तेही न थांबता. नाणे टाकताच त्यांनी आपला रस्ता त्याच वेगाने धरला होता. त्या एका तासाच्या संगीत सेवेसाठी वादकाच्या पुढे एकूण ३२ डॉलर्स जमा झाले होते. त्याने ते शांतपणे गोळा केले. व्हायोलिन वाजविणे थांबिवले. त्या भुयारी मार्गावर आता शांतता पसरली होती. सुरावट बंद झाली होती. पण कोणीही त्याची दखल सुद्धा घेतली नाही. कोणालाच त्याचे काहीच वाटले नाही. कोणीही साध्या टाळ्या वाजवून त्याच्या कलेची कदर केली नाही.

तो व्हायोलिनवादक कोण होता. कोणालाच त्याचे नाव गाव जाणून घ्यावेसे वाटले नाही. कोणीही त्याला ओळखले नाही. तो जगप्रसिद्ध संगीत दिग्दर्शक आणि व्हायोलिनवादक ज्योशुआ बेल (Joshua Bell) होता. त्याने त्या एक तासात त्याचेच अत्यंत गुंतागुंतीचे, अवघड, लोकप्रिय पण फार मधुर असे व्हायोलिनवादन सादर केले होते. त्या संगीत बंदिशीची किंमत वास्तव दुनियेत साधारण ३.५ मिलीयन डॉलर एवढी प्रचंड होती.

त्या दिवसाच्या दोनच दिवस आधी त्याच्या वादनाचा एक कार्यक्रम बोस्टन येथे खचाखच गर्दीने तुडुंब भरलेल्या हॉलमध्ये झाला होता. त्या कार्यक्रमाचे तिकीट प्रत्येकी १०० डॉलर होते.

ही एक सत्यघटना आहे. अशा पद्धतीने ज्योशुआ बेलने अज्ञातरूपात मेट्रो स्टेशनच्या भुयारात लोकांसमोर व्हायोलिन वाजविणे हे वॉशिंग्टन पोस्ट या पाक्षिकाची हेतुपुरस्सर पूर्वनियोजित घटना होती. एक निष्कर्ष काढण्यासाठी त्यांना हा सामाजिक प्रयोग करून पाहायचा होता. त्यायोगे त्यांना सर्वसामान्य जनतेच्या जाणिवा, अभिरुची आणि प्राधान्यता याचा अभ्यास करायचा होता. म्हणूनच त्यांनी असा सार्वजनिक जागेवर आणि गर्दीच्या वातावरणात तोही अगदी मोक्याच्या अशावेळी हा प्रयोग अमलात आणला. अचानकपणे समोर आलेली कला आपले लक्ष वेधून घेते का किंवा आपण अशावेळी थांबून त्याचा आस्वाद घेऊ शकतो का, त्याची खरी पारख करू शकतो का? आपण दुसऱ्याचे कलागुण तत्काळ ओळखू शकतो का? हे अभ्यासणे हा यामागचा हेतू होता. तो नक्कीच साध्य झाला असे म्हणावे लागेल.

यातून एक फार महत्त्वाचा निष्कर्ष निघाला. तो असा, एखाद्या जगद्विख्यात संगीतकाराची अत्यंत गाजलेली, आवडती अशी निर्मिलेली कलाकृती तो स्वत: सादर करीत असताना सुद्धा जर आपण दुर्लक्षित करू शकतो तर मग आपण आपल्या आयुष्यात रोज कितीतरी अज्ञात आनंद हिरावून बसतो हेच दिसून येते.

❋ ❋ ❋

# प्रोत्साहन

**म**हान वैज्ञानिक थॉमस एडिसन त्यावेळी ६७ वर्षांचा होता. संशोधन व प्रयोगासाठी तयार केलेल्या त्याच्या प्रचंड मोठ्या प्रयोगशाळेला एक दिवस आग लागली. आगीमध्ये प्रयोगशाळा भस्मसात झाली.

नेमका त्या वेळी थॉमस एडिसनने त्या कार्यशाळेचा विमा उतरविला नव्हता. त्या महत्त्वपूर्ण वास्तूची जळून राखरांगोळी थंड होण्यापूर्वीच प्रख्यात फोर्ड कंपनीचा प्रमुख हेन्री फोर्ड हा एडिसनकडे गेला आणि त्याला तत्काळ ७५०,०००/- अमेरिकन डॉलर्सचा चेक दिला. हेन्री फोर्डने एडिसनला सांगितले, ''ही रक्कम मी तुझी प्रयोगशाळा पुन्हा उभी करण्यासाठी देत आहे. या रकमेवर मी व्याज आकारणार नाही. याहून अधिक रकमेची गरज भासली तर विनासंकोच सांग. मी ती रक्कम तुला देऊ शकेन.''

त्या वेळी हेन्री फोर्ड हा एक मोटारी बनविणारा यशस्वी कारखानदार होता. तसेच थॉमस एडिसन हा अमेरिकेतील मान्यताप्राप्त प्रमुख संशोधक होता. मग प्रश्न असा निर्माण होता की, हेन्री फोर्ड इतका उदार, दयाळू व दिलदार होऊन त्याने त्या काळात एवढी मोठी रक्कम एडिसनला का दिली असावी?

कदाचित याचे उत्तर पुढील हकिकतीमध्ये मिळू शकते.

ज्या वेळी हेन्री फोर्ड त्याच्या तरूणवयात मोटारीच्या संशोधनात मग्न होता, त्याच सुमारास एडिसन हा विद्युत मोटार गाड्यांच्या संशोधनात काम करीत होता. जेव्हा एडिसनला समजले की, हेन्री फोर्ड हा पेट्रोलवर चालणाऱ्या मोटारगाडीच्या विषयात संशोधन करीत आहे, तेव्हा तो ताबडतोब फोर्डला भेटायला गेला. त्या भेटीमध्ये पेट्रोलवर चालणाऱ्या मोटारींच्या रचनेबद्दल व तंत्राबद्दल एडिसनने असंख्य प्रश्न फोर्डला विचारले. ती मोटार कशी चालेल हे जाणून घेतले.

जेव्हा ही भेट आणि दोघांमधील चर्चा संपत आली तेव्हा एडिसन हेन्री फोर्डच्या पाठीवर शाबासकी देत म्हणाला, ''अरे

गुणी मुला, तू नक्कीच नवीन काहीतरी निर्मितीच्या जवळ पोहोचला आहेस. याचा पाठपुरावा करण्यासाठी मी तुला प्रोत्साहन व शुभेच्छा देत आहे. तुझी ही नवनिर्मिती अमेरिकेतील वाहतुकीच्या क्षेत्रात नक्कीच क्रांती घडवून आणिल.'' एडिसनने त्यावेळी हेन्री फोर्डला दिलेले हे उत्तेजन हेन्री फोर्डला पेट्रोल मोटारगाडीच्या पूर्ण निर्मितीसाठी उपयोगी ठरले.

तुम्ही आम्ही एखाद्याला प्रोत्साहन देऊ ते कदाचित या कहाणीइतके महत्त्वाचे ठरणार नाही. ते उत्तेजन देत असताना आपल्याला त्याचे महत्त्व समजून येणार नाही. ज्याला ते उत्तेजन मिळते त्याला ते लाखमोलाचे असते. म्हणूनच प्रत्येक दिवशी कोणाला तरी प्रोत्साहन देऊन आपण त्या दिवसाचे सत्कार्य केल्याचे भाग्य मिळविले पाहिजे.

आपण आयुष्यात जे घडावे याची मनोमन इच्छा बाळगतो ते घडण्यासाठी कोणीतरी आपल्याला उत्तेजन देऊन प्रेरणा द्यावी, यासाठी आपण सतत भुकेलेले असतो.

❋ ❋ ❋

# फुलपाखरू आणि फूल

एका माणसाने देवाची मनापासून प्रार्थना केली आणि देवाकडे एक फुलपाखरू आणि एक फूल मागितले. देवाने त्या ऐवजी त्या माणसाला एक काटेरी झाड व एक सुरवंट दिला. तो माणूस थोडा नाराज झाला. देवाने माझ्या मागण्याचा असा वेगळा अर्थ का बरे काढला असावा? मग त्याने विचार केला, ''जाऊ दे. देव फार व्यस्त असेल त्याला अनेक लोकांच्या प्रार्थनेला ओ द्यायची असेल. खूप लोकांची काळजी घ्यायची असेल.'' असे समजून त्याने देवाला असे का केले हे विचारायचे नाही असे ठरविले. काही वेळानंतर तो देवाने त्याला काही दिले होते हे विसरून पण गेला. पण काही दिवसांनंतर त्याला आश्चर्य वाटले. काटेरी झाडाला सुंदर फूल उगवले होते आणि सुरवंटाचे एका रंगीबेरंगी, सुंदर अशा फुलपाखरात रूपांतर झाले होते.

देव नेहमीच सर्व गोष्टी योग्य करीत असतो. आपल्याला कितीही चुकीचे वाटले तरी तो जे करतो ते उत्तमच असते. तुम्ही देवाला एक मागून त्याने तुम्हाला दुसरेच काही दिले तरी त्याच्यावर विश्वास ठेवा. खात्री बाळगा की तुम्हाला ज्याची जरूरी आहे ते बरोबर योग्य वेळी देव तुम्हाला देणारच.

तुम्हाला जे नेहमी हवे असते ते तुम्हाला आवश्यक असतेच असे नाही. देव आपली प्रार्थना केव्हाही अमान्य करीत नाही.

आजच्या काटेरी निवडुंगाला उद्या टवटवीत फुले येणार असतात. देवावर जे भरंवसा ठेवतात त्यांना देव फक्त उत्तमच देतो.

❋ ❋ ❋

# फेरविचार

एका विद्यापिठातील एक विद्यार्थी त्याच्या प्राध्यापकांबरोबर विद्यापिठाच्या आवारात फिरायला निघाला होता. ते प्राध्यापक विद्यार्थीवर्गात खूप आवडते होते. त्यांच्या शब्दाला खूप मान देणारे विद्यार्थी त्यांच्या प्रेमळ स्वभावामुळे त्यांना आपला मित्र समजत असत. ते चालत जात असताना त्यांना वाटेत एक जुन्या बुटांचा जोड पडलेला दिसला. तो बहुतेक त्या भागात सफाई, बागकाम करणाऱ्या अशा गरीब माणसाचा असावा असा त्यांचा अंदाज होता. त्या माणसाचे काम संपवून घरी जाण्याची वेळ होत आली होती. त्या विद्यार्थ्याने प्राध्यापकांकडे पाहून म्हटले, ''आपण या माणसाची थोडी गंमत करू या का? आपण त्याचे हे बूट त्या झुडपामागे लपवून ठेऊ या आणि आपण पण जवळच इथे लपू या. तो आल्यावर बूट न दिसल्यामुळे त्याची जी धांदल होईल ती पहायला आपल्याला मजा येईल.''

प्राध्यापक लगेच त्याला म्हणाले, ''नाही रे बाबा. आपल्या करमणुकीसाठी एखाद्या गरीब माणसाला त्रास देणे बरे नाही. तुझी सांपत्तिक स्थिती पुष्कळ चांगली आहे. तू त्या गरीब माणसाला काही छुपी मदत करून नकळत त्याचा आंदद मिळवू

शकतोस. हे पाहा, त्याच्या बुटात एक नाणे टाक, आपण लपून बसू आणि तिथून ते नाणे पाहिल्यावर त्यावर त्याची काय प्रतिक्रिया होते ते त्याच्या नकळत पाहू.''

विद्यार्थ्याने त्याच्या दोनही बुटात नाणे ठेवले आणि ते दोघे जवळच्या झाडीमध्ये जाऊन लपून बसले. तो गरीब कामगार त्याचे काम संपवून त्या रस्त्यावर आला. तिथे त्याने त्याचे बूट व कोट ठेवला होता. कोट अंगावर चढवताना त्याने एक पाय एका बुटात अडकवायला त्यात घातला. पाय बुटात घातल्यावर त्याच्या पायाला काहीतरी असल्याचे जाणवले. काय आहे ते पाहण्यासाठी तो थांबला आणि त्याच्या पायाला ते नाणे लागले. आश्चर्यचकित होऊन थक्क झाल्याचा भाव त्याच्या चेहऱ्यावर उमटलेला दिसला. त्याने ते नाणे हातात घेतले, चार वेळा उलटसुलट करून त्याकडे बघितले. नंतर त्याने त्याच्या चौफेर नजर टाकली. पण त्याला कोणीच नजरेस पडले नाही. त्याने ते नाणे कोटाच्या खिशात टाकले. दुसरा बूट घालायला तो खाली वाकला. दुसऱ्या बुटातही नाणे पायाला लागल्यावर तो प्रथम जेवढा आश्चर्यचकित झाला होता त्याच्या दुप्पट यावेळी झाला. त्या नाण्यांचा आनंद त्याला मनात साठवून ठेवता येईना. तो गुढघे टेकून खाली बसला. आकाशाकडे हात करून जणू काही स्वर्गातील देवाला उत्कटतेने नमस्कार करून त्याने आभार मानले. कळकळीने आभार मानताना तो म्हणाला, ''बायकोच्या आजारपणासाठी व मुलांच्या जेवणासाठी ज्या कोणी अज्ञात माणसाने अगदी वेळेवर हा मदतीचा हात पुढे केला आहे त्याचे शतश: आभार. आम्ही आज मोठ्या संकटातून वाचलो आहोत.''

जवळच्या झाडीत लपून बसलेला तो विद्यार्थी सद्गदीत झाला. अनाहूतपणे त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. त्याच वेळी प्राध्यापक त्याच्या पाठीवर हात ठेवून म्हणाले, ''तू आधी जी त्याची चेष्टा करून मजा पाहणार होतास आणि त्याचा आनंद घेणार होतास त्यापेक्षा त्याच्या या समाधानाचा आनंद तुला जास्त झाला की नाही?''

त्या विद्यार्थ्याने मान्य केले की, ''आज तुम्ही मला शिकविलेला धडा मी आयुष्यात कधीही विसरणार नाही. मला तुमच्या सांगण्याचा अर्थ पूर्वी समजला नव्हता, आता मात्र तो अर्थ मला समजला आहे. घेण्यापेक्षा देण्याने केव्हाही जास्त आशीर्वाद व सदिच्छा मिळत असतात.''

❋ ❋ ❋

# भगवान के घर देर है लेकिन अंधेर नहीं

एकदा एका लहान मुलाला समजले की देव स्वर्गात माणसांना आपल्या हाताने त्याच्या बागेतील आंबे वाटत आहे. त्या मुलाला ती बातमी समजताच त्याला खूप आनंद झाला आणि तो ताबडतोब देवाच्या हातून आंबा घेण्यासाठी स्वर्गात पोहोचला.

तिथे पाहतो तर देवाच्या दारात लांबच लांब रांग आंबे घेण्यासाठी लागली होती. हा लहान मुलगा त्या रांगेत शेवटी जाऊन उभा राहिला. प्रत्यक्ष परमेश्वराच्या हातून आंबा मिळणार या कल्पनेनेच लांब रांग असूनही तो अत्यंत उत्सुकतेने व अस्वस्थतेने त्याचा नंबर येण्याची वाट पाहत थांबला होता. जेव्हा त्याचा नंबर आला व तो देवाजवळ पोहोचला तेव्हा त्याने अधिरतेने आपले दोनही हात देवापुढे आंबा घेण्यासाठी पसरले.

परमेश्वराने त्या मुलाच्या हातात भला मोठा आंबा ठेवला. पण दुर्दैवाने त्या लहान मुलाच्या चिमुकल्या हातांनी तो आंबा धरता आला नाही. तो आंबा त्याच्या हातातून निसटून जमिनीवर पडला आणि धुळीत पडून खराब झाला.

तो लहान मुलगा अगदी हिरमुसला झाला.

जवळच एक देवदूत उभा होता. त्याने लहान मुलाला नाराज झालेले पाहिले. त्याच्या जवळ जाऊन त्याला सांगितले, ''काही हरकत नाही. तू परत रांगेत जाऊन उभा राहा. तुझा नंबर येताच परमेश्वर तुला आंबा देईल. या वेळी तू तो खाली पडून देऊ नकोस.''

आता रांगेत आणखी माणसे येऊन उभी होती. मुलाचा नंबर खूपच दूर होता. रांगेत उभा असताना देवाच्या हातून आंबा घेऊन येणाऱ्या लोकांकडे तो बघत होता. त्या प्रत्येकाचा चेहरा अतिशय समाधानाने फुलून गेलेला दिसत होता. मुलाला मनातून

फार वाईट वाटत होते. तो विचार करीत होता, आपल्याच हातून आंबा का खाली पडला? इतर सगळ्यांना कसा सहजपणे आंबा घेता आला. मी काय पाप केले आहे की मला अशी शिक्षा व्हावी?

लहान मुलगा मनातून धास्तावला होता. तो सारखा मनाला बजावित होता की या वेळी आपण कोणतीही चूक करायची नाही. आलेली संधी दवडायची नाही. काही वेळातच मुलगा देवाजवळ पोहोचला. देवाने मोठ्या प्रेमाने त्याच्या हातावर आंबा ठेवला आणि त्याला म्हणाला, ''माझ्या लाडक्या बाळा, अरे मागच्या वेळी मी तुझ्या हातावर आंबा ठेवला आणि मग माझ्या लक्षात आले की तो आंबा खराब झालेला होता. म्हणून मीच तो तुझ्या हातातून खाली पडेल असे नियोजले होते. तुला नासलेला आंबा दिला गेल्याने मला फार वाईट वाटले होते. तुझी दया आली. मी तुला माझ्या बागेतील सर्वांत गोड व रसाळ आंबा देण्याचे ठरविले. पण त्यावेळी माझ्याजवळ बागेतील उत्तम फळ आले नव्हते. ते अजून तयार होत होते. या कारणास्तव मी तुला पुन्हा रांगेत आणि ते सुद्धा अधिक वेळ उभे राहण्यास भाग पाडले. हा आंबा तुला मुद्दाम देत आहे. माझ्या बागेतील हे आत्तापर्यंतचे सर्वांत उत्तम फळ आहे. जा तुला ते खूप आवडेल. सदा सुखी हो.''

तेव्हा तात्पर्य असे कीं, कित्येक वेळा आपण पूर्ण झोकून देऊन किंवा समर्पित होऊन एखादी गोष्ट केली तरी त्याचे फळ लगेच मिळेलच असे होत नाही. कदाचित आपल्या अपेक्षेप्रमाणे आपल्याला अंतिम यश मिळेलच असे नसते. देवावर विश्वास ठेवा. खात्री बाळगा की देवाने काहीतरी चांगले योजून ठेवले असणार. म्हणूनच आपल्या अपेक्षेप्रमाणे घडले नसणार. लक्षात ठेवा, कृतज्ञतेची भावना बाळगणे हे नेहमीच उत्तम घडण्याचा मार्ग असतो.'

यावर विश्वास बाळगा आणि मग पाहा तुमचे आयुष्य नेहमीच सदाबहार असेल.

❋ ❋ ❋

# भारतीय व्यवस्थापनाची पद्धत

एका यशस्वी उद्योगात एक मुंगी रोज नियमितपणे लवकर कामावर हजर होऊन लगेच कामाला सुरूवात करीत असे. तिचे कामामुळे सर्वसाधारण येणाऱ्या उत्पन्नापेक्षा अधिक उत्पन्न निघत असे. ती पण स्वत:च्या कामावर खूश होती. कोणत्याही प्रकारची देखरेख नसताना सुद्धा मुंगीच्या कामामुळे कंपनीच्या प्रमुखाला – सिंहाला – फार आश्चर्य वाटत होते. त्याला वाटले जर मुंगी देखरेखीशिवाय इतके उत्पादन देऊ शकते तर देखरेखीखाली तिने काम केल्यास याहूनही अधिक उत्पादन मिळू शकेल.

या विचाराप्रमाणे सिंहाने देखरेख करण्यासाठी एका झुरळाची नेमणूक केली. झुरळ देखरेखीच्या कामात तरबेज म्हणून नावाजलेले होते, तसेच ते केलेल्या कामाचा अहवाल सादर करण्यात वाकबगार होते. झुरळाने काही निर्णय तातडीने घेतले. सर्वप्रथम त्याने कामावर येण्याजाण्याचे हजेरीचे घड्याळावर आधारित नोंदणीपत्रक सुरू केले. त्याचे अहवाल तयार करून ते टाईप करण्यासाठी एका सेक्रेटरीची आवश्यकता असल्याचे सांगितले. त्या कामासाठी त्याने एक कोळी नियुक्त केला. त्याने तयार केलेले अहवाल, त्याच्यामधील ग्राफ, उत्पादनाची आकडेवारी, त्याबद्दलचे विवेचन, विश्लेषण, पुढच्या दिवसातील उत्पादनाचा कल, दिशा पाहून सिंहसाहेब अतिशय खूश झाले. त्याने ते सगळे अहवाल बोर्ड मिटिंगमध्ये सादर करण्यासाठी प्रिंट करून घेतले. त्यासाठी झुरळाला नवीन संगणक आणि लेसर प्रिंटर विकत घ्यावा लागला. नव्याने स्थापन केलेले ते आयटी विभागाचे काम करण्यास एका माशीची नियुक्ती केली.

जी मुंगी एकेकाळी खूप कामाची, अधिक उत्पादन क्षमतेची व आरामशीर चिंतामुक्त होती ती या कागदी घोडे व अनावश्यक मिटिंग्जच्या फापटपसाऱ्याचा तिरस्कार करू लागली. कारण त्यात तिचा फार वेळ वाया जाऊ लागला. मुंगी ज्या खात्यात काम करीत होती त्या खात्यासाठी एखादा मुख्य अधिकारी नेमावा अशा विचारात सिंहसाहेब पडले. त्या जागी सिंहाने एका रातकिड्याची नेमणूक केली. रातकिड्याने प्रथम काय केले असेल तर एक अत्यंत उच्च प्रतीचा गालिचा व कार्यनिरूपण शास्त्राप्रमाणे सोयिस्कर असलेली खुर्ची विकत घेतली. तसेच त्याला एक वैयक्तिक सेक्रेटरीची गरज होती. ती त्याने त्याच्या पूर्वीच्या कामाच्या

ठिकाणावरून आयात केली. त्याला त्याने काळ कामाचे गणित मांडून कामाची मान्यताप्राप्त पातळी ठरविणारा आराखडा तयार करण्यास सांगितले. मुंगी काम करीत असलेले खाते आता अत्यंत भकास, मरगळलेले, अनिच्छ, दुर्मुखलेले असे खाते होऊन गेले होते. सर्व अस्वस्थ होऊन कामावरून त्यांचे लक्ष उडालेले होते.

याच वेळी त्या खात्यात परिस्थितीचा व पर्यावरणाचा अभ्यास करण्याची जरूरी असल्याचे रातकिड्याने सिंहाला पटवून दिले. हे सर्व अमलात आणूनही मुंगी ज्या खात्यात काम करीत होती त्या खात्याचे उत्पादन आधीपेक्षा बरेच कमी झालेले दृष्टोत्पत्तीस आले. म्हणून प्रसिद्ध व वाकबगार अशा घुबडाची नेमणूक तपासणी करून त्यावर उपाय सुचविण्यासाठी सल्लागार म्हणून केली. घुबडाने तीन महिने त्या खात्याची चाळणी व पाहणी करून एक भला मोठा, बरीच पाने असलेला शब्दजंजाळ असलेला अहवाल सादर केला. अहवालाच्या निष्कर्षात त्याने एकच वाक्य लिहिले होते. ''खात्यात जरूरीपेक्षा जादा कामगार नेमले गेले आहेत. ते कमी करावेत.'' कल्पना करा कोणाची उचलबांगडी झाली असेल. अर्थातच, मुंगीची व ती सुद्धा अकार्यक्षम व कामात कमी इंटरेस्ट असणारी, नकारात्मक दृष्टिकोन असलेली या कारणासाठी.

आपण अजूनही मंदीच्या भोवऱ्यात का अडकलो आहोत ते यावरून ध्यानात आले असेलच. आजकाल मुंगी होऊन काम करणे योग्य ठरणार नाही.

❋ ❋ ❋

# भीतिपेक्षा उंच गगन भरारी

**ए**का राजाला अरेबियाहून दोन अतिशय सुंदर बहिरी ससाण्याची जोडी भेट म्हणून पाठविली होती. आत्तापर्यंत बघितलेल्या ससाणा जोडीपेक्षा ही जोडी खूपच रुबाबदार व जलद उडणारी होती. राजाने हे दोन अनमोल पक्षी शिकण्यासाठी पक्ष्याच्या शिक्षकाच्या ताब्यात दिले.

दोन तीन महिन्यांनंतर तो शिक्षक राजाकडे आला. त्याने राजाला सांगितले, ''दोनपैकी एक ससाणा दिमाखदारपणे आकाशात उंच भराऱ्या घेतो. रूबाबात गगनात उडतो. पण आल्या दिवसापासून एकदा सुद्धा दुसरा ससाणा आपल्या फांदीवरून तसूभरही हलला नाही.''

राजाने संपूर्ण राज्यातून मांत्रिक व जादूगार आणले. पक्ष्याची काय अडचण आहे हे अजमावून पाहिले. पण कोणालाच त्या पक्ष्याला उडविण्यास यश आले नाही. राजाने आपल्या राजमंडळाला यावर उपाय शोधण्यास सांगितले तरीही काही झाले नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी राजाने खिडकीतून पाहिले तर तो पक्षी आपल्या जागेवरून तसूभरही हलला नव्हता. शक्य त्या सर्व प्रयत्नानंतरही प्रश्न सुटत नाही हे पाहून राजाने ठरविले की, या पक्ष्यांच्या अडचणी खेड्यापाड्यातील शेतकरी अधिक जाणत असतील. राजाने मंत्रिमंडळाला खेडेगावातून एखाद्या माहीतगार शेतकऱ्याला घेऊन येण्याची आज्ञा सोडली.

शेतकरी आल्यानंतरच्या दुसऱ्या दिवशीच्या सकाळी राजाने खिडकीतून पाहिले आणि तो चक्रावून गेला. हर्षभरित झाला. समोरच्या झाडावरचा तो पक्षी उंच आकाशात राजवाड्याच्या बागेत भराऱ्या मारीत होता. त्याने आपल्या सरदाराला सांगून त्या शेतकऱ्याला बोलावून घेतले. त्याने हा चमत्कार घडवून आणला होता. सरदाराने लगेच त्या शेतकऱ्याला राजासमोर हजर केले. राजाने त्याला विचारले, ''तू हे कसे करू शकलास? ससाण्याला तू हवेत कसे उडायला शिकवलेस?''

राजासमोर विनम्र होऊन त्या शेतकऱ्याने सांगितले, ''महाराज, त्यात मी विशेष काहीच केले नाही. ज्या फांदीवर तो ससाणा पक्षी बसून होता ती फांदीच तोडून टाकली.''

आपल्यालाही सर्वांना उडता येत असते. आपल्यामध्ये असणारी अविश्वसनीय क्षमता आपणास ठाऊक नसते. तिचा वापर करण्याऐवजी आपण खूप परिचित असणाऱ्या गोष्टींना चिकटून राहतो. प्रत्येकबाबतीत असणाऱ्या शक्यता या असंख्य असतात; पण अनेकांना त्याचा बोध व शोधच लागत नाही. आपण आपल्या परिचित आणि सोयिस्कर गोष्टीच जवळ करीत असतो.

आपले आयुष्य त्यामुळे सर्वसामान्यच राहते. ते खळबळजनक, थरारक, परिपूर्ण होत नाही.

त्यासाठी आपण मनातील ज्या भीतिला चिकटून बसलो असू ती झटकून दूर फेकून दिली पाहिजे तरच गगनातील उंच भरारीचा अनुभव आपणास घेता येईल.

❃ ❃ ❃

## मदतीचा हात मिळून जिंकण्यासाठी

**जा**गतिक ऑलिंपिक गेम्स सुरू होते. एक धावण्याची अनोखी अशी शर्यत सुरू होणार होती. शर्यतीत भाग घेणाऱ्या खेळाडूंवर सर्वांचे डोळे लागून राहिले होते. हे सर्व स्पर्धक मानसिक अथवा शारीरिक अपंग होते; परंतु त्यांच्यामधील स्पर्धेची भावना किंचितही कमी नव्हती. शंभर मीटर धावण्याच्या शर्यतीसाठी सर्वजण आरंभरेषेवर ओळीने पवित्रा घेऊन तयार होते. शर्यत सुरू होण्याची शिट्टी वाजली. ऐकूण स्पर्धक नऊजण होते. सर्वांनी कसोशीने पळायला सुरूवात केली. पण अरेरे!!! एक स्पर्धक मुलगा पायात अडखळून पडला. चांगल्या दोन तीन कोलांट्या करून जमिनीवर आडवा पडला. गुढगे खरचटले, ढोपरे ठेचकाळली. जखमांमुळे होणाऱ्या वेदना व त्याचबरोबर स्पर्धा अर्धवट टाकण्याचे दु:ख यामुळे तो मुलगा जोरात रडायला लागला. त्याचा रडण्याचा आवाज इतर स्पर्धकांनी ऐकला मात्र आणि त्यांनी धावण्याचा वेग कमी केला, थांबले, मागे वळून बघितले. सर्वच्या सर्व आठ स्पर्धकांनी एकाच वेळी असे केले.

एक छोटी स्पर्धक मुलगी त्याच्या जवळ आली. बसली. प्रेमाने त्याच्या हातावर हात ठेवून तिने विचारले, ''फार लागले का रे? आता कसे वाटते आहे?'' तोवर इतर स्पर्धकही त्याच्या भोवती जमा झाले. धीर देऊन व हाताचा आधार देऊन त्याला परत उभे केले. त्यानंतर सर्व स्पर्धकांनी हातात हात गुंफून एका ओळीत चालत जाऊन स्पर्धेची अंतिम रेषा पार केली. जमलेले सगळे प्रेक्षक खाडदिशी उभे राहून कित्येक वेळपर्यंत टाळयांचा कडकडाट करीत होते. अनेकांच्या डोळ्यांतून अश्रू वाहात होते.

इतकी वर्षे लोटली तरी हा प्रसंग प्रत्यक्ष पाहणारे प्रेक्षक अजूनही त्याबद्दल भरभरून बोलतात. सद्‌गदित होतात. हे का बरे होत असेल?

कारण आयुष्यात स्वत: जिंकण्याच्या आनंदापेक्षा दुसऱ्या कोणाला तरी जिंकून देण्यासाठी मदतीचा आनंद अनेक पटीने अधिक असतो. हे करताना तुमच्या यशाचा वेग कमी करावा लागला आणि परिणामत: तुम्ही अपयशी ठरलात तरी तो आनंद चिरकाळ टिकणारा असतो.

(A CANDLE LOOSES NOTHING IF IT IS USED TO LIGHT OTHER CANDLE)

❃ ❃ ❃

## मदतीचा हात

**ऑ**लिंपिक खेळांच्या स्पर्धेत असतो त्या आकाराच्या पोहण्याच्या तलावाच्या काठावर जेनी आरामात पहुडली होती. तिने तिचा नवीनच घेतलेला स्विमिंग सूट परिधान केलेला होता. तसा तो दिवस उबदार होता. त्यामुळे तिने तलावात उतरण्याचा विचार केला. त्यावेळी तलावात पोहणारे कोणीच नव्हते. अख्खा तलाव पोहण्यासाठी फक्त जेनीसाठी मोकळा होता. तलावातील संथ पाण्याने तिला पोहण्यासाठी उद्युक्त केले. गेल्या कित्येक दिवसांत जेनी पोहण्यासाठी तलावात उतरली नव्हती. त्यामुळेच ती थोडीशी बेढब आणि स्थूल झाली होती.

पोहताना जेनी थोड्याच वेळात थकायला लागली. तिने मनाशी विचार केला, ''छे! छे!! कष्टाविना फळ मिळणार नाही.'' अशा विचारात जेनी आणखी थोडा वेळ पोहत राहिली. थोड्याच वेळात तिचे डोके जड झाले. अंगाला कंप सुटला. श्वासोच्छ्वास

करायला त्रास होऊ लागला. तिच्या डोळ्यांपुढे अंधेरी येऊ लागली. तिने तलावाच्या काठावर पाहिले तर तिला जीवनरक्षक व इतर दोघे तिघे दिसले. इतरांना त्रास देऊन स्वत:ला ओशाळगत करणे तिला योग्य वाटले नाही. तिने पोहणे तसेच चालू ठेवले. पोहता पोहता ती तलावाच्या मध्यावर पोहोचली. स्वत:ला होणाऱ्या त्रासाचा बाऊ न करता ती तशीच पोहत राहिली. सरतेशेवटी तिने तलावाचा दुसरा काठ गाठलाच. अशक्तपणा, अंगातील शक्तिपात आणि थकवा यामुळे पाण्यातून बाहेर तलावाच्या काठावर येणे तिला अवघड होऊन गेले होते. तिला कोणाच्या तरी मदतीची नितांत गरज भासत होती. परंतु तोंडावाटे शब्द काढायची सुद्धा ताकद तिच्यात शिल्लक नव्हती. अखेर तलावाच्या काठावर आधार घेऊन ती काठाजवळच थोडावेळ स्तब्ध राहिली. त्यानंतर कित्येक मिनिटे गेली. हळूहळू तलावाच्या काठावर स्वत:ला बाहेर काढण्याची तिला शक्ती मिळाली. ती पाण्यातून बाहेर येऊन काठावर आरामात पहुडली.

अशाच एखाद्या प्रसंगात तुम्ही संकटात सापडले आहात. पण तुम्ही त्या परिस्थितीत कोणाचीही मदत मागितली नाहीत. अशा अवस्थेचा तुम्हाला कधी अनुभव आला आहे का? तुमच्या आयुष्यात येणारे ताणतणाव तुमच्या मनावर फार मोठा परिणाम घडवून आणतात का? हाती घेतलेले एखादे काम सोडून देऊन दुसरे एखादे काम करण्याची तयारी तुम्ही कधी दर्शविली आहे का?

आपल्यापैकी प्रत्येक जण अशा परिस्थितीला सामोरे जात असतो. थोडा विचार करुन पाहा.

मनातून नकाराची भावना काढून टाका. दुसऱ्याची मदत जरुर मागा. अशी दुसऱ्याची मदत घेणे यात मुळीच गैर नाही. पोहत असताना दमल्यामुळे जेनी पाण्यात बुडणे सहज शक्य होते. जेनीप्रमाणेच आपल्यापैकी अनेकांना सवय असते. संकट अगदी गळ्याशी आले तरीही त्याची लागलेली चाहूल आपल्याला जागे करीत नाही. ती मिळालेली सूचना आपण स्विकारीत नाही. कदाचित मदत मागितली म्हणून तुमचे हसे होईल या भीतिने तुम्ही मदत मागण्याचेच टाळीत असाल.

कृपया थांबा, विचार करा आणि जरुर मदत मागा. आणि हो, तुम्ही प्रवाहात पूर्ण बुडून जाण्यापूर्वी मदत मागा हे महत्त्वाचे.

❋ ❋ ❋

## मनातील विचारांमुळे घडणारा माणूस

**ही** गोष्ट आहे श्री. जॉर्ज डान्टझिंग जो सुप्रसिद्ध गणिततज्ज्ञ होता. त्याने केलेल्या गणिताच्या पद्धती आणि सिस्टिम इंजिनिअरिंगबाबतच्या संशोधनामुळे व प्रबंधामुळे तो अद्वितीय अजरामर ठरला आहे. जॉर्ज कॉलेजमध्ये असताना त्याने खूप अभ्यास केला. रात्री उशिरापर्यंत अभ्यासासाठी जागणे हे तर नित्याचेच होते. एक दिवस तो इतक्या उशिरापर्यंत अभ्यासासाठी जागला की सकाळी उठायला त्याला बराच उशीर झाला. प्रा. न्यूमनच्या गणिताच्या तासाला यायला त्याला वीस मिनिटे उशीर झाला. वर्गात आल्याबरोबर फळयावर जे दोन गणिताचे प्रश्न प्रोफेसरांनी लिहिले होते ते त्याने लगेच आपल्या वहीत उतरवून घेतले. ती गणिते म्हणजे त्या दिवशी प्रोफेसरांनी दिलेला गृहपाठ होता अशी त्याची समजूत झाली होती. ती गणिताची उत्तरे शोधण्यास त्याला बरेच दिवस मेहेनत करावी लागली; पण अखेर शेवटी त्याला त्यात यश मिळाले. ज्या दिवशी त्याने ती गणिते सोडविली होती त्याच्या दुसऱ्याच दिवशी जॉर्जने वर्गात प्रोफेसरांच्या हातात आपली उत्तराची वही दिली.

त्यानंतर सहा आठवडे गेले. नंतरच्या रविवारच्या सकाळी ठीक सहा वाजताच जॉर्जच्या प्रोफेसरांनी त्याला उठविले. प्रोफेसर अत्यंत अस्वस्थ पण उल्हसित होते.

त्या दिवशी जॉर्ज वर्गात वीस मिनिटे उशिरा आल्यामुळे प्राध्यापकांचे बोलणे त्याने ऐकले नव्हते. प्राध्यापकांनी ती दोन गणिते अनुत्तरित राहिलेली म्हणून विद्यार्थ्यांना सांगितली होती. त्यांनी ती कोणालाच सोडविण्यासाठी अगर गृहपाठ म्हणून फळयावर लिहिली नव्हती. त्या गणिताची कोडी अगदी विद्वान गणिततज्ज्ञ आईन्स्टाईनसुद्धा सोडवू शकला नव्हता.

जॉर्ज डान्टझिंगने मात्र कोणाचीही मदत न घेता, किंवा कोणाच्याही प्रयत्नांचा आधार न घेता स्वत: एक नव्हे तर दोन्ही

गणिते सोडविली होती. ती दोन्ही गणिते आईन्स्टाईननंतर वर्षांनुवर्षे विद्वान गणिततज्ज्ञांना अनुत्तरित ठेवावी लागली होती.

जॉर्जला हे माहीत नव्हते की ती इतकी कठीण समस्या आहे. तो ती सोडवू शकणार नाही असे त्याच्या मनात सुद्धा आले नसल्याने नकारात्मक विचार त्याच्या डोक्यात आलाच नाही. म्हणूनच तो त्यात यश मिळवू शकला.

❋ ❋ ❋

# मनावर कोरला गेलेला संदेश (टॅटु)

एकदा हाँगकाँगच्या छोट्या गल्लीतून हिंडताना एका गोंदवून देणाऱ्या कलागृहापाशी (स्टुडिओ) माझे पाय थबकले. त्याच्या रस्त्याच्या बाजूच्या प्रदर्शन कक्षात उपलब्ध असलेले टॅटु संदेश नमुन्यादाखल प्रदर्शित करून ठेवले होते. छातीवर किंवा दंडावर त्रिशूळ, नांगर, झेंडा अगर मत्स्यकन्या यापैकी तुम्ही काहीही गोंदवून घेऊ शकता. हे सर्व तर होतेच पण माझे लक्ष वेधले ते तीन शब्दांच्या मजकुराकडे. ते होता, 'हरण्यासाठी जन्म आपुला' (BORN TO LOSE). मी आत जाऊन त्या चिनी गोंदविणाऱ्या कलाकाराला विचारले, ''हा असा संदेश कोणी आपल्या छातीवर किंवा अंगावर गोंदवून घेतो का?''

त्याने उत्तर दिले, ''हो, कधी कधी एखादा गोंदवून घेतो की.''

मी परत म्हटले, ''पण माझा विश्वास बसत नाही, असा संदेश कोणी अभिमानाने मनापासून गोंदवून घेत असेल?''

चिनी माणसाने आपल्या डोक्यावरून हात फिरविला आणि म्हणाला, ''कोणाच्याही अंगावर संदेश गोंदविण्याआधी तो संदेश त्याच्या मनावर बिंबलेला असतो.''

किती खरे आहे ना हे? आपल्यापैकी अनेकजण प्रथमपासूनच आपण हरणार असे मनाशी पक्के करतात. खेळाचा एक नामांकित प्रशिक्षक शिकागोमध्ये होता. त्याने त्याच्या ऑफिसमध्ये अतिशय ठळकपणे एक संदेश प्रदर्शित केला होता. ''झोपताना विजयी म्हणूनच बेडवर आडवे व्हा'' (Always go to bed as a winner). अत्यंत प्रज्ञावंताने केलेला हा विचार आहे हे नक्की आणि म्हणूनच 'हरण्यासाठी जन्म आपुला' या टॅटुच्या संदेशापेक्षा अगदी वेगळा आहे. हरणार नाही तर सतत जिंकणारच. शिकागोच्या त्या प्रशिक्षकाने आपल्या या संदेशाचे समर्थन करताना सांगितले होते, ''झोपेच्या दरम्यान तुमचे जागृत मन तुमच्या सुप्तमनाला बजावित असते. अशा वेळी माझ्या खेळाडूंना हार मानण्याचे विचार शिवता कामा नयेत असा माझा आग्रह असतो. मी त्यांना नेहमी आग्रहाने बजावित असतो की केव्हाही पराभूत वृत्तीचा मनात शिरकाव होऊ देऊ नका.''

यासाठी तुम्हाला काय केले पाहिजे, तर 'हरण्यासाठी जन्म आपुला' हा मनावर गोंदविलेला संदेश पार पुसून टाका. आपले काय घडायला हवे आणि आपण कोण व कसे व्हायला हवे याचा विचार करता करता आपण तसेच घडत असतो. हा मानवी जात्याच असलेला स्वभाव आहे. जर तुमच्या मनामध्ये कमीपणाचा न्यूनगंड असेल तर तुम्ही स्वत:ला नेहमी अपूर्ण, निष्क्रिय, असमर्थ समजू लागता. तुमच्यामध्ये असलेल्या उत्तम गुणांवरचा तुमचा विश्वास उडाला तर तुम्ही अपयशाचे धनी व्हाल. त्यासाठी मनातील हा कटु विचार एकदम काढून टाका.

हे कसे साध्य होईल तर, तुमच्या मनातील तुमची प्रतिमा असामान्य करा. त्या जागी तुम्ही समर्थ, कर्तृत्ववान, सक्षम आहात हे मनावर कोरून टाका. ज्या कामात तुम्हाला अपयश आले असेल असे प्रसंग विसरून जा. जे काम तुम्ही उत्तम रीतीने पूर्ण केले असेल ते आठवून व त्यासाठी तुम्हाला मिळालेले कौतुक आठवा. अशा सर्व गोष्टी व प्रसंग मनात साठवून ठेवा आणि त्याची सतत उजळणी करीत राहा.

असे केल्याने नवीन संदेश किंवा टॅटु तुमच्या मनावर कोरला जाईल. विजयश्रीचा संदेश. सुरूवातीस म्हटल्या प्रमाणे प्रत्येक माणूस हा जिंकण्यासाठीच जन्माला आलेला असतो. तेव्हा ज्यासाठी तुम्ही जन्मला आहात ते तत्काळ करायला सुरूवात करा.

❋ ❋ ❋

# मनावरचा लगाम

एक आध्यात्मिक गुरू आपल्या शिष्यांसमवेत बाजाराच्या एका रस्त्याने जात असताना एक माणूस आपल्या गायीला दोरीला बांधून ओढत नेत असलेला दिसला. गुरूने त्या माणसाला थांबण्याची विनंती केली आणि आपल्या शिष्यांना त्याच्याभोवती उभे राहण्यास सांगितले.

''आज मी तुम्हाला एक पाठ देणार आहे. या गायीकडे पाहून तुम्हाला काय वाटते? माणूस गायीच्या बंधनात आहे की गाय माणसाच्या बंधनात आहे?'' गुरुंनी शिष्यगणांना प्रश्न केला. शिष्यांच्या मनात कोणतीही संदिग्धता न होता त्यांनी सांगितले, ''अर्थातच गाय त्या माणसाच्या पूर्ण ताब्यात आहे. तो माणूस गायीचा मालक आहे. तो गायीला दोरीने बांधून आपल्या ताब्यात ठेवतो आहे. त्याला हवे तिकडे गायीला जावेच लागेल. तो माणूस गायीचा मालक व गाय त्याची गुलाम आहे.''

''आता पाहा बरे काय काय होते ते.'' असे म्हणून त्या गुरूने तो दोर कापून टाकला. त्या बरोबर गाय त्या माणसापासून दूर पळाली.

याबरोबर तो माणूस गायीच्या मागे मागे पळायला लागाल. ''पाहा, आता काय होते आहे ते. आता कोण कोणावर हुकूमत गाजवत आहे? माणूस की गाय? गायीला त्या माणसाबद्दल अजिबात आत्मियता वाटत नाही. ती त्या माणसाच्या बंधनातून मुक्त होऊन दूर पळते आहे. असेच आपल्या मनाविषयी घडते. आपण ज्या अनेक गोष्टी आपल्या मनात साठवून ठेवतो त्या सगळ्याच गोष्टींविषयी आपल्याला अभिरूची नसते. कसेही करून आपण त्या सगळ्या गोष्टी एकत्र धरून ठेवतो. त्या सर्व गोष्टी मनाच्या गाभाऱ्यात साठविताना आपल्या मनाचा कोंडमारा होतो. ज्या क्षणी त्या गोष्टींविषयी आपली अभिरुची संपते, त्याच वेळी त्या गोष्टी आपल्याला अनावश्यक भासू लागतात. ज्या क्षणी त्या गोष्टींची आपल्याला निरर्थकता किंवा व्यर्थता समजते, त्या क्षणी त्या गोष्टी आपल्या मनातून नाहीशा व्हायला लागतात. जशी ही गाय आता सुटून जाऊन पळून जात आहे.''

या निरर्थक गोष्टींविषयी मनातील विचार बंद करण्याची आवश्यकता नसते. या फालतू वाटणाऱ्या गोष्टींविषयी अभिरूची काढून टाकणे इतकेच काय ते आवश्यक असते. त्याचवेळी त्यांचा दोर कापला जातो. हाच तर संन्यासाचा अर्थ आहे. अभिलाषेला तिलांजली देणे किंवा त्याचा परित्याग करणे, मनात कोणत्याही बाबीची अभिरुची न धरणे म्हणजेच संन्यस्त वृत्ती. अलिप्तता किंवा विरक्ती म्हणजेच वैराग्य. त्यासाठी जीवनाचा त्याग करण्याची आवश्यकता नसते, तर फक्त मनावर बंधने घालून मनाचा दोर अनावश्यक गोष्टीपासून कापून टाकणे इतकाच अर्थ असतो.

डोळ्यांचा डॉक्टर तुम्हाला स्पष्ट दिसण्यासाठी चश्मा देऊ शकतो पण गुरू तुम्हाला आदर्श जीवन जगण्याची दृष्टी देतो.

❋ ❋ ❋

# महायोद्धा अलेक्झांडरची शेवटची इच्छा

जगातील दोन ओळींची सर्वांत सुंदर कविता अशी आहे.....

बर्फ गरम होतो तेव्हा तो वितळतो,

माणसाला तिटकारा आला तर त्याचे डोळे पाणावतात

Ice melts when heated, Eyes melt when hated.

अनेक प्रदेश व राज्ये पादाक्रांत केल्यानंतर महान योद्धा अलेक्झांडर घरी परतत होता. वाटेतच तो खूप आजारी पडला आणि मरणाच्या अवस्थेला येऊन पोहोचला. त्या मरणावस्थेत असताना त्याला कळून चुकले की, आपण आत्तापर्यंत केलेला पराक्रम, मिळविलेले विजय, आपली शूर लढवय्ये असणारी फौज, आपली तळपती तलवार आणि आपली मिळविलेली अमाप संपत्ती याला आता काहीच अर्थ उरलेला नाही.

त्याने आपल्या मातृभूमीला पोहोचण्याचा ध्यास घेतला होता. मातृभूमीवर जाऊन शेवटी तिला वंदन करून तिचा आशीर्वाद घेण्यासाठी त्याचे मन व्याकूळ झाले होते. परंतु त्याच्या ढासळत जाणाऱ्या प्रकृतीमुळे त्याला मातृभूमीला पोहोचता येणार नाही हे कळून चुकले होते. एव्हढा मोठा जगज्जेता अंथरुणावर आडवा पडून निस्तेज होऊन शेवटच्या घटका मोजित होता.

त्या अवस्थेत असताना त्याने आपल्या सगळ्या सरदारांना, सैन्याच्या सेनापतीला बोलाविले आणि सांगितले,''मी आता फार काळ जिवंत राहणार नाही. लवकरच मी हे जग सोडून जाईन असे दिसते. माझ्या शेवटच्या तीन इच्छा आहेत. मी गेल्यावर त्या तुम्ही आठवणीने पूर्ण करा.''

सेनापती आणि सगळ्या सरदारांच्या डोळ्यातून आंसवे वाहून त्यांच्या गालावर ओघळत होती. आपल्या अत्यंत लाडक्या राजाला वंदन करून त्याच्या तीनही इच्छा शिरसावंद्य मानून त्या पूर्ण करण्याचे त्यांनी आश्वासन दिले.

अलेक्झांडरने त्याच्या तीन इच्छा सांगितल्या त्या अशा, ''माझ्यावर उपचार करणाऱ्या डॉक्टर्सनीच फक्त माझा मृतदेह अंत्ययात्रेत उचलून न्यावा. अशी माझी पहिली इच्छा आहे.'' थोडा दम खाऊन त्याने त्याची दुसरी इच्छा व्यक्त केली, ''मी आत्तापर्यंत जे सोने, चांदी, मौल्यवान रत्ने जिंकून व मिळवून आणलेली आहेत ती सर्व माझी शवपेटी ज्या रस्त्यावरून थडग्याकडे नेली जाईल त्या रस्त्यावर पसरून ठेवावीत. तो रस्ता हिरे, मांणके, सोने, चांदी यांनी मढून गेला पाहिजे.''

एवढे बोलताना अलेक्झांडरला धाप लागली. क्षणभराची विश्रांती घेऊन पुढे त्याने सांगितले, ''माझ्या तिसऱ्या इच्छेप्रमाणे माझे दोनही हात शवपेटीच्या बाहेर दिसतील असे लोंबकळत राहू देत.''

आपल्या सेनानी राजाच्या या तीन विचित्र शेवटच्या इच्छा ऐकून तिथे जमलेल्या सर्वांनाच फार आश्चर्य वाटले; पण त्याबद्दल कारण विचारण्याचे कोणालाच धाडस होत नव्हते.

अलेक्झांडरचा सर्वांत जवळचा व मर्जी असणाऱ्या एका सेनापतीने धीर करून विचारले, ''महाराजा, आपण व्यक्त केलेली प्रत्येक इच्छा आम्ही तंतोतंत अमलात आणू असे मी आपणास शपथपूर्वक सांगतो, तथापि आपण या अशा जगावेगळ्या इच्छा मनात का बाळगल्या आहेत? आम्हाला त्याचे कारण व अर्थ कळू शकेल का?''

त्यावर अलेक्झांडरने एक प्रदीर्घ श्वास घेतला आणि सांगितले, ''मला आयुष्यात तीन गोष्टींचा साक्षात्कार झाला आहे. ते मी या तीन इच्छांद्वारे लोकांपर्यंत पोहोचवू इच्छितो.''

त्या तीन इच्छांद्वारे अलेक्झांडरला लोकांना खालील गोष्टींची जाणीव करून द्यायची होती.

''डॉक्टरांनीच माझी शवपेटिका वाहून नेली तर लोकांना समजेल की जगातील कोणताही धन्वंतरी माणसाचे आजार पूर्ण बरे करून त्याला मरणाच्या दाढेतून वाचवू शकत नाही. त्यासाठी त्याच्याजवळ कोणतीही ताकद किंवा उपाय नसतो. त्यामुळे माणसाने आयुष्यात बेफिकीर राहू नये.

''माझ्या अंत्ययात्रेच्या रस्त्यावर अशी संपत्ती पसरून ठेवल्यामुळे लोकांच्या लक्षात येईल की मी आयुष्यभर ही संपत्ती जमा करीत आलो; पण शेवटी मी त्यातील एक कणही सोनेनाणे बरोबर नेऊ शकणार नाही. तेव्हा आयुष्यात संपत्तीच्या मागे धावणे निरर्थक आहे.

''आणि माझ्या तिसऱ्या इच्छेनुसार माझे दोनही हात मी शवपेटीबाहेर लोंबकळत ठेवायला अशासाठी सांगितले आहे की, त्यामुळे लोकांना हे दिसून येईल की मी या जगात येताना रिक्त हातानी आलो होतो व जाताना पण रिक्त हातानेच जात आहे.'' हे सांगून त्या महान योद्धयाने आपले डोळे मिटले. क्षणार्धात त्याचा शांतपणे मृत्यू झाला.

यातून आपण शिकू शकतो की,

तुमची तब्ब्येत उत्तम ठेवणे तुमच्या स्वत:च्या हातात आहे. त्याची काळजी सतत घ्या.

तुम्ही जमा केलेली संपत्ती तुम्ही जिवंत असेपर्यंतच तुम्हाला उपभोगता येते.

तुम्ही स्वत:साठी जगलात तर ते तुमच्याबरोबरच संपेल, पण दुसऱ्यासाठी जगाल तर ते कायम शिल्लक राहील. देवावर विश्वास ठेवा.

❃ ❃ ❃

# मानसिक साखळदंड

**पु**ष्कळ माणसे सर्कशीमधील पाळीव हत्तीसारखी वागतात. तुम्ही पाहिले असेलच की, हा अजस्त्र हत्ती सर्कशीच्या तंबूबाहेरील मोकळ्या पटांगणात एका लहानश्या ओंडक्याला साध्या दोरखंडाने बांधून ठेवलेला असतो. वास्तविक पाहता हा बलाढ्य प्राणी आपल्या सोंडेने हजारो मण वजनाचे ओंडके उचलू शकतो. तरीही सर्कशीत मात्र त्याला त्या छोट्याशा ओंडक्याला बांधून, जखडून ठेवता येते. हे कसे शक्य होते?

जेव्हा तोच हत्ती अगदी लहान पिल्लू असतो, तेव्हा त्याला भल्या जाडजूड, भक्कम साखळदंडाने लोखंडाच्या खांबाला बांधून ठेवलेले असते. त्यावेळी तो पूर्ण ताकदवान प्राणी झालेला नसतो. त्यामुळे त्याला त्या बंधनातून मुक्त होता येत नाही. त्याने कितीही प्रयत्न केले तरी स्वत:ची सुटका तो करून घेऊ शकत नाही. थोड्याच अवधीत तो बंधनमुक्त होण्याचे प्रयत्न सोडून देतो. कालांतराने मोठा झाल्यानंतर बलवान होऊनही तो बांधलेल्या अवस्थेतून सुटून जाण्याचा प्रयत्न सुद्धा करीत नाही. कारण त्याच्या कोवळ्या वयातच त्याच्या मनावर बिंबवलेले संस्कार असतात की, ''छे ! आपल्याला हे शक्य नाही. मी हे करू शकणार नाही. कदापीही नाही.'' त्या लहानवयातील कोरलेला हा समज त्याच्या डोक्यात पक्के घर करून बसलेला असतो.

या जगात असे अनेक महाभाग असतात की ज्यांची विचारसरणी त्या सर्कशीतील बलाढ्य अशा हत्तीसारखी बनलेली असते. त्यांची विचार करण्याची शक्ती अशीच बांधून, जखडून ठेवलेली असते. त्यांच्या मनावर सतत बिंबवले गेलेले असते की, ''हे तुम्हाला जमणार नाही. तुम्हाला शक्य होणार नाही. तुमच्याकडून हे होऊच शकणार नाही.'' आणि मग अशी माणसे आपला प्रयत्न थांबवितात. त्यांना काहीही करण्याची इच्छा व शक्ती राहात नाही. त्यांच्या मनात अनेक उद्दिष्टे असतील. ती पूर्णत्वाला नेण्याची ते स्वप्ने पाहात राहतील परंतु त्यांच्या मनात उमटलेला तो नकारात्मक ठसा किंवा न्यूनगंड, अबलत्वाचा संस्कार त्यांचे पाय मागेच खेचत राहतात.

म्हणूनच आज तुम्ही तुमच्या मन:पटलावरील नाकर्तेपणाचा, न्यूनगंडाचा ठसा पुसून टाका. जेव्हा तुमचे मन त्या अदृश्य, अभद्र पडछायेतून बाहेर पडेल आणि तुम्हाला तुमच्या कर्तृत्वाच्या दाही दिशा मोकळ्या दिसतील तेव्हाच तुम्ही तुमचा भविष्यकाल उज्ज्वल करू शकाल.

❋ ❋ ❋

# मृत्यू बोलावणे घेऊन येतो

**य**मराज एक दिवस एका माणसाकडे येतात आणि त्याला सांगतात, ''मित्रा आज तुझा दिवस आहे. मी तुला न्यायला आलो आहे.'' तो गृहस्थ म्हणतो, ''पण मी अजून तयार नाही.'' यमराज त्यावर सांगतो, ''अरे पण तुझे नाव माझ्याकडील यादीमध्ये दुसऱ्याच क्रमांकावर आहे.''

गृहस्थ त्याला विनंती करतो, ''ठीक आहे. पण तू जरा वेळ इथे विश्रांती घे. आपण मिळून जाण्याआधी मी तुला काहीतरी चांगले खायला देतो.''

यमराजाला त्याचे म्हणणे पटले. त्या गृहस्थाने स्वादिष्ट असे पदार्थ आणून ठेवले, ज्यात त्याने झोपेचे औषध टाकले होते. यमराजाने पोटभर अन्न खाल्ले आणि यमराजाला प्रचंड सुस्ती आली. तो गाढ झोपी गेला.

त्या गृहस्थाने त्याच्याजवळची आजच्या दिवशी मरणाचा नंबर असणाऱ्या व्यक्तींची यादी हळूच मिळविली. स्वत:चे यादीमध्ये असलेले दुसरे नाव काढून टाकून ते यादीमध्ये शेवटच्या क्रमांकावर टाकले.

यमराज झोपेतून उठल्यावर त्या मनुष्याला म्हणाले, ''तू माझ्यासाठी इतके परिश्रम घेतले आहेस तर मी आज या यादीमधील शेवटच्या व्यक्तीपासून सुरुवात करण्याचे ठरविले आहे.''

**तात्पर्य :** तुमच्या प्रारब्धात जे लिहिले असेल त्याला आनंदाने सामोरे जा. ते मान्य करा. तुम्ही कितीही प्रयत्न केलात तरी ते तुम्हाला बदलता येणार नाही.

# यश आणि अपयश.... जिराफाचे पहिले धडे

जिराफांची लेकरे कोणत्याच शाळेत त्यांचे पहिले धडे गिरवायला जात नाहीत. परंतु जन्मानंतर थोड्याच वेळात त्यांना आयुष्यातील फार महत्त्वाचा धडा दिला जातो. आपल्या सर्वांना तो धडा कायम लक्षात ठेवायला हवा. जिराफाचा जन्म होताना जणू धरणी हादरून जाण्यासारखी परिस्थिती असते. आईच्या उदरातून लहानगा जिराफ जवळजवळ आठ फूट उंचावरून दणकन जमिनीवर येऊन आदळतो. जन्माबरोबर तो गलितगात्र होऊन कोमेजून गेलेला असतो. तो त्याच अवस्थेत दोन आठवडे जरासुद्धा न हलता पडून असतो.

त्या दोन आठवड्यात जिराफाची आई आपली लांब मान त्याच्यापर्यंत नेऊन त्याला चाटून कुरवाळीत असते. त्यानंतर मात्र अशक्य वाटणारी एक घटना घडते. आई आपला पाय ताणते आणि बेबी जिराफाला एक सणसणीत लाथ हाणते. त्याच क्षणी बेबी जिराफ हवेत उंच फेकला जातो आणि काही क्षणातच खाली जमिनीवर येऊन आपटतो. त्या अचानक झालेल्या दणक्याने बेबी जिराफ हातपाय आखडून पडून राहतो. पण त्याची आई दयामाया न करता त्याला पुन्हा पुन्हा तसेच लाथेने हवेत उडवत राहते. बेबी जिराफ थरथरत, दमून गेलेले असते. परंतु त्याची आई ते पिल्लू आपले चारही पाय ताणून देऊन जमिनीवर उभे राहिल्याशिवाय लाथांचा प्रहार थांबवित नाही.

बेबी जिराफ प्रथम आपल्या पायावर उभा राहिलेला पाहून आई त्या आनंदाप्रीत्यर्थ आणखी एकदा जास्तच जोरात त्याला हवेत भिरकावून देते. आणखी एकदा त्या पिल्लाला आयुष्याची सुरुवात करण्याआधीच दणका खावा लागतो. पण या खेपेस मात्र ते पिल्लू त्या दणक्यातून स्वत:ला सावरीत उभे राहते. जिराफाची आई प्रसन्न होते, आनंदित होते. बेबी जिराफाने आयुष्याचा पहिला धडा यशस्वीपणे गिरविला असल्याची तिला खात्री होते.

यातून आपण काय शिकायचे तर, कितीही वेळा पडलात किंवा अपयशी ठरलात तरी नाराज होऊन प्रयत्न करणे सोडू नका. परत ताठ मानेने उभे राहून ठरविलेले काम करा.

जिराफाची आई असे निष्ठुर होऊन का शिक्षण देते? रानातील सिंह आणि चित्याला जिराफाचे मास फार आवडते त्यापासून स्वत:चे रक्षण करण्यासाठी बेबी जिराफाला लवकरात लवकर उभे राहून वायू वेगाने पळता येणे आवश्यक असते. त्याशिवाय त्याचा राज्यात निभाव लागणे अशक्यच असते. आपल्यापैकी बरेच जण जिराफासारखे नशिबवान नसतात. आपल्या प्रत्येक अपयशाच्यावेळी आपल्याला त्यातून बाहेर येण्यासाठी नशीब हात देत नाही. आपण जेव्हा अपयशाने खचून जातो तेव्हा प्रयत्न करणेच सोडून देतो. एक प्रकारच्या नाजूक परिस्थितीतून बाहेर काढण्यासाठी आपल्याला कोणीच कठोरपणे जाणीव करून देत नाही. आपले अस्तित्व टिकवून यशस्वी होण्यासाठी परत उभारी धरायला आपण शिकणे आवश्यक असते. आपल्या भोवतालच्या यशस्वी माणसांच्या यशस्वितेचा तुम्ही अभ्यास केलात तर त्यांनी हाच प्रयास वारंवार केल्याचे तुमच्या ध्यानात येईल. तुमच्या लक्षात येईल की, त्यांनी केलेल्या प्रत्येक कामात त्यांना यश मिळत होते का? तर नाही. त्यांना मिळालेले यश हे सहजासहजी त्यांना प्राप्त झाले होते का? तर तेही नाही. त्यांच्या ठायी असलेली बेबी जिराफाची जिद्द तुमच्या लक्षात येईल. त्यांच्या आयुष्यात ही नित्यनियमित घडणारी गोष्ट असेल.

यशाचा मार्ग हा केव्हाही सोपा नसतो. यश मिळविण्यात अनेक अडथळे असतात आणि ते पार करताना तुम्हाला अनेक वेळा अपयशाला सामोरे जावे लागते. तुम्हाला अपयशाची झळ सोसावीच लागते. चटके सहन करावेच लागतात. तुम्ही दर वेळी जागे होऊन परत जोमाने आपल्या उद्दिष्टासाठी धडपडत राहिलात तर यश तुमच्यापासून दूर नसते. हेच तुमच्या आयुष्यात जरूर असणारे कौशल्य असते. यशस्वी माणसांना याच कौशल्याची सवय लागलेली असते.

❋ ❋ ❋

# यशाचे रहस्य

पुढे येणारी सफलता अनुभवण्यासाठी त्यापूर्वी येणारे अपयश कसे पचवायचे ते शिकावे लागते. हे ऐकायला सुद्धा चमत्कारिक वाटते ना? पण ज्याने हे विधान केले आहे त्याने आयुष्यात करोडो डॉलर्स कमावले आहेत. आजच्या काळातही त्यांनी मिळविलेली ही संपत्ती अफाटच म्हणावी लागेल. त्या दोन भावांचीच ही गोष्ट आहे.

इ. स. १९५८ मध्ये फ्रँक आणि डॅन कार्ने (Frank & Dan Carney) या दोन बंधूंचा छोटासा किराणा मालाचा घरगुतीच सुरू केलेला व्यवसाय होता. एक दिवस त्याच व्यवसायाच्या छोट्या जागेतच त्यांनी छोट्या प्रमाणावर पिझ्झा तयार करून मागणीप्रमाणे पुरवठा करायला प्रारंभ केला. वास्तविक त्यांच्या कॉलेज शिक्षणाच्या फीसाठी पूरक जोडधंदा म्हणून त्यांनी हा पिझ्झाचा व्यवसाय सुरू केला होता. हा व्यवसाय वाढत जाऊन त्याच्या अनेक शाखा त्या दोघांना सुरू कराव्या लागल्या; परंतु बरोबर १९ वर्षांनंतर फ्रँक कार्ने याने आपल्या ३२०० पिझ्झा हट या नावाची विक्री केंद्र मालिका तब्बल ३०० मिलीयन डॉलर्सना विकून टाकली. व्यवसाय नव्याने सुरू करणाऱ्या कोणाही माणसाला हे जरा न पटणारे चमत्कारिक वाटेल.

परंतु फ्रँक कार्ने त्यामागची त्याची भूमिका स्पष्ट करताना सांगतो की, ''मी जवळजवळ ५० एक व्यवसायात धाडसाने पाऊल टाकले होते. त्यापैकी साधारण १५ व्यवसायात मी यशस्वी झालो होतो. याचा अर्थ माझे यशस्वितेचे प्रमाण सर्वसाधारणपणे ३० टक्केच होते.'' क्रिकेटच्या खेळात संधी मिळताच सरसावून पुढे येऊन चेंडूला फटका मारावा लागतो. पण काही वेळा फटका मारून सावधपणाने पाऊल मागे टाकून क्रीझमध्ये परतसुद्धा जावे लागते. व्यवसायातही असेच धोरण असावे लागते.

फ्रँकला ते सुद्धा मान्य आहे की, पूर्वी त्याच्याकडून झालेल्या चुकांपासूनच तो शिकत गेला. आणि व्यवसायात हव्या तशा सुधारणा करीत गेला. उदाहरणार्थ, एका ठिकाणी सुरू केलेल्या पिझ्झा हटच्या विक्री केंद्राला अपयशाची कारणे शोधताना त्याच्या ध्यानात आले की त्याने त्या जागेची निवड चुकीची केली होती. शिवाय त्या जागेच्या आंतरभागाची सजावट कमी प्रतीची झाली होती. पुढच्या खेपेला योग्य जागेची निवड करून आतील सजावट उत्तम व झगमगीत करायला तो विसरला नाही. दुसऱ्या एका विक्री केंद्राच्या भागात त्याच्या स्पर्धकाने अधिक जोमाने धंदा केला. त्याला शह देण्यासाठी फ्रँकने आपल्या पिझ्झा बनविण्याच्या पद्धतीमध्येच आमूलाग्र बदल केला. पिझ्झाला खुसखुशीतपणा आणून तो जास्त चविष्ट करण्याचा प्रयत्न केला. पिझ्झावर घालण्याच्या वेगवेगळ्या पदार्थांची आणि पेस्टची पाककृतीच बदलून टाकली. हे करताना लोकांची आवड व मागणी याचा जाणिवपूर्वक बारकाईने विचार केला.

फ्रँकने केलेल्या या सततच्या प्रयत्नांमुळे सातत्याने यशश्री त्याच्या गळ्यात माळ घालीत होती. तसे बघितले तर फ्रँक कार्नेला अनेक वेळा अपयशाला सामोरे जावे लागले होते. परंतु या प्रतिकूल परिस्थितीचाच फ्रँकने आपल्या व्यवसायाच्या भरभराटीसाठी उपयोग करून घेतला. आपल्यापैकी प्रत्येकालाच अपयश अनुभवून ते मान्य करावे लागते.

प्रश्न फक्त असा असतो की, असे येणारे अपयश हे त्यानंतर येणाऱ्या यशाच्या आड येऊ देणारे की त्याच अपयशातून धडे घेऊन त्याचा वापर त्यापुढचे यश खेचून आणण्यासाठी करणार. फ्रँक कार्नेप्रमाणेच अपयशाचे रूपांतर भविष्यातील उज्ज्वल यशामध्ये करायला शिकले पाहिजे.

❋ ❋ ❋

# योजकता

एके दिवशी एक वाटसरू एका आडगावात येऊन पोहोचला. त्या गावात पोहोचताच क्षणी आपण रस्ता चुकल्याची त्याला खात्री पटली. त्याला त्या गावात हरवून गेल्यासारखे वाटले. त्याने त्या गावातील एका गावकऱ्याला थांबविले. वाटसरू त्या गावकऱ्याला म्हणाला, ''मित्रा मी रस्ता चुकलो असून गोंधळून गेलो आहे.'' गावकऱ्याने त्या वाटसरूला एकदा नीट न्याहाळले

आणि मग विचारले, ''तू नक्की कोठे आला आहेस याची तुला कल्पना आहे का?''

वाटसरू उत्तरला, ''हो तर. तुमच्या गावात शिरतानाच वेशीवर लावलेला तुमच्या गावाच्या नावाचा बोर्ड मी वाचला होता ना.'' गावकऱ्याने त्या वाटसरूला पुढचा प्रश्न विचारला, ''तुला कोठे जायचे आहे हे तुला माहीत आहे का?'' वाटसरूने झटकन 'हो' असे उत्तर दिले.

तितक्याच झटकन गावकरी म्हणाला, ''मग मित्रा तुझा गोंधळ होण्याचे काहीच कारण नाही. तू रस्ता चुकलेला नाहीस. तुझ्या इच्छित स्थळी पोहोचण्यासाठी कोणत्या दिशेने तुला मार्गक्रमण करायला हवे आहे ते समजले म्हणजे झाले.''

आपल्यापैकी अनेक जण या वाटसरूप्रमाणेच गोंधळलेल्या मन:स्थितीत असतात. आपण कोठे आहोत ते आपल्याला नक्की ठाऊक असते. अशी माणसे असमाधानी, मनाचा हिरमोड झालेले, निराशा पावलेले व त्याचमुळे मनाची उभारी आणि समतोल घालवलेल्या अवस्थेत असतात. याच वेळी त्या माणसांना आयुष्यात शांतता व संपूर्ण समाधान कोठे मिळेल हे ठाऊक असते. आयुष्यात त्यांना भरगोस स्वास्थ्य कसे व कोठे मिळेल याचीही कल्पना असते. त्या वाटसरूप्रमाणेच ही माणसे गोंधळून गेलेली असतात. अशा वेळी त्यांना जरूरी असते ती फक्त योग्य दिशा सापडण्याची. ती दिशा आणि त्या दिशेने यशाच्या शिखरावर जाण्याचा मुख्य मार्ग सापडणे ही तशी अवघड गोष्ट नसते. पण ती दिशा सापडून त्या दिशेच्या मार्गाने आक्रमण करण्यासाठी त्या क्षणी योग्य त्या योजनेची संकल्पाची नितांत आवश्यकता असते. त्या क्षणी योग्य मार्गदर्शनाची गरज असते. अशा वेळी त्या व्यक्तीला अचूक ध्येय, उद्दिष्ट डोळ्यांसमोर असावे लागते.

अमेरिकेतील एका विद्यापीठाच्या कुलगुरूंनी विद्यार्थ्यांना संदेश देताना म्हटले होते, ''तुमच्या आयुष्याची वाटचाल व उद्दिष्टे याबद्दल प्रथमपासून तुमच्या मनात योजना केली नसेल तर तुमचे आयुष्य तुम्ही मनात योजलेल्या उद्दिष्टांपर्यंत पोहोचूच शकणार नाही.'' (Your life cannot go according to plan, if you have no plans.)

❋ ❋ ❋

# रबरी फुगे आणि जीवनातील आनंद

एकदा व्यावसायिक ५० लोकांचा परिसंवाद चालू होता. अचानक व्याख्यात्याने जमलेल्या प्रत्येकाच्या हातात एक रबरी फुगा दिला आणि प्रत्येकाला एक मार्कर पेन पण दिले होते. तो फुगवून त्यावर स्वत:चे नाव मार्कर पेनने लिहायला सांगितले. सर्व फुगे गोळा करून ते जवळच्या दुसऱ्या खोलीत सोडण्यात आले. त्यानंतर सर्व प्रतिनिधींना त्या खोलीत जाण्यास सांगितले. खोलीत शिरल्यापासून पाच मिनिटांच्या आत प्रत्येकाने आपले नाव लिहिले असलेला फुगा घेऊन परत येण्यास सांगितले.

खोलीत गेल्यानंतर प्रत्येक प्रतिनिधी जिवाच्या कराराने स्वत:चे नाव लिहिलेला फुगा पकडण्यासाठी धडपडत होता. तसे करताना ते एकमेकांना ढकलत होते, एकमेकांवर आदळत होते. त्या खोलीत एकूण गोंधळ माजला. पाच मिनिटे पुरी झाल्यावर एकालाही आपल्या नावाचा फुगा हातात मिळाला नाही. त्यानंतर प्रत्येकाने मिळेल तो फुगा पकडून त्याच्यावर नाव असलेल्या व्यक्तीच्या ताब्यात तो देण्यास सांगण्यात आले. पाच मिनिटांपेक्षा कमी वेळात सर्वांच्या हातात स्वत:चे नाव लिहिलेला फुगा होता.

व्याख्याताने बोलायला सुरूवात केली. ''हेच आणि अगदी असेच आपल्या आयुष्यात घडत असते. प्रत्येक माणूस जिवाच्या कराराने आपल्या आनंदाचा शोध घेण्यासाठी धडपड करीत असतो. तो आनंद कशात मिळणार आहे हे कोणालाच समजत नाही.'

**तात्पर्य** : दुसऱ्याच्या आनंदात आपला आनंद लपलेला असतो. त्यांना त्यांचा आनंद द्या, तुम्हाला तुमचा आनंद आपोआप मिळेल.

❋ ❋ ❋

# रागावर नियंत्रण

एकदा एक स्त्री विमान प्रवासास निघाली होती. विमान निघण्याच्या वेळेस अजून बराच वेळ होता. आपले सामान चेक ईन करून शांतपणे बसावे म्हणून ती उड्डाणपूर्व विश्रांतीसाठी असणाऱ्या वेटिंग लाँचमध्ये जाण्यास निघते. विमान उड्डाणाला बाकी असणारा बराच वेळ काढण्यासाठी ती एक पुस्तक विकत घेते. त्याबरोबरच टाईमपास करण्यासाठी खाण्यासाठी नानकटाईचे एक पॅकेटही विकत घेते. अशा प्रकारे निवांत आरामात वेळ काढण्याच्या तयारीने ती स्त्री त्या भव्य विमानतळाच्या व्हीआयपी कक्षांतील एका खुर्चीवर स्थानापन्न होते. तिच्या शेजारच्या टेबलानंतरच्या आरामखुर्चीवर एक सद्गृहस्थ बसलेला असतो. तो एका मासिकात डोके खुपसून वाचन करण्यात गुंग असतो. त्या दोघांच्या मधील टीपॉयवर एक नानकटाईचे पॅकेट उघडे करून ठेवलेले असते.

ठरल्याप्रमाणे ती पुस्तक वाचता वाचता शेजारी असलेल्या नानकटाईपैकी एक उचलून खाऊ लागते. जेव्हा ती पहिली नानकटाई खाते, त्याचबरोबर शेजारी बसलेला अनोळखी गृहस्थही त्यातील एक नानकटाई उचलून खातो. ते लक्षात येताच तिला खूप राग येतो. परंतु ती काहीही बोलण्याचे टाळते. ती मनात विचार करते, ''काय माणूस आहे? खरं तर त्याला हे कृत्य करण्याची अद्दल घडावी यासाठी त्याच्या डोळ्यांवर एक जोरात फटका मारावासा वाटतो आहे. पण....

त्यानंतर तिने एक नानकटाई उचलली की, तो शेजारी पण लगेच एक नानकटाई उचलत होता. या प्रकारामुळे तिचा रागाचा पारा अस्मानाला जाऊन भिडला होता. पण स्वत:वर नियंत्रण ठेवून तिने निश्चयपूर्वक त्याच्या कृतीवर प्रतिकार दर्शविला नाही. सरतेशेवटी पॅकेटमध्ये एकच नानकटाई शिल्लक राहिली. तिने विचार केला आता हा सद्गृहस्थ काय करतो ते पाहूच या. त्या गृहस्थाने शांतपणे बरोबर मध्यावर तोडून त्या नानकटाईचे दोन भाग केले. त्यातील एक भाग स्वत: खाल्ला व दुसरा शेजारी बसलेल्या स्त्रीसाठी ठेवून दिला.

संतापाने लाल होऊन ती स्त्री मनात म्हणाली, ''आता मात्र हद्द झाली हं!'' तिथून ताडकन् ती उठली. आपले इतर सामान हातात घेतले. बोर्डिंग पास हातात घेतला व विमानात बसण्याच्या दिशेने चालायला लागली. विमानात बसण्याची सूचना मिळताच विमानात आपल्या जागेवर जाऊन बसली. त्यानंतर आपला चश्मा व इतर काही वस्तू ठेवण्यासाठी जवळची पर्स उघडली. पाहते तो काय? पर्समध्ये तिने विकत घेतलेला नानकटाईचा पॅक जशाचा तसा होता. अगदी हात न लावलेला, न उघडलेला.

हे पाहताच खरा प्रकार तिच्या लक्षात आला. शरमेने तिला मेल्याहून मेल्यासारखे वाटले. नानकटाई विकत घेतल्यानंतर ते पॅकेट तिने पर्समध्ये ठेवल्याचा तिला पूर्ण विसर पडला होता.

याचाच अर्थ आपल्या नानकटाई त्या गृहस्थाने खाल्ल्या नाहीत तर उलट त्याच्याच नानकटाई आपण फस्त केल्या. शिवाय हे आपण करीत असताना त्या माणसाच्या चेहऱ्यावर पुसटशी सुद्धा रागाची रेघ उमटली नाही. किंवा त्याच्या डोळ्यांत आपल्याविषयी तिरस्काराची भावना उमटली नाही. स्वत: निष्कारण रागावल्याबद्दल व त्याच्याविषयी गैरसमज करून घेतल्याबद्दल तिची तिलाच घृणा वाटू लागली.

पण आता काय उपयोग? झाल्या प्रकाराबद्दल माफी मागण्याची संधी पण तिला उपलब्ध नव्हती.

केलेल्या कृत्याचे स्पष्टीकरण देऊन त्या गृहस्थाजवळ दिलगिरी व्यक्त करण्यासाठी वेळही नव्हता व तो गृहस्थही तिथे नव्हता. स्वत:ला दोष देत बसून राहाण्यापलिकडे तिला काहीच करता आले नाही.

काही गोष्टी घडून गेल्यानंतर त्या परत फिरवता येत नाहीत, जसे फेकलेला दगड एकदा हातातून सुटला की, मारलेला बाण एकदा धनुष्याच्या दोरीवरून सुटला की, मिळालेली संधी एकदा निसटून गेली की, येणारी वेळ एकदा टळून गेली की, तोंडातून बाहेर पडलेला शब्द एकदा तोंडातून बाहेर पडला की.

❋ ❋ ❋

# लक्षाधीश

नोकरीच्या शोधात असणाऱ्या एका बेकार तरुणाने एका सॉफ्टवेअर कंपनीमध्ये शिपायाच्या नोकरीसाठी अर्ज केला. रितसर त्याला कंपनीकडून मुलाखतीसाठी बोलावणे आले. सर्व माहिती दिल्यानंतर त्याची मुलाखत घेण्यात आली. परीक्षा म्हणून त्याला फरशी साफ करण्यास सांगण्यात आले. सर्व बाबतीत तो कामाला योग्य ठरल्यानंतर त्याला नोकरीत घेण्यात आल्याचे सांगण्यात आले. त्यानंतर त्याला विचारण्यात आले, ''तुझा ईमेल पत्ता काय आहे? म्हणजे त्यावर तुला योग्य तो अर्ज पाठवू. तो तू भरून पाठविलास की नंतर कामावर केव्हापासून रुजू व्हायचे ते तुला कळविण्यात येईल.''

त्या गरीब माणसाकडे ईमेल कोठून असणार?

त्याने आर्जवाने सांगितले, ''माझ्याकडे कॉम्प्युटर नाही आणि ईमेल ॲड्रेसही नाही.''

त्यावर त्याला सांगण्यात आले, ''माफ कर, तुझ्याकडे ईमेल ॲड्रेस नाही म्हणजे तू अस्तित्वातच नाहीस आणि जो अस्तित्वातच नाही त्याला आम्ही नोकरी कशी काय देऊ शकणार?''

नोकरी मिळण्याची आशा सोडून तो तिथून बाहेर पडला. काय करावे हे त्याला सुचेना. त्याच्या खिशात त्यावेळी जेमतेम रु.१००/- होते. त्याने शेवटी काहीतरी छोटा व्यवसाय करून पैसे मिळविण्याचे ठरविले. तो तसाच घाऊक भाजी मार्केटमध्ये गेला. जवळच्या रु.१००/- चे टोमॅटो विकत घेतले. घरोघर हिंडून त्याने ते टोमॅटो किरकोळ भावाने विकले. दोन तासात त्याच्याजवळचे पैसे दुप्पट झाले. पुन्हा त्या पैशाचे त्याने घाऊक बाजारातून टोमॅटो घेऊन किरकोळ भावाने दारोदार हिंडून विकले. त्या दिवशी त्याने असा व्यवसाय तीन वेळा केला. त्याला त्यामध्ये चांगली कमाई झाली. असा व्यवसाय करून आपण आपला चरितार्थ नीट सांभाळू शकू असा विश्वास त्याला निर्माण झाला.

रोज सकाळी लवकर उठून तो व्यवसाय करायला सुरुवात करीत असे. सायंकाळपर्यंत न थकता, न कंटाळता तो व्यवसाय करु लागला. त्याच्या जवळची पुंजी रोज वाढतच गेली. लवकरच त्याने एक हातगाडी, मग एक टेंपो व काही दिवसांनंतर त्याने एक ट्रक विकत घेतला. त्याचा धंद्याचा पसारा वाढला. लवकरच त्याच्याकडे डिलिव्हरी वाहनांचा ताफाच जमा झाला. पांच दहा वर्षांत तो मोठया व्यापाऱ्यांमध्ये गणला जाऊ लागला. त्याने आपल्या कुटुंबाचे राहणीमान बदलून टाकले. कुटुंबाच्या प्रत्येक घटकाच्या भविष्याचा विचार करून तो नियोजन करू लागला. त्यांच्या भविष्याच्या तरतुदीसाठी त्याने विमा उतरविण्याचे ठरविले.

त्याने विमा एजंटना बोलावून योग्य त्या व हव्या असलेल्या तरतुदी असणाऱ्या विमा पॉलिसीजची निवड केली. जेव्हा विमा एजंटबरोबरची चर्चा संपून त्याने विमा पॉलिसीजची निवड केली तेव्हा विमा एजंटने त्याला विचारले, ''तुमचा ईमेल ॲड्रेस काय आहे?'' आपला ईमेल ॲड्रेस नसल्याचे सांगताच विमा एजंट आश्चर्यचकित होऊन त्याला म्हणाला, ''काय सांगता काय? तुमचा ईमेल ॲड्रेस नाही? अहो मग हा व्यवसायाचा प्रचंड व्याप आपण कसा काय सांभाळू शकता? तुम्हाला कल्पना आहे का? तुमचा ईमेल ॲड्रेस असता तर आज तुम्ही कोठच्या कोठे पोहोचला असता.''

त्या व्यावसायिकाने दोन मिनिटे स्तब्धता पाळली अन् मग शांतपणे म्हणाला, ''हो मला कल्पना आहे. माझ्याजवळ ईमेल ॲड्रेस असता तर आजही मी एका संगणक कंपनीमध्ये फरशा पुसणारा शिपाई असतो.''

याचे तात्पर्य म्हणजे,

१. इंटरनेट हे तुमचे आयुष्य घडविण्याचे साधन अजिबात नाही.

२. तुमच्याजवळ संगणक व पर्यायाने इंटरनेट, ईमेल नसेल तरीही कठोर परिश्रमाच्या जोरावर तुम्ही कोट्यधीश होऊ शकता.

❋ ❋ ❋

# वाहून गेलेले दूध

ही गोष्ट एका अत्यंत विद्वान शास्त्रज्ञाची आहे. त्याने वैद्यकीय विषयात संशोधन करून अनेक महत्त्वाचे शोध लावले आहेत. एका वर्तमानपत्राच्या प्रतिनिधीने त्याची मुलाखत घेताना त्याला विचारले, ''सामान्य माणसापेक्षा तुम्ही अधिक कल्पक कसे काय होऊ शकलात? इतरांपेक्षा आपण वेगळे कसे घडू शकलात?''

त्याने सांगितले, ''मला असे वाटते की ही माझ्या आईने मला दिलेली देणगी आहे. त्यावेळी मी जेमतेम दोन किंवा तीन वर्षांचा असेन. मी रेफ्रिजरेटरमधून दुधाची बाटली बाहेर काढण्याचा प्रयत्न करीत होतो. दुधाची बाटली गुळगुळीत झाली होती. माझ्या हाताची पकड सुटली. बाटली खाली पडली आणि त्यातील दूध फरशीवर पसरून त्याची नदी झाली.

थोड्या वेळाने माझी आई स्वयंपाकघरात आली. तिने ते पाहिले. झाल्या गोष्टीबद्दल मला रागे भरण्याऐवजी, एक मोठे भाषण ऐकविण्याऐवजी, माझ्यावर ओरडण्याऐवजी किंवा कोणतीही शिक्षा करण्याऐवजी ती म्हणाली, ''काय सुंदर राडा करून टाकला आहेस रे! दुधाची अशी वाहती नदी मी कधीच पाहिली नव्हती. दुधाचे मस्त डबके तयार झाले आहे. जाऊ दे. जे व्हायचे ते नुकसान तर होऊन गेले आहे. अर्थातच आता आपल्याला हे सगळे साफ करून निस्तरले पाहिजे. तू कसे काय करशील सांग पाहू. आपण स्पंज, टॉवेल का पोतेरे वापरू या? तुला काय घ्यावेसे वाटते?'' त्याने स्पंज पसंत केला. आईच्या मदतीने सगळी घाण स्वच्छ केली. फरशी पूर्ववत साफ झाली. दुधाचे तयार झालेले डबके पुसून निघाले.

त्यानंतर त्याची आई त्याला म्हणाली, ''हे पाहा, आपल्या लक्षात आले की आपले काय चुकले. तुझ्या लहानशा दोन हातानी दुधाची मोठी बाटली रेफ्रीजरेटरमधून बाहेर काढण्याचा तुझा प्रयत्न फसला. चला आपण आता बाहेर मागच्या अंगणात जाऊ. आता दुधाची रिकामी झालेली बाटली पाण्याने भर. ती तुझ्या हाताने वरच्या बाजूला पकडून खाली न पाडता दुसरीकडे नेता येते का ते पहा बरे.'' त्या प्रयत्नात त्या लहान मुलाला कळून चुकले की, दुधाची भरलेली बाटली जर तिच्या वरच्या बाजूला झाकणाच्या जागी दोन्ही हातांनी घट्ट पकडली तर ती न पडता हलविता येते. काय अभिनव सुंदर रितीने एक नवीन धडा शिकून झाला होता.

त्यानंतर तो शास्त्रज्ञ म्हणाला, ''त्याच वेळी माझ्या लक्षात आले की कोणतीही चूक झाली तरी घाबरण्याचे कारण नसते. त्याऐवजी चुका होणे हे नवीन संधी उपलब्ध होऊन काहीतरी नवीन शिकण्याचे साधन ठरते. शास्त्रज्ञ कोणत्याही संशोधनासाठी हेच तर प्रयोगातून साध्य करीत असतात. कोणताही प्रयोग फसला तरी त्यातून नवीन काहीतरी महत्त्वाचे निष्कर्ष हाती लागलेले असतात.''

यालाच तर शोध लागणे म्हणतात. हीच शिकत राहण्याची व कल्पकतेची वाटचाल आहे.

❋ ❋ ❋

# विक्रेत्याचे आवश्यक गुण

दुपारची वेळ होती. नव्यानेच बांधकाम झालेल्या उच्चवर्णीयांच्या वस्तीची कॉलनी होती. नीरव शांतता होती. व्हॅक्युम क्लीनरच्या एका नामांकित कंपनीचा एक इच्छुक तरूण उत्साही विक्रेता मोठ्या आशेने त्या भागाची निवड करून आलेला असतो. त्यापैकी एका घराच्या प्रवेशद्वारापाशी येऊन उभा राहतो. दुपारच्या उन्हामुळे चेहऱ्यावर आलेला घाम खिशातील रूमालाला टिपतो. तोंडावर विक्रेत्याचे खोटे हसू चढवतो. दरवाजावरची बेल दाबतो. बऱ्याच वेळ त्याला प्रतिसाद मिळत नाही. हे पाहून तो दारावर टकटक करतो.

आतून एक प्रसन्न व्यक्तिमत्त्वाची तरूणी दार उघडते. समोर आलेल्या संभाव्य ग्राहकाची संधी जाणून क्षणाचाही विलंब न

लावता तो विक्रेता तडक घरात घुसतो. समोरच्या प्रशस्त दिवाणखाण्यात आपल्या हातातील बॅगा खाली ठेवतो. ती तरुणी काही बोलण्याच्या आतच त्यानी आणलेल्या काळ्या प्लास्टिक बॅगेतून आणलेले शेण व इतर घाण त्या दिवाणखान्यातील स्वच्छ व सुंदर अशा मऊ मऊ गालिच्यावर इतस्तत: पसरतो. क्षणार्धात तो सुंदर गालिचा गलिच्छ दिसू लागतो.

त्या तरुणीचा चेहरा पार कडवट होतो. परंतु तो विक्रेता मात्र स्वत:च्या चेहऱ्यावरील उत्साह व हसू मावळू न देता एका दमात उद्‌गारतो, ''मॅडम, मी आणलेल्या या व्हॅक्युम क्लीनरने काही मिनिटांत हा सर्व गालिचा स्वच्छ करून पूर्ववत करतो. कारण मी दाखवित असलेले हे मशिन अत्यंत प्रबल, शक्तिमान, व आधुनिक तंत्रज्ञानयुक्त आहे. तुम्हाला शपथेवर सांगतो की, हे जर मी करू शकलो नाही तर खाली टाकलेली घाण मी माझ्या हाताने नाही तर जिभेने साफ करीन.''

यावर त्या तरुणीने विचारणा केली, ''ठीक आहे, ते करण्यासाठी त्याबरोबर चवीसाठी तुम्हाला टोमॅटो केचप व मिरचीचे लोणचे लागेल ना? मी ते लगेच घेऊन येते.''

विक्रेता अवाक होऊन त्याने विचारले, ''मॅडम असे का विचारता आपण?''

हतबल व दिग्मूढ झालेली ती तरूणी थोडी नाराजीनेच उत्तरते, ''अरे भल्या गृहस्था, आम्ही आजच या घरात राहायला आलो असून गालिचासह सर्व सामान नव्याने खरेदी केले आहे. शिवाय या भागात अजून विजेचे कनेक्शन आलेले नाही.''

हे ऐकताच त्या विक्रेत्याचा चेहरा कसा झाला असेल ते सांगण्याची गरज नाही.

**तात्पर्य** : कोणताही नवीन प्रकल्प वा काम सुरू करण्यापूर्वी सर्व माहिती व परिस्थिती जाणून घेऊनच कामाला प्रारंभ करावा.

❋ ❋ ❋

## विचाराचे वेगळे वळण - सुखदु:खाचे वाटेकरी

**ही** गोष्ट वाचायला तुम्हाला फक्त एक मिनिट वेळ लागेल परंतु त्यानंतर तुमच्या विचारांना नक्की वेगळे वळण लागेल.

दोन वयस्कर पण खूप गंभीर आजाराने ग्रस्त असलेले रुग्ण एका दवाखान्यात एकाच खोलीत दोन बेडवर औषधोपचार करून घेत होते. त्या दोघांपैकी एकाला दिवसभरातील एक तास उठून बसायला परवानगी दिली होती. त्यायोगे त्याच्या छातीत जमा होत असलेले पाणी व द्रव बाहेर पडण्यास उपयोग होत असे. त्या रूमला असलेल्या एकमेव खिडकीजवळ त्याचा बिछाना होता. दुसरा आजारी गृहस्थ रूमच्या दुसऱ्या भिंतीलगतच्या बेडवर होता. तो दिवसभर उताणा निजूनच राहात असे. त्याला उठून बसायला परवानगी नव्हती.

दोघेही आजारी वृद्ध दिवसभर अखंड गप्पा करीत असत. ते त्यांच्या पत्नीविषयी, कुटुंबाविषयी, घराविषयी, त्यांच्या नोकरी विषयी, त्यांच्या सामाजिक आयुष्याविषयी, त्यांनी केलेल्या मागील आयुष्यातील प्रवासाविषयी एकमेकांना भरभरुन सांगत असत.

रोज दुपारी जेव्हा खिडकीजवळचा आजारी एक तास उठून बसत असे, तेव्हा तो खिडकीबाहेर घडत असलेल्या सर्व घटनांचे रसभरीत वर्णन करून आपल्या रूमपार्टनर असलेल्या दुसऱ्या आजाऱ्याला सांगत असे. तोही बेडवर पडल्या पडल्याच ते सर्व ऐकून आनंद घेत असे. सतत बेडवर आडवे पडून राहिल्यामुळे त्याचे कंटाळवाणे झालेले आयुष्य जरा सुसह्य होत असे. वर्णन ऐकून तो बाहेरच्या जगात सुरू असलेल्या घटना कल्पनेने डोळ्यांसमोर आणून त्यातील गंमत व रंगबेरंग अनुभवत असे.

खिडकीजवळचा आजारी वर्णन करीत असे, खिडकीच्या बाहेर जवळच असलेल्या बागेत एक सुंदर तळे असून त्यामध्ये बदके आणि राजहंस मजेत विहार करत असत. लहान मुले त्या पाण्यामध्ये कागदाच्या बोटी सोडीत असत, तरूण तरूणीच्या जोड्या एकमेकांचे हातात हात घालून तळ्याच्या काठावर हिंडत असत. रंगीबेरंगी आणि वेगवेगळे फुलांचे ताटवे बागेमध्ये फुललेले असत. तळ्याच्या दुसऱ्या टोकाला दूरवर शहरातील उंच इमारतींनी केलेली रांग आकाशाला छेद देऊन जात असे.

खिडकीजवळच्या माणसाने केलेले हे बाहेरच्या जगाचे अप्रतिम वर्णन ऐकून बेडवर निजून असलेला त्याचा रूमपार्टनर डोळे

मिटून मनात ते साठवून ठेवत असे. मिटल्या डोळ्यांसमोर त्याला ऐकत असलेले दृश्य जसेच्या तसे उभे राहत असे. एका उबदार दुपारी खिडकीजवळच्या व्यक्तीने बाहेर रस्त्यावरून जाणाऱ्या सैनिकांच्या परेडचे व त्याबरोबर असणाऱ्या बँडचे बहारदार वर्णन केले. ऐकणाऱ्याला तो बँडचा आवाज ऐकू आला नाही तरी मनाच्या डोळ्यांनी त्याने ऐकत असलेले वर्णन दृष्टीसमोर उभे केले.

दिवसामागून दिवस, आठवड्यामागून आठवडे आणि महिन्यांमागून महिने उलटत होते.

एके दिवशी सकाळी नित्यनियमाप्रमाणे दिवसाच्या परिचारिकेने त्या दोघांच्या आंघोळीसाठी बादलीतून पाणी आणले. खिडकीजवळच्या पेशंट जवळ जाताच तिला धक्का बसला. त्या आजारी वृद्धाने रात्री शांतपणे शेवटचा श्वास घेतला होता. त्याचे निचेष्ट शरीर खिडकीजवळच्या पलंगावर होते. परिचारिकेला फार वाईट वाटले; पण कर्तव्य म्हणून तिने दवाखान्याच्या संबंधित व्यक्तीला त्याची बॉडी नेण्यासाठी विनंती केली.

दिवसभरात संधी मिळताच दुसऱ्या आजारी व्यक्तीने विनंती केली की त्याला रिकाम्या झालेल्या त्या खिडकीजवळच्या जागी हालवावे. दवाखान्याच्या परिचारिकेने त्याची विनंती मान्य करून त्याला खिडकीजवळ नेले. तो त्या जागी नीट स्थिरस्थावर झाल्यावर ती परिचारिका त्याला सोडून आपल्या कामाला निघून गेली.

खूप कष्टदायक असूनही त्याने महद्प्रयासाने हाताच्या कोपरावर जोर देऊन स्वत:ला थोडेसे खिडकीच्या टोकापाशी आणले. कसेतरी त्याने खिडकीच्या बाहेर पाहून बाहेरच्या जगाचे दर्शन घेण्याचा प्रयत्न केला.

बाहेर त्याची नजर जाताच त्याला आश्चर्याचा जबरदस्त धक्का बसला. खिडकीच्या लगत फक्त एक उंच भिंत होती. त्या पलीकडचे काहीही दिसणे शक्य नव्हते.

काही वेळानंतर जेव्हा परिचारिका आली तेव्हा त्याने तिला विचारले, माझ्या त्या दिवंगत रुमपार्टनरला गेले कित्येक दिवस असे रसभरीत वर्णन करायला का भाग पडले असेल? काय कारण झाले असेल?

त्या परिचारिकेने अचंबा वाटून सांगितले की, ''आश्चर्य आहे कारण तो गृहस्थ ठार आंधळा होता. त्याला जवळची भिंत सुद्धा दिसणे शक्य नव्हते. कदाचित तुमचा उत्साह द्विगुणित होऊन तुम्हाला लवकर आराम पडावा म्हणून त्याने असे वर्णन करून तुमचे मनोरंजन केले असेल.''

या गोष्टीचे भरतवाक्य म्हणून आपल्याला असे म्हणता येईल की,

स्वत: कितीही दु:खात अगर कठीण प्रसंगात असलात तरी त्या परिस्थितीतही दुसऱ्याला सुखी करण्यात मिळणाऱ्या आनंदाला सीमा नसते.

दु:खात वाटेकरी झाल्यावर दुसऱ्याचे दु:ख निम्मे होते; पण दुसऱ्याचे सुखात सहभागी झाल्यास सुख दुप्पट होते.

तुम्हाला श्रीमंत व्हावे असे वाटत असेल तर पैशाने विकत न घेता येणाऱ्या किती गोष्टी तुमच्याजवळ आहेत याची मोजदाद करा. त्या जितक्या जास्त तितके जास्त तुम्ही श्रीमंत आहात असे समजा.

❃ ❃ ❃

# विहिरीत पडलेले गाढव

एक दिवस एका शेतकऱ्याचे गाढव शेतातल्या विहिरीमध्ये पडले. खाली पडल्यावर गाढव जीव तोडून केविलवाण्या स्वरात रडत होते. शेतकरी त्याला बाहेर कसे काढायचे याचा विचार करीत होता. काहीच उपाय मिळत नाही असे समजल्यानंतर त्याने विचार केला, नाहीतरी गाढव खूप म्हातारे झाले आहे. त्याचा आता कामासाठी काहीच उपयोग नाही. त्याला वर काढून तरी काय उपयोग?

अशा विचाराने त्या शेतकऱ्याने आसपासच्या लोकांना मदतीसाठी हाक दिली. बरेच लोक जमा झाले. ते सगळे फावडी आणि घमेली घेऊन आले. प्रत्येक जण घमेलेभर माती विहिरीमध्ये टाकू लागला. सुरुवातीला गाढवाला काय चालले आहे

त्याचा अंदाज येत नव्हता. अंगावर माती पडली की तो घाबरून किंचाळत असे. काही वेळानंतर ते बरेच शांत झाले. ते पाहून जमलेल्या सर्वांना आश्चर्य वाटले.

आणखी काही घमेली माती विहिरीत टाकून झाल्यावर शेतकऱ्याने कुतूहलाने विहिरीत डोकावून पाहिले. त्यालाही आश्चर्याचा धक्का बसला. प्रत्येक वेळी मातीचे घमेले विहिरीत ओतले गेले की ते गाढवाच्या पाठीवर पडत असे. त्या बरोबर ते गाढव एक अद्‌भुत प्रतिक्रिया देत असे. ते आपली पाठ जोराने हालवित असे. त्याबरोबर एक उडी मारत असे. त्यामुळे तो दरवेळी थोडा थोडा उंच बनलेल्या मातीच्या ढिगावर चढत असे.

जसजसे शेतकरी आणि जमलेले गावकरी त्या गाढवावर माती ओतत होते तसतसे ते गाढव वर वर येत असे. एक वेळ अशी आली की गाढव विहिरीच्या तोंडापाशी येऊन पोहोचले. त्या बरोबर गाढव टुणकन उडी मारून जमिनीवर येऊन उभे राहिले. त्या आनंदाप्रीत्यर्थ ते जोरजोराने ओरडू लागले.

**तात्पर्य** : आयुष्यात तुमच्यावर पुष्कळ वेळा सर्व प्रकारची चिखलफेक होईल. विहिरीतून बाहेर पडण्यासाठी गाढवाने एक युक्ती केली. पाठीवरची माती झटकून टाकली पाहिजे. विहिरीच्या तळाशी नुसते थांबून आपण वर कधीच येऊ शकणार नाही. हतबल होऊन प्रयत्न सोडून चालणार नाही. झटकून टाका आणि एक छोटीशी उंच उडी मारा. तुम्हाला परत ताठ उभे राहता येईल.

❋ ❋ ❋

# शब्दांचे सामर्थ्य

एकदा एका जंगलातून बेडकांचा समूह एकत्रपणे मार्गक्रमणा करीत होता. चालता चालता अचानकपणे त्यांच्यापैकी दोन बेडूक पाणी असलेल्या एका खोल खड्ड्यात पडतात. त्या दोन बेडकांचे बाकीचे साथीदार त्या खोल खड्ड्याच्या भोवती जमा होतात. त्यांना जेव्हा तो खड्डा खूप खोल असल्याची जाणीव होते तेव्हा खड्ड्याभोवती जमलेले ते बेडूक आत पडलेल्या त्या दोन दुर्दैवी बेडकांना म्हणतात, ''आता काही तुम्ही या खड्ड्याबाहेर सहीसलामतपणे येऊ शकणार नाही.''

ते बोलणे ऐकूनही खोल खड्ड्यात पडलेल्या त्या बेडकांनी त्याकडे दुर्लक्ष केले आणि त्या खड्ड्यामधून उड्या मारुन बाहेर पडण्याचे आपले प्रयत्न चालूच ठेवले. काठावर बसलेले इतर बेडूक मात्र त्यांना ओरडून सांगत होते की, ''तुम्ही विनाकारण प्रयत्न करू नका. आता तुम्ही जवळजवळ मेल्यातच जमा आहात.'' शेवटी त्या दोन अभागी बेडकांपैकी एका बेडकाने काठावर असलेल्या साथीदार बेडकांचा सल्ला ग्राह्य मानला आणि आपले वर येण्याचे प्रयत्न थांबविले. तो त्या खड्ड्याच्या तळाशी गेला व थोड्याच वेळात मरण पावला.

दुसऱ्या बेडकाने मात्र आपले प्रयत्न चालूच ठेवले. प्रत्येक वेळी तो जास्तीत जास्त उंच उडी मारण्याचा प्रयत्न करीत राहिला. पुन्हा एकदा काठावर गर्दी केलेल्या बेडकांनी खाली पडलेल्या बेडकाला सांगितले की, ''तुझे निरर्थक प्रयत्न थांबव. आणि शांतपणे मरणाला सामोरे जा.'' त्याला असा निर्वाणीचा सल्ला त्याच्या साथीदारांनी दिला. त्याकडे दुर्लक्ष करुन तो बेडूक निर्धाराने प्रयत्न करीतच राहिला. त्याने जिवाच्या कराराने आणखी एक उंच उडी मारली. त्याच्या प्रयत्नांना यश आले व तो बेडूक काठावर येऊन पोहोचला. तेव्हा इतर बेडकांनी त्याला विचारले, ''आम्ही सांगत असूनही तू तुझे उड्या मारणे थांबविले कसे नाहीस? तू आमचा आवाज ऐकत होतास का?''

त्या बेडकाने तो बहिरा असल्याचे इतर बेडकांना सांगितले आणि त्याची समजूत झाली होती की, काठावरचे बेडूक त्याला उंच उडी मारण्यासाठीच प्रोत्साहन देत होते.

या गोष्टीतून आपल्याला दोन तात्पर्य मिळतात.

* जिभेवरील शब्दामध्ये जीवन मरणाची ताकद सामावलेली असते. अवसान गळलेल्या एखाद्या माणसाला केवळ शाब्दिक प्रोत्साहन उत्साहित करू शकते. तो दिवस त्या माणसासाठी अविस्मरणीय ठरू शकतो.

* कोणी एखादा हतबल किंवा अवसान गळालेल्या अवस्थेत असेल व त्याचवेळी जर त्याला नाऊमेद करण्याचे किंवा घात होण्याचे बोल ऐकायला मिळाले तर ते शब्दच त्याला मरणयातना देऊ शकतात. म्हणूनच तोंडातून शब्द बाहेर पडताना प्रत्येकाने काळजीपूर्वक वक्तव्य करायला हवे.

शब्दांना फार मोठे सामर्थ्य असते. दुसऱ्यांना प्रोत्साहन देणारे शब्द त्या माणसाच्या आयुष्यात किती महत्त्वपूर्ण ठरतात हे समजणे फार कठीण असते. त्याच्या उलट दुसऱ्याच्या अडचणींच्या काळात त्याला मानसिक क्लेश देणारे शब्द त्या माणसाचे मनोधैर्य खच्ची करुन टाकतात. जो मनुष्य दुसऱ्यांना शब्दाने नेहमी प्रोत्साहन देतो तो थोरच मानला पाहिजे.

❋ ❋ ❋

## शांततेचा खरा अर्थ

एक राजा कलागुणांचा भोक्ता होता. त्याने एक दिवस एक स्पर्धा जाहीर केली. जो कोणी शांततेचे सर्वांत योग्य व सुंदर चित्र काढेल त्याला मोठे बक्षीस जाहीर केले होते. राज्यातील अनेक कलाकारांनी आपल्या कल्पनेमधून चित्र रंगविले होते. राजाने सगळी चित्रे पाहून त्यातील फक्त दोनच चित्रे पसंत केली. त्या दोन चित्रांपैकी एका चित्राला बक्षीस द्यायचे होते.

एका कलाकाराने आपल्या चित्रात एक शांत तळे रंगविले होते. चित्र अतिशय रेखीव व सुंदर रंगविले होते. तळ्याचे पाणी म्हणजे शांततेचा अथांग पसरलेला, पाण्यात पडलेला शांततेचा आरसाच होता. तळयाच्या वर आकाशात निळे प्रसन्न आभाळ होते. तळ्याभोवती उंच पर्वतराजांची गगनचुंबी माळ होती. कापसासारखे मऊ मऊ असे ढग होते. सर्वांना वाटले की हेच चित्र पहिल्या नंबरचे मानकरी ठरणार. शांततेचे सगळे गहिरे रंग त्या चित्रात भरलेले होते.

दुसऱ्या कलाकाराने रंगवलेल्या चित्रातही पर्वतराज होते. पण ते खडकाळ, खडबडीत आणि ओसाड होते. आकाश निरभ्र नव्हते तर त्याने रौद्र स्वरूप धारण केलेले होते. विजांचा लखलखाट होत होता आणि पावसाने जोर धरला होता. डोंगरमाथ्यावरून फेसाळलेल्या पाण्याचा धबधबा कोसळत होता. या सर्व चित्रातून शांतता थोडीही प्रतिबिंबित होत नव्हती.

राजाने ते चित्र निरखून पाहिले. त्या चित्रात एका डोंगराच्या कपारीत धबधब्याच्या बाजूला एक झुडूप होते. त्या छोट्याशा झुडपावर एका पक्षिणेने आपले घरटे बांधले होते. त्या खळाळत्या धबधब्याच्या कोसळणाऱ्या पाण्यात आपल्या घरट्यात शांतपणे बसलेला तो पक्षी मोठा लोभस दिसत होता. तो भोवतालच्या निसर्गाच्या रौद्र वातावरणात शांत बसला होता.

या दोनपैकी कोणत्या चित्राला बक्षीस मिळाले असेल असे वाटते? राजाने दुसऱ्या चित्रास पसंती दिली. कारण काय ठाऊक आहे?

राजाने त्याचे कारण सांगितले, ''शांतता याचा अर्थ जिथे कसलाच आवाज नसेल, कसलाच त्रास नसेल, किंवा काहीही कठीण काम नसेल अशा जागी आपण असणे असा साधा अर्थ नसतो. अशा सर्व गोंधळात, गडबडीत असूनही तुम्ही मनाने शांत असणे ही खरी शांतता असते. हाच शांततेचा खरा अर्थ आहे.

❋ ❋ ❋

## शांततेचे महत्त्व

एका शेतकऱ्याच्या शेतावर खूप मोठे धान्याचे व गवताचे कोठार होते. तिथे काम करीत असताना त्याचे किमती घड्याळ चुकून खाली पडले. ते घड्याळ नुसतेच किमती होते असे नाही तर त्याला एक प्रकारचे भावनिक महत्त्व होते. पुष्कळ वेळ वर खाली सगळीकडे घड्याळाचा शोध घेऊनही शेतकऱ्याला ते सापडले नाही. स्वत: शोधण्याचा प्रयत्न त्याने सोडून दिला. त्या

कोठाराच्या बाहेर मुले खेळत होती. शेतकऱ्याने त्या मुलांना मदतीला बोलावले. जो कोणी घड्याळ शोधून देईल त्याला भरघोस बक्षीस देणार असल्याचे त्याने मुलांना सांगितले. हे समजल्याबरोबर मुलांची वानरसेना कोठारात धावत आली. मुलांनी पण चोहोबाजूला घड्याळ शोधण्याचा प्रयत्न केला. कडब्याच्या सगळया ढिगात शोध घेतला. तरीही ते घड्याळ त्यांच्या हाताला लागले नाही.

शेतकऱ्याने घड्याळ मिळण्याची आशा सोडून दिली होती. तेवढ्यात एक लहान मुलगा आला आणि त्याला एक अवसर देण्यास त्याने शेतकऱ्याला विनंती केली. शेतकऱ्याने त्याच्याकडे एकदा पाहिले. त्याला वाटले काय हरकत आहे त्या मुलाला शोधण्याची संधी देण्यास? त्या मुलाचा उत्साह पाहून शेतकऱ्याला आशा वाटली. त्या मुलाची प्रयत्न करण्याची इच्छा प्रामाणिक दिसली.

शेतकऱ्याने त्या लहानग्या मुलाला कोठारात जायला परवानगी दिली. थोड्याच वेळात तो मुलगा सापडलेले घड्याळ हातात घेऊन आनंदाने नाचतच बाहेर आला. मुलाला घड्याळ घेऊन येताना पाहताना शेतकऱ्याला अत्यंत आनंद झाला आणि फार आश्चर्य वाटले. इतर कोणालाही ते मिळाले नाही आणि त्यालाच कसे मिळाले असे त्याने त्या मुलाला विचारले.

मुलगा म्हणाला, ''मी विशेष असे काहीच केले नाही. फक्त जमिनीला कान लावून शांत बसलो होतो. कानोसा घेत असताना घड्याळाची टिकटिक मला ऐकू आली. त्या आवाजाच्या दिशेकडे मी लक्षपूर्वक पाहिले आणि मला घड्याळ दिसले.''

**तात्पर्य** : शांतता ही प्रचंड शक्ती प्राप्त करण्याचे साधन आहे. कामामुळे मरगळलेल्या मनापेक्षा शांत मनाने अधिक चांगला विचार करता येतो. प्रत्येक दिवशी काही वेळ मन शांत ठेवून तुम्ही बसा आणि मग पाहा, तुमचे आयुष्य तुमच्या पद्धतीने जगण्यास त्याचा किती उपयोग होतो.

संगीत आणि शांतता एकत्र आल्यास फार मोठी शक्ती निर्माण होते. कारण संगीतामध्ये शांतता, धीरगंभीरता भरलेली असते तर शांततेमध्ये एक प्रकारचे नादमाधुर्य असते.

नीरव शांततेमध्ये अनेक न सुटणाऱ्या प्रश्नांची उत्तरे मिळून जातात. शांतता हा सोन्यासारखा अनुभव असतो. आपल्या सभोवतालचा निसर्ग, झाडे, फुले, फळे, गवत शांततेमध्ये कसे बहरून येतात. चंद्र, चांदण्या, सूर्य हे शांततेत किती तेजस्वी दिसतात. दुसऱ्याच्या हृदयाला हात घालायला आपल्याला शांततेची गरज असते.

आपण शांत चित्ताने देवाचे स्मरण केले तर आपल्याला ईश्वराच्या जवळ जाता येते. ईश्वर शांततेचा भोक्ता आहे.

तुम्ही शांततेत एकचित्ताने ईश्वराची प्रार्थना केलीत तर ईश्वर तुमच्याशी संवाद करतो. तेव्हाच तुम्हाला समजते की तुम्ही नगण्य आहात.

❋ ❋ ❋

# संघभावना...

१) **ए**कदा ससा आणि कासव या दोन प्राण्यांमध्ये त्यांच्यापैकी कोण जलद पळू शकतो यावरून वाद निर्माण झाला. ससा म्हणाला, ''मी सर्वांत जलद पळणारा प्राणी आहे.'' कासवाला हे मान्य नसल्यामुळे कासव म्हणाले, ''छे! हे खरे नाही. सर्वांत जलद पळणारा प्राणी तर मीच आहे.'' यावरून दोघांचे एकमत न झाल्याकारणाने दोघांमध्ये शर्यत लावूनच या वादाचा निकाल लावण्याचे ठरले. शर्यतीचा मार्ग त्यांनी निश्चित केला आणि दोघांनी धावण्यास सुरुवात केली.

सशाने धूम ठोकली आणि तो कासवाच्या बराच पुढे गेला. कासव बरेच मागे राहिलेले पाहून सशाने विचार केला, '' चला, झाडाच्या सावलीत थोडा वेळ स्वस्थ बसून विश्रांती घ्यायला आपल्याला काहीच हरकत नाही. बिच्चारे कासव! आपण झाडाखाली बसून एक छोटी डुलकी घेतली तरी सुद्धा कासव काही आपल्याला गाठू शकणार नाही.'' ससा एका झाडाच्या सावलीत बसला आणि त्याला गाढ झोप लागली. कासव मोठ्या कष्टाने मार्गक्रमणा करीत होते. जाताना त्याने झाडाखाली

झोपलेल्या सशाकडे दुर्लक्ष केले. कासव सशाच्या आधीच शर्यतीच्या अंतिम टप्प्यावर पोहोचले. अर्थातच, कासवाने शर्यत निर्विवादपणे जिंकली. सशाला थोड्या वेळाने जाग आली. क्षणार्धात त्याला आपण शर्यत हरल्याने कळून चुकले.

या गोष्टीचे तात्पर्य म्हणजे, .... शांत, निश्चयी पण स्थिर असणाराच शर्यत जिंकतो. आपल्यापैकी प्रत्येकाने लहानपणापासून ही गोष्ट व त्याचे तात्पर्य ऐकले आहे.

हीच गोष्ट अशी पण होऊ शकते.

२) सशाला शर्यतीत हरल्याचे फार दु:ख झाले. त्याने शांतपणे पराजयाच्या कारणांचा शोध घेण्यासाठी डोके खाजवायला सुरुवात केली. स्वत:वरील फाजील विश्वास, निष्काळजीपणा व आळशीपणा या दुर्गुणांमुळेच आपण शर्यत हरलो हे सशाच्या ध्यानात आले. सशाने काही गोष्ट गृहीत धरण्याची चूक केली नसती तर कासवाने शर्यत जिंकण्याची सुतरामही शक्यता नव्हती.

पुन्हा एकदा शर्यतीत भाग घेण्यासाठी सशाने कासवाला आव्हान दिले. कासवाने ते मान्य केले. या खेपेस मात्र सशाने आळस न करता, सर्व शक्ती पणाला लावून, वाटेत न थांबता शर्यतीचा अंतिम टप्पा गाठला. खूप मोठ्या फरकाने सशाने शर्यत जिंकली.

या गोष्टीचे तात्पर्य काय?.... जलद असण्याबरोबरच सातत्य हेच शांत, निश्चयी व स्थिर असणाऱ्यावर मात करू शकते.

तुमच्या संस्थेमध्ये किंवा संघटनेमध्ये दोन प्रकारची माणसे असतील. एक शांत, पद्धतशीर व भरवशाचा असेल तर दुसरा अत्यंत चपळ किंवा जलद असेल पण तितकाच भरवशाचा असेल, तसेच त्याच्या कामात सातत्य असेल, तर ही दुसरी व्यक्ती व्यवस्थापनातील वरच्या थरावर लवकर पोहोचू शकते. त्याची संस्थेतील प्रगती पहिल्या व्यक्तीपेक्षा जास्त वेगाने होते.

म्हणूनच केव्हाही शांत, स्थिर असणे चांगलेच ठरते; परंतु त्याहूनही जलद, भरवशाचे व सातत्यपूर्ण असणे हे उत्तम ठरते.

अजूनही ही गोष्ट इथे संपत नाही.

३) या खेपेला कासव शांतपणे विचार करते. ज्या पद्धतीने या शर्यतीची आखणी केली होती त्यामध्ये सशाला आपण कधीही हरवू शकणार नाही हे कासवाला पुरेपूर कळून चुकते. त्याने पुन्हा सशाला विचारपूर्वक शर्यतीचे आव्हान दिले. मात्र यावेळी शर्यतीचा मार्ग ठरविण्याचा अधिकार स्वत:कडे घेण्यास कासव विसरले नाही. सशाने ते मान्य करताच दोघांनी शर्यतीसाठी धावायला सुरुवात केली. पूर्वी ठरविल्याप्रमाणे ससा निश्चयपूर्वक, सातत्याने, अत्यंत जलद पळाला. पळता पळता या शर्यतीच्या मार्गावर ससा एका नदीच्या काठी येऊन पोहोचला. नदीचे पात्र खूप भव्य असून ती दुथडी भरून वाहात होती. शिवाय शर्यतीमधील अखेरचा टप्पा नदीच्या पैलतीरावर जाऊन दोन तीन किलोमीटर अंतरावर संपणारा होता.

नदीच्या अलीकडच्या किनाऱ्यावर पोहोचल्यानंतर आता काय करता येईल? नदी कशी पार करता येईल? या विचाराने ससा हतबल बसला. या वेळेपर्यंत कासव मंदगतीने तिथवर येऊन पोहोचले. शांतपणे नदीचे पात्र पार करुन पैलतीरावर पोहोचले. त्याच शांतपणे नदीपलीकडील शर्यतीमधील २-३ किलोमीटरचा अंतिम टप्पा पूर्ण केला व अखेरच्या जागी आरामात पोहोचले.

या गोष्टीचे तात्पर्य काय? तर.... प्रथमत: तुमच्यामध्ये असणाऱ्या मूलभूत क्षमतेची, लायकीची व अंगीकृत गुणांची जाणीव करून घ्या. त्याला योग्य, अनुरूप अशी परिस्थिती निर्माण करा. मगच स्पर्धेला सज्ज व्हा.

तुमच्या संघटनेमध्ये जर तुम्ही उत्तम वक्ते असाल, इतरांवर छाप पाडण्याची तुमच्यात शक्ती असेल तर तुम्ही स्वत:साठी योग्य संधी निर्माण करू शकता. त्या संधीचा फायदा घेऊन तुम्ही वरिष्ठांचे लक्ष तुमच्याकडे वेधून घेऊ शकता. तुम्ही केलेल्या कामाची, अभ्यासाची, विश्लेषणाची नोंद करा. त्याचा एक रिपोर्ट तयार करा व वरिष्ठांच्या नजरेत आणून द्या. संस्थेतील तुमच्या प्रगतीला व उच्चपदाला जाण्यासाठी याचा निश्चित उपयोग होईल.

ही गोष्ट अजूनही इथे संपलेली नाही.

४) या वेळेपर्यंत  ससा आणि कासव यांची घट्ट मैत्री जमली होती. त्या दोघांनी एकत्र बसून विचार केला. यावेळी खेळलेली शर्यत पूर्वीपेक्षा अधिक चांगली व मजेशीर कशी करता येईल यावर दोघांचे एकमत झाले. म्हणूनच त्या दोघांनी ही शर्यत पुन्हां एकदा खेळण्याचे नक्की केले. परंतु यावेळी शर्यत वैयक्तिक न खेळता संघभावनेने खेळण्याचे ठरविले. एकमेकांच्या मदतीने शर्यतीत भाग घेण्याचा निश्चय केला.

दोघांनी धावायला सुरूवात केली. नदीच्या किनाऱ्यापर्यंत सशाने आपल्या पाठीवर कासवाला घेतले व दोघेही किनाऱ्यावर येऊन पोहोचले. आता मदतीची वेळ कासवाची होती. कासवाने पाण्यातून पोहताना सशाला आपल्या पाठीवर घेतले. दोघांनी विनासायास नदी पार केली. पैलतीरावर पाय ठेवताच, सशाने पुन्हा कासवाला पाठीवर घेतले. शेवटचे अंतरही दोघांनी एकदमच पार केले. अंतिम स्थळी दोघे बरोबर एकमेकांच्या साथीने पोहोचले. दोघांना परमावधीचा आनंद मिळाला. पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक पटीने समाधान मिळाले.

आता या गोष्टीचे तात्पर्य काय? तर केव्हाही वैयक्तिक नैपुण्य पणाला लावणे आणि मूलभूत क्षमा पूर्णपणे वापरणे उत्तमच ठरते. तरीही तुमच्या संघाने एकदिलाने काम करून व ते करीत असताना एकमेकांच्या मूलभूत कार्यक्षमतेचा पूर्ण वापर केल्यानेच उत्तम परिणाम साधता येतो. अन्यथा मिळालेले यश हे सर्वोत्तम असत नाही. कारण कोणीतरी क्षमतेपेक्षा कमी योगदान करणे व कोणीतरी पूर्ण क्षमतेने काम करणे हे सतत घडतच असते.

या सर्व गोष्टींचा एकत्रित विचार केल्यानंतर आपल्याला काही तत्त्वे प्रकर्षाने जाणवतात ती अशी.

१. पराजयाला सामोरे जाताना हतबल होऊन हातपाय गाळून स्वस्थ बसू नका.

२. जलद पण सातत्याने कृती करणारा कोणीही, शांत पण स्थिर कृती करणाऱ्या व्यक्तीवर सहज मात करू शकतो.

३. स्वत:च्या मूलभूत किंवा प्राथमिक क्षमतेच्या पूर्ण वापरानेच काम करा.

४. स्पर्धेमध्ये तुमच्याविरूद्ध पक्षाबरोबर स्पर्धा न करता निर्माण होणाऱ्या परिस्थितीवर मात करण्याचा सतत प्रयत्न करा.

५. एकत्रित सांघिक साधनांचा व क्षमतेचा वापर करून एकसंघाने केलेले प्रयत्न हे नेहमीच वैयक्तिक प्रयत्न व नैपुण्यावर मात करू शकतात.

❋ ❋ ❋

# संघर्ष

एक दिवस एका माणसाला एका रेशमी किड्याचे - फुलपाखराचे घरटे - कोसला नजरेस पडले. त्या कोषातून बाहेर पडण्यासाठी फुलपाखराने एक छोटेसे छिद्र पाडले होते. त्या माणसाला ते छोटेसे छिद्रही दृष्टीस पडले. तो माणूस तासन्‌तास बसून त्या कोषाचे एकटक निरीक्षण करीत होता. ते लहानसे फुलपाखरु त्या बारीक छिद्रातून स्वत:च्या शरीराला ढकलून कोषाबाहेर येण्याची धडपड करीत होते. काही वेळानंतर ते फुलपाखरु थकले. कोषातून बाहेर पडण्याचे प्रयत्न त्याने थांबविले. त्या फुलपाखराला शक्य होते तेवढे प्रयत्न त्याने केले. पण त्यानंतर त्याला बाहेर सरकता येईना. त्याला तसे स्वत:ला बाहेर रेटणे अशक्य झाले.

त्या फुलपाखराचे निरीक्षण करीत बसलेल्या त्या दयाळू माणसाने फुलपाखराला मदत करण्याचे ठरविले. त्याने कात्री घेतली. अत्यंत हळुवारपणे त्या कोषाला पडलेले छिद्र बाजूने कातरून त्याचे तोंड थोडे मोठे केले. त्याबरोबर आतील फुलपाखराला विनासायास त्या कोषाच्या बाहेर पडता आले.

पण! पण त्या फुलपाखराचे संपूर्ण शरीर सुजलेले होते. तर पंख अगदी कोमेजून वाळून गेलेले होते. त्या माणसाचे फुलपाखराचे निरीक्षण चालूच होते. कारण त्याची अशी अपेक्षा होती की ते फुलपाखरू आता कोणत्याही क्षणी आपले पंख पसरून, पंखाची फडफड करून शरीराचा तोल सांभाळेल आणि दुसऱ्या क्षणाला मस्तपैकी हवेत भरारी घेऊन आकाशात स्वच्छंदाने घिरट्या घालायला सुरुवात करील.

पण!! दुर्दैवाने त्यापैकी काहीच घडले नाही. खरे तर ते फुलपाखरू आयुष्यभर आपले सुजलेले शरीर आणि वाळलेले कोमेजलेले पंख बाळगूनच इत:स्तत: खुरडत खुरडत भटकत राहिले. त्याला स्वच्छंदाने आकाशात कधीच उडता आले नाही. त्या माणसाच्या अतिउत्साही दयाळूपणाने घाईघाईत काही वेगळाच अनर्थ करून ठेवला होता. त्या कोषाचे तोंड छोटेच असणे व त्यामुळे फुलपाखराला त्या कोसल्यातून बाहेर पडण्यासाठी जबरदस्त जिवापाड झगडावे लागणे, हे सर्व ईश्वरी योजनेनुसार अटळ असते. परंतु हे त्या दयाळू माणसाच्या लक्षात आले नाही.

त्या जिवापाड झगडण्यामुळेच त्या फुलपाखराच्या शरीरामधून एक प्रकारचा रस किंवा स्राव किंवा द्रवपदार्थ त्याच्या पंखांना पुरविला जातो. या द्रव पदार्थाच्या पंखावर होणाऱ्या प्रक्रियेमुळेच पंखांची इजा कमी होऊन त्यातील शक्ती अबाधित राहते. त्यामुळे एकदा का फुलपाखरू कोषातून मुक्त होऊन बाहेर पडले की लगेचच त्याच्या पंखामध्ये आकाशात झेप घेण्याची ताकद येते. हे सुद्धा अगदी निसर्गनियमाप्रमाणेच घडत असते.

याचाच अर्थ असा की, झगडणे, संघर्ष करणे हे आपल्याही आयुष्यात आवश्यक असते. जर परमेश्वराने आपल्या आयुष्यात कोणतेही अडथळे निर्माण केले नाहीत तर आपले आयुष्य अगदीच सपक मिळमिळीत होऊन जाईल. संकटांना आणि अडचणींना पार करीत जगलेले आपले आयुष्य जसे बळकट बनते तसे ते घडणारच नाही.

मग आपणही कधी गगनात उंच भरारी घेऊ शकणार नाही. म्हणूनच थोडीफार तरी धडपड करा. संघर्षाला तोंड द्या आणि सफल, सार्थ, यशस्वी, समाधानी जीवन जगा.

❋ ❋ ❋

# संतापी स्वभाव....

एक लहान मुलगा स्वभावाने फार संतापी होता. त्याचा रागाचा पारा वारंवार वर जात असे. त्याच्या वडिलांनी अनेक वेळा समजावल्यानंतरही त्या मुलाच्या स्वभावात फरक पडत नव्हता. एक दिवस त्या मुलाच्या वडिलांनी मुलाच्या हातात एक खिळ्यांनी भरलेली पिशवी व एक हातोडी दिली. त्यांनी आपल्या मुलाला सांगितले की, ''हे पाहा, तुला ज्या ज्या वेळी राग येईल किंवा तुला संताप होण्यासारखे काही घडेल तेव्हा तू आपल्या घराच्या कुंपणाच्या भिंतीजवळ जायचे आणि प्रत्येक वेळी यातील एक खिळा तू भिंतीत ठोकून परत यायचे.'' पहिल्याच दिवशी त्या मुलाने ३७ खिळे त्या कुंपणाच्या भिंतीमध्ये ठोकले. त्यानंतर काही आठवड्यातच त्या मुलाला आपला संताप आवरण्याचे ज्ञान येऊ लागले. दिवसभरातील राग येण्याचे प्रमाण कमी कमी होऊ लागले. त्याचबरोबर त्याची कुंपणाच्या भिंतीमध्ये खिळे मारण्याची संख्या कमी होऊ लागली. अखेर एक दिवस असा उगवला की, त्या दिवशी त्या मुलाला एकदाही चिडायला, संतापायला झाले नाही. अर्थातच, त्या दिवशी त्याला एकही खिळा भिंतीत ठोकायला लागला नाही. त्याने अतिशय आनंदाने आपल्या पित्याला ते सांगितले. त्यावर वडिलांनी त्याला शाबासकी दिली व सांगितले, ''आता ज्या दिवशी तुला दिवसभरात एकदाही राग येणार नाही त्या दिवशी तू कुंपणाजवळ जा आणि तू भिंतीमध्ये ठोकलेल्या खिळ्यांपैकी एक खिळा काढून घेऊन ये.''

दिवसामागून दिवस जात होते. त्या मुलाला दिवसभरात राग न येणारे दिवस वाढत होते. तो भिंतीतील ठोकलेले खिळे काढीत होता. अन् एक दिवस त्या भिंतीमध्ये पूर्वी ठोकलेला एकही खिळा शिल्लक राहिला नाही. त्या आनंदाने उत्साहित होऊन त्याने वडिलांना ती गोष्ट सांगितली. वडिलांनी प्रेमाने मुलाला जवळ घेतले आणि त्याला हाताला धरून कुंपणाच्या भिंतीजवळ नेले. ते म्हणाले, ''वा तू फारच छान प्रगती केली आहेस. परंतु जरा कुंपणाच्या भिंतीकडे पाहा बरे. बेटा, या भिंतीला पडलेली भोके तुला दिसतात का? आता ही भिंत पूर्वीसारखी कधीच दिसणार नाही. तू रागाच्या भरात जेव्हा दुसऱ्याला लागेल असे बोलतोस, तेव्हा त्याच्या मनाला अशीच भोके पडतात. त्या जखमा नेहमी भळभळत राहतात. ती जखम कधीच बरी होत नाही. त्यावर मलमपट्टी केली तरी त्यामुळे होणारे व्रण तसेच शिल्लक राहतात. तू माणसाच्या मनावर शब्दांचे शस्त्र चालवून भले ते बाहेर काढ.

पण काय उपयोग? तू नंतर कितीही वेळा माफी मागितलीस तरी ती मनाची जखम बरी होणारच नाही. शाब्दिक केलेला वार हा इतर कोणत्याही शस्त्राने प्रत्यक्ष शरीरावर केलेल्या वारापेक्षा भयंकर असतो.

आप्तेष्ट व मित्र फार मौल्यवान हिरे – मोती असतात. ते तुम्हाला सतत हसत ठेवतात. प्रसन्न ठेवतात. तुमच्या यशाचे ते एक कारण असतात. त्यांच्या रूपाने जगाकडे पाहण्याची तुम्हाला दृष्टी येते. तुम्हाला जगाचा कानोसा घेता येतो. त्यांचे शब्द तुम्हाला प्रेरणा देतात. उत्साह देतात. त्यांना नेहमीच तुमच्याशी हितगूज करायला आवडते.

अशा आप्तस्वकीयांना न दुखावणे हे तुमचे कर्तव्य नाही का?

❋ ❋ ❋

# संहारक की विधायक

काही वर्षांपूर्वी अमेरिकेतील एका विद्यापिठात काही तरूण आणि अतिशय हुशार विद्यार्थ्यांनी एकत्र येऊन एक अभ्यास मंडळ स्थापन केले होते. त्या सर्वांना उपजतच आश्चर्यकारक साहित्यिक कल्पनाशक्तीची देणगी होती. ते सर्वजण भविष्यकालातील उदयोन्मुख कवी, कादंबरीकार किंवा ललित साहित्य लेखक म्हणून ओळखले जायचे. इंग्रजी भाषेवर या सर्वांचे अभूतपूर्व प्रभुत्व होते. त्यामुळे त्यांच्यामध्ये उत्तम इंग्रजी साहित्य निर्मितीची क्षमता प्रचंड प्रमाणात होती. ते सर्वजण नियमितपणे एकत्र येऊन एकमेकांच्या साहित्य निर्मितीचे वाचन करीत. त्यावर चर्चा करीत, टीकाही करीत असत. टीकेची झोड उठविताना ते दया, माया, शांतीचा विचारही करीत नसत. कोणत्याही साध्या सरळ साहित्य निर्मितीवर टीका करून त्याची चिरफाड करीत व त्याची अक्षरश: लक्तरे करून टाकीत असत. टीका करताना ते अत्यंत कठोर, निष्ठुर व कधीकधी अगदी टोकाचे खवचट होत असत. या टीकासत्राची पातळी इतक्या पराकोटीला जात असे की अभ्यास मंडळाच्या त्या बैठकीला रणधुमाळीचे स्वरूप येत असे. त्यामुळे या मंडळाच्या सदस्यांना दुसऱ्याला दडपून किंवा दाबून टाकणारे रणवीरच संबोधले जाऊ लागले.

या पुरूष वर्गाच्या वाङ्मय मंडळाशी स्पर्धा करण्याच्या उद्देशाने नाही, परंतु त्या विद्यापिठातील साहित्यप्रेमी आणि अभ्यासू विद्यार्थिनींनी आपले स्वतंत्र असे एक वाङ्मय मंडळ सुरू केले होते. त्यांच्या वाङ्मय मंडळाचे कार्य व उद्दिष्ट हे पुरूष मंडळाच्या सारखेच होते. या मंडळाच्या सदस्यांनी स्वत:ला पुरोगामी, अग्रेसर व समतोल विचारांचे म्हणवून घेतले होते व तसेच मंडळाच्या चर्चेचे धोरण स्वीकारले होते. त्या मंडळाच्या विद्यार्थिनी सभासदही एकमेकींचे साहित्य वाचून त्यावर चर्चा करीत असत. परंतु या दोन मंडळांमध्ये एक मुख्य फरक होता. विद्यार्थिनी वाङ्मय मंडळात होणाऱ्या या टीकेची धार जरा कमी तिखट असे. विधायक भूमिकेतून केलेली ही टीका इतरांना प्रोत्साहन देत असे. कधी कधी तर टीका न होता उलट वाचन केलेल्या साहित्यकृतीचे कौतुक होत असे. अगदी सामान्य असणाऱ्या साहित्यकृतीची सुद्धा प्रशंसा केली जात असे.

त्यानंतर वीस वर्षांनी या दोनही मंडळाच्या विद्यार्थ्यांच्या एका सहाध्यायी विद्यार्थ्याने एक अभ्यास करण्याचे ठरविले. त्या अभ्यासाच्या सूत्रामध्ये त्याने आपल्या बरोबरच्या विद्यार्थ्यांचा झालेला व्यक्तिमत्त्व विकास व त्यांच्या साहित्य कारकिर्दीचे मूल्यमापन करण्याचे ठरविले. वर वर्णन केलेल्या त्या दोन वाङ्मय मंडळांमधील माजी विद्यार्थ्यांनी साहित्य निर्मितीच्या क्षेत्रात केलेल्या योगदानात त्याला खूपच फरक आढळून आला. पुरूष गटातील एकाही विद्यार्थ्यांकडून महत्त्वपूर्ण किंवा लक्षणीय दर्जेदार साहित्य निर्मिती झालेली नव्हती. याउलट विद्यार्थिनींच्या मंडळामधील सहापेक्षा अधिक मुली साहित्य क्षेत्रात नावारूपाला आल्या होत्या. काहीजणींनी तर राष्ट्रीय पातळीवर प्रसिद्धी प्राप्त करून मान्यता मिळविली होती.

या दोन मंडळांमधील सभासदांमध्ये असलेले सुप्तगुण, बुद्धिमत्ता यात फरक होता का? त्यांना मिळालेल्या शिक्षणात फरक होता का? तर मुळीच नाही. पुरूष मंडळाचे सभासद प्रखर टीकास्त्रामुळे दबले गेले होते. सतत धडपडतच राहिले. उलट विद्यार्थिनी मंडळाच्या सदस्य महिला एकमेकींच्या प्रोत्साहनामुळे सतत उत्तेजित होत राहिल्या. सततच्या जाज्वल्य टीकेच्या वातावरणामुळे पुरुष विद्यार्थी भांडण व वादाच्या भोवऱ्यात अडकून पडले. परिणामी त्यांचा स्वत:च्या कर्तृत्वावरचा विश्वासच

उडाला. विद्यार्थिनींच्या मंडळामधील उत्साहवर्धक वातावरणामुळे फुलून जाऊन, खुलून जाऊन स्वत:मधील उत्तम तेच त्यांनी दिले आणि साहित्य निर्मितीची उच्च पातळी गाठली.

टीकेचा अतिरेक आणि टीकेचा योग्य वापर याचाच परिणाम कसा होतो ते या दोन मंडळांच्या उदाहरणाने आपल्याला ध्यानात येते.

❋ ❋ ❋

# सफरचंदाचे झाड

एका माणसाला चार मुलगे होते. आपल्या मुलांनी कोणतीही गोष्ट पाहताच क्षणी त्याबद्दल आपले मत तयार करण्याची सवय करून घेऊ नये अशी त्याची मनापासूनची इच्छा होती. त्यासाठी तो आपल्या चारही मुलांना आळीपाळीने लांब अंतरावर असलेल्या एका सफरचंदाच्या झाडाची पाहणी करून त्यांचे अवलोकन करून काय वाटले ते आल्यावर सांगायला सांगतो.

पहिला मुलगा हिवाळ्यात, दुसरा स्प्रिंगमध्ये, तिसरा उन्हाळ्यात तर चौथा पावसाळ्यात गेला.

जेव्हा ते चौघेही जाऊन परत आले तेव्हा वडिलांनी त्या चौघांना एकत्र बोलाविले. प्रत्येकाने काय पाहिले ते वर्णन करून सांगण्यास सांगितले.

पहिल्या मुलाने सांगितले की, मी गेलो तेव्हा झाड झडून गेले होते. सर्व फांद्या वाळून गेल्या होत्या आणि इतक्या वाकल्या होत्या की खाली पडतील की काय असे वाटत होते.

दुसरा मुलगा म्हणाला नाही नाही तसे नव्हते. मी गेलो तेव्हा सर्व झाडाला अंकुर फुटला होता आणि खूप फळांनी झाड बहरणार अशी चिन्हे दिसत होती.

तिसरा मुलगा हर्षभरित होऊन सांगू लागला, मी गेलो तेव्हा तर झाड फळांनी बहरून गेले होते. सफरचंदांनी झाड लडबडले होते. हवेत एक प्रकारचा गोड सुगंध दरवळला होता.

चौथ्याने झाडाचे वर्णन एक जिवंतपणाचा आनंद देणारे होते. पूर्ण समाधान पावून फळे खाण्यासाठी तयार होऊन झाडावरून उतरविण्याच्या स्थितीत आली होती.

चारही मुलांचे निरीक्षण ऐकून घेतल्यावर वडील त्या चौघांना म्हणाले, हे पाहा तुम्ही चौघांचेही बरोबर आहे. कारण तुम्ही प्रत्येकाने फक्त एका ऋतुमध्ये झाड पाहिले आहे. झाड काय किंवा एखादी व्यक्ती काय याच्याबद्दल एकाच निरीक्षणात किंवा एकाच ऋतूत पाहून आपले मत बनविणे चुकीचे ठरते. ते कोणत्या पठडीतील आहेत, त्यांचा कशात आनंद आहे, ते कशामुळे समाधानी आहेत, त्यांच्यापासून काय व कोणाला सुख मिळते ते आपण फक्त शेवटीच जाणू शकतो.

हिवाळ्याच्या गारठ्यातच तुम्ही अडकून पडलात तर पुढे येणाऱ्या वसंतऋतुची, उन्हाळयात मिळणाऱ्या आनंदाची आणि त्या पाठोपाठ येणाऱ्या कृतार्थतेची मजा तुम्ही चाखू शकणार नाही.

तात्पर्य काय की, एका ऋतूमुळे होणाऱ्या त्रासाला कंटाळून पुढे येणाऱ्या या सर्व ऋतुंची मौज वाया घालवू नये. येणाऱ्या अडचणीच्या काळाला धीराने तोंड देऊन नंतरच्या आनंदाला मुकू नये. कारण तो चांगला काळ नक्की येणारच असतो.

सारे काही संपण्यापूर्वी महत्त्वाकांक्षा जागृत करा. महत्त्वाकांक्षा चेतवून टाका.

आनंद तुमच्या जीवनात गोडी निर्माण करतो. प्रयत्न करण्याने तुम्ही मजबूत होता. दु:ख तुम्हाला माणुसकी शिकविते. अपयश तुम्हाला नम्र बनविते आणि यश तुम्हाला मोठे करते.

❋ ❋ ❋

# सर्वोत्कृष्टता ... श्रेष्ठ गुणवत्ता

एका देवळात बांधकामाच्या ठिकाणी एक व्यक्ती सुरू असलेले काम पाहण्यासाठी येते. त्या परिसरात एक मूर्तिकार आपल्या कसबी हाताने देवाची मूर्ती कोरीत असतो. पाषाणाची मूर्ती सुंदर रूप धारण करीत होती. तिथे आलेल्या गृहस्थाला मूर्तिकार बनवित असलेल्या मूर्तीशेजारी हुबेहूब तशीच त्याच देवाची मूर्ती पूर्णावस्थेत परंतु आडव्या स्थितीत आढळते. आश्चर्य वाटून तो मूर्तिकाराला विचारतो, 'काय हो! एकाच देवाच्या या दोन मूर्ती तुम्ही तयार करीत आहात काय? दोनही मूर्ती एकाच देवळात हव्या आहेत का?'

मूर्तिकाराने वर न पाहताच उत्तर दिले, ''नाही, देवळासाठी एकच मूर्ती हवी आहे. परंतु पहिली केलेली मूर्ती अखेरचा हात फिरवित असताना थोडी खराब झाली.'

त्या गृहस्थाने दोनही मूर्तिंचे बारकाईने निरीक्षण केले. परंतु त्याला दोनही मूर्तींमध्ये प्रत्यक्ष किंवा चटकन दिसणारा कोणताच दोष आढळला नाही. म्हणून त्याने विचारले, 'कोठे खराब झाली आहे मूर्ती?'

'त्या पहिल्या मूर्तीच्या नाकाचा एक टवका निघाला आहे पाहा.' आपल्या कामावरचे लक्ष अजिबात विचलित न करता त्याने स्पष्टीकरण केले.

'हो का? ही मूर्ती तुम्ही कोठे व कशावर स्थापन करणार आहात?' गृहस्थाला उत्सुकता वाटून त्याने प्रश्न केला.

'देवळामध्ये एका वीस फूट उंचीच्या चौथऱ्यावर या मूर्तीची स्थापना होणार आहे.' मूर्तिकाराने माहिती पुरविली.

आता मात्र त्या गृहस्थाला फार आश्चर्य वाटले आणि तो उद्‌गारला, 'असंच ना? अहो इतक्या उंचीवर उभ्या केलेल्या या मूर्तीच्या नाकाकडे कोणाचे लक्ष जाणार आणि आपण म्हणता तो दोष कोणाच्या लक्षात येणार?'

कलाकाराने तत्काळ आपले काम थांबविले. त्या गृहस्थाकडे रोखून पाहत त्याने उत्तर दिले, 'इतर कोणाच्याही लक्षात येणार नाही तरीही मला ही गोष्ट ठाऊक आहे ना? आणि ती मला कायम लक्षात येत राहील. माझ्या मनाला सतत टोचत राहील.'

कोणत्याही निर्मिती प्रक्रियेत श्रेष्ठ गुणवत्ता प्राप्त करण्याची जिद्द हे सर्वोत्कृष्टतेचे अंतिम ध्येय असले पाहिजे. मग त्याचे इतर कोणी कौतुक करो अथवा न करो. सर्वोत्कृष्टता ही वरपांगी दिसण्यापेक्षा स्वत:च्या मनाला त्याची खात्री पटणे गरजेचे असते. मिळणारा हा सर्वोत्कृष्ट निर्मितीचा आनंद दुसऱ्या कोणाकडून होणाऱ्या कौतुकासाठी नसतो. तो पूर्णपणे आत्मसमाधान व आत्मसन्मानासाठी असतो. त्यामुळे तो तुम्हाला प्रगतीच्या वाटेवर नेतो.

❋ ❋ ❋

# सहानुभूती आणि समजूतदारपणा

तुमच्या कामाच्या ठिकाणी तुमचा एखादा सहकारी तुम्ही त्याला दाखविलेला आपलेपणा, सद्‌भावना, सहानुभूती किंवा उदारपणा जेव्हा झिडकारून टाकतो आणि त्याचा स्वीकार करण्यास नकार देतो तेव्हा तुम्ही काय करता? यावर आपला प्रतिसाद कसा असतो? आपण रागावतो, चिडतो आणि त्या माणसाशी असलेले मित्रत्वाचे व भावनिक संबंध तोडून टाकतो. पण अशाही परिस्थितीत आपण त्या व्यक्तीला आपलेपणा दाखवित राहिलो, त्याच्याशी जवळीक करीत राहिलो, तर काय बरे घडेल? पूर्वीच्या परिस्थितीत काही बदल होईल का? पुढील गोष्टीच्या उदाहरणावरुन काय घडेल ते आपल्याला समजू शकेल.

एक शेतकरी आपल्या शेताच्या बाजूच्या शेताजवळून जात होता. त्याने शेजारच्या शेतामध्ये काही शेतमजूर एका गायीभोवती कोंडाळे करुन उभे असलेले पाहिले. तो साहजिकच त्या लोकांच्या जवळ जाऊन काय चालले आहे ते पाहू लागला. ती गाय आडमुठेपणामुळे त्या लोकांशी जणू असहकार पुकारून बसली होती. ती गाय कोणालाच दूध काढून देत नव्हती. त्यांच्यापैकी कोणीही दूध काढण्यासाठी त्या गायीच्या जवळ जाताच ती लाथ झाडायला सुरुवात करायची. अशा परिस्थितीत काय करावे असे त्या लोकांनी त्या हुशार शेतकऱ्याला विचारले.

शेतकऱ्याने त्या शेतमजुरांना काहीतरी युक्ती शोधून काढतो असे सांगितले. मग त्याने हातात एक लांब काठी घेतली. तो त्या गायीपासून थोड्या अंतरावर बसला. तिथूनच त्याने गायीच्या पायाला काठीने अलगदपणे ढोसले. ताबडतोब गायीने लाथ झाडली. काही मिनिटांनंतर शेतकऱ्याने पुन्हा एकदा काठीने ढोसले. गायीने पुन्हा जोरात लाथ झाडली. तो शेतकरी नंतर दिवसभर तसाच बसून राहिला. न कंटाळता तो दिवसभर अलगदपणे त्या गायीच्या पायाला काठीचा स्पर्श करीत राहिला. त्या गायीभोवती जमलेले लोक पाहत होते. ती गाय तब्बल बारा तास काठीचा स्पर्श होताच लाथ झाडीत होती. परंतु अशा तऱ्हेने ती गाय किती वेळ लाथ झाडू शकेल? शेवटी ती कंटाळून गेली. थकून गेली आणि लाथा झाडायची थांबून गेली. त्या हुशार शेतकऱ्याने त्यानंतर गायीचे दूध काढायला सांगितले. त्या गायीने त्यानंतर कधीही लाथ झाडली नाही.

ही लहानगी पण अर्थपूर्ण कथा जे इतरांचा अनादर करतात, इतरांचा आपलेपणा झिडकारतात व सतत विरोध दर्शवितात त्यांना लागू पडते. अशा लोकांना सतत आपलेपणा व सद्‌भावना दर्शवित राहिले तर एका ठरावीक वेळेनंतर त्यांच्यात परिवर्तन घडून येते. त्यांची विरोधी वृत्ती नाहीशी होऊन त्यांना समंजसपणा प्राप्त होतो. त्या क्षणापासून अशा लोकांकडूनही इतरांना आपलेपणा व सद्‌भावनेचा, प्रेमाचा ओलावा मिळू लागतो. त्यांच्यापासून असणारे भय, विरोध, असहकार, अस्विकार सर्व संपुष्टात येते.

काही माणसे इतरांच्या सद्भावनेला व चांगुलपणाला सततच नकारात्मक प्रतिसाद का देतात? त्याची कारणे वेगवेगळी असू शकतील. परंतु सर्वसाधारणपणे त्यांना ज्या माणसांकडून संरक्षण, सहानुभूती किंवा सुरक्षिततेची अपेक्षा असते, त्यांच्याकडूनच त्यांना शिक्षा मिळण्याचे दु:ख व अपेक्षाभंग सहन करावा लागतो; पण त्यांच्या त्या कारणांचा शोध घेणे किंवा त्यांच्या दु:खाचे मूळ शोधणे हे आपले कर्तव्य असते. त्यांना त्यानंतरही सतत आपलेपणा व सहानुभूती दाखविणे ही आपली जबाबदारी असते.

❋ ❋ ❋

# सांघिक बळ

आपण अनेक वेळा हंस पक्षांचा थवा आकाशात उडताना पाहतो. तो थवा आकाशात स्वच्छंदाने विहरताना इंग्रजी व्ही (V) या अक्षरासारखा आकृतीबंध तयार करून एकत्र उडतो. आपल्याला आश्चर्य वाटते की, हे पक्षी अशा प्रकारचा आकृतीबंध करुनच आकाशात का भराऱ्या घेत असावेत? अशा साचेबंध आकृतीबंधातच विहार केल्यामुळे संपूर्ण पक्ष्यांच्या त्या समूहाला हवेमध्ये जवळजवळ ७१% पल्ला किंवा उडण्याचा आटोका – विस्तार जास्त मिळू शकतो. एका पक्ष्याच्या स्वतंत्रपणे उडण्याच्या पल्ल्यांपेक्षा हा सामूहिक उडण्याचा पल्ला – विस्तार कितीतरी मोठ्या प्रमाणात असतो. याच तत्त्वानुसार लोक जेव्हा सांघिक प्रयत्न करतात तेव्हा त्यांचे प्रयत्न सामुदायिक समान दिशेने व सांघिक भावनेने केलेले असतात. अशा वेळी त्यांच्या झेपेची लांबी, रुंदी, उंची, खोली खूपच विस्तारलेली असते. त्यांची गती प्रचंड वेग धारण करून अचूक व सुलभ झालेली असते. अशा वेळी पक्षी काय किंवा माणसे काय एकमेकांच्या भरवशावर आपला मार्गक्रम आक्रमित असतात.

या सांघिक उड्डाणाच्या आकृतीमधून जेव्हा एखादा हंसपक्षी बाजूला होतो तेव्हा तो पुन्हा त्या आकृतीबंधात येऊन मिळण्याचा व पुढचा प्रवास समूहासमवेत करण्याची धडपड करीत तो सर्वांच्या एकत्रित संघशक्तीचे बळ त्याला स्वत:साठीही मिळविण्याची इच्छा असते. हंसपक्ष्याच्या या तत्त्वाची आपल्याला जाण असेल तर आपणही आपल्या सांघिक रचनेमध्ये सर्वांत अग्रगण्य असलेल्या आपल्या संघ प्रमुखाच्या मार्गानेच जाण्याचा आटोकाट प्रयत्न करू.

हंसपक्ष्याच्या या थव्याचा सर्वांत पुढे असणारा प्रमुख पक्षी थकताच तो आपण होऊन मागल्या फळीमध्ये येतो. लगेचच त्या थव्यामधील दुसरा एखादा पक्षी त्या प्रमुखाची जागा घेतो. संघाची गती तशीच टिकून राहते. सांघिक वाटचालीमध्ये हंसाच्या काय किंवा माणसांच्या काय अशाप्रकारे स्थाने पालटणे ही फार सावधगिरीची व हुशारीची लक्षणे आहेत.

सांघिक उड्डाणामध्ये पिछाडीस उडणारे हंसपक्षी पुढच्या बाजूला असणाऱ्या हंस पक्ष्यांना आवाजाने शाबासकी देऊन नेहमीच प्रोत्साहन देत असतात. त्यायोगे त्यांची व संघाची वेगमर्यादा जलद राखण्यास त्यांना मदत करीत असतात. आपण आपल्या सांघिक कार्यात कोणता संदेश देऊन संघाचा उत्कर्ष साधित असतो याचा शोध घेणे आवश्यक ठरते.

समूहातील एखादा हंसपक्षी गगनविहार करताना थकतो किंवा एखाद्या पक्ष्याला पारध्याचा निशाणा लागतो. तो पक्षी जखमी होतो आणि एकूण सांघिक रचनेच्या उड्डाणातून तो बाहेर पडतो. तेव्हा इतर पक्षी काय करतात? तर इतर पक्ष्यांपैकी दोन पक्षी त्या थकलेल्या किंवा जखमी झालेल्या पक्ष्याबरोबर बाहेर पडून खाली उतरतात. ते दोन पक्षी त्या जखमी पक्ष्याला सर्वतोपरी मदत करुन संरक्षण देतात. जखमी किंवा थकलेला हंसपक्षी जोपर्यंत ताजातवाना होऊन उडण्याच्या अवस्थेत येत नाही किंवा तो पक्षी प्राण सोडीत नाही तोपर्यंत ते मदतनीस पक्षी त्याला साथ देत त्याच्याजवळच थांबून राहतात. त्या नंतरच ते सोबती थव्याच्या दिशेने पुन्हा आकाशात झेपावतात.

या हंसपक्ष्यांच्या सांघिक वृत्तीप्रमाणे आपणही आचरण केले तर एकमेका साहाय्य करीत सर्वांचेच कल्याण साधणे आपल्याला नक्की शक्य होईल.

❋ ❋ ❋

# सामना आव्हानांचा

नेपोलियन हिलच्या आजोबांचा लाकडापासून मालवाहतुकीसाठी वापरात येणारे मोठे खटारे किंवा गाड्या बनविण्याचा व्यवसाय होता. त्याबद्दलची एक आठवण सांगताना नेपोलियन हिल सांगतो, जेव्हा त्याचे आजोबा शेती करण्यासाठी रान साफ करीत असत तेव्हा मधे मधे असलेले ओक जातीचे वटवृक्ष मुद्दामच तोडीत नसत. असे राखून ठेवलेले वटवृक्ष नैसर्गिक वातावरण व आपत्तींना तोंड देत स्वत:च्याच आधारावर तग धरून उभे राहात असत. त्यांना रानातील इतर कोणत्याही वृक्षांचा आधार किंवा आश्रय मिळत नसे. या ओक जातीच्या वटवृक्षापासूनच – त्या वृक्षांच्या लाकडापासून त्याचे आजोबा खटाऱ्याला लागणारी मजबूत चाके तयार करीत असत. कारण हीच झाडे नैसर्गिक आपत्तींना सतत सामोरे जाऊन ताठपणाने जगलेली होती. साहजिकच संकटांना तोंड देण्याची शक्ती त्यांच्यात खूप प्रमाणात साठलेली असे. म्हणूनच त्या लाकडापासून बनवलेली चाके कितीही वजनदार व अवजड सामान वाहून नेण्यास योग्य व मजबूत ठरत.

या गोष्टीमधून आपल्याला एक महत्त्वाचा संदेश मिळतो. आपण जास्तीतजास्त आव्हाने आनंदाने स्वीकारली पाहिजेत. अशाप्रकारच्या अवघड आव्हानांमधूनच आपल्याला अनेकविध प्रचंड संधी प्राप्त होत असतात. या मिळणाऱ्या संधीच आपला मानसिक विकास घडवून आणतात. त्या संधी आपल्या प्रश्नांचा कल्पकतेने उलगडा करतात. अनेक प्रश्नांची उत्तरे सापडवून देतात. आयुष्यात कधीतरी उदास, अवघड, अंध:कारमय कालखंड येतोच. या काळात अशा आव्हानांच्या स्वीकृतीनेच तुमच्यामधील आत्मविश्वास वाढीला लागतो. येणाऱ्या कोणत्याही संकटांना तोंड देण्याची तुमच्या ठायीची शक्ती वाढते. त्यामुळे त्या पुढील काळात त्याहूनही प्रचंड आव्हानांना सामोरे जाण्यास तुम्ही तयार होता.

संकटांचा सामना करता करताच त्या ओक जातीच्या वटवृक्षाप्रमाणे दिवसेंदिवस आपण अधिक बलवान होतो.

❋ ❋ ❋

# सूटकेस

एक माणूस निधन पावतो. त्याला जेव्हा ते समजते तेव्हा त्याच्या जवळ एक देवदूत येऊन उभा असतो. त्या देवदूताकडे एक सूटकेस असते. देवदूत त्या माणसाला म्हणतो, ''चला, आपली निघायची वेळ झाली.''

माणूस आश्चर्याने विचारतो, ''आताच निघायचे? माझे बरेच प्लॅन होते.''

देवदूत, ''माफ कर, पण आता आपल्याला वेळ नाही. निघायला हवे.''

माणूस, ''तुझ्याजवळच्या त्या सूटकेसमध्ये काय आहे?''

देवदूत, ''तुझ्या साऱ्या चिजवस्तू.''

माणूस, ''माझ्या चिजवस्तू? तुला असं म्हणायचं आहे का, म्हणजे माझे कपडे, माझे पैसे?''

देवदूत, ''त्या वस्तू तुझ्या नव्हत्याच. त्या पृथ्वीवरच्या होत्या.''

माणूस, ''मग माझ्या आठवणी असतील.''

देवदूत, ''त्या तुझ्या कधीच नव्हत्या. त्या त्या वेळच्या होत्या.''

माणूस, ''हा! मग माझी गुणवत्ता असेल.''

देवदूत, ''छे छे. तेही काही तुझे नव्हते. होते ते फक्त त्यावेळच्या परिस्थितीपुरते होते.''

माणूस, ''बरे मग माझे मित्र आणि कुटुंबीय असावेत.''

देवदूत, ''माफ कर, तेही तुझे कधीच नव्हते. ते फक्त तुझ्या वाटचालीत तुझ्या सानिध्यात आले होते.''

माणूस, ''निदान माझी पत्नी व मुले तरी असतील.''

देवदूत, ''नाही बाबा, ते तुझे नव्हते. ते फक्त तुझ्या हृदयात होते.''

माणूस, ''माझे शरीर तर नाही त्या सूटकेसमध्ये?''

देवदूत, ''ते तर तुझे कधीच नव्हते. ते मातीला मिळाले.''

माणूस, ''माझा आत्मा नक्की असणार.''

देवदूत, ''तोही नाही. कारण तो परमेश्वराचा आहे.''

अतिशय घाबरून माणसाने देवदूताकडून सूटकेस घेतली. उघडून पाहिली तर ती रिकामी होती. त्याच्या गालावरून अश्रू ओघळले. आणि तो म्हणाला, ''याचा अर्थ माझे असे काहीच नव्हते.''

देवदूत त्याला म्हणाला, ''अगदी बरोबर. प्रत्येक क्षण जो तू जगलास तो तुझा होता. आयुष्य हे त्या क्षणांचे असते. म्हणूनच मिळणारा प्रत्येक क्षण आनंदाने जगला पाहिजे. तुमच्या म्हणून असणाऱ्या कोणत्याही गोष्टी त्यापासून तुम्हाला अडवू शकणार नाहीत. तुमचे आयुष्य तुम्ही जगा. जगताना चांगल्या गोष्टी करत राहा. आनंदी राहायला विसरू नका. ते सर्वांत महत्त्वाचे असते. कृतज्ञ व्हा. ऐहिक गोष्टी ज्यासाठी तुम्ही आयुष्यभर वणवण केली असेल त्या सगळ्या गोष्टी इथे पृथ्वीवरच राहणार आहेत. त्यापैकी काहीही तुम्ही बरोबर नेऊ शकणार नाही.

❋ ❋ ❋

# स्त्रीच्या इच्छेचे गुपित

आर्थर राजाला दगाबाजीने कैद करून शेजारच्या राजाने तुरूंगात डांबून ठेवले होते. बादशहाने राजाला ठार मारले असते; पण राजा आर्थर तरूण होता व त्याच्या वागण्याने बादशहाने तसे केले नाही. राजाने बादशहाच्या एका अवघड प्रश्नाचे समाधानकारक उत्तर दिले तर बादशहा त्याला मोकळे सोडावयास तयार होता. बरोबर उत्तर शोधण्यास राजाला एक वर्षाची मुदत दिली होती. एक वर्षानंतरही जर राजा बरोबर उत्तर देऊ शकला नाही तर मात्र त्याला मृत्युदंड देण्यात येईल अशी बादशहाने अट घातली होती.

प्रश्न असा होता, ''स्त्रीला खरोखर काय हवे असते?''

अत्यंत विद्वान माणसालाही हा प्रश्न चक्रावून टाकेल असा होता. तरूण राजा आर्थरला तर उत्तर देणे अशक्यच वाटले. परंतु लगेच मरण पत्करण्यापेक्षा बादशहाचा प्रस्ताव मान्य करणे व प्रश्नाचे उत्तर एका वर्षात शोधणे हे राजा आर्थरला जास्त पटले.

राजा त्याच्या राजवाड्यात परतला. राज्यातल्या प्रत्येकाला, राजपुत्र, राजकन्या, देवळाचे पुजारी, शास्त्री, विद्वान अगदी राजदरबारातील विदूषक यांना सुद्धा त्याने प्रश्नाचे उत्तर येते का हे विचारले. परंतु त्यापैकी कोणीच समाधानकारक उत्तर देऊ शकले नाहीत. अनेकांनी चेटकिणीला उत्तर विचारायला सुचविले कारण फक्त तिलाच उत्तर ठाऊक असण्याची शक्यता होती. परंतु चेटकिण त्याची फार मोठी किंमत मागेल हेही सर्वांना ठाऊक होते. संपूर्ण राज्यात चेटकिणीचा मोबदला फार मोठ्या आकड्यात असतो हे प्रसिद्ध होते.

असे करता करता वर्षाचा शेवटचा दिवस उजाडला. चेटकिणीचा सल्ला घेण्याखेरीज दुसरा पर्याय शिल्लक राहिला नव्हता. ती प्रश्नाचे उत्तर सांगण्यास तयार होती पण प्रथम राजाने तिची किंमत मान्य करावी अशी तिने अट घातली. त्या म्हाताऱ्या चेटकिणीला सर लॅन्सलोट याच्याबरोबर लग्न करायचे होते. सर लॅन्सलोट हा दरबारातील सर्वांत हुशार, उदात्त, अभिजात असा सरदार होता. शिवाय तो राजा आर्थरचा अत्यंत जवळचा, विश्वासू सहकारी व मित्र होता. हे ऐकून राजाला धक्का बसला.

ती चेटकिण कुबड असलेली अत्यंत कुरूप अशी दिसायला भयानक होती. तिला फक्त एक दात होता व तिच्या शरीराला मलमूत्राचा वास येत असे. बोलताना ती अचकट विचकट व अश्लील भाषा वापरीत असे. राजाला आतापर्यंतच्या आयुष्यात चेटकिणीइतका तिरस्करणीय प्राणी पाहण्याची वेळ कधीच आली नव्हती. त्याने हे मुळीच मान्य केले नाही. आपल्या मित्राला अशा विद्रूप स्त्रीशी लग्न करायला लावून ते भोगणे सहन करायला लावणे त्याला कदापीही मान्य होणार नव्हते.

पण लॅन्सलोटला चेटकिणीने घातलेल्या या अटीचा सुगावा लागला. तो आर्थर राजाशी बोलला. म्हणाला, तुझ्या आयुष्यापेक्षा इतर कोणताही त्याग हा मोठा होऊच शकत नाही. राज्याच्या स्वातंत्र्यापेक्षा दुसरे काहीच महत्त्वाचे असणार नाही. शेवटी ते लग्न करण्याचे लॅन्सलोटने जाहीर केले. तेव्हाच चेटकिणीने प्रश्नाचे उत्तर सांगितले.

''स्त्री नेहमी तिच्या आयुष्याची ती स्वत:च सर्वेसर्वा राहू इच्छिते. सर्व निर्णय तिचे तीच घेऊ इच्छिते.''

चेटकिणीने त्रिकालाबाधित सत्य उच्चारल्याचे सर्व राजवाड्यात प्रत्येकाला पटले व आता राजाचे प्राण वाचणार याबद्दल खात्री पटली आणि तसेच झाले. शेजारच्या बादशहाने आर्थर राजाला स्वातंत्र्य बहाल केले. लॅन्सलोट व चेटकिणीचे लग्न ठरल्याप्रमाणे थाटामाटाने झाले. लग्नानंतर पहिल्या रात्री हनिमूनची वेळ झाली. लॅन्सलोट त्या भयंकर क्षणाला सामोरा जाण्यास तयार होऊन त्याने बेडरूममध्ये प्रवेश केला. पाहतो ते काय? त्याने कधीही पाहिली नव्हती इतकी सुंदर युवती बेडवर बसलेली त्याला नजरेस पडली. त्याने तिला विचारले, ''हे असे कसे झाले?'' तिने सांगितले, ''मी चेटकिणीच्या रूपात तुझ्या समोर आल्यानंतर सुद्धा तू माझ्याशी फार चांगला वागलास. यापुढे अर्धावेळ मी माझ्या खऱ्या भयानक व कुरुपरूपात वावरीन व अर्धी वेळ मी अशीच सौंदर्यवतीच्या रुपात तुझ्यासमोर येईन. तुला मी कोणत्या वेळी दिवसा की रात्री सुंदर दिसायला आवडेल?'' लॅन्सलोटला कोणतेही उत्तर दिले तरी आपत्ती येणार हे कळून चुकले. दिवसा सुंदर स्त्रीला बरोबर मिरवून मित्रांना दाखवून रात्र चेटकिणीच्या रूपाबरोबर काढायची की दिवस हिडीस चेटकिणीच्या साथीत काढायचा हा त्याला प्रश्न सोडविता येईना.

राजा आर्थरच्या प्रश्नाला चेटकिणीने दिलेले उत्तर लक्षात असल्यामुळे शेवटी विचार करून लॅन्सलोटने उत्तर दिले, ''तुला जे काही करायचे ते करायला तुझी तू स्वतंत्र आहेस.''

हे उत्तर ऐकल्याबरोबर चेटकिण म्हणाली, ''मी कायमच सौंदर्यवतीच्या रुपात वावरेन.'' कारण लॅन्सलोटने तिच्या आयुष्याचे निर्णय घेण्यास तिला पूर्ण मुभा दिली होती.

**तात्पर्य :** १) प्रत्येक स्त्रीच्या मनात एक चेटकिण दडलेली असते, ती कितीही सुंदर असली तरी. २. जर तुम्ही स्त्रीला तिला हवे तसे करू दिले नाही तर कोणतीही गोष्ट बिघडायला वेळ लागत नाही.

❋ ❋ ❋

# स्वत:ची किंमत

एका विचारवंताच्या सभेमध्ये एका नामांकित विद्वानाचे व्याख्यान प्रायोजित केले होते. व्याख्यात्याच्या ख्यातीमुळे जवळपास २००० विचारवंत व्याख्यानास उपस्थित होते. व्याख्यान सुरू करतानाच व्याख्यात्याने हातात. रु. ५०० ची नोट उंचावत आपल्या श्रोत्यांना विचारले, ''ही रु. ५०० ची नोट कोणाला हवी आहे?''

सभेतील अनेक हात उंचावले. ''ही नोट कोणातरी एकालाच देणार आहे. पण त्या पूर्वी मला एक गोष्ट करायची आहे.'' असे म्हणून त्याने हातातील नोटेचा चुरगळून चोळामोळा केला.

त्यानंतर त्याने विचारले, ''आता ही नोट कोणाला हवी आहे?''

त्यानंतरही पहिल्याप्रमाणेच अनेक हात वर गेले.

''ठीक आहे. आता जर मी असे केले'' असे म्हणून व्याख्यात्याने ती नोट हातातून जमिनीवर फेकली व पायातील बुटाच्या टाचेने ती चेचली. तुडविली. ती चोळामोळा होऊन घाण झालेली नोट पुन्हा हातात घेऊन त्या विद्वानाने प्रश्न केला, ''अजूनही ही नोट कोण घेऊ इच्छितो आहे?''

पुन्हा हातांचे झेंडे हवेत फडफडले. त्यावर व्याख्याता म्हणाला, ''मित्रांनो, पाहा यावरून मी तुम्हाला सर्वांना एक महत्त्वाचा धडा सांगितला आहे. मी त्या नोटेचे काहीही केले, ती कितीही खराब केली तरी सुद्धा तुमच्यापैकी प्रत्येकाला ती पैशाची नोट हवी होती. कारण माझ्या कोणत्याही कृतीने त्या नोटेची किंमत कमी झाली नव्हती. अजूनही त्या नोटेची किंमत रु. ५०० अशीच टिकून आहे.''

आपल्या आयुष्यात अनेक वेळा आपल्याला ठोकरा खाव्या लागतात. अपमानित केले जाते. फसविले जाते. आपल्याला अनेक तणावाने कठीण काळातून दिवस घालवावे लागतात. आपण दुसऱ्याच्या इच्छेनुसार व निर्णयामुळे भरडले जातो. आपला मानसिक चोळामोळा होतो. बिकट परिस्थितीला सामोरे जावे लागते. अशा वेळी आपण हतबल होऊन जातो. आपल्याला कोणीच किंमत देत नाही, विचारत नाही असा स्वत:बद्दल गैरसमज होऊन जातो.

परंतु काहीही झाले तरी, कशीही परिस्थिती निर्माण झाली तरी, कितीही आव्हाने समोर उभी राहिली तरीही स्वत:ला कमी लेखू नका.

तुम्ही स्वत: स्वत:साठी एक खास व्यक्तिमत्त्व असता. हे केव्हाही विसरून कालच्या अप्रिय घटनांच्या सावलीमुळे पडणारी स्वप्ने आणि उद्याची आशा झाकाळू देऊ नका.

अस्मिता जागी ठेवली तरच स्वत्त्व आणि स्वत:ची किंमत अबाधित राहील.

❋ ❋ ❋

# हजार आरशांचे घर

फार फार वर्षांपूर्वी एका दूरदूरच्या पण छोट्याशा गावात एक घर होते. त्या घराचे नाव होते हजार आरशांचे घर. त्या गावात एक छोटेसे पण आनंदी कुत्र्याचे पिल्लू होते. त्याला त्या वेगळ्या घराबद्दल समजले. त्याने त्या वेगळ्या घराकडे जाण्याचे ठरविले. ते कुत्र्याचे पिल्लू त्या वेगळ्या घराजवळ पोहोचले. आनंदाने उड्या मारीतच त्या घराच्या जिन्याने वर जाऊन प्रवेशद्वारापाशी ते कुत्रे उभे राहिले. त्याने आपले कान दरवाजातून आत पाहताना टवकारले होते. आपली शेपूट वर करून जोरजोरात वळवळत तो दरवाजातून आत पाहतच राहिला. समोर दिसणाऱ्या दृश्याने ते कुत्र्याचे पिल्लू आश्चर्यचकित झाले. त्याला त्याच्यासारखेच कान टवकारून आणि शेपटी वर करून आनंदाने हलवित त्याच्याकडे एकटक पाहणारी आणखी १००० कुत्र्यांची पिल्ले दिसली.

त्या आनंदात त्याने प्रसन्नपणे हसून त्या पिल्लांकडे पाहिले. तो काय? समोरच्या १००० कुत्र्यांनी प्रसन्नपणे, प्रेमळ व मित्रत्वाच्या भावनेने हसून त्याला प्रतिसाद दिला. त्याला आणखीनच आनंद झाला. त्याच्या मनात आले, ''अरे वा! किती सुंदर व आनंद देणारी आहे ही जागा. आपण वारंवार या ठिकाणी भेट द्यायला हवी.''

त्या गावात दुसरे एक कुत्र्याचे पिल्लू होते. ते आधीच्या पिल्लाप्रमाणे फारसे आनंदी नव्हते. त्यानेही त्या घराला एक दिवस भेट देण्याचे ठरविले. ते दुसरे पिल्लू त्या घराजवळ आले. अत्यंत धिम्या पावलाने घराचा जिना चढून ते घराच्या प्रवेशद्वारापाशी उभे राहिले. आत डोकावताना ते हताशपणे मान खाली घालून समोर पाहू लागले. त्याला काय दिसले? समोरची १००० कुत्री अत्यंत तुच्छतेने आणि काहीशा रागाने, त्वेषाने त्याच्याकडे एकटक पाहत होती. मित्रत्वाचा भाव त्यांच्या पाहण्यात अजिबात नव्हता. ते कुत्र्याचे पिल्लू कान टवकारून, शेपटी ताठ करून, गुरगुरत समोरच्या कुत्र्यांकडे पाहू लागले. त्याबरोबर ती १००० कुत्री उलट एकदम त्या पिल्लाच्या अंगावर गुरगुरली. ते कुत्र्याचे पिल्लू भयभीत होऊन गेले. आपली शेपटी दोन पायात घालून ते परत फिरले. जाताना त्या पिल्लाच्या मनात विचार आला, ''काय भयंकर आहे जागा ही. पुन्हा कधीही इकडे फिरकणे सुद्धा नाही.''

या जगात असेच घडते. जगातील सर्व चेहरे म्हणजे आरसेच असतात. तुम्हाला तुमचे प्रतिबिंबच त्या चेहऱ्यांमध्ये दिसत असते.

❋ ❋ ❋

## हवेत उडालेले कागदाचे तुकडे

एके काळी एका वृद्ध माणसाने त्याचा शेजारी चोर आहे अशी अफवा पसरविली. त्यामुळे त्या तरूण गृहस्थाला अटक करण्यात आली. थोड्याच दिवसात तो तरूण निर्दोष असल्याचे निष्पन्न झाले. अटकेतून सुटून आल्यावर त्याने त्या वृद्धाविरूद्ध त्याच्यावर खोटे आरोप केल्याबद्दल फिर्याद नोंदविली.

कोर्टात तपासणीदरम्यान त्या वृद्ध गृहस्थाने सांगितले, ''न्यायाधीश महाशय ते मी व्यक्त केलेले माझे मत होते. त्यापासून त्या माणसाला कसलाच तोटा झाला नाही.''

न्यायाधिशाने आपला खटल्याचा निकाल जाहीर करण्यापूर्वी त्या वृद्ध गृहस्थाला एक काम सांगितले. ''एका कागदावर तुम्ही दुसऱ्या व्यक्तीबद्दल जे जे बोलला होता ते सर्व लिहून काढा. त्या कागदाचे बारीकबारीक तुकडे करा. घरी परत जाताना वाटेत ते तुकडे रस्त्यावर फेकून द्या. उद्या कोर्टात हजर व्हा. मी उद्या खटल्याचा निकाल सांगेन.''

दुसऱ्या दिवशी कोर्टाचे काम सुरु झाल्यावर न्यायाधीश महाराजांनी त्या वृद्ध माणसाला फर्मावले, ''मी खटल्याचा निकाल सांगण्यापूर्वी आपण बाहेर जाऊन काल रस्त्यावर फेकून दिलेले कागदाचे सगळे तुकडे गोळा करून आणावेत.''

तो वृद्ध गृहस्थ उत्तरला, ''न्यायाधीश महाराज हे कसे शक्य आहे? मी ते गोळा करू शकणार नाही. रस्त्यात फेकलेले ते कागदाचे तुकडे वाऱ्यावर विखुरले गेले असतील.''

न्यायाधीश महाशय त्यावर म्हणाले, ''त्याप्रमाणे आपण पसरविलेल्या अफवेमुळे एखाद्या व्यक्तीच्या सन्मानाला धक्का पोहोचू शकतो. कधी कधी तो इतका जबरदस्त असतो की त्याच्याबद्दलचा समज तो दुरूस्त करूच शकत नाही.''

तुम्ही जर एखाद्याबद्दल चांगले बोलू शकत नसाल तर काहीच न बोलणे उचित असते. आपण आपल्या तोंडावर नियंत्रण ठेवायला शिकले पाहिजे. तरच आपण आपल्या शब्दांचे गुलाम होणार नाही.

❋ ❋ ❋

# हुशार कोण गाढव की कुत्रा?

एका धोब्याने एक गाढव व एक कुत्रा असे दोन प्राणी पाळले होते. एका रात्री सगळे जग झोपी गेले असताना एक चोराने येऊन त्या धोब्याचे घर चोरीसाठी फोडले. रात्री धोबी गाढ झोपला होता. पण गाढव आणि कुत्रा जागे होते. धोब्याने कुत्र्याची नीट काळजी घेतली नव्हती.  त्याला त्याच्या आवडते खायला दिले नव्हते. त्यामुळे तो मालकावर राग धरून होता. मालकाला धडा शिकवायचा म्हणून चोर आल्यावर कुत्र्याने ओरडून मालकाला जागे केले नाही.

गाढवाला काळजी वाटून ते कुत्र्याला म्हणाले तू जर काही केले नाहीस तर मालकाला जागे करायला मला काहीतरी करावे लागेल. कुत्र्याने आपला निश्चय बदलला नाही व तो भुंकून त्याने मालकाला जागे केले नाही.

त्यामुळे गाढव मोठ्या मोठ्याने ओरडायला लागले. गाढवाचे ओरडणे ऐकून मालक झोपेतून उठून धावत आला. चोर पळून गेला. गाढवाच्या ओरडण्यामुळे मालकाची झोप मोडली यासाठी मालकाने गाढवाला मध्यरात्री काहीही कारण नसताना बदड बदड बदडले.

**तात्पर्य :** स्वत:चे काम करण्याऐवजी दुसऱ्याचे काम सुरू करण्यापूर्वी दहा वेळा विचार करा.

आता दुसऱ्या एका गोष्टीत पाहा काय होते. धोबी सुशिक्षित असतो. व्यवस्थापनाचे उच्च शिक्षण त्याने घेतलेले असते. जगण्याकडे वेगळ्या नजरेने पाहून आपली राहणी अधिक उंचावण्याची, काहीतरी वेगळे करण्याची त्याची धडपड असे. मध्यरात्री अचानक ओरडण्यामागे काहीतरी खास कारण घडले असले पाहिजे अशी त्याला खात्री वाटत होती. तो बाहेर येऊन खरे काय घडले असावे याची शहानिशा करण्यासाठी परिसर तपासतो. त्याला गाढवाच्या अवेळी ओरडण्याचे सत्य कारण लक्षात आले. चोर येऊन चोरी करून गेल्याचे त्याला समजले आणि मालकाला जागे करण्याच्या उद्देशाने गाढव जोरजोराने ओरडला हे त्याने जाणले. गाढवाने केलेल्या या जादाच्या कामामुळे व गाढवाच्या नेमून दिलेल्या जबाबदारीपेक्षा अधिक व तेही आपण होऊन पुढाकार घेऊन काम केल्यामुळे मालक त्याच्यावर खूश झाला. त्याला बक्षीस म्हणून जादा गवत खायला दिले. इतरही कामात काही सवलती दिल्या. मालकाचा तो सर्वांत लाडका पाळीव प्राणी झाला.

यामुळे कुत्र्याच्या जगण्यात काहीच फरक पडला नाही. उलट कुत्र्यापेक्षा गाढवच जास्त इमानेइतबारे मालकाचे सगळे काम करू लागला. कुत्र्याचीही काही कामे गाढवाला करावी लागायला लागली. मात्र वार्षिक गुणांच्या परीक्षेत कुत्र्यानेच अक्कलहुशारीने बाजी मारली.

कुत्र्याला कळून चुकले होते की त्याच्यापेक्षा गाढव जादा काम आनंदाने करतो आहे. त्याच्या वाटच्या कामाची पण गाढव काळजी करतो आहे. त्यामुळे कुत्र्याला आरामशीरपणे, आळशीपणे झोपा काढता येऊ लागल्या.

गाढवाला त्याच्या कामामुळे प्रथम श्रेणीचे गुण मिळाले पण त्याला त्याच्या कामात सातत्य ठेवण्यासाठी अधिकाधिक काम करत राहावे लागले. या जादाच्या कामामुळे त्याला फार ताण पडू लागला व याचा परिणाम म्हणून त्याला दुसरी नोकरी शोधावी लागली. कुत्रा मात्र आरामात तिथेच चिकटून राहिला.

**तात्पर्य :** आपले काम सोडून दुसऱ्याचे काम करण्याचा प्रयत्न कधीही करू नये.

❋ ❋ ❋

# विभाग २
# विचारप्रवर्तक व भावनाप्रधान लेख / कथा

## अखेरचे आठ दिवस

**ए**कदा संत एकनाथांना कोणी दोन प्रश्न विचारले, पहिला त्यांच्या स्वतःच्या भविष्याबद्दल, आणि दुसरा, एकनाथ स्वभावाने एवढे शांत आणि निर्द्वेशी कसे राहू शकतात याच्याबद्दल. एकनाथ हसले; आणि केव्हातरी याचे उत्तर देईन असे सांगितले. काही दिवसांनी एकनाथांची त्या माणसाशी भेट झाली. तेव्हा त्याला बाजूला नेऊन एकनाथ म्हणाले, ''तुझ्या पहिल्या प्रश्नाचे उत्तर देण्याची वेळ आली आहे. कारण दुर्दैवाने तू आता आठ दिवसांच्या आत मरणार आहेस.''

तो गृहस्थ सुन्न झाला. गोठला! एकनाथ समोरून निघून गेले, तेव्हां तो बधीर मनाने परतला. जगलो तर एकनाथांसारख्या संताच्या सदिच्छेने जगू, अशी त्याला भावना निर्माण झाली. ती त्याने सार्थ केली. आयुष्यातले आठ दिवस पूर्ण करून नवव्या दिवशी एकनाथांच्या दर्शनाला तो गेला. एकनाथांना हात जोडून म्हणाला, ''तुमच्या कृपेने वाचलो.'' एकनाथ मान डोलवित म्हणाले, ''आता मी तुम्हाला दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर देतो. गेले आठ दिवस तुम्ही कसे वागलात? इतरांच्यावर किती रागावलात?''

तो मनुष्य उत्साहाने म्हणाला, ''छे हो कसला हो रागावतो?'' अगदी छान, शांत आठ दिवस गेले. शांत म्हणजे मरणाच्या भीतिने बेचैन होतो. पण दुसऱ्यावर रागवण्यासाठी ती बेचैनी नव्हती. घरात बायकोशी कधी भांडलो नाही. मुलांना मारले नाही. वाटायचे की आता अखेरचे आठ दिवस उरले. बायको मुले पुन्हा दिसणार नाहीत; त्यांना का दुखवावे? अहो, शेजाऱ्याशी जमिनीवरून चार पिढ्यांचे भांडण होते. त्याला स्वतःच्या हाताने हवा तो तुकडा तोडून दिला. देणे होते ते देऊन टाकले. ज्यांच्याकडून येणे होते, त्यांच्यापैकी जे गरीब होते, त्यांचे येणे सोडून दिले. काही पैसे गमावले, पण शांती कमावली. खूप खूप शांत असे आठ दिवस त्या दृष्टीने गेले.''

एकनाथ समोरच्या माणसाच्या पाठीवर हात थोपटून म्हणाले, ''हे तुझ्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर. आठ दिवसात जग सोडून जायचे आहे, अशा कल्पनेने मी सदाच वावरतो. म्हणून शांत वाटते.''

❋ ❋ ❋

## अतूट नाते

**ए**क लहान मुलगी तिच्या वडिलांबरोबर नदीवर बांधलेला पूल पार करून जात होती. पुलावरून जाताना वडिलांना साहजिकच मुलीच्या सुरक्षिततेची काळजी वाटली. म्हणून वडिलांनी मुलीला सांगितले, ''माझ्या बछडे, प्लीज माझा हात पकड मग आपण पुलावरून पलीकडे जाऊ. तू माझा हात पकडल्यामुळे तू अपघाताने नदीत पडण्याचा धोका राहणार नाही.''

त्यावर ती लहानगी मुलगी आपल्या वडिलांना म्हणते, ''नाही बाबा, तुम्हीच माझा हात पकडा.''

ती असे का म्हणाली हे न समजल्यामुळे वडील तिला विचारतात, ''का गं? यात काय एवढा मोठा फरक आहे?''

मुलगी सांगते, ''हो बाबा. दोन्हीमध्ये खूपच फरक आहे. समजा मी तुमचा हात धरुन चालताना अचानक काही विपरीत घडले तर मी तुमचा हात सोडून देण्याची खूप शक्यता असेल. पण काहीही झाले तरी कोणत्याही परिस्थितीत तुम्ही माझा हात सोडणार नाही.''

हीच गोष्ट कोणत्याही नातेसंबंध दृढ होण्याच्या बाबतीत लागू ठरते.

कोणत्याही प्रकारच्या वचनपूर्तीच्या सक्तीने बांधून ठेवलेल्या नातेसंबंधात कधीच विश्वासार्हता नसते.

एकमेकांवरील नातेसंबंधातील विश्वास हा परस्परांनी घालून घेतलेल्या मानसिक बंधनामुळेच अतूट होत असतो.

म्हणून ज्याच्यावर तुम्ही मनापासून प्रेम करता त्याचा हात आपण होऊन हातात घट्ट पकडा. त्याने हात पुढे करण्यासाठी थांबू नका.

❋ ❋ ❋

## अत्याचारविरहित संगोपन

डॉ. अरुण गांधी हे महात्मा गांधी यांचे नातू. M. K. Gandhi Institute for Nonviolence या संस्थेचे ते संस्थापक होत. त्यांनी आपल्या एका भाषणात खालील गोष्ट सांगितली. त्यांच्याच शब्दात ती अशी होती.

मी त्या वेळी १६ वर्षांचा होतो. साऊथ आफ्रिकेतील दर्बनपासून १८ मैल दूर असलेल्या ऊस लागवड केलेल्या एका शेतावर माझ्या आजोबांनी एक संस्था स्थापन केली होती. शहरी भागापासून हे ठिकाण अगदी दूर एकाकी, शेजारपाजार नसलेले असे होते. आजोबांबरोबरच आम्ही आमच्या आईवडिलांबरोबर राहत होतो. त्यामुळे मी आणि माझ्या दोन बहिणी जवळच्या शहरात जाऊन मित्रांना भेटणे आणि एखादा सिनेमा पाहायला नेहमीच उत्सुक असायचो. त्यासाठी एखादे छोटेसे कारण सुद्धा आम्हाला पुरत असे.

एके दिवशी माझ्या वडिलांनी मला कारने जवळच्या शहरात त्यांना न्यायला सांगितले. तिथे दिवसभर त्यांच्या कामाच्या संदर्भात मिटिंग्ज होत्या. या आलेल्या संधीमुळे मी एकदम खूश होऊन गेलो. शहरात जात असल्याने आईने तिला जरूरी असणाऱ्या वस्तूंची यादी माझ्या हाती दिली आणि त्या वस्तू आणायला सांगितले. वडिलांनी पण घरातील बऱ्याच प्रलंबित दैनंदिन कामांची यादी माझ्याकडे सोपविली. त्यातच कार सर्व्हिसिंग करून घेण्याचे काम होते. मी वडिलांना जेव्हा त्यांच्या कामाच्या जागी सोडले तेव्हा ते म्हणाले, ''सायंकाळी ठीक पाच वाजता तू येथेच ये. मग आपण बरोबरच घरी परत जाऊ.''

त्यानंतर मला दिलेल्या कामाच्या यादीप्रमाणे सगळी कामे उरकून मी तडक मला हवा असलेला सिनेमा पाहायला सिनेमागृहात थडकलो. सिनेमा पाहण्यात मी इतका तल्लीन होऊन गेलो की मला वेळेचे भानच राहिले नाही. सिनेमा संपताच घड्याळात पाहिले तर पाच वाजून तीस मिनिटे झाली होती. घाईघाईने मी गॅरेज गाठले. कार ताब्यात घेतली आणि सकाळी वडिलांना सोडले होते त्या ठिकाणी पोहोचलो. तोपर्यंत सहा वाजले होते.

मला पाहताच चिंतातूरपणे वडिलांनी मला विचारले, '' का रे, उशिर का झाला तुला?'' मी सिनेमा पाहायला गेलो होतो हे सांगायची माझी मलाच लाज वाटली. सांगायचा धीरही झाला नाही. मी सांगितले, ''कारचे काम झाले नव्हते त्यामुळे मला थांबावे लागले.'' मला झालेल्या उशिरामुळे काळजीपोटी त्यांनी गॅरेजला फोन करून चौकशी केली होती हे मला लक्षातच आले नाही. माझी लबाडी, खोटे बोलणे त्यांच्या ध्यानात आले.

ते म्हणाले, ''हं!! तुला वाढविण्यात आणि तुझ्यावर संस्कार करण्यात माझ्याकडून काहीतरी चुकले आहे. मी त्यात कमी पडलो आहे. कारण माझ्याशी खरे बोलण्याचे नैतिक धैर्य मी तुझ्यात आणू शकलो नाही. तुझ्याबाबतीत मी कोठे कमी पडलो ते मला शोधून काढलेच पाहिजे. त्यासाठी आज मी घराचा १८ मैलांचा रस्ता पायी चालत जाऊन विचार करणार आहे.''

हे बोलून तत्काळ ते घराच्या वाटेला लागले. अंगात असलेला फुल सूट, पायात असलेले जड बूट तसेच ठेवून ते त्या कच्च्या, खडकाळ, मातीच्या रस्त्याने अंधारात ठेचाळत, संपूर्ण १८ मैल रस्ता तुडवून घरी पोहोचले. जवळजवळ साडेपाच तास ते तसेच चालत होते. मी त्यांना सोडून कारने पुढे जाणे शक्यच नव्हते. मी त्यांच्यामागे मागे हळूहळू कार चालवित होतो. माझ्या एका क्षुल्लक आनंदासाठी खोटे बोलण्यामुळे त्यांनी स्वत:ला जो त्रास करून घेतला तो पाहून मला फार लाज वाटत होती.

त्या दिवशी मनाशी निर्धार केला की यानंतर कधीही खोटे बोलायचे नाही. जेव्हा जेव्हा मला तो प्रसंग आठवतो त्यावेळी मनात विचार येतो, आपण मुलांना ज्या पद्धतीने चुकांसाठी शिक्षा देतो तशी शिक्षा मला जर वडिलांनी दिली असती तर मी जो

धडा शिकलो तो तसाच शिकलो असतो का? कदाचित कोणतीही कडक शिक्षा दिली असती तरी ती मी सहन केली असती आणि तीच चूक पुढेही करत राहिलो असतो. त्या उलट कोणतीही जबर शिक्षा न करता, उत्तम संस्कार व संगोपन करण्याची ही किती परिणामकारक पद्धत आहे असे मला वाटते.

या घटनेला आता पन्नास वर्षांहून अधिक काळ होऊन गेला आहे. तरीही त्याची आठवण जरी झाली तरी अंगावर रोमांच उभा राहतो. तीच त्या संस्काराची ताकद आहे. कायम स्वरूपात कोरले गेलेले ते संस्कार आहेत. प्रेमाच्या धाग्याने दिलेली शिकवण ही चिरकाल टिकते. मात्र भीतिपोटी गिरविलेले धडे क्षणभंगुर ठरतात.

❋ ❋ ❋

# अद्‌भुत सत्यघटना

१८९१ साली अमेरिकेतील स्टॅनफोर्ड विद्यापिठात घडलेली ही सत्यघटना आहे. एका १८ वर्षांच्या विद्यार्थ्यांकडे त्याची फी भरण्यासाठी पुरेसे पैसे नव्हते. तो अनाथ होता. फीसाठी लागणारे पैसे कसे जमवायचे याचा तो विचार करीत होता. त्याच्या डोक्यात एक कल्पना येते. शिक्षणासाठी पैसे उभे करण्यासाठी तो आणि त्याचा एक मित्र एक म्युझिक कार्यक्रम ठरवितात. विद्यापिठाच्या माध्यमातून कार्यक्रमाची तिकीट विक्री करून त्यांना आवश्यक असणारे पैसे जमविण्याचे ते नक्की करतात.

त्या कार्यक्रमासाठी ते प्रसिद्ध पियानोवादक पॉडेरेस्की (PADDREWSK) याला पोलंडहून आमंत्रित करतात. त्याच्या मॅनेजरने एका कार्यक्रमाचे २०००/- डॉलर्स मागितले. तरी त्या मुलांनी ते मान्य केले. दोन मित्रांनी तो कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी कंबर कसली. तिकीट विक्रीसाठी जोरदार प्रयत्न सुरू केले.

कार्यक्रमाचा दिवस उजाडला. पॉडेरेस्कीने स्टॅनफोर्ड विद्यापिठात आपल्या हाताची जादू सादर केली. पण त्या मित्रांना आवश्यक असणारी तिकीटविक्री करता आली नाही. लोकांनी अपेक्षित प्रतिसाद दिला नाही. एकूण तिकीट विक्री फक्त १६००/- डॉलर्सची झाली. अपेक्षाभंगामुळे उदास होऊन दोघे पॉडेरेस्कीला भेटले. त्याला झालेल्या अपयशाची कल्पना दिली. जमलेली सर्व रक्कम १६००/- व सोबत एक ४००/- डॉलर्सचा एक चेक दिला. तो ठरलेल्या रक्कमेपैकी उरलेल्या रकमेचा होता. तो चेक लवकरात लवकर वठला जाईल याची व्यवस्था करण्याचे आश्वासन दिले.

परंतु मोठ्या मनाच्या पॉडेरेस्कीने ते साफ अमान्य केले. त्याने तो चेक फाडून टाकला आणि त्याला दिलेले १६००/- डॉलर्सही त्या मुलांना परत दिले. त्यानी मुलांना सांगितले ‘‘हे पैसे परत घ्या. यातून कार्यक्रमासाठी झालेला खर्च वजा करून तुमची फी भरा आणि जर काही रक्कम राहिलीच तर तेवढीच मला द्या. दोघे मित्र ते ऐकून अवाक्‌ झाले. त्यांनी पॉडेरेस्कीचे शतश: आभार मानले.

चांगुलपणाचा तो एक छोटासा नमुना होता पण त्यातून पॉडेरेस्की किती महान व्यक्ती होती याचेच दर्शन झाले.

वास्तविक ज्या दोन विद्यार्थ्यांना तो ओळखत सुद्धा नव्हता. त्यांना एवढी मदत करण्याचे त्याला काहीच कारण नव्हते. आपल्या प्रत्येकाच्या आयुष्यात असे प्रसंग येतातच आणि आपण विचार करतो मी आता त्याला मदत केली तर त्याने माझा काय फायदा होणार आहे? पण मोठ्या मनाची माणसे विचार करतात, मी जर आता त्यांना मदत केली नाही तर त्यांची किती वाईट अवस्था होईल. त्यांना त्या बदल्यात कोणत्याही गोष्टीची अपेक्षा नसते. असे करणेच योग्य आहे अशी त्यांच्या मनाची खात्री असते म्हणूनच ते तसे करतात.

पॉडेरेस्की नंतरच्या काळात पोलंडचा पंतप्रधान झाला. तो फार मोठा नेता म्हणून लोकांत परिचित होता ; पण दुर्दैवाने दुसऱ्या जागतिक युद्धात पोलंडची धूळधाण झाली. देशातील अर्धीअधिक जनता उपाशी मरत होती आणि त्यांना खायला घालायला देशाकडे आर्थिक बळ नव्हते.

पोडेरेस्कीला लोकांसाठी कोठून मदत मिळवावी हे समजत नव्हते. त्याने अमेरिकेच्या अन्नधान्य पुरवठा यंत्रणेकडे मदतीसाठी शब्द टाकला. त्या यंत्रणेचा प्रमुख हेबर्ट हूव्हर (HERBERT HOOVER) हा होता. पुढे तो अमेरिकेचा अध्यक्ष झाला.

त्याने पोलंडला मदत करण्याचे तत्काळ मान्य केले आणि शेकडो टन अन्नधान्य उपाशी पोलिश जनतेसाठी रवाना केले. देशावर ओढवलेले संकट टाळता आले.

पॉडेरेस्कीची काळजी दूर झाली. त्याने व्यक्तीश: अमेरिकेला जाऊन हूव्हरच्या उदात्त कृतीबद्दल आभार मानण्याचे ठरविले. मात्र हूव्हरने त्याला बोलू न देता तो म्हणाला, ''मि. प्राईम मिनिस्टर आपण माझे आभार मानण्याचे काहीच कारण नाही. आपल्या स्मरणात नसेल पण पुष्कळ वर्षांपूर्वी स्टॅनफोर्ड विद्यापिठातील दोन विद्यार्थ्यांना फीसाठी आपण मदत केली होतीत, मी त्यापैकी एक विद्यार्थी होतो.''

हे जग मोठे मजेशीर आहे. तुम्ही जसे वागता तशीच वागणूक तुम्हाला इतरांकडून मिळते.

❃ ❃ ❃

# अनमोल नातेसंबंध

**का**ल रात्रीच्या मित्रांच्या पार्टीत नेहमीपेक्षा बरीच घेतली गेली होती. सकाळी जाग आल्यावरही कालची नशा अजून पूर्ण उतरलेली नव्हती. डोके जड होते. बळजबरीनेच त्याने डोळे ताणून उघडले. त्याला समोरच्या टेबलावर दोन ॲस्प्रिनच्या गोळ्या व एक ग्लास पाणी भरून ठेवलेले दिसले. त्याने उठून पाहिले तेव्हा समोरच त्याचे कपडे स्वच्छ धुवून व इस्त्री करून ठेवलेले आढळले. बेडरूममध्ये सगळे कसे व्यवस्थित, नीटनेटके, स्वच्छ व जिथल्या तिथे होते. बाहेर येऊन पाहतो तर संपूर्ण घरच व्यवस्थित व स्वच्छ होते.

तो टेबलावर ठेवलेल्या ॲस्प्रिनच्या गोळ्या घेतो. टेबलावर एक चिठ्ठी आढळते. ''डार्लिंग, तुझ्यासाठी गरम नाश्ता करून टेबलावर ठेवला आहे. तो जरूर खा. मी जरा लवकर ग्रोसरी करायला बाहेर जात आहे. आय् लव्ह यू.''

ती चिठ्ठी पाहून त्याला खूप आश्चर्य वाटले. धक्काच बसला. तो स्वयंपाकघरात जातो. खरोखरच टेबलावर गरम नाश्ता आणि आजच्या दिवसाचे वर्तमानपत्र ठेवलेले असते. त्याचा मुलगाही टेबलावर नाश्ता करीत असतो तो त्याला विचारतो, ''बेटा, काल रात्री काय झाले?''

मुलगा सांगतो, ''काही नाही. तुम्ही उशिरा तीन वाजता घरी आलात. नशेमध्ये तुम्ही बेभान होऊन बरळत होतात. तुमचा तोल जात होता. तुमच्या धक्का लागण्याने काही क्रोकरी फुटली. दरवाजातून आत येताना तुम्ही दरवाजाला धडक दिलीत त्यामुळे तुमचा उजवा डोळा, काळानिळा झाला होता.''

तो आणखीनच बुचकळयात पडतो. त्याने विचारले, ''मग सगळे कसे जैसे थे वैसे, टिपटॉप राहिले आहे? इतके स्वच्छ कसे? आणि माझ्यासाठी नाश्ता टेबलावर तयार? मला तर वाटले होते तुझी आई माझ्यावर भयंकर चिडलेली असणार, तिचे आणि माझे प्रचंड भांडण होणार. मग हे कसे?''

त्यावर मुलगा म्हणाला, ''हा !! असे वाटले होय तुम्हाला? पण ममाने तुम्हाला ओढतच बेडरूममध्ये नेले. ती जेव्हा तुमचे कपडे बदलत होती तेव्हा तुम्ही ओरडून म्हणालात, ''ए बाई सोड मला, माझे लग्न झाले आहे.''

**तात्पर्य:**

| | |
|---|---|
| स्वत:ने ओढवून घेतलेली नशा व तिचे परिणाम | रु. ५,००० |
| फुटलेल्या क्रोकरीची किंमत | रु. ५,००० |
| गरम नाश्ता | रु. ५० |
| नशेत असतानाही अचूक बोलणे | अनमोल नाते |

खरोखरच अनेक गोष्टी पैसे किंवा क्रेडिट कार्ड विकत घेऊ शकत नाही.

❃ ❃ ❃

# अपयशाची जबाबदारी

एका आमसभेत भारताच्या माजी राष्ट्रपती डॉ. अब्दुल कलाम आझाद यांना विचारले गेले की, ''एखाद्या कामात अपयश आले तर त्या टीमच्या नेत्याने ते कसे हाताळावे? तुमच्या स्वत:च्या अनुभवातून सांगू शकाल काय?''

त्यांच्याच शब्दात त्यांनी कथन केलेला अनुभव खालीलप्रमाणे होता. ते सांगतात,

''इ. सन १९७३ या वर्षी भारताच्या उपग्रह सोडण्याच्या कार्याचा प्रोजेक्ट डिरेक्टर म्हणून माझी नेमणूक झाली होती. त्या प्रोजेक्टला सर्वसाधारण SLV-3 असे संबोधले जाते. भारताचा 'रोहिणी' उपग्रह अवकाशात १९८० पर्यंत यशस्वीपणे कार्यान्वित करण्याची मला जबाबदारी देण्यात आली होती. त्यासाठीचे मनुष्यबळ व पैसे मला उपलब्ध केले होते. पण कोणत्याही परिस्थितीत १९८० पर्यंत उपग्रह अवकाशात कार्यान्वित झालाच पाहिजे असे बजावले होते. ते उद्दिष्ट गाठण्यासाठी हजारो शास्त्रज्ञ व तंत्रज्ञ लोकांचे गट – टीम अपार मेहनत घेत होते.

मला आठवते त्याप्रमाणे तो १९७९ चा ऑगस्ट महिना होता. आमच्या समजुतीप्रमाणे आमची तयारी पूर्ण झाली होती. मी प्रोजेक्ट डिरेक्टरच्या नात्याने उपग्रहाच्या नियंत्रण केंद्रात पोहोचलो. उपग्रह अंतराळात झेपावण्याच्या नियोजित वेळेपूर्वी ठीक चार मिनिटे बाकी असताना केंद्रातील संगणक त्यांचे काम करू लागले. ज्या ज्या गोष्टी तपासून पाहणे जरूरीचे असे ठरले होते त्या सर्व गोष्टी तपासण्यास संगणकाने सुरूवात केली. एका मिनिटाच्या तपासणीनंतर संगणकाने उपग्रह सोडण्यास स्थगितीची सूचना केली. उपग्रहातील काही नियंत्रण करण्याचे घटक किंवा भाग कार्यरत होत नव्हते. प्रोजेक्टसाठी माझे अत्यंत कुशल असे चार किंवा पाच सहकारी होते. त्यांनी मला ग्वाही दिली की त्या सर्व घटकांची त्यांनी स्वत: चाचणी घेऊन ते योग्य रितीने काम करतील अशी खात्री करून घेतली होती. माझा त्यांच्यावर पूर्ण विश्वास असल्याकारणाने मी संगणकाची सूचना न मानता पूर्वनियोजित ठरलेल्या पद्धतीचा वापर करून उपग्रह सोडण्याच्या प्रथम टप्प्याला हिरवा कंदील दाखविला. सगळे काही व्यवस्थित पार पडले. मात्र पुढच्या टप्प्यावर काही अडचणी उद्‌भवल्या. उपग्रह अवकाशात उंच झेपावण्याच्या ऐवजी संपूर्ण अग्नीबाण बंगालच्या उपसागरात धाडकन कोसळला. आम्हाला आलेले ते एक मोठे अपयश होते.

त्या दिवशी भारतीय अवकाश संशोधन केंद्राचे (Indian Space Research Organization) अध्यक्ष प्रो. सतीश धवन यांनी एक तातडीची पत्रकार परिषद आयोजित केली. उपग्रह सोडण्याची वेळ सकाळी ठीक सात वाजताची होती. त्या नंतर लगेचच म्हणजे बरोबर ७.४५ वाजता सकाळी पत्रकार परिषद भरली होती. ती सुद्धा इस्त्रो उपग्रहाच्या अवकाशात सोडण्याच्या परिसरातच. तो परिसर आंध्र प्रदेशातील श्रीहरीकोट्टा येथे होता. परिषदेसाठी जगभरातील अनेक पत्रकार उपस्थित होते. प्रो. धवन हे स्वत: परिषदेला हजर राहून त्यांनी सूत्रसंचालन केले. इतकेच नाहीतर त्यांनी त्या अपयशाची संपूर्ण जबाबदारी आपली असल्याचे मान्य केले. ते म्हणाले, माझ्या संपूर्ण टीमने अत्यंत मेहनत करून प्रामाणिकपणे प्रयत्न केले होते. परंतु त्यांना मिळाले त्यापेक्षा अधिक तांत्रिक साहाय्याची आवश्यकता होती. त्याचबरोबर त्यांनी मिडियाला असे आश्वासन दिले की, पुढील एका वर्षाच्या काळात हीच टीम खात्रीने यश संपादन करील. वास्तविक मी प्रोजेक्टचा डिरेक्टर होतो व त्या नात्याने खरे पाहता अपयशाची जबाबदारी माझी होती. परंतु प्रा. धवन साहेबांनी ती जबाबदारी संशोधन केंद्राचे अध्यक्ष या अधिकारात आपल्या शिरावर घेतली.

पुढच्या वर्षी जुलै १९८० मध्ये आम्ही परत उपग्रह अवकाशात सोडण्याचा प्रयत्न केला या वेळी आम्ही यशस्वी झालो. संपूर्ण भारतवर्षाला अत्यानंद झाला. परत एकदा मागच्या सारखीच पत्रकार परिषद बोलावली होती. प्रा. धवल यांनी मला त्यांच्या जवळ बोलावले आणि मला पत्रकार परिषदेला संबोधित करायला सांगितले. मी परिषदेमध्ये आमच्या यशाची कहाणी कथित केली.

त्या आनंदाबरोबरच मी त्या दिवशी एक फार मोठा धडा गिरविला. एखाद्या कामात अपयश येते त्यावेळी त्या टीमच्या नेत्याने अपयशाची जबाबदारी आपल्यावर घ्यायची असते आणि जेव्हा यश प्राप्त होते त्याचे माप मात्र काम करणाऱ्या टीमला बहाल करायचे असते. हा व्यवस्थापनाचा उत्तम धडा मला पुस्तकी अभ्यासातून नव्हे तर प्रत्यक्ष अनुभवातून शिकायला मिळाला.

❋ ❋ ❋

# असामान्य माणसांच्या असामान्य कृती

एक वयस्कर जोडपे हार्वर्ड युनिव्हर्सिटीच्या प्रेसिडेंटच्या दारात त्याची भेट घेण्यासाठी त्याच्या सेक्रेटरीजवळ विनंती करीत होते. त्या स्त्रीने जुना मळका, चुरगळलेला असा वेष परिधान केला होता आणि त्या गृहस्थाने जुन्या पद्धतीचा हातमाग कापडाचा शिवलेला सूट परिधान केला होता.

सेक्रेटरीने स्वत:च्या तोऱ्यातच मग्रुरीच्या स्वरात त्या वयस्कर जोडप्याला सांगितले की, ''तुमच्यासारख्या अशिक्षित, गावंढळ माणसाचे या उच्चश्रेणीच्या नामांकित हार्वर्ड युनिव्हर्सिटीत काहीच देणेघेणे नाही. किंबहुना तुम्ही या युनिव्हर्सिटीच्या प्रांगणात येण्याचे सुद्धा लायकीचे नाही.''

खूप अजिजीच्या स्वरात ती म्हातारी स्त्री परत एकदा विनंती करीत म्हणाली, '' आम्हाला कृपया एकदा प्रेसिडेंटना भेटू द्या.''

तरीही सेक्रेटरीने त्यांच्याकडे न पाहताच सांगितले, ''साहेब दिवसभर खूप बिझी आहेत. ते तुम्हाला वेळ देणे शक्य नाही.''

परत एकदा हिय्या करून त्या म्हातारीने सांगितले, ''आमची थांबायची तयारी आहे.''

त्यानंतर निदान दोन तीन तास त्या सेक्रेटरीने त्या जोडप्याला ताटकळत बसवून ठेवले. कंटाळून ते दोघे निघून जातील असा तिचा अंदाज होता, पण तो खोटा ठरला. शेवटी ती सेक्रेटरी वैतागली आणि तिने प्रेसिडेंट साहेबांना डिस्टर्ब करण्याचे ठरविले. आत जाऊन ती म्हणाली, ''साहेब तुम्ही पाच मिनिटे त्यांच्याशी बोला म्हणजे तरी ते निघून जातील.''

ते दोघे आत जाताच प्रेसिडेंट साहेबांनी अत्यंत त्रासिक नजरेने त्यांच्याकडे रोखून पाहिले.

प्रेसिडेंट साहेबांचे लक्ष जाताच, ती वयस्कर स्त्री म्हणाली, ''आम्हाला एक मुलगा होता. तो याच हार्वर्ड युनिव्हर्सिटीमध्ये शिकत होता. दुर्दैवाने एक वर्षापूर्वी तो एका अपघातात हे जग सोडून गेला. माझे पती आणि माझी अशी इच्छा आहे की त्याचे एक स्मारक या युनिव्हर्सिटीच्या परिसरात बांधावे. कोणती जागा त्यासाठी आम्हाला मिळू शकेल?''

साहेबांच्या चेहऱ्यावरची एक रेषा सुद्धा हलली नाही. त्यांनी निर्विकारपणे आणि गुश्शातच उत्तर दिले, ''बाईसाहेब, इथे शिकलेला आणि मरण पावलेल्या प्रत्येक व्यक्तीचा स्मारक पुतळा आम्ही या परिसरात उभा करू शकणार नाही. तसे केले तर लवकरच या युनिव्हर्सिटीचे रूपांतर एखाद्या स्मशानभूमीत होऊन जाईल.''

''नाही, नाही. आम्ही त्याचा पुतळा नव्हे तर त्याच्या नावाने आम्ही एक इमारत बांधून ती युनिव्हर्सिटीला देऊ इच्छितो.''

प्रेसिडेंट साहेबांचे डोळे चमकले. त्यांनी त्या अशिक्षित, अजागळ आणि गावंढळ दिसणाऱ्या दोघांकडे एक तीव्र नजरेने बघितले आणि जवळ जवळ किंचाळलेच, ''काय म्हणता? इमारत? तुम्ही काय बोलता आहात कळते का? इमारत बांधायला किती खर्च येतो याची तुम्हाला काही कल्पना तरी आहे का? आम्ही आतापर्यंत एकूण दहा मिलियन डॉलर्स इमारतीवर खर्च केला आहे.''

त्या महिलेने आपल्या नवऱ्याकडे वळून पाहिले आणि शांतपणे म्हणाली, ''अरेच्चा, हे इतकेच पैसे लागतात कां एखादी युनिव्हर्सिटी सुरू करायला? मग आपण आपलीच एक युनिव्हर्सिटी सुरू करायला काहीच हरकत नाही.''

नवऱ्यानेही ताबडतोब होकारार्थी मान हलवली.

प्रेसिडेंट साहेब केवळ खजील होऊन भांबावलेल्या नजरेने आ वासून पाहतच राहिले.

ते वृद्ध जोडपे कोण होते लक्षात आले का? ते होते श्री. व सौ. लेनांद स्टॅनफोर्ड. ते त्या ऑफिसमधून तडक बाहेर पडले आणि पालो अल्टो, कॅलिफोर्निया येथे पोहोचले. त्या जागी त्यांनी एक नवीन युनिव्हर्सिटीची स्थापना केली. त्या युनिव्हर्सिटीचे नाव 'स्टॅनफोर्ड युनिव्हर्सिटी'. त्यांच्याच मुलाचे स्मरणार्थ उभी केलेली ही युनिव्हर्सिटी जगात सध्या प्रथम क्रमांकाची समजली जाते. हार्वर्ड विद्यापिठाने चालत आलेली संधी हातून वाया घालविली होती.

पुष्कळ वेळा आपण समोर आलेल्या माणसाच्या वरपांगी दिसण्यावरून किंवा पेहेरावावरून त्याला ओळखतो. बहुतेक वेळा आपला कयास चुकलेला असतो. या चुकीच्या समजुतीमुळे आलेली माणसे कुचकामाची समजून त्यांना वाईट पद्धतीने वागवितो.

परंतु यामध्ये नुकसान आपलेच होते. समोर आलेली संधी आपण दवडतोच शिवाय आपण चांगल्या मित्रांना, कर्मचाऱ्यांना किंवा चांगल्या ग्राहकांना मुकतो.

SMALL PEOPLE TALK ABOUT OTHERS,
AVERAGE PEOPLE TALK ABOUT THINGS,
GREAT PEOPLE TALK ABOUT IDEAS.

छोटी माणसे दुसऱ्याबद्दल चर्चा करतात, साधारण दर्जाची माणसे फक्त चीजवस्तूंबाबत बोलतात, तर असामान्य माणसे त्यांच्या कृतीतून बोलतात.

❋ ❋ ❋

## आईवडिलांचा घटस्फोटाचा निर्णय

एक वयस्कर गृहस्थ मुंबईहून आपल्या न्यू यॉर्कमधील मुलाला फोन करून सांगतो, ''मला तुझा दिवस खराब करायला बरे वाटत नाही तरी मला तुला मुद्दाम कळवायचे आहे की, मी आणि तुझ्या आईने विभक्त होण्याचा निर्णय घेतला आहे. ३५ वर्षांचे आमचे वैवाहिक जीवन अशा तऱ्हेने संपणार आहे. आतापर्यंत झाले तेवढे खूप झाले.''

मुलगा ओरडलाच, ''डॅडी तुम्ही हे काय बोलता आहात?''

''इथून पुढे आम्ही दोघे एकमेकांसमोर उभे सुद्धा राहू शकत नाही आता.'' म्हातारा म्हणाला. ''आम्हाला दोघांना एकमेकांचा कंटाळा आला आहे. मला तर आता तिच्याबद्दल बोलावेसे वाटत नाही. तर तुझ्या बहिणीला हाँगकाँगमध्ये फोन करून कळव.''

मुलगा घाईघाईने आपल्या बहिणीला फोन करून तिच्यावर या बातमीची तोफ डागतो.

''वैऱ्यासारखे ते भांडून घटस्फोट घेत आहेत. मी बघते काय करायचे ते'' सात्त्विक संतापाने ती बोलली.

तिने ताबडतोब मुंबईला फोन केला. फोनवर वडिलांवर कडाडली, ''तुम्ही घटस्फोट घेणार नाही. मी तिथे येईपर्यंत काहीही करू नका. मी भावाला न्यू यॉर्कला परत फोन करते आहे. आम्ही दोघेही उद्या मुंबईला पोहोचत आहोत. तोपर्यंत काहीही करू नका. ऐकताय ना मी काय सांगते आहे ते?'' असे म्हणून तिने फोन बंद केला. म्हातारापण त्याचा फोन बंद करतो आणि वळून बायकोकडे पाहतो. तिला सांगतो. ''चला काम झाले. सर्व आपण कल्पना केली होती त्याप्रमाणे घडत आहे. ते दोघेही उद्या आपल्या लग्नाच्या वाढदिवसाला येत आहेत. आणि बरे का दोघेही आपआपल्या खर्चाने तिकिट काढून येत आहेत.'' दोघांना आनंदाच्या उकळ्या फुटल्या.

**तात्पर्य :** जगातील कोणताही पुरुष अथवा स्त्री वर्षातील ३६५ दिवस कामात व्यस्त असत नाही. तुम्ही तुमच्या आप्तेष्टांना भेटण्यासाठी चार दिवस रजा घेतली तर काही आभाळ कोसळत नाही. ऑफिसचे काम हेच काही जीवनाचे सर्वस्व नाही आणि पैसे साठविणे हे पण जीवनाचे एकच उद्दिष्ट नाही.

❋ ❋ ❋

## आईचे माहात्म्य

ज्यांना आईच्या प्रेमाची ऊब अजून लाभली आहे यांना आणि ज्यांना हे भाग्य लाभले नाही त्यांनाही हे फार आवडेल. ज्या आई आहेत त्यांना तर हे खूप आवडेल.

तारूण्यात पदार्पण केलेली व नुकतीच आई झालेली महिला विचारते, ''हा खूप लांबचा प्रवास आहे का?'' मार्गदर्शक तिला सांगतो, ''हो नक्कीच. तू मार्गाच्या अखेरीस पोहोचशील त्या आधी म्हातारी झालेली असशील, पण शेवट हा सुरूवातीपेक्षा फार

फार समाधानकारक असेल.''

तरूण आई फार खूश होती. सध्याच्या दिवसापेक्षा अधिक काही चांगले असेल यावर तिचा विश्वासच नसतो. म्हणून ती तिच्या मुलांबरोबर खेळते, वाटेवर जाताना त्यांच्यासाठी सुगंधी, टवटवीत फुले गोळा करते, स्वच्छ खळाळत्या झऱ्यात त्यांना न्हाऊ घालते, त्यांना स्वच्छ सूर्यप्रकाशात न्हाऊन काढते. तरूण आईच्या डोळ्यात आनंदाचे अश्रू येतात. ती म्हणते, ''याहून जास्त सुंदर दुसरे काही असणारच नाही.''

वाटेवर एक वादळ येते. वाट अंधारली. मुलांना थंडी आणि गारठून जायला झाले. आईने त्यांना छातीशी जवळ घेतले, आपल्या पदराखाली झाकले. मुले तिला म्हणाली, ''आई आम्हाला मुळीच भीती वाटत नाही, कारण तू जवळ आहेस ना. आणि कोणाचाही हात आमच्यावर हल्ला करू शकणार नाही.''

सकाळ उजाडली. समोर उंच टेकडी होती, मुले ती टेकडी चढून गेली, पण चढताना दमली. आई पण थकली. पण ती मुलांना म्हणाली, ''जरा धीर धरा. आपण लवकरच तिथे पोहोचू. मुले आणखी उंच चढली, टेकडीच्या माथ्यावर पोहोचली तेव्हा म्हणाली, ''आई तुझ्या आधाराशिवाय आम्ही टेकडी चढू शकलो नसतो.''

रात्री आई झोपल्यावर वरती आकाशात तिचे लक्ष गेले, तिला चमचमणारे तारे दिसले आणि ती म्हणाली, आजचा दिवस कालच्यापेक्षा चांगला आहे. काल मी मुलांना धाडस शिकविले. आज मी त्यांना ताकदवान करीन.

दुसऱ्या दिवशी ढगाळ वातावरण झाले. त्यामुळे अंधकार पसरला. युद्धाचे, वैराचे आणि अभद्र ढगांनी आकाश व्यापून टाकले. मुले चाचपडली आणि अडखळून पडली. आई त्यांना म्हणाली, ''वर पाहा येणाऱ्या प्रकाशाकडे पाहा.'' मुलांनी ढगाच्या वर डोकावून पाहिले. कधीही न मावळणारे अलौकिक सौंदर्य त्यांच्या दृष्टीस पडले.

अंधारातून बाहेर पडण्याची वाट त्यांना दिसली. त्या रात्री आई मुलांना म्हणाली, ''हा सर्वांत उत्तम दिवस आहे. मी माझ्या मुलांना देवाचे दर्शन घडविले.''

दिवसामागून दिवस, आठवड्यामागून आठवडे, महिन्यामागून महिने आणि वर्षामागून वर्षे गेली. आई म्हातारी झाली. ती अगदी कृश झाली. पाठीत वाकली, पण मुले मात्र उंच वाढली. बलाढ्य झाली. धाडसाने मार्गक्रमणा करीत होती. रस्ता खाचखळग्यांचा सुरू झाला तशी मुलांनी आईला उचलून घेतले. ती तर पक्षाच्या पिसासारखी हलकी होऊन गेली होती. सरतेशेवटी ते डोंगरापाशी पोहोचले. पलीकडे त्यांना चमकणारा रस्ता आणि सोन्याचे दरवाजे सताड उघडे दिसले.

आई म्हणाली, ''मी माझ्या प्रवासाच्या अखेरच्या टप्प्यावर आले आहे. मला शेवट ठाऊक आहे. तो सुरुवातीपेक्षा खूप चांगला आहे. आता माझी मुले माझा हात सोडून चालू शकतील आणि त्यांची मुले त्यांचा हात पकडून चालतील.

मुले म्हणाली, ''तू कायमच आमच्या बरोबर चालत राहणार आहेस. तू या दारातून बाहेर गेलीस तरी आमच्या बरोबर असशील.'' ते तिच्याकडे पाहत राहिले आणि ती दरवाजातून निघून गेली. दरवाजे बंद झाले. मुले म्हणाली, ''आता आम्ही तिला पाहू शकत नाही पण ती आमच्यातच आहे. प्रत्यक्ष नसली तरी तिच्या आठवणीच्या रूपाने ती जवळ आहे. तिचे अस्तित्व अबाधित आहे.

तुमची आई कायम तुमच्याजवळ असते. तुम्ही रस्त्यातून चालताना पानांची सळसळ म्हणजे तिचे तुमच्या कानात गुणगुणणे असते. तुमच्या मोज्यांना तिने लावलेल्या हातांचा सुगंध असतो. तुम्हाला बरे नसले तर तिच्या हाताचा थंडावा तुम्हाला सुखकर करतो. तुमच्या हास्यात तिचा आनंद भरलेला असतो. तुमच्या डोळ्यांवाटे येणाऱ्या प्रत्येक अश्रूच्या थेंबाला पुसायला तिचे हात तुमच्या डोळ्यांवर असतात. तिच्याचमुळे तुम्ही या जगात आलात. तिने आखून दिलेल्या रस्त्यावरच तुम्ही चालत आहात. ती तुमचे पहिले प्रेम असते. ती तुमच्या हृदयाचे स्पंदन असते. या पृथ्वीवर कोणीही आणि काहीही तुम्हाला तिच्यापासून वेगळे करू शकत नाही. वेळ, जागा किंवा मरणसुद्धा.

❋ ❋ ❋

# आजची चांगली गोष्ट!

रोजच्या जीवनात बरेच वेळा असं वाटतं की आपल्या मनासारखं काहीच होत नाही. होतील असं वाटणारी कामं ठप्प पडतात, अडकतात. कितीही प्रयत्न केला तरी ज्या गोष्टी व्हायच्या असतात त्या होत नाहीत. मग निराशा येते, राग येतो आणि आपली खूप चिडचिड होते. आपण रागावलो की तो राग मित्रांवर किंवा घरच्यांवर काढला जातो. मग राग गेला की आपल्याला वाईट वाटतं, आपण त्यांची क्षमा मागतो आणि ते आपल्याला माफही करतात. पण बोललेले शब्द परत घेता येत नाहीत. आपण ज्या कारणामुळे चिडलो होतो ती गोष्ट शुल्लक वाटू लागते. असं झालं की मला एक गोष्ट आठवते. एक माणूस देवाचे आभार मानत असतो. तो म्हणत असतो की, ''माझ्याकडे नवे बूट नव्हते म्हणून मी दु:खी होतो. त्यावेळी तू मला एक माणूस दाखवलास ज्याकडे पाय पण नव्हते. मग माझी तक्रार आपोआप मुकी झाली.''

थोडक्यात सांगायचं तर आपण छोट्या दु:खांकडे लक्ष देऊन त्यांना मोठं करतो पण छोट्या सुखांकडे लक्षच देत नाही. जसं बऱ्याच गोष्टी आपल्याला पाहिजे तशा होत नाहीत, तसं त्याहून कितीतरी जास्त गोष्टी आपल्याला खूश करायचा प्रयत्न करत असतात.

पण आपल्या एक लहानशा दु:खाच्या नादात आपण त्या दहा खूश करणाऱ्या गोष्टींना विसरतो. जर आतापर्यंतचे विचार पटले असतील, तर मनात एक प्रश्नपण आला असेल. आपण या लहान सुखांकडे लक्ष का द्यावं?

काही मनासारखं नाही झालं तर त्याला पटकन मनातून बाहेर काढून जे आपल्याला सुख देतं ते कसं करावं?

याचं उत्तर माझ्या एका मैत्रिणींकडून मला शिकायला मिळालं. आमची मैत्री जशी वाढू लागली तसं त्यांनी मला एक मजा सांगितली. त्या म्हणाल्या, की आम्ही एकामेकांशी बोलायला लागलो की, आजची चांगली गोष्ट काय?'' असा प्रश्न विचारायचा.

प्रश्न सोपा आहे पण पहिले काही दिवस मला नीट उत्तरंच देता येत नव्हतं. मी आजची चांगली गोष्ट काही नाही. असं म्हटलं की त्या काहीतरी असेल, नीट विचार कर असं म्हणायच्या.

मग मी काहीतरी छोट्यातलं छोटं आहे म्हणून सांगायचो. त्या पण साध्या सोप्या गोष्टी, आजची चांगली गोष्ट म्हणून सांगायच्या.

पण काही दिवस हा प्रकार सुरू राहिला अणि मला लहानातल्या लहान गोष्टी पण आजची चांगली गोष्ट वाटू लागल्या. आज एका दुकानात मस्त कॉफी प्यायली, आज मस्त आठ तास गजर लावून झोप झाली, आज अचानक एक  जुना मित्र भेटला अशी आमची उत्तरं येऊ लागली. मग त्यांच्या प्रश्नाचा खरा अर्थ लक्षात आला. जसं आपण लहान दु:खांकडे लक्ष देतो तसं या प्रश्नामुळे आम्ही लहान सुखांकडे लक्ष देत होतो आणि कोणालातरी सांगितलं की ते सुख परत मनात यायचं. मग आजची चांगली गोष्टच्या ऐवजी 'आजच्या चांगल्या गोष्टी' अशा वाढू लागल्या. खरंच दिवसातल्या वाईट गोष्टी या चांगल्या गोष्टींसमोर शुल्लक वाटू लागल्या.

आता तर मी स्वत:ला हा प्रश्न रोज झोपायच्या आधी विचारतो. गेलेला दिवस संपवताना त्यातील एक तरी चांगली आठवण परत जगली पाहिजे.  अशा छोट्या सुखांकडे नीट लक्ष दिलं तर एक एक करून सगळेच दिवस मजेत जाऊ लागतात. तुम्ही पण हा प्रयोग करून बघा. जसं आपण बंद असलेल्या मंदिरासमोरून जाताना पण आत देव आहे या विश्वासाने नमस्कार करतो, तसं या प्रयोगावर पण विश्वास करून बघा. अट फक्त एकच, की तुम्ही 'आजची चांगली गोष्ट काय?' या प्रश्नाला काहीतरी उत्तर दिलंच पाहिजे. हा प्रश्न स्वत:ला तर विचाराच, पण आपल्या मित्रांना किंवा घरातल्या व्यक्तिंना विचारा. उत्तर कितीही शुल्लक वाटलं तरी नीट ऐका, तुमचं उत्तरपण सांगा. बघा तुम्हाला पण मस्त वाटेल आणि तुमच्या मित्रांनापण. हा प्रश्न खूप बाळबोध वाटतो किंवा मित्र चेष्टा करतील असं वाटत असेल तर आधी काही दिवस स्वत:लाच विचारा. मग एकदा तुम्ही रोजच्या दिवसाचा आस्वाद घेऊ लागलात की मित्रांना विचारा, 'आजची चांगली गोष्ट काय?'

आता शेवटी मी मला आवडणाऱ्या काही साध्या – सोप्या गोष्टी लिहितो.

खाण्यावरून सुरूवात केली तर तेलकट तरी आणि तिखट मिसळ, आईस्क्रीम, उन्हात फिरून आल्यावर उसाचा रस, पुण्यातील सुजाताची मस्तानी, पाऊस पडत असताना गरमगरम भजी, रात्री झोपायच्या आधी एक छोटं चॉकलेट, आईच्या हातचं जेवण, हापूस आंबा असे असंख्य पदार्थ आहेत. हे रोज एक एक करून खायचं असं ठरवलं तरी वर्षाच्या 'चांगल्या

गोष्टींची' यादी होईल. रेडिओवर अचानक लागलेलं आपल्याला आवडणारं गाणं, हे पण एक वेगळंच सुख आहे.

त्यात ते गाणं थोडं जुनं असेल आणि आपल्याला त्याचा विसर पडत असताना ते लागलं तर मग अजूनच मस्त वाटतं. पहिल्या पावसानंतर ओल्या मातीचा सुगंध हृदयात सुकलेल्या भरपूर आठवणी परत ओल्या करून जातो.

आपण नवी साडी किंवा शर्ट घातला की होणारी प्रशंसा हे पण एक छोटंसं सुखच आहे.

अंघोळ करून स्वच्छ झाल्यावर अंगावर मारलेलं अत्तर, आपल्याला दिवसभर त्याच्या सुगंधाने ताजंतवानं ठेवू शकतं. अशा कितीतरी लहान वाटणाऱ्या गोष्टी आपल्याला खूप आनंद देऊ शकतात, जर आपण त्यांना आनंद द्यायची संधी दिली तर.....

❋ ❋ ❋

## आणखी फक्त पाच मिनिटे

एका रविवारच्या सकाळी एक स्त्री एका खेळाच्या मैदानावर येऊन एका माणसाच्या जवळ एका बाकावर बसते. तो पाहा माझा मुलगा तिथे खेळतो आहे. ती त्या माणसाला सांगते. एका झोपाळ्यावर लाल टी शर्ट घातलेल्या मुलाकडे बोट दाखवून ती सांगते.

वाह! मुलगा स्मार्ट दिसतो आहे आणि तो दुसऱ्या झोपाळ्यावर निळा टी शर्ट घातला आहे तो माझा मुलगा आहे. तो माणूस म्हणतो. नंतर घड्याळात बघून मुलाला हाक मारतो. ''जॅक चल, जायचे का?'' त्यावर जॅक म्हणतो, ''डॅड फक्त आणखी पाच मिनिटे प्लीज.'' तो माणूस मानेनेच हो म्हणतो. जॅक आनंदाने उंच झोका घेतो.

पाच मिनिटे झाल्यावर तो गृहस्थ उभा राहून परत मुलाला हाक मारतो, ''जॅक चला, आता वेळ झाली. जाऊ या.'' जॅक परत पाच मिनिटांची परवानगी घेतो. ''फक्त पाचच मिनिटे बरं का.'' तो हसून म्हणतो.

''आई गं ! तुम्हाला खूपच सबुरी आहे बरे का.'' स्त्री त्याला म्हणते.

तो माणूस हसतो आणि म्हणतो, ''माझा मोठा मुलगा जॉन, गेल्या वर्षी याच रस्त्यावर मोटार बाईक चालवित होता. त्याला पिऊन नशा चढलेल्या ट्रक ड्रायव्हरने धक्का दिला व त्यात तो मरण पावला. मी जॉनबरोबर फारसा कधी वेळ घालविला नाही. आता जॅकबरोबर फक्त पाच मिनिटे म्हणत मी कितीही वेळ देण्यास तयार आहे. जॉनबरोबर केलेली चूक मी परत जॅकबरोबर करू इच्छित नाही. त्याला वाटते मी त्याला पाच मिनिटे जास्त खेळायला देत आहे ; पण खरे तर मलाच तो पाच मिनिटे अधिक खेळताना दिसतो.''

आयुष्य हे काही शर्यत नाही. आयुष्यात कशाला प्राधान्य द्यायचे ते आपण ठरवायचे असते. ज्याच्यावर तुमचे प्रेम आहे त्याला पाच मिनिटे तुम्ही कितीही कामात व्यस्त असलात तरी जरूर द्या. तुम्हाला कधीही खंत वाटणार नाही. एकदा का तुम्ही ती संधी वाया घालवलीत तर ती कायमची गेलेली असेल. आयुष्य हे मागच्या चुका समजावून घेऊन त्या सुधारून पुढे चालण्याचे आहे.

❋ ❋ ❋

## आत्मसम्मान - प्रतिष्ठा - एक भिंतीवर

दुसऱ्याबद्दल काळजी घेणे हे बऱ्याच प्रकारे करता येते. पुढे दिलेली पद्धत ही एक अभिनव पद्धत म्हणावी लागेल. मी माझ्या मित्राबरोबर व्हेनिस जवळच्या एका शेजारच्या गावात कॉफी प्यायला एका प्रसिद्ध कॉफी पार्लरमध्ये बसलो होतो. व्हेनिस म्हणजे दिव्यांचा झगमगाट व सतत पाण्यात राहणारे गाव. आम्ही कॉफी घेत असतानाच एक माणूस येऊन आमच्या समोरच्या टेबलावर बसला. त्याने वेटरला बोलावले आणि आपली ऑर्डर दिली. ''दोन कॉफी. दोनपैकी एक भिंतीवर. त्या माणसाने दिलेली ऑर्डर ऐकून आम्हाला त्यात फार इंटरेस्ट वाटला. आम्ही पाहिले तर त्याला टेबलावर फक्त एकच कॉफी देण्यात आली

होती; पण त्याने पैसे मात्र दोन कॉफीचे दिले. तो निघून गेल्याबरोबर वेटरने एका कागदावर 'एक कप कॉफी' असे लिहिले आणि तो कागद समोरच्या भिंतीवर अडकवला.

आम्ही तिथे असतानाच दोन माणसे आली. त्यांनी तीन कप कॉफीची ऑर्डर दिली. दोन टेबलावर आणि एक भिंतीवर. दोन कॉफी त्यांना टेबलावर आणून देण्यात आली. जाताना त्यांनीही बिल तीन कॉफीचे चुकते केले. याही खेपेला वेटरने मागच्या वेळेप्रमाणेच केले. त्याने एक कप कॉफी लिहून तो कागद भिंतीवर अडकवला. हे काहीतरी आगळेवेगळे आणि अनाकलनीय असे आमच्यासाठी होते. आम्ही आमची कॉफी संपवून पैसे देऊन बाहेर पडलो.

काही दिवसांनंतर पुन्हा त्या कॉफीपार्लरमध्ये जाण्याचा योग आला. आम्ही आमची कॉफी मस्त गप्पांबरोबर घेत असताना अगदी गरीब, जुनाट फाटके कपडे घातलेला एक मनुष्य तिथे आला. तो टेबलावर बसल्यावर म्हणाला, ''त्या भिंतीवरची एक कप कॉफी'' वेटरने नेहमीच्या पद्धतीप्रमाणे आदब व शिष्टाचार पाळून त्याला ग्राहकाचा सर्व सन्मान देऊन एक कॉफी आणून दिली. त्या माणसाने ती कॉफी घेतली व पैसे न देता तो निघून गेला. तो गेल्यावर वेटरने त्या भिंतीवरील लावलेल्या कागदापैकी एक कागद काढून तो कचऱ्याच्या डब्यात टाकून दिला. आम्हाला आश्चर्य वाटले. आता आम्हाला सगळ्या गोष्टींचा उलगडा झाला होता. गरजू लोकांच्या मदतीसाठी हे करणाऱ्या त्या गावातील लोकांचे कौतुक वाटले. आमच्या डोळ्यांत एक प्रकारच्या कृतज्ञतेचे अश्रू आले.

त्या गरीब माणसाच्या गरजेची कदर केली जात होती. तो कॉफी घ्यायला येतो पण स्वत:ची किंमत कोठेही कमी न होऊ देता त्याला कॉफी घेता आली. त्यासाठी त्याला ओशाळगतपणे कोणाला फुकट मागावी लागली नाही. किंवा त्या कॉफीचे पैसे कोणी दिले हे पण त्याला माहीत करून घ्यायला लागले नाही. त्याने फक्त त्या भिंतीकडे पाहिले, कॉफी मागविली, ती पिण्याचा आनंद घेतला आणि पैसे न देता निघून गेला.

ती भिंत जगातील कोणत्याही कलाकाराने रंगवलेल्या भित्तीचित्रा (मुराल) पेक्षा जास्त सुंदर होती.

❋ ❋ ❋

# आनंदी जीवनाचे रहस्य

वृद्धाश्रमाच्या प्रतिक्षागृहात खूप वयस्कर परंतु प्रसन्न दिसणारे एक आजोबा वाट पाहत बसलेले असतात. ९० वय उलटून गेलेले असले तरी सवयीचा व्यवस्थितपणा, कपड्यांचा नेटकेपणा, चेहऱ्यावर ओसंडून वाहणारा उत्साह व नावीन्यशोधक भिरभिरती नजर यात अजूनही काहीही कमी झालेले नव्हते. पंचाहत्तरी उलटलेली त्यांची पत्नी काही दिवसांपूर्वी त्यांना सोडून गेली होती. नाईलाजाने त्यांनी वृद्धाश्रमात राहण्याचा निर्णय घेतलेला असतो. प्रतिक्षागृहात वाजवीपेक्षा जास्त वेळ वाट पाहिल्यानंतर वृद्धाश्रमाचा व्यवस्थापक येऊन त्यांची रुम तयार झाल्याचे सांगताच आजोबांचा चेहरा जास्तच उजळून निघतो.

व्यवस्थापक चला म्हणताच आपल्या काठीच्या आधारे आजोबा लिफ्टच्या दिशेने चालायला लागतात. त्यांच्या रुमच्या मजल्यावर पोहोचेपर्यंत व्यवस्थापक त्यांच्या रुमचे वर्णन करून सांगत असतो. रुममध्ये येणाऱ्या हवा, प्रकाशापासून अगदी खिडक्यांना लावलेल्या नवीन पडद्यांचे सुद्धा रसभरीत वर्णन करीत असतो.

'ओह! मला नक्की आवडेल.' उत्साहाने ओसंडून जात त्यांनी त्या स्वागताला प्रतिसाद दिला. एखाद्या लहान मुलाला अचानक कुत्र्याचे पिल्लू मिळाल्यानंतर जो प्रचंड आनंद होईल तसाच आनंद त्या वृद्धाच्या बोलण्याचालण्यात दिसत होता. व्यवस्थापकाला अचंबा वाटून त्याने विचारले, 'आजोबा तुम्ही तर तुमची रुम, आतील सजावट बघितलीही नाही. मग इतकी खुशी कशी?आपण आता तुमच्या रुमजवळ पोहोचलो आहोत.'

त्यावर ते वयस्कर गृहस्थ म्हणाले, 'नाही नाही, त्याचा काही संबंध नाही. खूश होण्यासाठी मी प्रत्यक्ष जागा बघायलाच हवी असे मुळीच नाही. त्या रुमवर मी जाणार या कल्पनेने जाण्याआधीच आनंदित होऊन गेलो होतो. रुममधील फर्निचर अगर

तिथली सजावट यामुळे माझ्या आनंदावर कोणताही परिणाम होणार नाही. ती रुम, ते फर्निचर, ती सजावट मी कशा नजरेतून पाहीन यावरच माझा आनंद अवलंबून असेल. ते सर्व मला आवडणारच हे माझ्या मनाशी मी प्रथमपासूनच ठरविले आहे. असे निर्णय मी दिवस सुरू होताना, झोपेतून जागे होताना घेतलेले असतात.

माझ्या शरीरातील दुखण्या खुपण्याचा किंवा कोणकोणते अवयव काम करेनासे होऊन निकामी झाले आहेत, याचा विचार मी रोज रात्री झोपण्यापूर्वी केलेला असतो. त्याचप्रमाणे सकाळी जाग येताच जे अवयव अजूनही काम करीत आहेत त्यासाठी ईश्वराचे आभार मानतो.

जोवर डोळे उघडून मी जग पाहू शकतो किंवा गतआयुष्यातील सुखद आठवणींना उजाळा देऊ शकतो तोपर्यंत उगवणारा प्रत्येक दिवस हा मला वरदान असतो. उतारवय म्हणजे सरलेल्या आयुष्यातील सुखद स्मृतींची बँक किंवा ठेवाच असतो. त्या बँकेत साठवलेल्या स्मृतींची उजळणी हा पुन:प्रत्ययाचा आनंदच असतो. म्हणूनच माझे असे सांगणे आहे की, तुमच्या तरुणवयात या स्मृती नावाच्या बँकेत तुमच्या आनंदाचा ठेवा साठवित राहा. माझ्या या उतारवयातही तुम्ही जो आनंदाचा ठेवा माझ्या बँकेत जमा करीत आहात त्याबद्दल मी तुमचा सदैव ऋणी राहीन.'

वरील कथेवरून काही निष्कर्ष लक्षात ठेवायला हवेत.

१. मनातील द्वेषभावनेचा समूळ नाश करा.

२. मनातील चिंतेला अजिबात थारा देऊ नका.

३. साधी राहणी आचरणात आणा.

४. शक्य तेवढी दानशूर वृत्ती बाळगा.

५. दुसऱ्याकडून कमीतकमी अपेक्षा ठेवा.

एकमेकांशी सद्‌भावनेने, सदाचाराने, खरेपणाने व आपलेपणाने वागल्यानेच या जगामध्ये सुखशांती नांदू शकेल. बंधुत्वाने चमत्कार घडू शकेल.

❋ ❋ ❋

# आपत्कालीन परिस्थिती आणि प्रसंगावधान

इयत्ता तिसरीचा वर्ग. तिसऱ्या रांगेत एक नऊ वर्षांचा मुलगा बाकावर बसला होता. अचानक त्याच्या पायाजवळ तळे साचते. त्याच्या पँटचा पुढचा भाग ओला झाला होता. त्याला हृदयाचे ठोके बंद पडणार असे वाटू लागले. कारण हे अचानक कसे झाले ते त्याला समजतच नव्हते. यापूर्वी असे कधीही झाले नव्हते. इतर मुलांना कळेल तेव्हा त्यांच्या चिडविण्याचा अंतच होणार नाही हे तो समजून चुकला होता. वर्गातील मुलींना जर हे समजले तर तो जिवंत असेपर्यंत त्या त्याच्याशी बोलणार सुद्धा नाहीत हेही तो जाणून होता. त्याला हार्ट अॅटॅक यायची भीती वाटू लागली. मनात तो देवाची प्रार्थना करू लागला. ''देवा हा माझ्यावर फार मोठा पेचप्रसंग गुदरला आहे. ही माझ्यावर आलेली आपत्कालीन परिस्थिती आहे. मला तुझी मदत हवी आहे. माझ्या मदतीला धावून ये. अन्यथा मी पाच मिनिटांत मरण पत्करलेले असेल.''

त्याच्या प्रार्थनेनंतर तो वर पाहतो तर त्याला समोर टीचर उभ्या असलेल्या दिसतात. त्यांच्या डोळ्यांत असा भाव असतो की, त्याला वाटते आपण नक्की पकडले गेलो आहोत. टीचर त्याच्याजवळ चालत येत असतानाच त्याच्या वर्गातील एक मुलगी हातात गोल्डफिशचा पाण्याने भरलेली काचेची कुंडी घेऊन येते. त्या मुलाच्या व टीचरच्या मधे आल्याबरोबर तिच्या हातातील ते काचेचे भांडे निसटते. नेमके ते त्या मुलाच्या मांडीवर पडते. त्याच्या मांडीवर व पायाखाली पाणी सांडते.

मुलगा वरवर रागावल्याचे नाटक करतो. पण मनात म्हणतो, ''हे भगवान थँक यू.''

इतक्या वेळ तो मुलगा सर्व वर्गाचा टिंगलीचा विषय होणार होता तो क्षणार्धात सहानुभूतिला पात्र होतो. टीचर त्याला घेऊन खाली जातात आणि जिमची पँट त्याला तात्पुरती घालायला सांगतात. तोपर्यंत त्याची ओली झालेली पँट कोरडी करायची

व्यवस्था करतात. वर्गातील सगळी मुले खाली वाकून, ओणवे होऊन त्या मुलाच्या बाकाखालचे पाणी व घाण पुसून तो भाग स्वच्छ करायच्या मागे लागतात. सहानुभूतिची जादू काही न्यारीच होती ; परंतु नियती कशी चमत्कार करते पाहा. त्याची होणारी टिंगलटवाळी दुसऱ्या कोणाच्या तरी वाटेला जाते. ती जाते त्या मुलीच्या – सुशीच्या – वाटेला.

ती पण इतर मुलांबरोबर साफ करायला मदत करायला लागते पण बाकीचे तिला जायला सांगतात. मूर्ख मुली तू जे केलेस ते पुष्कळ झाले असे सांगून तिला काही करू देत नाहीत.

शाळा सुटल्यावर मुले बसची वाट पाहत थांबली होती. त्यावेळी तो मुलगा सुशीजवळ गेला आणि तो म्हणाला, ''मला वाटते तू ते हेतूपुरस्सर केलेस ना? अर्थात माझ्या भल्यासाठी.'' सुशी पण त्याला सांगते, ''हो कारण मागे एकदा माझी पण पँट ओली झाली होती.''

देवा तशी कृपा अशीच आमच्यावर राहू दे. असाच आमच्या पाठीशी कायम राहा आणि आम्हाला मदत कर.

आपल्यापैकी प्रत्येक जण कधी ना कधी संकटात सापडतोच; पण परमेश्वर आपले रक्षण करायला सिद्ध असतो. त्याच्यावर श्रद्धा ठेवा. त्याची प्रार्थना करा. प्रार्थना करणे ही फार मोठी दैवी देणगी आहे. त्यासाठी आपल्याला काहीच किंमत पडत नाही. उलट त्यापासून आपल्याला प्रतिफलच मिळते. आपण एक दुसऱ्यासाठी प्रार्थना करू या.

❋ ❋ ❋

## आयुष्यात काय गमावले?

''**या** आयुष्यात काय करायचे राहून गेले असे वाटते?'' पत्नी २५ वर्षे वयाची असताना ती नवऱ्याला विचारते.

''मी नव्या नोकरीची संधी गमावली'' निराश होत नवरा म्हणाला.

पत्नी ३५ वर्षे वयाची झाल्यावर ती तोच प्रश्न विचारते. नवरा रागारागाने म्हणतो, ''माझी बस चुकली.''

नवरा ५५ व्या वर्षी नैराश्याने म्हणतो, ''मी निवृत्त होण्याचा चांगला योग गमावला.''

६५ वयाचे वेळी नवरा घाईघाईने सांगतो, ''मी दाताची अपाँईंटमेंट चुकविली.

वयाच्या ७५ व्या वर्षी पत्नी काहीच विचारत नाही. खूप आजारी असलेल्या पत्नीच्या बेडजवळ नवरा बसलेला असतो. त्याला बऱ्याच वेळा पत्नीने विचारलेला प्रश्न आठवतो. आज नवरा तोच प्रश्न पत्नीला विचारतो. पत्नी तोंडभरून हसून आणि अतिशय धीरगंभीरपणे त्याच्याकडे पाहत उत्तरते, ''या आयुष्यात मी जर काही गमावले नसेल तर ते तुमचे माझ्यासाठी असणे.''

नवऱ्याला रडू आवरणे शक्य झाले नाही. आपण दोघे कायम बरोबरच असणार आहोत असा त्याचा समज होता. तो कायमच त्याच्या कामात आणि किरकोळ गोष्टींमध्ये गुंग असायचा. इतका की पत्नीचा विचारही त्याच्या मनात येत नसे. ते ऐकल्यावर नवऱ्याने पत्नीला घट्ट मिठीत घेतले आणि म्हणाला, ''गेल्या पन्नास वर्षांत तुझ्या माझ्यावरील उत्कट प्रेमाला साद न देण्याचे धाडस मी स्वत:ला कसे करू देऊ शकलो?''

सध्याच्या धकाधकीच्या जीवनात अनेक लोक आपल्या कामातच गुरफटलेले असतात. त्यांना कामाशिवाय दुसरे काही सुचत नाही. समाजाच्या अपेक्षांना पुरे पडताना ते स्वत:चा वेळ आणि स्वत:ची प्रकृती याची आहुती देतात. स्वत:च्या तब्बेतीची पर्वा करण्यास ते पुरेसा वेळ देत नाहीत. मुलांच्या वाढत्या वयात त्यांचा सहवासाचा आनंद घेत नाहीत. त्यांच्यावर जिवापाड प्रेम करणाऱ्या स्वकीयांकडे ते दुर्लक्ष करतात. त्यांच्या प्रकृतीची काळजी करत नाहीत.

आजपासून एक वर्षानंतर काय घडणार आहे हे कोणीच जाणत नाही. आयुष्य हे कायमस्वरूपी नसते त्यामुळे आज या क्षणाला जागा आणि जगा. तुमच्या आवडत्या व्यक्तीवरील प्रेम शब्दांत व्यक्त करा. त्याच्याबद्दलची काळजी कृतीतून व्यक्त करा. उगवणारा प्रत्येक दिवस हा आयुष्यातील शेवटचाच आहे असे जगा. असे केलेत तर तुम्ही गेल्यावर तुमच्या आवडत्या व्यक्तींना काही राहून गेल्याचे दु:ख होणार नाही.

❋ ❋ ❋

# इवलेसे रोपटे

इवल्याशा तृणाला निराश होण्यास सबळ कारणे असतात. ते जमिनीवर पार खाली पडते. त्याला आपल्या जागेवरून कोठेही जाता येत नाही. ते लोकांच्या पायाखाली तुडविले जाते. थंडी आणि पावसाने ते बेजार होते. कित्येक वेळा ते जमिनीत गाडले जाते.

हे सगळे सहन करूनही जे करायचे ते करतच असते. ते सूर्यप्रकाशाच्या दिशेने छोटेसे, कमजोर असे खोड बाहेर काढते. त्याला आपले खाद्य मिळविण्यासाठी फारसे जागेवरून हलता येत नाही. म्हणून मग ते जिथे असेल त्याच्या आसपास जे शक्य असेल ते गोळा करते. त्याचा जास्तीतजास्त उपयोग करून घेते. ते जमिनीत आपली पाळेमुळे खोलवर रूजवून स्वत:ला भक्कम करते.

रोज थोडे थोडे वाढून त्याचे लहानसे रोपटे तयार होते. काही दिवसांतच त्याचे लहानसे झाड होते. सोसाट्याचा वारा येतो, दुष्काळ पडतो, ऋतु बदलतो. त्या सर्व परिस्थितीत ते चिकाटीने जे करायला हवे ते करत राहते. कालांतराने त्याला परिपूर्णतेचे समाधान मिळते. त्या इवल्याशा रोपट्याचे एका उंच, मजबूत, सुंदर भल्या मोठ्या वृक्षात रूपांतर होते. तो वृक्ष आता आणखी बियाणे व रोपटी तयार करतो. कालांतराने त्याचेच निबिड अरण्यात रूपांतर झालेले पाहायला मिळते.

म्हणजेच इवलेसे बियाणे व तृण बिनकामाचे व क्षुद्र वाटले तरी ते तसे नसते. त्याच्याकडून ज्याची अपेक्षा असते ते शक्य असेल तेव्हा जरूर करत असते, ते करत असताना ज्या शक्यता आहेत त्या स्पष्ट करीत असते. तुम्हालाही जेव्हा असेच निराशाजनक विचार मनात येतात, तेव्हा या इवल्याशा रोपट्याची आठवण करा. तसे पाहायला गेले तर ते तुमच्यापेक्षा खूपच कमी कार्यक्षम, खूपच कमी परिस्थितीनुसार बदलू शकणारे, खूपच कमी कल्पक असते. तरीही अंगच्या चिकाटीमुळे दिमाखदार निर्मिती करू शकते. ज्याला परिस्थितीशी जुळते घेण्याची तयारी असते, त्याला नेहमीच आशेचा किरण दिसत असतो.

❁ ❁ ❁

# उत्तर सीमेवरील चहाचे दुकान

ही गोष्ट भारताच्या उत्तर सीमेवरील जम्मू व कश्मिरच्या पूंछ व राजोरी सेक्टर भागामधील सत्यघटना आहे. ती आठ जवानांची तुकडी एका चेकपोस्टवर सीमा संरक्षणासाठी पुढचे तीन चार महिने ड्युटी करायला जात होती. चेकपोस्टवर आधी कार्यरत असलेली जवानांची तुकडी ही नवीन येणारी कुमक पोहोचण्याची आतुरतेने वाट पाहत होती. त्यांची सुटका झाल्यानंतर ते आपल्या बटालियनच्या मुख्य ठाण्यावर जाऊन सुरक्षित दिवस जगायला उत्सुक होते. त्यापैकी काहीजण सुट्टी घेऊन आपल्या मुलाबाळांमध्ये जाण्यास तास मोजत होते. त्या वेळी ड्युटीवर असलेल्या जवानांनी केलेल्या कामाची कल्पना असल्यामुळे त्यांची सोडवणूक करायला जाणारे जवान आनंदाने जात होते.

पोस्टवर जाण्याचा मार्ग अतिशय धोकादायक चढणाचा होता. मुक्कामाला पोहोचण्यास दुसऱ्या दिवसाची सायंकाळ होणार होती. थंडीच्या दिवसातील पडणाऱ्या हिमवर्षावामुळे रस्त्यात होणाऱ्या छळवणुकीत भरच पडत होती. त्या जवानांच्या तुकडीच्या मेजरला वाटत होते की कोणीतरी एक गरम चहाचा कप दिला तर हा प्रवासाचा शीण काहीसा कमी होईल. अर्थात, अशी आशा करणे अनाठायी असल्याचे त्याला ठाऊक होते.

त्याच परिस्थितीत आणखी एक तास चढण चढल्यानंतर एका ठिकाणी त्यांना एक पडक्या अवस्थेतील छोटेसे बांधकाम नजरेत आले. ते एक छोटेसे दुकान होते पण कुलूप लावून बंद होते. रात्रीचे दोन वाजले होते.

दुकानाच्या जवळपास एकही झोपडे दिसत नव्हते. याचा अर्थ दुकानाचा मालक जवळ नव्हताच. काहीच निर्णय घेता येत नव्हता. मेजरने सॉरी म्हटले. चहा आपल्या नशिबात नाही असेही म्हणाला. जवान गेले तीन तास सतत चालत होते. दमून गेले

होते. त्यांना थोडी वेळ विश्रांती घेण्यास मेजरने परवानगी दिली.

''सर हे नक्की चहाचे दुकान आहे. आपण चहा करू शकतो. फक्त आपल्याला दुकानाचे कुलुप तोडावे लागेल.'' एक जवान धीर करून बोलला. मेजरला ती सूचना खरी ठरण्याची शक्यता कमी वाटली तरी कल्पनेतील वाफा येणारा चहा दिसत होता. त्याला नाही म्हणणे शक्य झाले नाही. त्याने दोन मिनिटे विचार केला आणि दुकानाचे कुलूप तोडण्यास मान्यता दिली. कुलूप तोडले गेले. त्यांचे नशिब बलवत्तर होते.

ते खरोखरच चहाचे दुकान होते. चहाचे सगळे साहित्य होते आणि शिवाय थोडी बिस्किटेपण होती. चहा तयार झाला. त्या कडाक्याच्या थंडीमध्ये त्या एक कप चहाने जवानांना फार तरतरी आली. त्यांच्यापुढे असलेल्या अत्यंत धोकादायक मार्गावर चढून जाण्यास जवान तयार झाले. मेजर निघण्यापूर्वी विचारात पडला. चहाच्या दुकानाच्या मालकाच्या परवानगीशिवाय दुकानाचे कुलूप तोडून प्रवेश केला, चहा केला, बिस्किटांचा फडशा पाडला. त्या सगळ्याचे पैसे देणे होते पण ते घ्यायला कोणीच हजर नव्हते. काहीतरी मार्ग काढल्याशिवाय मेजर पुढे जाण्यास तयार नव्हता. त्याने खिशातील पाकिटामधून रु. १,००० ची एक नोट काढली ती टेबलावर ठेवून त्यावर साखरेचे भांडे वजनाला ठेवले. मालक आला की सकाळी प्रथमत: ती नजरेस पडेल अशी त्याला खात्री वाटली. त्याला वाटणाऱ्या अपराधी भावनेतून सुटल्याचे समाधान झाले.

दिवस, आठवडे, महिने उलटले. जवानांच्या तुकडीने दिलेले काम उत्तम बजावले होते. त्यांच्या नशिबाने एकही जवानाला कसलीही इजा पोहोचली नव्हती. एक दिवस त्यांना सोडविण्यासाठी आणखी वेगळी जवानाची तुकडी येणार होती. ती आल्यानंतर ते परतीसाठी मार्गस्थ झाले. वाटेत त्याच येतानाच्या ठिकाणावर ते थांबले. यावेळी मालक दुकानात होता व दुकान चालू होते. तो अत्यंत म्हातारा आणि अगदी तुटपुंज्या सामुग्रीसह दुकानात होता. जवानांना पाहताच त्याचा चेहरा उजळला. निदान आठ कप चहा तरी विकला जाईल अशी त्याला आशा निर्माण झाली. सगळे जवान चहा पिताना त्या म्हाताऱ्या मालकाशी गप्पा मारीत होते. इतक्या आडरस्त्याला तो करणाऱ्या चहाच्या व्यवसायाबद्दल, एकूण परिस्थितीबद्दल, त्याच्या आतापर्यंतच्या अनुभवाबद्दल ते त्याच्याशी बोलत होते. म्हातारा त्याच्या अनेक जुन्या कथा सांगत होता व परमेश्वरावरचा दृढविश्वास दर वेळी बोलून दाखवित होता.

एक जवान म्हणाला, ''पण जर परमेश्वर असता तर तुला या अशा हलाखीत का ठेवले आहे?'' जवानाला त्याच्या गरिबीची आणि देवावरच्या अंधश्रद्धेची दया आली.

''नाही रे बाबा. असे म्हणू नकोस. देव खरोखरच आहे. माझ्याकडे त्याचा पुरावा आहे. मी फार कठीण प्रसंगातून जात होतो. माझ्या एकुलत्या एका पोराला दहशतवादी लोकांनी बेदम मारले. त्यांना त्याच्याकडून काही माहिती हवी होती जी त्याला ठाऊक नव्हती. मी लवकर दुकान बंद केले, मुलाला घेऊन दवाखान्यात गेलो. औषधे विकत घ्यायची होती; पण माझ्याजवळ पैसे नव्हते. दहशतवाद्यांच्या भीतिमुळे कोणी पैसे कर्ज म्हणून सुद्धा देत नव्हते. साहेब मी तर आशाच सोडली होती. त्या दिवशी माझ्या मदतीसाठी देवाची प्रार्थना केली आणि साहेब त्या दिवशी अल्ला माझ्या दुकानात चालत आला. निराश होऊन मी दुकानात परत आलो. पाहतो ते दुकानाचे कुलूप तोडलेले होते. मला वाटले माझे होते तेही सर्व लुटले गेले असणार. पण पाहतो तर काय? अल्लाने साखरेच्या भांड्याखाली रु. १,००० ची नोट ठेवली होती. त्या पैशाची काय किंमत होती ते मी सांगू शकणार नाही. अल्ला आहे साहेब, अल्ला नक्की आहे. मला ठाऊक आहे रोज इथे माणसे मरताहेत. पण तुम्ही लवकरच तुमच्या कुटुंबात, मुलाबाळांजवळ जाणार आहात. तुम्ही अल्लाचे आभार मानायला हवेत. त्याचे आपल्या सर्वांकडे लक्ष आहे. तो नक्की आहे. तो त्या दिवशी माझ्या दुकानात नक्की चालत आला होता. मला त्याची खात्री आहे.''

त्याच्या डोळ्यांत देवावरचा अढळ विश्वास दिसत होता. इतरांना गांगरून टाकणारा होता.

सात जवानांचे डोळे त्यांचा नेता काय हुकूम करतो याकडे लागले होते. गप्प राहण्याचे त्याने डोळ्याने केलेले संकेत त्या सातही जणांनी वाचले. मेजरने उठून चहाचे पैसे दिले आणि म्हाताऱ्याला आवेशाने मिठी मारली.

मेजर म्हणाला, ''हो  बाबा, देव खरेच अस्तित्वात आहे आणि हो, चहा फार छान झाला होता.''

सात जवानांना मेजरच्या डोळ्यांच्या कडा ओल्या झालेले अनोखे दृश्य पाहायचा योग आला.

❋ ❋ ❋

# ऋणनिर्देशाने होणारा परिणाम

**शा**ळेतील एका शिक्षिकेने आपल्यापेक्षा जेष्ठ व अनुभवी असणाऱ्या लोकांना भेटून त्यांचा तिच्यावर झालेला परिणाम व त्यामुळे तिच्यात झालेला आमूलाग्र बदल याचा ऋणनिर्देश केला. तिने वर्गात प्रत्येक विद्यार्थ्यांला पुढे बोलावले. प्रत्येक मुलाचा तिच्यावर काय व कसा परिणाम झाला आहे ते तिने सांगितले. नंतर तिने प्रत्येकाला एक निळी फीत (रिबीन) छातीवर लावली. त्यावर लिहिले होते, ''ज्याने माझ्यात बदल घडवून आणला ती व्यक्ती''

त्यानंतर शिक्षिकेने एक उपक्रम करण्याचे ठरविले. केलेल्या कामाचा ऋणनिर्देश केल्यानंतर (इम्पॅक्ट रेकग्निशन) समाजावर त्याचा काय परिणाम होतो ते तिला आजमावयाचे होते. त्यासाठी तिने प्रत्येक विद्यार्थ्यांला तशाच मजकुराच्या तीन निळ्या फिती दिल्या. बाहेर जाऊन या ऋणनिर्देशाच्या प्रयोगात आणखी लोकांना सामावण्यास सांगितले. त्यांनी ह्या प्रयोगाचा काय परिणाम घडतो ते नोंद करून एक आठवड्यानंतर वर्गात त्याचा अहवाल सादर करण्यास बजावले.

वर्गातील एक मुलगा जवळच्या एका कंपनीतील कनिष्ठ अधिकाऱ्याकडे गेला. त्या अधिकाऱ्याने मुलाला व्यवसायमार्गाचे नियोजन (करीअर प्लॅनिंग) करण्यासाठी मार्गदर्शन केले होते त्याबद्दल ते ऋणनिर्देश होते. मुलाने त्याला दिलेली निळी फीत त्या अधिकाऱ्याच्या शर्टावर लावली. शिवाय त्याला आणखी दोन फिती देऊन सांगितले, ''आमचा वर्ग ऋणनिर्देशनाचा उपक्रम करीत आहे, त्यात तुमचा सहभाग असण्याची विनंती आहे. त्यासाठी तुम्ही कोणाला तरी एक फीत लावून त्याचा सन्मान करावा व दुसरी त्याला तसेच करण्यासाठी द्यावी, असे कराल का?''

त्या दिवशी दुपारी तो अधिकारी त्याच्या साहेबाकडे गेला. तो साहेब कटकट्या म्हणून लोकांत परिचित होता. अधिकाऱ्याने त्याला सांगितले, ''तुमच्या निर्मितीक्षम कुशाग्र बुद्धिचा मी आदर करतो.'' साहेबाला फार आश्चर्य वाटले. कनिष्ठ अधिकाऱ्याने आपल्या साहेबाला त्याने जर ती फीत लावली तर चालेल का म्हणून विचारले. साहेबाने तशी फीत लावायचा हो म्हटले. अधिकाऱ्याने एक निळी फीत साहेबाच्या कोटावर, त्याच्या हृदयाच्या वर लावली. राहिलेली एक फीत त्याने साहेबाला देऊन विनंती केली की त्याने पण ज्या कोणाचा त्याच्यावर परिणाम झाला असेल त्याला लावून त्याचा गौरव करावा. शाळेतील मुलाने ती फीत दिली असून त्याच्या उपक्रमाची माहिती साहेबाला पुरविली. हे ऋणनिर्देशनाचे अभियान असेच चालू ठेवण्यासाठी त्याला विनंती केली. त्याचा इतरांवर काय परिणाम होतो ते पाहण्याचा उद्देश असल्याचेही सांगितले.

त्या दिवशी रात्री साहेब आपल्या १४ वर्षे वयाच्या मुलाजवळ बसला. ''एक अत्यंत अविश्वासकारक अशी घटना आज घडली. मी माझ्या ऑफिसमध्ये बसलो होतो. माझा एक कर्मचारी आला आणि म्हणाला, ''तो माझा आदर करतो.'' आणि त्याने ही फीत माझ्या छातीवर लावली. मी निर्मितीक्षम कुशाग्र बुद्धिचा असल्याचे व माझ्या व्यक्तिमत्त्वाचा त्याच्या व्यक्तिमत्त्व विकासाला फायदा झाल्याचे पण त्याने मला सांगितले. त्याने ही फीत मला देऊन मी कोणाला तरी सन्मानित करावे अशी विनंती केली. आज मी ऑफिसमधून घरी येताना तुझ्याबद्दल माझ्या मनात विचार आला. मला तुझा सन्मान करायचा आहे. माझे दिवस खूप धावपळीचे जातात आणि मी जेव्हा घरी येतो तेव्हा हवे तितके लक्ष तुझ्याकडे देत नाही. तू परीक्षेत कमी गुण मिळविल्या कारणाने व तू तुझी बेडरूम नीट न ठेवल्यासाठी मी तुझ्यावर ओरडतो. आज तुझ्याजवळ बसून तुला सांगावेसे वाटते की मला तू खूप आवडतोस. तुझ्यामुळे माझ्या जगण्याला खूप अर्थ आला आहे. तुझ्या आईखेरीज तू असा एक आहेस की जो माझ्या आयुष्यात फार महत्त्वाची व्यक्ती आहेस. तू फार चांगला मुलगा आहेस आणि माझे तुझ्यावर नितांत प्रेम आहे.''

त्याच्या बोलण्याने विस्मित झालेला तो मुलगा हमसून हमसून रडायला लागतो. त्याला रडू आवरतच नाही. त्याच्या शरीराला कंप सुटतो. तो वडिलांना मिठी मारतो आणि रडतच सांगतो, ''डॅडी, आज मी माझ्या रूमवर बसून तुम्हाला आणि ममाला एक पत्र लिहिले आहे. आज मी तुम्ही झोपल्यावर आत्महत्या करणार होतो. मी त्या पत्रात कारणे लिहिली आहेत. मला माफ करा असेही लिहिले आहे. तुम्हाला माझी इतकी काळजी वाटते हे मला ठाऊक नव्हते. पत्र वर आहे. मला नाही वाटत

आता त्याची मला जरूर आहे.''

त्याचे वडील वर गेले, त्यांनी ते पत्र वाचले. त्यात मुलाने सगळा राग व दु:ख व्यक्त केले होते. तो साहेब दुसऱ्या दिवशी ऑफिसमध्ये गेला तो पूर्ण बदललेला होता. त्यानंतर तो कटकटी राहिला नाही. आपल्या हाताखालील लोकांना त्याने ते त्याच्यासाठी किती महत्त्वाचे आहेत हे आवर्जून सांगितले. त्या कनिष्ठ अधिकाऱ्याने अनेक मुलांना त्यांचे व्यावसायिक नियोजन करण्यास मदत केली. त्या मुलांपैकी एक त्याच्या साहेबाचाच मुलगा होता. त्याबरोबरच त्या सर्वांनी त्याचे आयुष्य बदलण्यास मदत केल्याचेही तो आवर्जून सांगत होता.

शाळेतील मुलांना यापासून एक महत्त्वाचा धडा मिळाला. आयुष्यात एखादी व्यक्ती आपल्यावर प्रभाव पाडते त्याचा ऋणनिर्देश करण्याने त्या व्यक्तीचा सन्मान केला जातो.

❋ ❋ ❋

# एक मौलिक संदेश

एका प्रसिद्ध उद्योगाच्या कार्यकारी संचालकाने आपल्या कर्मचाऱ्यांना अगदी छोटा परंतु फार महत्त्वाचा व उद्‌बोधक संदेश दिला होता. तो असा होता.

''कल्पना करा की तुमचे आयुष्य म्हणजे एक खेळ आहे. त्या खेळात तुम्ही पाच चेंडूंना हवेतून हातात नाचवित आहात. म्हणजे एका हातातून दुसऱ्या हातात उडवित आहात. तुमच्या हातातील त्या पाच चेंडूंची नावे आहेत, व्यवसाय, कुटुंब, प्रकृती स्वास्थ, मैत्री आणि अंतरात्मा. हे सगळे तुम्ही हवेत उडवून त्यांच्याशी खेळत आहात.

तुमच्या थोड्याच वेळात लक्षात येईल की व्यवसायाचा चेंडू हा रबराचा आहे. तो जमिनीवर आपटला तरी तो परत उसळी घेऊन वर उडेल.

पण इतर चार चेंडू म्हणजे, कुटुंब, प्रकृती स्वास्थ्य, मैत्री आणि अंतरात्मा हे चेंडू मात्र काचेचे आहेत. यापैकी कोणताही एक चेंडू जमिनीवर आदळला तर तो पूर्ववत न होण्याइतका डागाळेल, त्याला चरे पडतील, तो निकामी होईल किंवा त्याचे तुटून तुकडे पडतील. तुम्हाला ते चेंडू आधीसारखे कधीच हाताळता येणार नाहीत. हे लक्षात घेऊन तुम्हाला अतिशय गंभीरपणे प्रयत्न करायला हवेत.''

कामाच्या वेळात व काम करीत असताना ते अत्यंत काळजीपूर्वक करा.

वेळेच्या नियमांचे कसोशीने पालन करा.

दिवसातील योग्य तितका वेळ तुमच्या कुटुंबासाठी व मित्रांसाठी राखून ठेवा.

आवश्यक तेवढी विश्रांती घ्यायला विसरू नका.

❋ ❋ ❋

# एकवीस वर्षांच्या वैवाहिक जीवनानंतर

तो दिवस आमच्या लग्नाचा एकविसावा वाढदिवस होता. माझी पत्नी त्या दिवशी मला म्हणाली, ''आज तुम्ही दुसऱ्या एका स्त्रीला घेऊन बाहेर जेवायला जा आणि तिच्याबरोबर तिला आवडेल असा छानसा एखादा सिनेमा पाहा. माझे तुमच्यावर खूप प्रेम आहे. पण मला हेही माहीत आहे की ही दुसरी स्त्री पण तुमच्यावर अतोनात प्रेम करते आणि तिला तुमच्याबरोबर बाहेर जेवायला, तुमच्याबरोबर वेळ घालवायला आणि सिनेमाला जाणे खूप आवडेल.

माझ्या पत्नीच्या मनात असलेली ही दुसरी स्त्री म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून प्रत्यक्ष माझी आई होती. एकोणीस वर्षांपूर्वी माझे वडील गेल्यानंतर माझी आई एकटेपणाचे आयुष्य जगत होती. माझ्या कामाच्या व्यापात आणि तीन मुलांच्या संसारातून मी तिला मुद्दाम भेटायला म्हणून फारच क्वचित आणि तेही कारणपरत्त्वेच जात असे.

पत्नीची आज्ञा प्रमाण मानून सायंकाळी मी आईला टेलिफोन केला आणि मी तिला घेऊन जेवायला आणि सिनेमाला जाण्याचा बेत आखल्याचे सांगितले.

''अरे काय सांगतोस काय? बरा आहेस ना तू? काही प्रॉब्लेम नाही ना?'' माझ्या आईने विचारले. इतक्या उशिरा, ऐनवेळी आणि तीही अशी आनंदाची बातमी फोनवर देणे म्हणजे नक्की काहीतरी अशुभ वार्ता असणार अशी तिच्या मनाची समजूत होती.

मी तिला सांगितले, ''मला तुझ्याबरोबर जायची आज खूप इच्छा आहे आणि हो फक्त आपण दोघेच बरे का.''

दोन मिनिटे थांबून ती म्हणाली, ''वा! मलाही तुझ्याबरोबर आज यायला खूप आवडेल.''

त्या दिवशी काम संपवून मी तडक तिच्याकडे निघालो खरा; पण मनातून जरासा अवघडून गेलो होतो. जेव्हा मी तिच्या दारापाशी पोहोचलो तेव्हा ती दारात वाट पाहत होती. आमच्या आजच्या ठरलेल्या कार्यक्रमाविषयी ती पण जरा साशंक होती. तिने छानपैकी कपडे घातले होते. अंगात कोट चढविला होता. तसाच ड्रेस तिने तिच्या लग्नाच्या शेवटचा वाढदिवस साजरा करताना परिधान केला होता.

मला पाहताच ती प्रसन्नपणे तोंडभरून हसली आणि कारमध्ये बसतानाच म्हणाली, ''मी माझ्या मैत्रिणीला सांगितले की मी माझ्या मुलाबरोबर आज जेवायला आणि सिनेमाला जात आहे. त्यांचा तर त्यावर विश्वासच बसेना.''

आम्ही एका छानशा रेस्टॉरंटमध्ये गेलो. ते फार उच्च दर्ज्याचे नसले तरी सुंदर सजावट केलेले आणि टुमदार असे होते. रेस्टॉरंटमध्ये शिरताना रुबाबदारपणे माझा हात धरून ती चालत होती. टेबलावर बसल्यानंतर मी स्वाभाविकपणे काय खायला मागवायचे हे ठरविण्यासाठी मेनू कार्ड वाचत होतो. मधेच थांबून माझे लक्ष आईकडे गेले तर तिच्या जुन्या जमान्यातील आठवणी जाग्या होऊन तिच्या ओठावर मंद हास्य होते. ती म्हणाली, ''बेटा, तू लहान असताना मी तुझ्यासाठी अशीच मेनू कार्ड वाचून दाखवित असे.''

''हो ना. म्हणून तर आता तू निश्चिंत मनाने बैस. मला तू केलेस तसे तुझ्यासाठी करून मला आनंद घेऊ दे.'' मी प्रांजलपणे बोललो. जेवताना आमच्या मनमोकळ्या गप्पा झाल्या. त्या काही फार महत्त्वाच्या नव्हत्या; पण दोघांच्या गेल्या काही दिवसांमधील घडलेल्या किरकोळ घटनांबाबत तो आढावा होता. आम्ही दोघे बोलण्यात इतके रंगून गेलो की आमच्या सिनेमाची वेळ चुकली. अर्थातच सिनेमाला जाण्याचा बेत रद्द करावा लागला.

आईला घरी सोडून तिचा निरोप घेताना मी म्हणाली, ''बेटा, मला तुझ्याबरोबर असेच पुन्हा केव्हातरी यायला खूप बरे वाटेल; पण एक अट आहे. पुढच्या वेळी माझ्या आमंत्रणाला हो म्हणून तू आले पाहिजेस.'' मी तिला होकार देऊन अगदी समाधानाने निघालो.

घरी पोहोचताच माझ्या पत्नीने विचारले, ''कसा काय झाला तुमचा एकूण कार्यक्रम?'' फारच मस्त. माझ्या अपेक्षेपेक्षा कितीतरी छान झाला. मी कल्पना सुद्धा केली नव्हती इतके आम्ही दोघे खूश होतो.''

त्यानंतर थोडे दिवस माझे आणि आईचे संभाषण होऊ शकले नाही. दुर्दैवाने अचानक आईला जबरदस्त हार्ट ॲटॅक आला आणि त्यातच ती मला सोडून गेली. हे इतके अचानक घडले की मी तिला वाचविण्यासाठी काहीही करू शकलो नाही. त्यानंतर काही दिवसांनी मला एक पाकीट मिळाले. ते मी ज्या रेस्टॉरंटमध्ये आईला घेऊन गेलो होतो तिथूनच आले होते.

त्या पाकिटात रेस्टॉरंटची एक बील दिल्याची पावती होती. त्याबरोबर एक चिठ्ठी होती. ती आईच्या हस्ताक्षरातील होती. त्यात लिहिले होते, ''मी ह्या बिलाचे पैसे आधीच भरले आहेत. ते दोन माणसांच्या जेवणाचे बील आहे. एक तुझ्यासाठी आणि दुसरे तुझ्या बायकोसाठी. मी तुमच्याबरोबर नसेन. पण तुझ्या बायकोला नक्की घेऊन जा. मला त्या दिवशी किती आनंद झाला

होता ते मी शब्दांत वर्णन करू शकत नाही. पण हे नक्की की माझे तुझ्यावर अतिशय प्रेम आहे. माझा तुला सदैव आशीर्वाद आहे. सुखी राहा.''

त्याच क्षणी मला कळून चुकले ते म्हणजे, एखाद्याला, 'माझे तुझ्यावर प्रेम आहे हे वेळेवर व्यक्त करणे किंवा आपल्या आवडत्या माणसांना पुरेसा वेळ देणे अत्यंत महत्त्वाचे असते. परमेश्वर आणि स्वकुटुंबीय, आप्तेष्ट याहून काहीही जास्त महत्त्वाचे नसते. त्यांच्यासाठी त्यांच्यायोग्य आपला वेळ देणे हे अग्रक्रमाचे ठरते. कारण ते करण्यासाठी पुढे परत कधी वेळ मिळेलच याचा भरवसा नसतो. कोणालाच खात्री देता येत नाही. ज्या व्यक्तींवर तुम्ही प्रेम करता त्यांना कधीही गृहीत धरू नका. असे लक्षात येते की ज्या व्यक्तींवर आपले जास्त प्रेम असते, त्याच व्यक्ती आपल्याकडून जास्त दुखावल्या जातात. यापुढे हे जाणिवपूर्वक बदलण्याचा प्रयत्न करा.

❋ ❋ ❋

## एका गारगोटीने निर्माण केलेले वादळ

नदीच्या संथपणे वाहणाऱ्या पाण्यात एक छोटीशी गारगोटी टाका आणि पाहा. पाण्याच्या पृष्ठभागावर थोड्याशा लहरी निर्माण होतात आणि क्षणार्धात ती गारगोटी प्रवाहाच्या तळाशी जाऊन अदृश्य होते. ज्या वेळी ती गारगोटी पाण्याच्या पृष्ठभागाला प्रथम स्पर्श करते त्याच वेळी त्या केंद्रबिंदूपासून असंख्य वर्तुळाकार लहरी कितीतरी वेळ निर्माण होतच राहतात. प्रवाहात निर्माण होणाऱ्या या छोट्या छोट्या लहरी छोट्या छोट्या लाटांचे रुप धारण करून पार समुद्राला जाऊन पोहोचतात. ह्या उमटलेल्या लहरींचा शेवट कोठे होतो याचा कोणालाच पत्ता लागत नाही. पुढे याच छोट्या लहरींचे रूपांतर मोठ्या लाटेमध्ये होऊ शकते. नदीच्या संथ प्रवाहात अनाहूतपणे टाकलेल्या या गारगोटीमुळे तुम्ही भर समुद्रात लाटेच्या थैमानाची खळबळ माजवून टाकलेली असते.

तुमच्या तोंडून निघालेला एखादा निष्ठुर शब्द धाडकन दुसऱ्यापर्यंत क्षणार्धात जाऊन पोहोचतो; परंतु त्याच वेळी त्या दुसऱ्या माणसाच्या मनात विचारांच्या शेकडो लहरी निर्माण होतच राहतात. मनाच्या केंद्रबिंदूपासून त्या लहरी सैरावैरा सर्वत्र पसरतच राहतात. हे विचारचक्र एकदा सुरू झाले की ते थांबवणे तुमच्या हातात राहत नाही. त्यावर तुम्ही ताबा मिळवू शकत नाही. त्या एका शब्दाने कदाचित तुम्ही त्या माणसाच्या दुखावलेल्या मनात प्रचंड वादळ निर्माण करून अश्रूंचा बांध फोडून टाकलेला असतो. तो कठोर निर्दय शब्द त्याच्या हृदयापर्यंत पोहोचण्यापूर्वी असलेले त्याचे आनंदी विश्व तुमच्या शब्दाने भंग पावलेले असते.

त्याच तऱ्हेने तुमच्या तोंडून निघालेला एखादा दयाळू, प्रेमळ, आनंद देणारा प्रफुल्लित करणारा कौतुकाचा शब्द सुद्धा अशाच असंख्य लहरी ऐकणाऱ्याला संपूर्णपणे व्यापून टाकतो. या उमटलेल्या प्रत्येक आनंदलहरींमुळे ऐकणाऱ्याला अत्यंतिक सुख समाधान प्राप्त होत राहते. त्या एका शब्दाने ऐकणाऱ्याला दिलेले सुखसमाधान किती मोठ्या प्रमाणात असेल याची तुम्हाला कल्पनाही करता येणार नाही. त्या आनंदाला सतत भरती येत राहील आणि त्या समाधानाला अंत असणार नाही.

तुमच्या एका शब्दाने निर्माण केलेले हे आनंदाचे, समाधानाचे, तृप्ततेचे सूर तुम्हाला अनेक योजने दूरवर ऐकू येत राहतील की ज्यामुळे तुम्हालाही सुरेल संगीताची मेजवानी मिळू शकेल.

❋ ❋ ❋

# कर्ता करविता

**ए**क माणूस झोपलेला असताना देव त्याच्या स्वप्नात येतो. त्याला सांगतो की देवासाठी त्या माणसाने एक काम करायचे आहे. समोरचा दिसणारा खडक जास्तीतजास्त ताकद लावून ढकलायचा. माणसाने लगेच कामाला सुरूवात केली. दिवस रात्र तो खडक ढकलत असे.

बरीच वर्षे रात्रंदिवस तो नियमाने तो खडक ढकलण्याचे काम करत होता. त्या भल्या मोठ्या खडकाला धक्का देऊन त्याचे हात व खांदा थंडी वाऱ्याच्या माऱ्याला न जुमानता जोर केल्याने खूप मजबूत व रूंद झाले होते. रोज रात्री तो माणूस झोपायला आला की त्याच्या मनात विचार येत असे, आपण दिवसभर मेहनत केली पण हा खडक एक तसूभर सुद्धा जागचा हलला नाही. आपली मेहनत व दिवस फुकट गेला.

काही दिवसांनी माणूस नाउमेद व्हायला लागला. ते सैतानाच्या लक्षात आल्यावर तो त्याच्या मनात वेगळेच काही विचार भरविण्याचे ठरवितो. तो येऊन त्या माणसाला म्हणतो, ''तू इतके दिवस त्या खडकाला ढकलत आहेस पण तुला जरासे सुद्धा यश येत नाही. तो खडक जरासा पण हलला नाही.'' अशा रितीने त्याने माणसाच्या मनात भरविले की तुला दिलेले काम होणे अशक्य आहे व हे तुझे अपयश आहे. या विचाराने तो माणूस अधिकच नाऊमेद व हताश झाला.

सैतान पुढे त्याला म्हणाला, ''या कामाने तू स्वत:ला कशाला त्रास करून घेतो आहेस? तुला जमेल तेवढाच वेळ व कमीत कमी शक्ती खर्च करून जेवढे होईल तेवढेच काम कर. तितके काम केलेस की पुरे झाले.''

थकलेल्या माणसाला तेच हवे होते. त्याने त्याचे काम तसेच करायला सुरूवात केली. पण त्याने देवाची प्रार्थना करून त्याला आपली अडचण सांगण्याचेही ठरविले. ''देवा, तू सांगितल्याप्रमाणे मी खूप दिवस खूप मेहनत केली, अपार प्रयत्न केले. पण इतक्या प्रयत्नानंतर मी तो खडक एक सेंटीमीटरसुद्धा हलवू शकलो नाही. माझे काय चुकते आहे? मला का अपयश येत आहे?''

त्या माणसाची दया येऊन देव म्हणाला, ''मित्रा, मी तुला काम करायला सांगितल्यानंतर तू लगेच कामाला लागलास. मी तुला इतकेच सांगितले होते की तू तुझ्या सर्व ताकदीने समोरच्या खडकाला ढकल. ते तू केलेस. मी तुला तो खडक जागेवरून हलव म्हणून कधीच सांगितले नव्हते. तुझ्याकडून तो खडक हलवायचा माझा विचार नव्हता. तू तो फक्त ढकलायचा होतास आणि आता तू माझ्याकडे येऊन तुला अपयश आल्याचे सांगतो आहेस. पण ते खरे आहे का? जरा स्वत:कडे पाहा बरे. तुझे हात आणि खांदे मजबूत आणि पिळदार झाले आहेत. तुझी पाठ काटक बनली आहे. सततच्या ताणामुळे तुझ्या हाताला घट्टे पडले आहेत. तुझे पायही मजबूत, पिळदार व कणखर झाले आहेत. तू केलेल्या कष्टामुळे तू खूप ताकदवान बनला आहेस, तुझ्यातील क्षमता होती त्यापेक्षा बरीच वाढली आहे. जरी तू खडक हलवू शकला नाहीस तरी जे केलेस ते माझी आज्ञापालन होते, तुझ्या श्रद्धेचे ते प्रतीक होते. माझ्यावर दाखविलेला विश्वास होता. तू तुझे काम केलेस आता खडक हलविण्याचे काम मी करतो.''

आपण एखाद्या वेळेस देवाकडून एखादी गोष्ट ऐकतो तेव्हा आपण आपला शहाणपणा वापरतो आणि देवाने सांगितलेल्या गोष्टीचा वेगळाच अर्थ लावतो. देवाला फक्त आपला आज्ञाधारकपणा आणि त्याच्यावरचा आपला विश्वास पाहायचा असतो. म्हणूनच असे म्हणतात नुसत्या विश्वासाने डोंगर हलविले जातात. कारण प्रत्यक्ष डोंगर हलविणारा देवच असतो.

❁ ❁ ❁

# कवठी चाफ्याची गोष्ट

**मा**झ्या मुलीच्या लग्नासाठी मी तयार होत होते. लग्न माझ्या घरापासून ४० मैल दूर एका चर्चमध्ये होणार होते. माझ्यावर असलेल्या अनेक जबाबदाऱ्यांमुळे व वाढत जाणाऱ्या खर्चामुळे मला फार अस्वस्थ व्हायला झाले होते.

खूप गोष्टी करायच्या होत्या, खूप बिले भागवायची होती आणि हातात फार थोडा वेळ शिल्लक होता.

माझ्या बऱ्याच ओळखीच्या लोकांकडे कवठी चाफ्याची झाडे होती. पैसे वाचविण्यासाठी मी त्यांच्याकडून अतिशय सुगंधी, पिवळसर पांढऱ्या रंगाची उमललेली फुले आणि पातळ हिरवी पाने गोळा केली होती. अतिशय उंची अशा काळ्या कुळकुळीत लाकडाच्या भिंती व खांबावर सुंदर सजावट करायचे योजिले होते.

अखेर तो दिवस उजाडला. माझ्या आयुष्यातील आतापर्यंतचा सर्वांत धावपळीचा दिवस. मुलीच्या मैत्रिणी तिला सजवित असताना मी व मुलीचा होणारा नवरा टीम चर्चमध्ये जाऊन एकदा सगळी व्यवस्था डोळ्यांखालून घालायचे ठरविले. चर्चचा दरवाजा उघडून आम्ही आत जायला लागलो तर आतल्या गरम हवेचा झोत एकदम अंगावर आदळला. मी तर चक्कर येऊन पडणारच होते. इतक्यात माझे लक्ष गेले. सुंदर पिवळसर पांढऱ्या रंगाची फुले काळी ठिक्कर पडली होती. अगदी अंत्ययात्रेला असता तशी काळी फुले झाली होती. काल रात्रीच्या विजेच्या कडकडात चर्चची वातानुकूलित यंत्रणा ठप्प झाली होती. त्या कडक उन्हाळ्याच्या गरम हवामानात ती फुले वाळून मरून गेली होती.

मी गडबडून गेले. मला परत ४० मैल गाडीने जाऊन माझ्या गावातून परत फुले व पाने गोळा करून आणणे अशक्य होते हे मला समजत होते. लग्नाच्या वेळेपर्यंत जाऊन परत येण्याइतका वेळ अजिबात नव्हता. तसेच चर्चच्या गावातील फुलाच्या दुकानातून फुले विकत घेण्यासाठी माझ्याजवळ पैसे पण नव्हते.

टीम मला म्हणाला, ''आपल्याला दुसरी फुले आणता येतील का? मी ही सगळी खराब झालेली फुले काढून फेकून देतो. ताजी फुले आणली की आपण सजावट करूया.''

मी हो नक्कीच म्हणून पुटपुटले आणि कवठी चाफ्याच्या फुलांच्या शोधासाठी घाईघाईने बाहरे पडले. मी त्या परिसरात एकटीच फिरत होते. त्या सगळया भागात ताडमाड वाढलेले लाकडाचे उंच वासे असावेत असेच वृक्ष दिसत होते. मी मनात देवाची प्रार्थना करीत होते, ''देवा मला संकटातून सोडव. या गावात मी कोणालाच ओळखत नाही. मला फुले देणारा कोणीतरी लवकर भेटू दे.''

मी जशी चर्चमधून बाहेर पडले तोच मला जराशा अंतरावर असलेले कवठी चाफ्याचे झाड दिसले. त्या घराजवळ मी पोहोचले. नशिबाने राखण करायला कुत्रे नव्हते. दाराची बेल वाजविली. एका वयस्कर गृहस्थाने आलो म्हटले. वाह! खूपच छान. म्हणजे हातात गन नसणार तर. माझी अडचण व जरूरी सांगितल्यावर तो गृहस्थ मनापासून हसला. तो शिडीवर चढून त्याने मोठ्या मोठ्या फांद्या मला काढून दिल्या. काढलेल्या फांद्या मी कारच्या डिकीत ठेवल्या. शेवटची फांदी ठेवताना मी त्याला म्हणाले, ''सर, आज तुम्ही एका नववधूच्या आईला खूप मदत केली आहे. मी खूप खूश आहे.''

''इथे काय होते आहे याची तुम्हाला कल्पना नाही.'' ''काय?'' मी विचारले.

''अहो, माझी ६७ वयाची पत्नी सोमवारी निधन पावली. मंगळवारी माझे मित्र मला अंत्यविधीसाठी भेटायला आले होते. बुधवारी मी माझ्या पत्नीचे अंतिम संस्कार केले. गुरूवारी बाहेरगावचे आलेले माझे नातेवाईक परत गेले. शुक्रवारी माझी मुले परत गेली.'' त्याचा कंठ दाटून आला, डोळ्यांत पाणी आले, पुढे त्याला शब्द फुटेना. मी मानेनेच प्रतिसाद दिला. पुढे तो बोलू लागला. ''आज सकाळी मी मोठ्याने रडत होतो. मला पत्नीची अनुपस्थिती फार जाणवत होती. गेली १६ वर्षे तिची प्रकृती बरी नव्हती. तिला माझी गरज होती. पण आता माझी कोणालाच गरज राहिली नाही. आज सकाळी रडताना मला जाणवले, ८६ वर्षांचा ह्या दुर्बल म्हाताऱ्याची कोणाला गरज असणार? कोणालाच नाही. मी आणखीन जोरात रडायला लागलो. माझी कोणाला गरज उरली नाही. आणि त्याच वेळी तुम्ही दारावरची बेल वाजविलीत आणि म्हणालात, सर मला तुमच्या मदतीची गरज आहे. तुम्ही माझ्या हाकेला धावून आलात. तुम्ही देवदूत आहात.''

मी आ वासून त्याच्याकडे पाहतच राहिले. मी देवदूत नसल्याचे त्याला सांगितले. त्याने मला विचारले, ''मी ही चाफ्याची फुले तुम्हाला दिली त्यावेळी मी काय विचार करीत होतो तुम्हाला ठाऊक आहे?'' ''नाही'', मी म्हणाले.

''मी ठरविले. माझी कोणाला तरी अजून गरज आहे. माझ्या फुलांची कोणाला तरी गरज आहे. मी माझ्या फुलांचा उपयोग सेवा करण्यासाठी करू शकेन. ही फुले ज्यांना हवी त्यांना देऊ शकेन. अंत्यविधीसाठी तयार असलेल्या काही शवपेट्यांसाठी

फुले नसतात.त्यावेळी लोकांना फुलांची गरज असते. माझ्याकडे पुष्कळ फुले आहेत. माझ्या मागच्या परिसरात ती खूपच आहेत. मी ती फुले हॉस्पिटलना देऊ शकेन. चर्चना देऊ शकेन. अशा अनेक गरजू ठिकाणी मला ती फुले देता येतील. तुम्हाला माहिती आहे मी काय करणार आहे? मला देव त्याच्याकडे बोलवेपर्यंत ही सेवा करीत राहणार आहे.''

ती फुले घेऊन मी चर्चमध्ये परत आले. कोणाच्या तरी उपयोगी असणे ही तुम्हाला चैतन्य निर्माण करणारी भावना असते.

❋ ❋ ❋

# कुत्र्याच्या जगण्याचे प्रयोजन

एका कुटुंबात आयरिश वोल्फहाऊं कुत्रा होता. दहा वर्षांचा झाल्यामुळे त्याची प्रकृती खराब झाली होती. मी जनावरांचा डॉक्टर असल्याने मला त्या कुटुंबाने त्या कुत्र्याच्या प्रकृती तपासणी व औषध देण्यासाठी बोलावले होते. कुत्र्याचा मालक, त्याची पत्नी व एक लहान मुलगा ह्या सगळ्याच जणांना कुत्र्याबद्दल खूप प्रेम होते.

काहीतरी चमत्कार घडेल व कुत्र्याला बरे वाटेल अशी तिघांनाही आशा वाटत होती.

मी कुत्र्याला तपासले. त्याला शेवटच्या टप्प्यातील कॅन्सरने घेरले होते. त्याची वाचण्याची शक्यता फार कमी होती. मी त्या कुटुंबाला सत्य परिस्थिती सांगितली व कुत्रा जगण्याची शक्यता अजिबात नसल्याचे सांगितले. या अवस्थेत सुलभ मरण त्याला देणे हे उत्तम हेही समजावून सांगितले. सर्व विचारांती त्यांच्या घरात ते सुलभ मरण कुत्र्याला देण्याचे ठरले. त्यांचा मुलगा सहा वर्षांचा होता तरी ते करीत असताना तो तिथे हजर असावा असे त्याच्या आईवडिलांना वाटले. कारण तो त्यापासून काहीतरी शिकू शकेल व त्याला नंतर प्रश्न पडणार नाहीत असे त्यांचे मत होते.

दुसऱ्या दिवशी त्या कुत्र्याला औषध देण्याआधी मला त्या कुटुंबाची मानसिक अवस्था पाहून नेहमीप्रमाणेच घशाला कोरड पडली. त्या तिघांचे कुटुंब कुत्र्याभोवती उभे राहून त्याला थोपटीत होते. तो लहान मुलगा सुद्धा शांतपणे त्याला गोंजारीत होता. त्याचे ते शेवटचेच गोंजारणे व स्पर्श आहे याची त्याला कल्पना होती की नाही हे मला समजत नव्हते. मी माझे काम केल्यानंतर पाच मिनिटांतच कुत्रा चिरनिद्रेत निपचित पडला. त्या लहान मुलाने ते सगळे शांतपणे मान्य केले. त्याला कोणतेही प्रकारचे टेन्शन आले नव्हते.

आम्ही त्या कुत्र्याभोवती बसून त्याच्या आठवणी काढीत होतो. आमच्या बोलण्यात प्राण्यांचे आयुष्य माणसापेक्षा कमी का असते असाही विषय चर्चेला आला. आमचे बोलणे तो लहान मुलगा ऐकत होता. मधेच येऊन तो म्हणाला, ''मला ठाऊक आहे कुत्र्याचे आयुष्य कमी का असते ते.'' आम्ही सगळे त्याचे बोलणे ऐकू लागलो. त्याने जे सांगितले ते ऐकून माझे मन चक्रावून गेले. त्यापेक्षा जास्त दिलासा देणारे स्पष्टीकरण मी आजपर्यंत ऐकले नव्हते. ते ऐकताच माझा जगण्याचा दृष्टिकोनच बदलला.

तो मुलगा म्हणाला, ''माणसे जन्माला येतात आणि नंतर चांगले कसे जगावे, प्रत्येकावर प्रेम करावे, प्रत्येकाशी नीट वागावे हे शिकतात. पण कुत्र्याला जन्मत:च हे सर्व येत असते. त्यामुळे त्याला शिकण्यासाठी वेळ द्यावा लागत नाही आणि म्हणूनच त्याचे आयुष्य माणसापेक्षा कमी असते.''

माणसाला कुत्र्याकडून खूप गोष्टी शिकण्यासारख्या आहेत.

❋ ❋ ❋

# कृतीपूर्वी विचार करा

एक आंधळी मुलगी होती. स्वत:च्या अंधत्वाने ती स्वत:ला फार दोष देत असे. स्वत:चा तिरस्कार करीत असे. तिच्या खास एका मित्राखेरीज इतर सर्वांवर तिचा राग असे. त्यांच्याबद्दल तिला दु:स्वास वाटत असे. तिचा तो मित्र मात्र सतत तिच्या बरोबर व पाठीशी असे. ती त्या मित्राला नेहमी सांगत असे की, ''मला जर दृष्टी प्राप्त झाली व हे जग पाहता आले तर सर्वांत प्रथम काय करीन तर मी तुझ्याशी लग्न करीन.''

तिच्या नशिबाने एक दिवस कोण्या एकाने तिला दोन डोळे दान केले. ती शस्त्रक्रिया यशस्वी झाली. जेव्हा तिच्या डोळ्यांवरची बांधलेली पट्टी डॉक्टरांनी काढली तेव्हा तिला सगळे जग स्पष्ट दिसू लागले. तिला तिचा प्रिय दोस्त समोरच दिसला. ती आनंदात बुडून गेली.

समोर असणाऱ्या तिच्या मित्रानं तिला विचारले, ''तू म्हणत होतीस त्याप्रमाणे तुला आता जग दिसू लागले आहे. मग आता तू माझ्याशी लग्न करशील ना?'' मोठ्या आशेने त्याने तिचा हात हातात घेऊन तिला तसे विचारले. त्या मुलीने आपल्या मित्राकडे पाहिले तर तिला तो दोन्ही डोळ्यांनी आंधळा असलेला दिसला. त्याच्या दोन्ही डोळ्यांच्या झालेल्या खाचा पाहून तिला प्रचंड धक्का बसला. तिला असे काही पाहावे लागेल याची कल्पनाही नव्हती. आयुष्यभर त्याला या अवस्थेत पाहाणे हे अशक्य वाटून तिने चक्क त्याला नकार दिला.

तिचा मित्र हताश होऊन काहीही न बोलता तिथून निघून गेला. त्याच्या दृष्टीहीन डोळ्यांतून अश्रूंचे पाट वाहात होते. काही दिवसांनंतर त्याने आपल्या एके काळच्या जिवाभावाच्या मैत्रिणीला एक संदेश लिहिला, ''लाडके, तू तुझ्या डोळ्यांची नीट काळजी घे. त्यांना जप. कारण, प्रिये, ते डोळे तुझे होण्यापूर्वी माझे होते.''

परिस्थितीमध्ये बदल घडला की माणसाची बुद्धी असा विचित्र विचार करते. आपण काय परिस्थितीत होतो याचे भान फार थोड्या लोकांना राहाते. त्या पूर्वीच्या कठीण व क्लेशकारक काळात त्यांना कोण साथ देत होते, कोण आधार देत होते याचा विसर पडतो.

आयुष्य हे तुम्हाला मिळालेली दैवी देणगी आहे.

तुमच्या तोंडून एखादा सुद्धा अपशब्द बाहेर पडण्यापूर्वी ज्यांना बोलता येत नाही अशांची आठवण करा. समोरच्या ताटातील अन्नाच्या चवीबद्दल तक्रार करण्यापूर्वी, अनेकांना चार घास सुद्धा मिळत नाहीत याचा विचार करावा. तुमच्या नवरा अगर बायको – जोडीदाराबद्दल नाराजी व्यक्त करण्यापूर्वी अनेक जण साथीदार मिळावा म्हणून देवाला साकडे घालीत असतात त्यांना डोळ्यांसमोर आणावे.

तुम्ही ज्यावेळी स्वत:च्या आयुष्यावर नाखूश असता अशावेळी जे अल्पवयातच या जगातून गेले त्यांचे स्मरण करा. आपल्या मुलांबद्दल तक्रार करताना, या जगात अनेक जण असे आहेत की जे मूल होण्यासाठी हवालदिल झालेले असतात आणि तरीही त्यांच्या घरी पाळणा हलत नाही अशांची आठवण करा.

काही वेळा तुमचे घर छोटे असते किंवा ते कोणी साफ केलेले नसते. त्यासाठी घरावर अथवा कोणावर रागविण्यापूर्वी ज्या अभाग्यांना रस्त्यावर राहावे लागते त्यांचे चित्र डोळ्यांसमोर आणा. वाहन चालवित असताना तुम्हाला जावे लागणाऱ्या अंतरासाठी व होणाऱ्या त्रासासाठी वैतागत असाल तर तेच अंतर कोणीतरी पायी चालून पार करीत आहे याची जाणीव ठेवा. तुम्ही तुमच्या कामाने थकून जात असाल व कामासंबंधी कुरकुरत असाल तर अनेक अपंग व बेकार असणारे दुर्दैवी जिवांचा विचार करा. कदाचित तुम्ही करत असणारे काम त्यांना मिळण्याची अभिलाषा असू शकेल. दुसऱ्या कोणाकडे बोट दाखवून त्यांना अनादर करून त्यांची तुच्छता करण्यापूर्वी या जगात कोणीच स्वत:सकट, पापभिरू, सर्वसंपन्न व सदासद्गुणी असत नाही, हे लक्षात ठेवावे. या सगळ्याबरोबर जेव्हा मनात अस्वस्थता, उदासिनता निर्माण होऊन भकासपणा येतो तेव्हा चेहऱ्यावर हसू आणा आणि तुम्ही जिवंत असून सभोवती आनंदी वातावरण असल्याचा आनंद बाळगा.

❋ ❋ ❋

# गणित विषयाची शिक्षिका

शाळेत गणिताचा वर्ग सुरू होता. आज गणिताच्या शिक्षिकेने अभ्यास शिकविण्याऐवजी एक वेगळेच गणित मुलांना घातले. सर्व मुलांना दोन कागदावर वर्गातील इतर सर्व सहाध्यायांची नावे लिहायला सांगितली. नावे लिहिताना दोन नावांच्या मध्ये थोडी जागा सोडायला सांगितले.

त्यानंतर शिक्षिकेने मुलांना सांगितले की प्रत्येक नावानंतर सोडलेल्या जागेमध्ये तुम्हाला त्या मुलाच्या चांगुलपणाबद्दल जी एखादी गोष्ट माहीत असेल ती तुम्ही तुमच्या शब्दांत लिहावी. त्या दिवशी मुलांना नेमून दिलेली ही कामगिरी करण्यात गणिताच्या तासाचा वेळ संपून गेला. तास संपताना मुलांनी तयार केलेले ते कागद शिक्षिकेच्या स्वाधीन केले. त्यानंतरच्या शनिवारी त्या शिक्षिकेने प्रत्येक मुलाच्या नावाचा एक स्वतंत्र कागद तयार केला. कागदाच्या वरच्या बाजूला मुलाचे नाव लिहून खाली स्वतंत्र त्याच्या वर्गमित्रांनी त्याच्याबद्दल व्यक्त केलेल्या भावना लिहून काढल्या. प्रत्येक मुलाला स्वत:बद्दल इतर वर्गमित्रांना काय वाटते ते एकत्रितपणे वाचायला मिळणार होते.

नंतर येणाऱ्या सोमवारी गणिताच्या तासाला शिक्षिकेने ते तयार केलेले कागद ज्या त्या विद्यार्थ्याला बोलावून दिले. काही क्षणातच वर्गातील सर्व मुलांच्या चेहऱ्यावर एक आश्चर्ययुक्त पण अतिशय आनंदाचे, समाधानाचे हसू फुटले. त्या शिक्षिकेच्या कानावर मंजुळ कुजबूज आली. ''खरेच, अय्या! बापरे! वाह! इतरांना माझ्याबद्दल असे काही वाटत असेल असे मला स्वप्नातही वाटले नव्हते. माझ्यातील ही गोष्ट इतरांना मनापासून आवडत असेल असे मला ठाऊकच नव्हते.'' असे आणि अशा प्रकारचे आनंदोग्दार सर्व बाकांवरून ऐकू येत होते.

त्यानंतर वर्गातील मुलांनी त्या ऐतिहासिक कागदाबद्दल कधीही व कोणत्याच तासाला चर्चा केली नाही. मुलांनी त्याबद्दल वर्गाबाहेर अगर पालकांशी कधी चर्चा केली की नाही तेही त्या शिक्षिकेने कधी चौकशी केली नाही. कारण त्याला विशेष महत्त्व नव्हतेच. त्या दिवशीच्या त्या उपक्रमाचा हवा असलेला योग्य तो परिणाम नक्कीच साध्य झाला होता. मुले स्वत:वर आणि एक दुसऱ्या वर्गमित्रावर बेहद्द खूश होती. वर्षांबरोबर वर्गातील मुले आपआपल्या क्षेत्रात मग्न झाली. त्यानंतर बराच काळ लोटला. त्यापैकी एक मुलगा भारतीय सैन्यात दाखल झाला होता. पुढे कारगिलचे युद्ध भारताने जिंकले. पण दुर्दैवाने तो विद्यार्थी रणांगणावर धारातीर्थी पडला. ती शिक्षिका त्या खास लक्षात राहिलेल्या विद्यार्थ्याच्या अंत्ययात्रेला आवर्जून उपस्थित होती. त्यापूर्वी कोणत्याही सैनिकांच्या अंत्ययात्रेला ती कधीही हजर नव्हती. तिने त्याचे अंत्यदर्शन घेतले. मरणानंतरही तो अतिशय रूबाबदार व परिपक्व असा दिसत होता.

त्या अंत्ययात्रेला खूप लोक जमा झाले होते. त्यामध्ये त्या विद्यार्थ्याचे अनेक वर्गमित्र आवर्जून आले होते. त्याच्यावर प्रेम केलेले मित्र त्याला शेवटच्या प्रवासात साथ देत होते. ती वर्गशिक्षिका सुद्धा सद्‌गदीत अंत:करणाने यात्रेत सहभागी झाली होती.

अखेर शेवटी ती त्या विद्यार्थ्याच्या संजयच्या – दर्शनासाठी त्याच्याजवळ उभी राहून मनोमन सद्‌गती चिंतीत होती. त्याच वेळी संजयची कायम सोबत करणारा त्याचा एक सैनिक मित्र आला आणि म्हणाला, ''तुम्ही संजयच्या गणिताच्या शिक्षिका ना?'' शिक्षिकेने भरल्या डोळ्यांनीच मानेने हो म्हटले. त्यावर तो म्हणाला, ''संजय तुमच्याबद्दल खूप बोलत असे.''

अंत्यविधीनंतर संजयचे बरेच वर्गमित्र एकत्र जमले होते. संजयचे आईवडील पण त्यांच्याबरोबरच होते. त्या सर्वांना अर्थातच संजयच्या गणिताच्या शिक्षिकेला भेटायचे होते. तिच्याशी बोलण्यासाठी सगळे जमा झाले.

''आम्हाला एक वस्तू तुम्हाला मुद्दाम दाखवायची आहे.'' संजयचे वडील म्हणाले. त्यांनी खिशातून एक पाकीट काढले. ते संजयच्या मरणानंतर त्याच्या खिशात मिळाले होते. आम्हाला वाटले की हे काय आहे ते तुम्ही नक्की ओळखू शकाल. त्या कागदाच्या पाकिटातून अलगदपणे जीर्ण झालेले दोन फुलस्केप कागद त्यांनी बाहेर काढले. ते दोन कागद ज्या अवस्थेत होते त्यावरून ते बरेच वेळा उघडून, परत घडी करून पुन्हा त्या पाकिटात ठेवले असावेत हे स्पष्ट कळत होते. ते कागद हातात न घेता सुद्धा शिक्षिकेने ते कसले कागद आहेत हे ओळखले. संजयच्या वर्गमित्रांनी त्याच्याबद्दल त्यांना भावलेल्या संजयबद्दलच्या

गोष्टींची ती एक यादी होती. त्या शिक्षिकेनेच तयार केलेला तो दस्तऐवज होता.

''मनापासून तुमचे आभार. संजयने तो अमूल्य ठेवा जपून ठेवला होता.'' संजयची आई म्हणाली.

संजयचे सर्व उपस्थित वर्गमित्र तो खजिना पाहण्यासाठी भोवती जमले. त्यांच्यामधील अर्जुन हसला आणि म्हणाला,

''मी पण तो कागद जपून ठेवला आहे. तो माझ्या घरातील कपाटाच्या सर्वांत वरच्या कप्प्यात मी ठेवला आहे.''

पृथ्वीच्या पत्नीने सांगितले, ''पृथ्वीने तो कागद आमच्या लग्नाच्या अल्बममध्ये आवर्जून लावला आहे.''

''माझा कागद पण मी जवळ बाळगून असते.'' असे म्हणून रश्मीने तो आपल्या डायरीतून काढून दाखविला.

त्यानंतर लगेच दीपाली, त्या वर्गातील संजयची आणखी एक वर्गमैत्रिण पुढे आली. तिने आपल्या बॅगेतून आपली पर्स काढली. त्यातून एक जुना चुरगाळलेला कागद काढून सर्वांना दाखविला. ''हा कागद मी सदैव माझ्याजवळ ठेवते.'' ती पाणावलेल्या नजरेने पुढे म्हणाली, ''मला वाटते आपण सगळेच जण हा कागदाचा अमूल्य ठेवा जिवासारखा जपून बाळगत आहोत.''

यानंतर मात्र त्या गणिताच्या शिक्षिकेला उभे राहणे शक्य झाले नाही. मटकन ती खाली बसली आणि हमसून हमसून रडायला लागली. ती संजयसाठी रडली. संजयला जे परत पाहू शकणार नव्हते त्या त्याच्या सगळ्या मित्रांसाठी रडली. आपल्या सभोवतालची लोकसंख्या इतकी दाट आहे की, आपले आयुष्य एक दिवस संपणार आहे याचा सुद्धा आपल्याला विसर पडतो. तो शेवट केव्हा येणार आहे हे आपल्याला ठाऊक नसते.

तेव्हा ज्या माणसांवर तुमचे प्रेम आहे, ज्यांची तुम्हाला काळजी वाटते त्यांना सांगा की तुम्ही त्यांच्यावर मनापासून प्रेम करता. तुमच्यासाठी ती व्यक्ती खास आहे. खूप उशीर होण्यापूर्वीच त्यांच्याजवळ हे व्यक्त करा.

लक्षात ठेवा. जसे पेराल तसे उगवेल. तुम्ही जे दुसऱ्याच्या आयुष्यात आनंद निर्माण करण्यासाठी कराल तसेच तुमच्या वाट्याला तुमच्या आयुष्यात येईल.

❋ ❋ ❋

## गाडीवर फेकलेली वीट!!

एका व्यवसायाचा यशस्वी व्यवस्थापक असलेला तरूण आपली नवी कोरी जाग्वार कार जरा वेगाने चालवीत जवळच्या आडरस्त्याने जात होता. जात असतानाच त्याला कडेच्या बाजूला काही लहान मुले खेळताना दिसली. त्याने कारचा वेग थोडा कमी केला. त्याला काहीतरी वेगळे वाटले. पण त्याची कार पुढे निघाल्यावर कोणीच मुले दिसेनात. त्या ऐवजी मुलांच्या बाजूने एक विटेचा मोठा तुकडा जोरात येऊन कारच्या दारावर धडकला. त्याने गाडीचे ब्रेक लावले आणि भर्रकन ज्या ठिकाणाहून तो विटेचा तुकडा फेकला गेला होता त्या जागी कार आणली. रागावलेला तो तरूण कारमधून उतरला. जवळच असलेल्या मुलाची गचंडी पकडून त्याला कारजवळ नेले आणि ओरडला, ''काय चालले होते? नाव काय तुझे? तुला कळले का तू काय केलेस ते? माझी कार नवी आहे आणि तू फेकलेल्या विटेने झालेले नुकसान भरून काढायला व कार दुरूस्त करायला खूप खर्च येणार आहे. तू असे का केलेस?''

लहान मुलगा खूपच खजिल झाला होता. ''मला माफ करा. खरेच माफ करा. मी काय करावे हे मला समजत नव्हते. गेले काही मिनिटे हात दाखवूनही कोणीच थांबत नव्हते.'' त्याच्या डोळ्यांतून पाणी गालावरून आणि हनुवटीवरून ओघळत होते. मान खाली घालून कार थांबली होती त्या बाजूला हात दाखवून पुढे तो म्हणाला, ''तो पाहा माझा भाऊ. दगडाला अडखळून तो त्याच्या व्हीलचेअरवरून खाली पडला आहे. मी त्याला उचलू शकत नाही.'' मुसमुसून रडत तो मुलगा त्या तरुणाला म्हणाला, ''कृपा करून माझ्या भावाला व्हीलचेअरमध्ये बसवायला मला मदत करता का? त्याला लागले आहे. आणि तो जड असल्याने मला त्याला उचलता येत नाही.''

त्याच्या बोलण्याने विरघळून जाऊन त्या तरुणाने घशात अडकलेला आवंढा कसाबसा गिळला. तत्काळ त्या अपंग मुलाला त्याच्या व्हीलचेअरवर बसविले. खिशातून आपला लिननचा स्वच्छ हातरूमाल काढला.

त्याच्या तोंडावरचे खरचटलेल्या भागावरचे रक्त टिपले. त्याने पटकन अंदाज घेतला, सर्व ठीक आहे अशी खात्री करून घेतली. ''धन्यवाद, देव तुमचे भले करो'' मुलगा त्या अनोळखी तरुणाला म्हणाला. परत एकदा त्याच्या त्या शब्दांनी अवाक होऊन तरूण पाहतच राहिला. मुलाने भावाची व्हीलचेअर ढकलून आपल्या घराची वाट धरली.

तरूण वळून कारकडे निघाला. एवढेसे थोडे अंतरही त्याला फार लांब असल्यासारखे वाटले. कारजवळ येऊन पाहिले तर कारचे बरेच नुकसान झाले होते. विटेच्या दणक्याने बराच मोठा पोचा आला होता. पण तरूणाने तो पोचा दुरूस्त करायचा कधीच विचार केला नाही. त्या प्रसंगाने शिकवलेला धडा लक्षात राहण्यासाठी तो पोचा त्याने ठेवला होता. तो त्याला सतत आठवण करून देत होता. तो संदेश असा होता.

तुम्ही आयुष्यात इतक्या वेगाने जाऊ नका की कोणाला तरी तुमच्यावर वीट फेकून तुम्हाला जागे करावे लागेल. परमेश्वर आपल्या अंत:करणात हळुवार कुजबुजतो आणि हृदयात प्रेम जागवतो. कधीकधी आपले त्याच्याकडे लक्ष जात नाही त्यावेळी तो वीट फेकून आपल्याला जागे करतो. आपण लक्ष द्यायचे की नाही ते आपणच ठरवा.

❋ ❋ ❋

# घटस्फोट आणि वैवाहिक जीवन

**त्या** दिवशी मी घरी आल्यावर बायकोने मला जेवण वाढले. मी तिचा हात हातात घेऊन तिला म्हणालो, ''मला तुला एक महत्त्वाची गोष्ट सांगायची आहे. ती काहीही न बोलता बसली आणि माझ्याबरोबर जेवली. तिच्या डोळ्यांत दुखावले गेल्याची भावना मला स्पष्ट दिसत होती. मला जे तिला सांगायचे होते ते कसे सांगायचे ते समजत नव्हते. तोंडातून शब्द फुटत नव्हता. शेवटी मनाचा हिय्या करून मी तिला म्हणालो, ''मला घटस्फोट हवा आहे.'' माझ्या या शब्दांनी ती रागावलेली दिसली नाही. उलट अतिशय शांतपणे तिने विचारले, ''पण का?''

मी तिच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष केले. याचा मात्र तिला राग आला. हातातील चमचा तिने टेबलावर आपटला आणि ती माझ्या अंगावर ओरडलीच, ''तू दुष्ट माणूस आहेस.''

त्या रात्री आमचे एकमेकांशी बिलकुल बोलणे झाले नाही. ती रात्रभर रडत होती. मला ठाऊक होते की आमच्या वैवाहिक जीवनाला काय बाधा झाली होती ते तिला जाणून घ्यायचे होते. पण मी तिला समाधानकारक उत्तर देऊ शकत नव्हतो. मी ऑफिसमधील एका तरूणीच्या – रोझीच्या प्रेमात पडलो होतो. तिच्यामुळे बायकोवरचे प्रेम संपले होते. त्यामुळे त्या क्षणाला मी तिची काहीच समजूत घालू शकत नव्हतो.

मी अत्यंत अपराधी भावनेने आमच्या घटस्फोटाचा करारनामा तयार केला होता. त्याप्रमाणे मी बायकोला राहते घर, व्यवसायातील तीस टक्के भाग आणि कार या गोष्टी देऊ केल्या होत्या. तिने एकदा त्याकडे नुसते पाहिले आणि त्याचे तुकडे करून केराच्या टोपलीत फेकून दिले. जी स्त्री गेली दहा वर्षे माझी पत्नी म्हणून माझ्याजवळ वावरली ती आज मला परकी वाटू लागली होती. मला तिचा वाया गेलेला वेळ, पैसे व उत्साह याबद्दल वाईट वाटले; पण रोझीवर जडलेल्या प्रेमामुळे मी माझा निर्णय बदलू शकत नव्हतो. मी फक्त तिची कीव केली.

शेवटी तिने माझ्यासमोर मोठ्याने हंबरडा फोडला. मला तो अपेक्षितच होता. एका दृष्टीने तिचे रडणे हे त्या तणावाला मिळालेली एक मोकळीक होती. गेले कित्येक आठवडे मला घटस्फोटाच्या विचाराने पछाडून टाकले होते. तो विचार सांगितल्यानंतर जास्त स्पष्ट व ठाम झाला.

दुसऱ्या दिवशी मी कामावरून उशिरा घरी परतलो. घरी बायको टेबलावर काहीतरी लिहीत बसलेली दिसली. मला जेवायचे

नव्हते, त्यामुळे मी सरळ झोपायला गेलो. मी खूप दमलेलो होतो आणि शिवाय रोझीबरोबर खूप घटनापूर्ण दिवस गेल्यामुळे मला लगेच झोप लागली. मधेच जेव्हा मला जाग आली तेव्हा बायको अजून टेबलावर लिहीत बसली होती. मी तिच्याकडे लक्ष न देता परत झोपी गेलो.

सकाळी उठल्यावर तिने तिच्या घटस्फोटाच्या अटी माझ्या हातात ठेवल्या. तिला माझ्याकडून काहीच नको होते. फक्त घटस्फोटाआधी एक महिन्याची नोटीस हवी होती. त्या एक महिन्यात आम्ही दोघांनी जास्तीत जास्त नेहमीप्रमाणेच राहण्याचा प्रयत्न करावा अशी तिने विनंती केली होती. त्याचे कारण फारच साधे होते. या महिन्यात आमच्या मुलाची शाळेची परीक्षा होती आणि त्याला आमच्या घटस्फोटाच्या निर्णयामुळे अभ्यासात व्यत्यय येणे तिला नको होते. हे मला मान्य होते.

पण याहून दुसरे तिचे एक मागणे होते. आमच्या लग्नाच्या दिवशी मी तिला लग्नानंतर उचलून बेडरुममध्ये कसा घेऊन गेलो होतो ते आठवायला सांगितले. त्या दिवसापासून पुढचा संपूर्ण महिना मी तिला बेडरूममधून त्या दिवशीसारखे उचलून बाहेरच्या दरवाजापर्यंत रोज न्यायचे असा तिचा प्रस्ताव होता. मला तर हा तिचा वेडेपणा वाटला. आमचे शेवटचे हे दिवस सुसह्य व्हावेत या उद्देशाने मी तिच्या या अटीलाही मान्यता दिली.

ऑफिसमध्ये गेल्यावर रोझीला बायकोच्या घटस्फोटाच्या अटींविषयी सांगितले. ती छद्मीपणाने हसली आणि उद्दामपणे म्हणाली, ''भंपकपणाच आहे. तिला काय वाटेल ते करू दे पण घटस्फोट तिला मान्य करावाच लागेल.'' मी माझा घटस्फोटाचा निर्णय ठामपणे सांगितल्यापासून माझा आणि बायकोचा शारीरिक संबंध बिलकुल आला नव्हता. त्यामुळे पहिल्या दिवशी मी जेव्हा तिला उचलून चालत गेलो तेव्हा दोघेही जण अवघडून गेलो होतो. आमच्या मुलाने ते पाहून टाळ्या वाजवून तो म्हणाला, ''वाह! डॅडीनी ममीला हातावर उचलून घेतले आहे. त्याच्या शब्दांनी मला तर डोक्यात सणक गेली. बेडरूममधून हॉलपर्यंत व तिथून बाहेरच्या दारापर्यंत मी तिला हातावर उचलून नेली. ते अंतर जवळ जवळ दहा मीटर तरी होते. जाताना तिने डोळे मिटले होते आणि हळूच माझ्या कानात कुजबुजली, ''कृपया आपल्या मुलाला आपल्या घटस्फोटाची कल्पना देऊ नका.'' मी मान डोलवून हो म्हटले; पण ते ऐकून मला थोडे अस्वस्थ वाटले. मी तिला दाराबाहेर खाली ठेवले. ऑफिसला जाण्यासाठी ती बसची वाट पाहत थांबली. मी सरळ माझ्या कारने माझ्या ऑफिसला गेलो.

दुसऱ्या दिवशी आम्ही दोघांनी ते सहजगत्या पार पाडले. तिने माझ्या छातीवर डोके विसावले होते. मला तिच्या ब्लाऊजचा घमघमाट जाणवला. मला असेही वाटले की या बाईला आपण बरेच दिवसांत इतक्या जवळून पाहिलेच नव्हते. ती आता तरूण राहिली नाही हे पण जाणवले. तिच्या तोंडावर सुरकुत्या पडल्या होत्या. तिच्या केसात सोनेरी छटा आल्या होत्या. आमच्या लग्नाचा परिणाम तिच्यावर दिसत होता. क्षणभर वाटले अरेरे आपण तिची काय अवस्था करून टाकली आहे.

चौथ्या दिवशी मी तिला उचलले तेव्हा आमच्यातील शारीरिक ओढ जाणवली. याच स्त्रीने तिच्या आयुष्याची १० वर्षे मला सर्वस्व दिले. पाचव्या आणि सहाव्या दिवशी तर ती शारीरिक ओढ अधिकच जाणवली. मी रोझीला हे काही बोललो नाही. महिन्याचे दिवस जसजसे पुढे सरकत होते तसतसे तिला उचलून नेणे जास्तच सोपे व हलके वाटू लागले होते. कदाचित रोजच्या त्या एक प्रकारच्या व्यायामामुळे माझे हात बळकट होत होते.

एके दिवशी सकाळी कोणते कपडे घालावे हे तिला नक्की करता येत नव्हते. तिने बरेच ड्रेस घालून पाहिले पण एकही मनास येत नव्हता. एक सुस्कारा टाकून ती म्हणाली, ''छे, माझे सर्व कपडे मला ढगळ होत आहेत.''

मला त्याच क्षणी लक्षात आले, की ती फारच कृश झाली आहे, आणि म्हणूनच मी तिला इतक्या सहजपणे उचलून नेऊ शकतो. तिने आतल्या आत किती मनाला लावून घेतले होते ते मला फार जाणवले.

नकळत मी जवळ गेलो आणि तिच्या डोक्यावर हात फिरविला. आमचा मुलगा नेमका त्याचवेळी आला आणि म्हणाला, ''डॅडी, ममीला उचलून नेण्याची वेळ झाली.'' रोज सकाळी त्याच्या डॅडीने त्याच्या ममीला उचलून बाहेर नेणे हे नित्याचेच होऊन गेले होते. माझ्या बायकोने मुलाला जवळ बोलाविले आणि त्याला प्रेमाने घट्ट मिठीत घेतले. शेवटच्या क्षणी या भावनाप्रधान दृश्याने मी माझ्या निर्णयात फरक करीन अशी भीती मला वाटली आणि मी तोंड फिरविले. मग रोजच्याप्रमाणे मी

तिला बेडरूमपासून हॉलमधून जाऊन दाराजवळ आणले.

तिच्या हाताची मिठी माझ्या गळ्याभोवती अलगदपणे व नैसर्गिकरित्या पडली होती. मी तिला घट्ट जवळ घेतले होते. मला आमच्या लग्नाच्या दिवशी मी तिला नेले होते त्याची आठवण झाली.

पण तिचे घटलेले वजनाने मला फार दु:ख झाले. महिन्याच्या शेवटच्या दिवशी मी जेव्हा तिला उचलून घेतले तेव्हा मी एक पाऊलही पुढे टाकू शकलो नाही. आमचा मुलगा त्यावेळी शाळेत गेला होता. मी तिला छातीशी घट्ट धरले आणि म्हणालो, ''माझ्या आता लक्षात येत आहे की गेल्या बरेच दिवसांत आपण ही जवळीक अभावानेच अनुभवली होती.''

मी गाडीने ऑफिसला गेलो. ऑफीस जवळ जाताच झटकन गाडीतून बाहेर पडलो. गाडी बंद करायला सुद्धा न थांबता वर गेलो. थोडा उशिर केला तरी माझा विचार बदलण्याचा मोह मला होईल अशी भीती मला वाटली.

रोझीकडे गेलो आणि तिला एका दमात म्हणालो, ''माफ कर, पण मी घटस्फोट न घेण्याचं ठरविले आहे.'' ती आश्चर्याने माझ्याकडे पाहतच राहिली. माझ्या कपाळावर हात लावून तिने विचारले, ''तू बरा आहेस ना? ताप तर आला नाही ना?'' मी तिचा हात माझ्या कपाळावरून दूर केला आणि तिला म्हणालो, ''मी आता घटस्फोट घेणार नाही. माझे वैवाहिक जीवन कंटाळवाणे व्हायला आमचे एकमेकांवर प्रेम नव्हते असे नाही, तर आम्हा दोघांनाही आमच्या जीवनातील बारकाव्यांचे महत्त्व समजले नव्हते. आज मला पटले की लग्नाच्या दिवशी मी तिला हातावर उचलून नेले होते त्याचा अर्थ, मरणामुळे आम्हाला वेगळे करेपर्यंत मी तिला हात देणे हे अपेक्षित होते.''

रोझी एकाएकी जागी झाल्यासारखी उठली. माझ्या एक मुस्कटात मारली. धाडकन दरवाजा उघडून बाहेर गेली आणि ओक्साबोक्सी रडू लागली. मी लक्ष न देता जिन्यावरून खाली आलो. गाडीने तडक घरी निघालो. वाटेत एका फुलाच्या दुकानातून बायकोसाठी छानसा फुलांचा गुच्छ घेतला. फुलवाल्या मुलीने कार्डावर काय लिहायचे म्हणून विचारले. माझ्या ओठी हसू आले. आणि सांगितले,

''मी रोज सकाळी तुला उचलून नेणारच. अगदी आपल्यापैकी एक जण मरेपर्यंत.''

त्या दिवशी मी घरी धावत गेलो. हातात फुलांचा गुच्छ होता, ओठावर हसू होते, मी धावत पळत बेडरूममध्ये शिरलो. बायको बेडवरच होती पण निस्तेज होऊन मरण पावलेली.

माझ्या बायकोने गेला महिनाभर कॅन्सरशी झुंज दिली होती. मी रोझीच्या नादात असल्याने तिच्याकडे लक्षच दिले नव्हते. आपण लवकरच मरणार याची तिला कल्पना होती. आम्ही जर घटस्फोट घेतला असता तर त्याचा मुलाने काय अर्थ काढला असता व त्याचे वडिलांविषयी किती वाईट मत झाले असते, ते तिला टाळायचे होते.

आता त्याच्या नजरेत मी एक ममीवर खूप प्रेम करणारा डॅडीच राहिलो होतो.

वैवाहिक जीवनात पतीपत्नीच्या संबंधात लहानसहान गोष्टींचे खूप महत्त्व असते. तुमच्याजवळ कोणती कार आहे, किती इस्टेट आहे, बँकेत किती पैसे आहेत याला फारसे महत्त्व नसते. या सर्व गोष्टी तुम्हाला आनंदाचे वातावरण निर्माण करण्यास उपयोगी पडतात; पण त्या तुम्हाला खऱ्या अर्थाने कायमस्वरूपी आनंद देत नाहीत. यासाठीच तुमच्या जोडीदाराशी घट्ट मैत्री करा. अशा लहानसहान गोष्टी करा की ज्या योगे दोघांमधील जवळीक कायम वृद्धिंगत होत राहील.

❋ ❋ ❋

## चॉकलेट आईस्क्रीमचे गुंजन

एका सकाळी काही मित्रांबरोबर सकाळच्या जेवणाला रेस्टॉरंटमध्ये गेलो होतो. त्यांच्याबरोबर एक ८० वर्षांचे गृहस्थ आले होते. ते बहुधा माझ्या मित्रांबरोबर गोल्फ खेळत असावेत. एकूण आल्हाददायक ग्रुप होता.

जेवणाचा मेनू ज्यावेळी मागविला तेव्हा आम्ही सलाड, सँडविचेस आणि सूप असा निवडला. त्या ८० वर्षांच्या गृहस्थाने –

जिमने मात्र दोन चॉकलेट आईस्क्रीमचे गोळे व त्या बरोबर मस्त गरम गरम ॲपल पाय जरूर आणा म्हणून सांगितले. मी जे ऐकले ते बरोबर ऐकले ना असा मला प्रश्न पडला आणि इतर सर्व तर चकित झाले होते. पण जिम मात्र अजिबात ओशाळला नाही.

आम्ही सर्व जण ते तटस्थपणे न ऐकल्यासारखे बसलो होतो, अशा वेळी बहुतेक जण असेच गप्प राहतात.

पण जेव्हा आमचे मागवलेले पदार्थ टेबलावर आले तेव्हा मी तरी ते चवीने खाऊ शकलो नाही. जिम त्याचा ॲपल पाय खात असताना मी त्याच्यावरून माझी नजर हटवू शकलो नाही. इतरांना त्यावर विश्वासच बसत नव्हता. त्यांनी मुकाटपणे त्यांचे खाणे उरकले.

पुढच्या वेळी मी जेवायला गेलो तेव्हा मुद्दाम जिमला पण बोलावले. मी पुन्हा माझे व्हाईट सॉस मागविले तर त्याने फळे व आईस्क्रीम मागविले. त्याने विचारले, ''मी तुझी करमणूक केली का?'' मी म्हणालो, ''करमणूकच नाही पण मी चक्रावून गेलो आहे. तुला समजत असूनही तू इतके पचनास जड असलेले गोड पदार्थ कसे काय मागवू शकतोस?'' तो हसून म्हणाला, ''जे जे शक्य आहे ते सगळे मी चाखून पाहतो आहे. मी केवळ मला ज्याची जरूरी आहे असे पदार्थ खाण्याचा व जे करायला हवे तेच फक्त करण्याचा प्रयत्न केला. पण मित्रा आयुष्य हे इतके छोटे आहे की मी चांगल्या गोष्टींना मुकीन असे वाटले.''

''हल्ली मी विचार केला मी किती म्हातारा झालो आहे? मी इतका कधीच थकलो नव्हतो. त्यामुळे मरायच्या पूर्वी ज्या गोष्टी मी आतापर्यंत टाळीत आलो होतो त्या अनुभवायच्या आहेत. मी अजून कितीतरी फुलांचा वास घेतला नाही. कितीतरी सालमन माशांच्या तलावात मासे पकडले नाहीत. कितीतरी चविष्ट आईस्क्रीमची चव घेतलेली नाही. मी आकाशात पतंग उडविला नाही.

अनेक गोल्फ मैदाने आहेत जिथे मी अजून खेळलो नाही. कित्येक दिवसांत मी विनोदाला खळखळून हसलो नाही. माझ्या कितीतरी खेळांच्या स्पर्धा पाहायच्या राहून गेल्या आहेत. पोटॅटो चिप्स पोटभर खायच्या राहिल्या आहेत. मला पावसात चिंब होऊन भिजायचे आहे. समुद्राच्या लाटेवर तरंगायचे आहे. पाण्याचा फवारा तोंडावर घ्यायचा आहे. जवळच्या लहानशा चर्चमध्ये जाऊन मला ईश्वराचे त्याने केलेल्या कृपेसाठी मनापासून आभार मानायचे आहेत.

रोज सकाळी ब्रेडला लोणी साखर लावून खायचा आहे. हवा तितका वेळ फोनवर मला माझ्या दूर राहत असलेल्या मित्रांशी गप्पा मारायच्या आहेत. सिनेमा पाहताना मी कित्येक दिवसांत रडलो नाही. सकाळच्या पावसात मी भिजलो नाही. तोंडावर तुफान वाऱ्याचा झोत कधी झेलला नाही. मला परत कोणाच्या तरी प्रेमात पडायचे आहे.

मी जर जेवणाऐवजी चॉकलेट आईस्क्रीम खाल्ले आणि रात्री मला मरण आले तरी माझे काहीतरी राहून गेले असे न वाटता जे जे इच्छिले ते ते सगळे अनुभवले याचा आनंद मिळेल. इच्छेवरील विजयाचे समाधान लाभेल. माझ्या सर्व इच्छापूर्ती झाल्यासारखे वाटेल. माझे जीवन संपण्याआधी मी ते चॉकलेट आईस्क्रीम खाण्याचा आनंद मिळेल.''

हे ऐकल्याबरोबर मी वेटरला लगेच बोलावले. मी मागविलेले पदार्थ रद्द करून यांना जे दिले आहे तेच मला आण म्हणून सांगितले. वर थोडे विपड् क्रीम घालण्यास विसरू नको असेही सांगायला विसरलो नाही.

मस्तीत जगा, उत्कट प्रेम करा, मनमुराद हसा. आनंदी राहा. लक्षात ठेवा, समाधान, आनंद हा संपत्ती, सत्ता वा मानसन्मान यावर अवलंबून नसतो. तो तुम्हाला आवडणाऱ्या व्यक्तीबरोबर नातेसंबंध, मिळणारा आदर यावर पुष्कळ अवलंबून असतो.

जेव्हा पैसे बोलतात, तेव्हा चॉकलेट आईस्क्रीम मनात गुंजन करते.

❁ ❁ ❁

# जपानी लहान मुलाची परोपकारी वृत्ती

**हे** पत्र एका व्हिएटनामीने त्याच्या मित्राला लिहिले होते. तो जपानमध्ये स्थलांतरित आहे. ते अमेरिकेतील एका जर्नलमध्ये प्रसिद्ध झाले होते. हे पत्र जपानी सामाजिक मूल्यांचे व परोपकारी वृत्तीचे दर्शन घडवते. तेच तर जपानच्या सर्वांगिण प्रगतीचे बलस्थान आहे. लहानवयापासून ते जपानच्या रक्तात भिनलेले आहे. जपानमधील फुकुशिमा (FUKUSHIMA) येथील न्यूक्लिअर पॉवर प्लँट येथील त्सुनामीच्या आपत्तीनंतर तिथल्या परिस्थितीवर लिहिलेले हे पत्र आहे.

नमस्कार, गेले काही दिवस इथे सर्व उद्ध्वस्त होऊन गेले आहे. मी डोळे मिटले तरी डोळ्यांसमोर प्रेते दिसतात आणि डोळे उघडतो तेव्हाही प्रेते दिसतात. सगळीकडे प्रेतांचा खच पडलेला आहे. आम्ही रोज वीस तास काम करीत आहोत. दिवसाचे ४८ तास असते तर बरे झाले असते असे वाटते. कारण, तरच आम्ही संकटात सापडलेल्या लोकांना मदत करू शकू किंवा वाचवू शकू. आम्ही पाणी आणि वीजेशिवाय काम करीत आहोत. खाण्याचे पदार्थ तर अजिबात शिल्लक नाहीत. निर्वासितांना सुरक्षित स्थळी हलविण्याच्या सूचना येईतो आम्ही त्यांना हलवू शकत नाही.

सध्या मी फुकुशिमा जे न्यूक्लिअर पॉवर प्लँटपासून २५ कि. मी. अंतरावरच्या मदत छावणीत आहोत. इथे इतके लिहिण्यासारखे आहे की सगळे लिहीत बसलो तर एखाद्या संकटातील अनुभव, माणुसकीचे व आपआपसातील वर्तणुकीसंबंधी एक कादंबरीच तयार होईल.

या परिस्थितीतही लोक शांतपणे व्यवहार करीत आहेत. लोकांचा आत्मसन्मान व चांगली वर्तणूक राखण्यात पूर्ण सहभाग आहे. त्यामुळेच एकूण परिस्थिती जितकी खराब झाली असती त्यापेक्षा खूपच चांगली आहे. पण आणखी एक आठवडा जर असेच चालू राहिले तर गोष्टी हाताबाहेर जायला वेळ लागणार नाही. अखेर ती पण माणसेच आहेत. जेव्हा भूक व तहान असह्य होईल तेव्हा आत्मसन्मान व वर्तणूक यात बाधा आल्याशिवाय राहणार नाही. जपानचे सरकार हवाई मार्गे अन्न व औषधे याचा पुरवठा करण्याचा प्रयत्न करीत आहे पण ते म्हणजे समुद्रात चिमूटभर मीठ टाकल्यासारखे आहे.

इथे एक हृदयद्रावक प्रसंग घडला. त्यात एका लहान जपानी मुलाने माणुसकीच्या नात्याने कसे वागावे याचा माझ्यासारख्या मोठ्या लोकांनासुद्धा एक वस्तुपाठ दाखविला.

काल रात्री मला एका शाळेत एका धर्मादाय संस्थेतर्फे होणाऱ्या अन्नछत्रात मदतीसाठी पाठविले होते. तिथे खूप लांब गरजू लोकांची रांग होती. मला एक ९ वर्षांचा लहान मुलगा दृष्टीस पडला. त्याच्या अंगात टी शर्ट व शॉर्ट होती. भयंकर थंडीत तो त्या अपुऱ्या कपड्यात लांब पसरलेल्या रांगेत अगदी शेवटी उभा होता. त्याचा नंबर येईल तेव्हा काही अन्न वाटायला शिल्लक राहणार नाही, अशी मला भीती वाटत होती. म्हणून मी त्याच्याशी बोललो. ज्या वेळी भूकंप झाला त्यावेळी तो शाळेत होता. त्याचे वडील जवळच कोठेतरी कामाला होते. ते कारने शाळेत येत होते. तो मुलगा शाळेच्या बाल्कनीतून पाहत होता. त्याच्या डोळ्यांदेखत त्सुनामीने त्याच्या वडिलांची कार वाहून नेलेली त्याला दिसली.

मी त्याला त्याच्या आईबद्दल विचारले. त्याने सांगितले त्याचे घर अगदी समुद्रकिनारी होते. त्यामुळे घरात असलेली त्याची आई व बहीण वाचण्याची मुळीच शक्यता नव्हती. त्याच्या इतर नातेवाईकांबद्दल विचारल्यावर त्याने फक्त तोंड फिरवून डोळे पुसले.

मुलगा कडाक्याच्या थंडीने कुडकुडत होता. मी माझ्या अंगावरचे पोलीस जॅकेट काढून त्याच्या अंगावर घातले. ते करताना माझ्या खिशातील अन्नाचे पाकिट खाली पडले. मी ते उचलून त्याला दिले. ''तुझा नंबर येईल तेव्हा त्यांच्याजवळचे वाटप करण्याचे अन्न संपलेले असेल. हे मला मिळालेले आहे. माझे खाणे झाले आहे. तू हे खां.''

त्या मुलाने ते अन्नाचे पाकिट घेतले. मला नमस्कार केला. मला वाटले की तो ते पाकिट उघडून लगेच अन्न खाईल. पण त्याने तसे केले नाही. तो ते पाकिट घेऊन रांगेच्या सुरूवातीस गेला. तिथे रांगेतील लोकांना वाटण्यासाठी अन्न ठेवले होते. ते पाकिट त्याने तिथे असणाऱ्या अन्नाच्या साठ्यात जमा केले.

ते पाहून मला फार नवल वाटले. मी त्याला विचारले, तू न खाता तिथे असणाऱ्या वाटपाच्या साठ्यात ते पाकिट का नेऊन दिलेस? त्याने सांगितलेले उत्तर हा मला मिळालेला धडा होता. तो म्हणाला, ''कारण मला रांगेत उभे असलेल्या माझ्यापेक्षा जास्त भुकेले लोक दिसत होते. मी जर माझे पाकिट त्या साठ्यात दिले तर त्याचे सर्वांनाच समान वाटप होऊ शकेल.''

मी ते उत्तर ऐकून माझे तोंड फिरविले कारण लोकांना माझे डोळ्यांतून आलेले अश्रू दिसायला नको होते. ज्या समाजात या ९ वर्षांच्या मुलाला जे सामाजिक कर्तव्य व त्यागाची जाण आहे तो समाज आदर्श व महान व्यक्ती नक्कीच घडवित असतात.

❋ ❋ ❋

# तर लाईफ कसले?

एखादा छान ड्रेस आवडतो. आपल्याला दुकानात असलेल्या कपड्यांच्या गर्दीत तो साधा वाटतो, पण तरीही आवडतो. काहीतरी दुसरे घेऊन बाहेर पडतो. आपण परतताना मनात विचार येतो, 'तो ड्रेस घ्यायला हवा होता!''

सिग्नलला गाडी थांबते. चिमुरडी काच ठोठावते. गोड हसते, पण भीक मागत आहे हे लक्षात घेऊन त्या हसण्याकडे फार लक्ष देत नाही. आपण २/३ रुपये द्यावे असे मनात येते.

रेंगाळत सुटे शोधता शोधता 'देऊ का नको' हा धावा मनात सुरू असतो. तेवढ्यात सिग्नल सुटतो. गाडी पुढे घ्यायची वेळ येते. थोडे पुढे गेल्यावर मन म्हणते, 'सुटे होते समोर, द्यायला हवे होते त्या चिमुरडीला!'

जेवणाच्या सुट्टीत ऑफिसातला मित्र त्याच्या घरातला त्रास फार विश्वासाने सांगतो. त्याच्या डोळ्यांत व्यथांचे ढग दाटलेले दिसतात. वाईट वाटते खूप. नशिब आपण त्या परिस्थितीत नाही असेही मनोमन पुटपुटून आपण मोकळे होतो. 'काही मदत हवी का?' असे विचारायचे असूनही आपण गप्प राहतो. जेवणाची सुट्टी संपते. तो त्याच्या आणि आपण आपल्या कामाला लागतो. क्षणभर स्वत:वर राग येतो, 'मदत तर विचारली नाही, निदान खांद्यावर सहानुभूतिचा हात तरी ठेवायला हवा होता मी!'

असेच होते नेहमी. छोट्या छोट्या गोष्टी राहून जातात. खरं तर या छोट्या गोष्टीच जगण्याचे कारण असतात. घडले क्षण परत येत नाहीत. राहतो तो खेद, करता येण्यासारख्या गोष्टी न केल्याचा. जगण्याची साधने जमवताना जगणेच राहून जात नाहीयेना ते 'चेक' करा. आनंद झाला तर हसा, वाईट वाटले तर डोळ्यांना बांध घालू नका. चांगल्या गोष्टींना दाद द्या, आवडले नाही तर सांगा, घुसमटू नका, त्या त्या क्षणी जे योग्य वाटते ते करा. नंतर त्यावर विचार करुन काहीच साध्य होणार नाही. आयुष्यात छोट्या गोष्टींना महत्त्व द्या. त्या छोट्या क्षणांना जीवनाच्या धाग्यात गुंफणे म्हणजेच जगणे.

आवडलेल्या गाण्यांवर मान नाही डुलली तर 'लाईफ कसले?' आपल्यांच्या दु:खात डोळे नाही भरले तर लाईफ कसले, मित्रांच्या फालतु विनोदांवर पोट दुखेस्तोवर हसलो नाही तर लाईफ कसले ? आनंदात आनंद आणि दु:खात दु:ख नाही जाणवले तर लाईफ कसले?

❋ ❋ ❋

# तिसरा दृष्टिकोन

सात वर्षांच्या मुलांच्या वर्गात टीचर गणित शिकवित होत्या. त्यांनी अमेयला विचारले,''मी तुला एक सफरचंद दिले, आणखी एक सफरचंद दिले आणि आणखी एक सफरचंद दिले तर तुझ्याजवळ एकूण किती सफरचंदे असतील?''

अगदी थोड्या वेळात अमेयने उत्तर दिले, ''चार'' टीचर जरा नाराज झाल्या. त्यांनी अमेयकडून विनायास बरोबर उत्तराची अपेक्षा केली होती. टीचरचा थोडा अपेक्षाभंग झाला. तिने विचार केला, कदाचित त्या लहान पोराने नीट ऐकले नसावे. तिने परत अमेयला विचारले, ''बेटा अमेय नीट लक्ष देऊन ऐक. उत्तर फार सोपे आहे. तू लक्ष देऊन ऐकलेस तर तुला नक्की बरोबर उत्तर देता येईल. मी तुला एक सफरचंद दिले, आणखी एक दिले, आणखी एक दिले. आता तुझ्याजवळ किती सफरचंद होतील सांग बरे.''

अमेयला आपल्या टीचरच्या चेहऱ्यावर अपेक्षाभंग दिसला. त्याने परत एकदा आपल्या बोटांनी आकडेमोड केली. तो सुद्धा मनात उत्तर बरोबर येण्यासाठी मोजणी करत होता. त्यालाही टीचरच्या चेहऱ्यावर समाधान पाहायचे होते. या वेळी थोडेसे अडखळतच त्याने उत्तर दिले, ''चार...'' टीचरच्या चेहऱ्यावर पुन्हा अपेक्षाभंग दिसला. तिला आठवले की अमेयला आंबे आवडतात. कदाचित त्याला सफरचंद आवडत नसेल म्हणून तो चूक उत्तर देत असेल. त्यामुळे तो लक्ष केंद्रित करत नसेल.

या वेळी जरा जास्तच उत्सुकतेने आणि डोळे किलकिले करून टीचरनी विचारले, ''मी जर तुला एक आंबा दिला, आणि

एक आंबा दिला, आणि एक आंबा दिला तर तुझ्याजवळ किती आंबे होतील?'' टिचरच्या चेहऱ्यावर हसू पाहून अमेयने परत एकदा बोटांच्या हिशेबाने उत्तर काढले. त्याच्यावर कसलाच दबाव नव्हता. होता तो थोडासा टीचरवरच. तिच्या या नवीन पद्धतीने अमेयने उत्तर बरोबर द्यावे असे तिला वाटत होते. अमेयने थोडेसे अडखळतच हसून उत्तर दिले, ''तीन''.

टीचरच्या चेहऱ्यावर आता विजयाचे हसू होते. तिचा प्रयोग यशस्वी झाला होता. तिला स्वत:चेच अभिनंदन करायचे होते. त्याआधी एक शेवटची गोष्ट तिला करायची होती. तिने परत एकदा अमेयला विचारले, ''आता सांग, मी तुला एक सफरचंद दिले, आणखी एक सफरचंद दिले, आणखी एक सफरचंद दिले. तर तुझ्याजवळ किती सफरचंद होतील?'' अमेयने क्षणाचाही विचार न करता सांगितले, ''चार.''

आता मात्र टीचर चक्रावून गेली. ''कसे अमेय कसे?'' तिने थोड्याशा चिडलेल्या आणि गंभीर आवाजात प्रश्न केला. अमेयने अगदी दबलेल्या आवाजात अडखळत उत्तर दिले, ''कारण माझ्याजवळ पिशवीत आधीच एक सफरचंद आहे.''

**तात्पर्य :** जेव्हा कोणी मी विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर मला अपेक्षित असलेल्या उत्तराहून वेगळे देतो तेव्हा ते चुकीचेच असते असे नसते. त्या उत्तराला आणखी एक कोन असू शकतो की जो आपल्या ध्यानात आलेला नसतो.

❃ ❃ ❃

# तीन वस्तुपाठ - तीन बोधकथा

आपण आपल्या रोजच्या जगण्यातून अनेक अनुभव घेऊन शिकत जात असतो. पुढे दिलेल्या तीन गोष्टी – कासव, बेडूक आणि सुंदर तरुणी – आपल्याला बरेच काही सांगून जातात. वाचून विचार करायला लावतील अशा कथा आहेत.

## १. कासवांच्या कुटुंबाची सहल.

कासवाचे एक मोठे कुटुंब लांबच्या सहलीला जायचे ठरविते. स्वभावत: कासव हे अत्यंत आळशी व हळूहळू व्यवहार करणारे म्हणून ओळखले जाते. त्याला अनुसरुन त्या कासवाच्या कुटुंबाने सहलीची तयारी करायलाच मुळात बरीच वर्षे घालविली. शेवटी सात वर्षांनंतर कासवाचे कुटुंब सहलीसाठी योग्य स्थळे शोधण्यास बाहेर पडले. निघाल्यापासून दुसऱ्या वर्षी त्यांना योग्य असे ठिकाण आढळले.

त्यानंतरची दोन वर्षे त्यांनी ती जागा साफ करण्यात व बरोबर घेतलेले सामान उघडण्यात गेली. सामान काढून स्थिरस्थावर होण्यात थोडा अवधी गेला. त्यानंतर त्यांच्या लक्षात आले की सामानात मीठच आणायचे राहून गेले होते. मिठाशिवाय सहल म्हणजे अनर्थ झाला होता. सर्व सहलच बेचव होऊन गेली होती. यावर सर्वांचे एकमत झाले. आता काय करायचे हे ठरविण्यासाठी अगणित दिवस खर्च झाले. सरतेशेवटी त्या चर्चेमधून असे ठरले की, सर्वांत लहान असलेल्या कासवाने परत घरी जाऊन मीठ घेऊन यावे. लहानगे कासव त्या सगळ्यांपेक्षा जलद पळणारे होते. तरीही लहानग्या कासवाने त्या विरूद्ध आदळआपट केली, आरडाओरडा केला, भोकाड पसरले. जायला नकार दिला. शेवटी सर्वांनी त्याला समजावल्यानंतर ते एकाच अटीवर जायला कबूल झाले. तो परत येईपर्यंत कुटुंबापैकी कोणीही अन्नाचा कणही पोटात घालायचा नाही अशी त्याने अट घातली.

त्यानंतर तीन वर्षे झाली तरी ते लहान कासव परत आले नाही. पाच वर्षे झाली, सहा वर्षे झाली त्याचा पत्ताच नव्हता. सगळ्या कासवांच्या पोटात भुकेचा वणवा पेटला होता. अखेर शेवटी सात वर्षांनंतर त्यातील सगळ्यात वयस्क कासवाने जाहीर केले की, ''मी आता खायला सुरूवात करणार आहे.'' असे म्हणून पिशवीमधून चपाती काढून तोंडाला लावली. बरोबर त्याच क्षणी ते लहान कासव एकाएकी जवळच्या झाडामागून डोकावले आणि जोरात ओरडले, ''पाहा! पाहा!! मला ठाऊक होते की तुम्ही कोणी माझ्यासाठी थांबणार नाही. आता मी मीठ आणायला जाणारच नाही.''

याचप्रकारे आपल्यापैकी अनेक जण त्यांच्या अपेक्षेप्रमाणे इतर वागण्याची वाट पाहत स्वत:चा व इतरांचा वेळ वाया दवडतात. इतर काय करतात याकडेच आपले लक्ष लागलेले असते. स्वत: मात्र काहीही हालचाल करीत नाहीत.

## २. लाखो बेडकांच्या तंगड्या.

एकदा एक शेतकरी जवळच्या शहरातील एका रेस्टॉरंटमध्ये आला. त्याने त्या रेस्टॉरंटच्या मालकाला विचारले, ''मी जर तुम्हाला बेडकांचे लाखो पाय आणून दिले तर ते तुम्ही घ्याल का?'' रेस्टॉरंटच्या मालकाला आश्चर्य वाटून त्याने त्या शेतकऱ्यास विचारले, ''पण तुम्ही इतके बेडकांचे पाय कसे व कोठून मिळविणार?'' शेतकरी उत्तरला, ''माझ्या घराच्या जवळ एक डबके आहे. त्यात लाखो बेडूक आहेत. रोज रात्री ते सगळे प्रचंड डराव डराव करून माझे डोके उठवितात. मला झोप येत नाही. मला त्यांनी उच्छाद आणला आहे.''

तेव्हा रेस्टॉरंटचा मालक आणि त्या शेतकऱ्याने करार केला. शेतकऱ्याने दर आठवड्याला पाचशे बेडूक त्या रेस्टॉरंट मालकाला पुरविण्याचे ठरविले. पुढचे बरेच आठवडे असे चालू ठेवायचे ठरले.

त्यानंतरच्या पहिल्या आठवड्यात शेतकऱ्याने फक्त दोन मरतुकडे बेडूक आणले. येताना तो शेतकरी फार ओशाळला होता. त्याला रेस्टॉरंटच्या मालकाने विचारले, ''बाकीचे बेडूक कोठे आहेत?''

शेतकऱ्याने उत्तर दिले, ''त्या डबक्यात फक्त हे दोनच बेडूक होते, पण ते जणू काही लाखो बेडकांचा आवाज काढून ओरडत होते.''

आता कधी जर एखादा कोणी तुमची टिंगलटवाळी करून तुमची नालस्ती करायला लागला तर लक्षात ठेवा ते म्हणजे त्या दोन बेडकांप्रमाणे तुम्हाला त्रास देण्यासाठी आवाज करीत आहेत. दृष्टीआड येणारे कोणतेही संकट भयंकरच वाटते. रात्री गादीवर झोपलात की तुम्हाला एखाद्या वेळी एखादी गोष्ट भयंकर सतावत असेल. ती या लाखो बेडकांच्या आवाजाप्रमाणे वाटत असेल. सकाळी उठल्यावर मात्र विचार केला की जाणवेल छे त्यात फारसे काळजी करण्याचे कारण काही नव्हतेच.

## ३. दोन संन्यासी भिक्षुक आणि एक तरुण सुंदरी.

एके दिवशी एक मोठा भिक्षुक आणि त्याचा शिष्य भिक्षुक एकत्र प्रवास करीत होते. ते एका नदीजवळ आले. त्यांना नदी पार करून दुसऱ्या तिराला जायचे होते. पाहतात तर नदी ओलांडायचा पूल तुटलेला होता. त्यांना पाण्यातूनच नदी पार करून जावी लागणार होती. त्याच वेळी त्या तुटलेल्या पुलाजवळ एक तरूण सुंदरी थांबली होती. तिलाही नदी पार करून जायचे होते. पण तुटलेल्या पुलामुळे ती जाऊ शकत नव्हती.

तिला दुसऱ्या तिरावर नेण्यासाठी मदत हवी का असे मोठ्या भिक्षुकाने विचारले. तिने ते मान्य केले. मोठ्या भिक्षुकाचे ते वागणे पाहून भिक्षुक शिष्य आश्चर्यचकित झाला. ''आपल्या नियमाप्रमाणे कोणत्याही स्त्रीला स्पर्श करणे निषिद्ध असते, मग आपल्या गुरूने त्या स्त्रीला स्वत:च्या खांद्यावर उचलून पैलतिरावर नेण्याचे कसे कबूल केले?'' त्याला या विचाराने सतावले होते. पण तो गप्प बसला.

मोठ्या भिक्षुकाने त्या स्त्रीला पाठीवर घेतले व नदीच्या पलीकडच्या तिरावर नेले. भिक्षुक शिष्य अत्यंत नाराज झाला पण काहीही न बोलता त्यांच्या मागोमाग पैलतिरावर पोहोचला. त्यानंतर ती स्त्री तिच्या मार्गाने निघून गेली. दोन भिक्षुक त्यांच्या मार्गाने बरेच अंतर चालत होते. त्या संपूर्ण रस्त्याने जाताना लहान भिक्षुक सतत झाल्याप्रकाराबद्दल मनातून नाराज व अस्वस्थ होऊन चालत होता. त्याच्या मनात अनेक प्रकारच्या शंकाकुशंका, भिक्षुक गुरूच्या त्या वागण्याबद्दल येत होत्या. जसजसा वेळ जात होता तसतसे त्याला दुसरे काही सुचेनासे झाले होते. पण तरीही तो शांत होता. त्याच्या मनात काय गोंधळ चालू आहे याची मोठ्या भिक्षुकाला काहीही कल्पना नव्हती.

अखेर शेवटी ते दोघे भिक्षुक त्यांच्या इच्छित स्थळी पोहोचले. बऱ्याच वेळ मनात दाबून ठेवलेली खदखद आता मात्र लहान

भिक्षुकाला थांबविणे अशक्य झाले. तो भडकून उठून तावातावाने मोठ्या भिक्षुकाला म्हणाला, ''तुम्ही स्वत:ला फार मोठे संन्यासी भिक्षुक कसे काय म्हणवून घेता? तुम्हाला प्रथमसंधी मिळताच एका स्त्रीला सर्वस्पर्श केलात. आणि तेही ती स्त्री एक सुंदर यौवना असतानाही. तुम्ही आतापर्यंत मला नीतिमत्तेचे दिलेले धडे मला फक्त ढोंगीपणाचे वाटले. तुम्ही मला फार दांभिक वाटलात.'' मोठ्या भिक्षुकाला त्याचे बोलणे ऐकून फार आश्चर्य वाटले आणि मग तो म्हणाला, ''वत्सा, मी तर ती सुंदर यौवना त्या नदीच्या दुसऱ्या तिरावर पोहोचलो तिथेच सोडून पुढे आलो आहे. त्याच वेळी मी तिचे ओझे माझ्या खांद्यावरून खाली उतरविले होते. मला समजत नाही तू का ते ओझे इथपर्यंत वाहून आणलेस? आणि अजूनही ते तुझ्या डोक्यातून जात नाही.''

ही जुनी चायनिज बोधकथा पुष्कळ लोकांच्या विचार करण्यावर प्रकाश टाकते. रोजच्या जीवनात आपल्या मनाला पटत नसलेल्या अनेक गोष्टी आपल्या मनाला खूप त्रास देतात. त्या आपल्याला खूप खिजवतात. आपली चिडचिड होते. ते विचार पुष्कळ वेळा आपल्याला कटू व्हायला प्रवृत्त करतात किंवा आपण त्यामुळे दुसऱ्याचा मत्सर करू लागतो. त्या लहान भिक्षुकाप्रमाणेच आपण त्याचे गारूड आपल्या डोक्यातून उतरवून टाकीत नाही. आपण ते आपल्याबरोबर त्या ''सुंदर तरुणी'' प्रमाणे वाहत राहतो. पुन्हा पुन्हा ते विचार डोक्यात फेर धरून आपल्याला सतावत असतात. त्या विचाराने आपल्याला खूप राग येतो. असे का होते? सरळ साधे कारण आहे आपण ते विचार डोक्यातून झटकून टाकीत नाही. नदीच्या पैलतीरावर गेल्यावर लगेच त्या सुंदर तरूणीचे ओझे आपण डोक्यावरून उतरायला शिकले पाहिजे. हे केल्याने आपल्याला होणारा सगळा मानसिक त्रास संपून जाईल. आणखी त्रागा करण्याचे कारण राहणार नाही. नंतर मनावरचे दडपण निघून जाऊन अप्रिय प्रसंग टाळला जाईल.

❋ ❋ ❋

# तुमची निवड

**जे**री हा एका रेस्टॉरंटचा मॅनेजर होता. तो नेहमी प्रसन्न मन:स्थितीत राहायचा. त्याला जर कोणी विचारले, ''जेरी तू कसा आहेस?'' तर तो उत्तर देत असे, ''जर मी आहे यापेक्षा बरा असतो तर मी माझा जुळा भाऊ असतो.'' तो ज्या ज्या वेळा रेस्टॉरंटची नोकरी बदलून दुसऱ्या रेस्टॉरंटमध्ये जात असे त्या वेळी इतर वेटर्स पण त्याच्या पाठोपाठ नोकरी बदलत असत. त्याच्यामागे तो जाईल तिथे जात असत. असे का होत असे?

कारण जेरी हा लोकांना नैसर्गिकपणे प्रेरणा देणारा होता. त्याच्यापासून लोक नकळत स्फूर्ती घेत असत. एखाद्या कामगाराला एखादा दिवस खराब आला तर जेरी त्यातून बाहेर पडून त्या परिस्थितीतही आशेचा किरण कसा शोधायचा ते सांगत असे. त्याची ही जगण्याची पद्धत पाहून कोणालाही कुतूहल वाटत असे. जर त्याला विचारले,''तुझ्यासारखे सर्वांना जमत नाही. सगळे जण तुझ्यासारखे कायम आशावादी होऊ शकत नाहीत. तुला हे कसे जमते?'' त्यावर जेरी म्हणायचा, ''रोज सकाळी उठल्यावर मी मलाच विचारतो, मला दोन पर्याय आहेत. मी आज आनंदी राहू शकेन किंवा मी नाराजीने राहू शकेन. मी रोज आनंदी राहण्याचा पर्याय निवडतो. ज्या वेळी एखादी वाईट घटना घडते त्यावेळी आपण त्याला बळी पडायचे की आपण त्यापासून काही शिकायचे असे दोन पर्याय असतात. मी नेहमी त्यापासून शिकण्याचा पर्याय पसंत करतो. खूप वेळा लोक माझ्याकडे तक्रारी घेऊन येतात. मी त्यांच्या तक्रारी मान्य करायच्या की त्यातील आशादायक बाजू लक्षात घ्यायची ते ठरवितो. मी नेहमी आशादायक बाजू पसंत करतो.''

''पण हे नेहमी शक्य होत नाही.''

जेरी, ''हो शक्य आहे. आयुष्य हे नेहमी प्राधान्य देण्यावर अवलंबून असते. तुम्ही सगळा बकवास बाजूला करता तेव्हा फक्त पर्याय निवडणे एवढेच बाकी असते. तुम्ही त्या परिस्थितीत कशी प्रतिक्रिया द्यायची ते ठरवायचे असते. तुमच्या मन:स्थितीमुळे लोकांवर काय परिणाम होईल यावरचा पर्याय निवडा. तुम्हाला चांगली अगर खराब मन:स्थितीपैकी एकाची निवड करावी लागेल. तुमचे आयुष्य कसे जगायचे हे तुमचे तुम्ही ठरवायचे असते.''

बऱ्याच वर्षांनंतर जेरीकडून रेस्टॉरंटमध्ये काम करताना जी चूक कधीही करायची नसते अशी चूक घडली. ती अपघाताने घडलेली चूक होती. रेस्टॉरंटचा मागचा दरवाजा चुकून उघडा राहिला आणि मग? सकाळी तीन शस्त्रधारी गुंड लोकांनी रेस्टॉरंटवर हल्ला केला. गुंडांना तिजोरीतील खजिना हवा होता. तिजोरी उघडताना घाबरल्यामुळे जेरीचे हात थरथरले. तिजोरी उघडायला उशिर झाला. गुंडांनी घाबरून जेरीवर गोळ्या झाडल्या.

नशिबाने जेरीला लवकरच मदत मिळाली. त्याला हॉस्पिटलमध्ये नेण्यात आले. अठरा तास त्याच्यावर शस्त्रक्रिया चालली होती. त्यानंतर तो आठ दिवस अतिदक्षता विभागात होता. बुलेटस्च्या खुणा ठेवूनच जेरी दवाखान्यातून बाहेर आला होता. याला सहा महिने लोटल्यानंतर जेरीला भेटल्यावर विचारले, ''कसा आहेस?''

तर तो म्हणाला, ''जर मी आहे त्यापेक्षा बरा असतो तर मी माझा जुळा भाऊ असतो.'' त्याच्या जखमा पाहण्यापेक्षा त्याला रेस्टॉरंटमध्ये हल्ला झाला त्यावेळी त्याची भावस्थिती कशी होती हे जाणून घ्यायचे होते.

''प्रथमत: माझ्या मनात आले की मी मागील दार बंद करायला हवे होते. मला त्यांनी गोळ्या घातल्यावर जेव्हा मी जमिनीवर आडवा पडलो होतो तेव्हा मला आठवले की माझ्यासमोर दोन पर्याय आहेत. मी जगू शकतो किंवा मी मरू शकतो.'' ''पण तुला भीती वाटली नाही का?''

''मला तत्काळ वैद्यकीय मदत करणारे फार चांगले व निष्णात लोक होते. मी बरा होईन असा विश्वास ते मला सतत देत होते. पण जेव्हा मला ऑपरेशनसाठी नेण्यात आले तेव्हा तिथले डॉक्टर व परिचारिकांचे चेहरे पाहून मी खरोखरच खूप घाबरून गेलो होतो. त्यांच्या डोळ्यांत मी मरणार असाच भाव दिसत होता. मला कळत होते की आता डॉक्टरी उपाय सुरू करणे आवश्यक होते. मग तू काय केलेस?''

''त्यांच्यापैकी सर्वांत अनुभवी परिचारिका माझ्या कानात ओरडून विचारत होती, मला कशाची ॲलर्जी आहे? मी एक दीर्घ श्वास घेतला आणि ओरडलो, 'बुलेटस्ची. त्यांच्या हसण्यामध्येच मी त्यांना सांगितले, मी जगायला प्राधान्य देत आहे. लवकर माझ्यावर शस्त्रक्रिया करा. मी मेलेलो नाही जिवंत आहे.''

जेरी हा डॉक्टरांच्या हाताच्या गुणांमुळे वाचला, पण त्यापेक्षा तो त्याच्या आश्चर्यकारक आशावादी दृष्टिकोनामुळे लवकर बरा झाला. प्रत्येक दिवशी तुम्हाला पर्याय असतो. आयुष्य मजेत जगायचे की तिरस्कार करायचा. हा पर्याय निवडणे फक्त तुमचे असते, त्यावर इतर कोणाचेही नियंत्रण राहत नाही. आयुष्याबाबत दृष्टिकोन एकदा तुम्ही नक्की केलात की मग सर्व सुरळीत होते.

❋ ❋ ❋

# तुमचे पॅराशूट कोणी बांधून दिले?

**चा**र्ली प्लंब हा अमेरिकन नौदलात जेट पायलट म्हणून व्हिएतनाम युद्धावर गेला होता. त्या युद्धात चार्लीने ७४ वेळा सलग यशस्वी हमले केले होते. त्याच्या ७५ व्या हल्ल्याच्या वेळी जमिनीवरून मारलेल्या क्षेपणास्त्राने त्याचे एफ् ४ फँटम फायटर विमान अचूक निशाण केले होते. त्याचे जेट विमान असलेल्या १२,००० पौंड इंधनासकट उलट्यासुलट्या कोलांट्या घेत शेत जमिनीवरील चिखलात कोसळले होते.

जेटमधून बाहेर पडण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता. त्याला मरणापासून वाचविण्यासाठी त्याच्याजवळ एकच मार्ग होता. तो म्हणजे त्याचे पॅराशूट उघडून जमिनीवर उतरणे. पॅराशूट वेळेवर व नीट उघडावे अशी त्याने मनोमन प्रार्थना केली. खाली येताना चार्लीला पॅराशूट उघडतानाचा हिसका जाणवला. एकूण नव्वद सेकंदांच्या खाली येण्याच्या वेळेदरम्यान शत्रूच्या एका तुकडीने त्याचा वेध घेतला. तो मनात म्हणाला, ''शत्रूचे धारिष्ट्य म्हणजे प्रथम त्यांनी माझे अत्यंत मौल्यवान जेट विमान पाडले आणि आता ते मलापण जीवे मारण्याचा प्रयत्न करीत आहेत.'' त्या बंदुकीच्या गोळ्यांच्या माऱ्यानंतर चार्ली जखमी अवस्थेत जमिनीवर उतरला. शत्रूच्या हातात सापडला. तो एकूण २१०३ दिवस साम्यवादी व्हिएतनामच्या तुरूंगात युद्ध कैदी म्हणून

जेरबंद होता. तो त्या दिव्य अनुभवातून वाचला. त्या सगळ्या अनुभवावर आधारित तो लोकांना शिक्षण देण्यासाठी भाषणे देत होता.

कैदेतून सुटून परत आल्यानंतर बऱ्याच वर्षांनी पत्नी व एका जोडप्याबरोबर चार्ली एका रेस्टॉरंटमध्ये कॉफी घेत बसला होता. पलीकडे असणाऱ्या एका टेबलावरून एक गृहस्थ चार्लीकडे एकटक पाहत होता. थोड्या वेळाने तो उठून चार्लीच्या टेबलाजवळ आला. त्याच्याकडे रोखून पाहत तो म्हणाला, ''तुम्ही कॅप्टन चार्ली प्लंब आहात ना?'' चार्लीने त्याच्याकडे पाहिले आणि म्हणाला, ''हो, मीच कॅप्टन चार्ली प्लंब.'' त्यावर तो माणूस म्हणाला, ''ज्यांनी व्हिएतनामवर जेट फायटरने हल्ले केले ते तुम्हीच ना? तुमच्याजवळच हल्ल्याच्या साधनसामुग्रीचा साठा होता ना? तुम्ही जेट वाहक युद्ध नौकेवरून उड्डाण केले होते. तुम्ही पॅराशूटच्या साहाय्याने शत्रूच्या मुलखात उतरलात. तुम्ही त्यानंतर सहा वर्षे युद्धकैदी म्हणून तुरूंगात होतात.''

काहीसा चकित होऊन चार्लीने त्या माणसाकडे पाहिले आणि त्याला विचारले, ''हो पण तुम्हालाच हे कसे सगळे ठाऊक आहे?'' त्याने गालातल्या गालात हसत सांगितले,''कारण युद्ध नौकेवर तुमचे पॅराशूट मीच बांधून दिले होते.'' चार्ली एक अक्षरही बोलू शकला नाही. त्या माणसाने चार्लीचा हात हातात घेतला, जोरात हस्तांदोलन केले. वर म्हणाला, ''मला वाटते ते पॅराशूट नीट वेळेवर उघडले ना?'' आणि निघून गेला.

प्लंबला त्या रात्री झोप आली नाही. त्या माणसाबद्दलच विचार करीत राहिला. त्याच्या मनात आले, आपण त्या जेटवाहक युद्ध नौकेवरील समुद्राच्या पातळीखाली असलेल्या चिंचोळ्या रूममधून किती वेळा तरी चालत गेलो असू. त्या माणसाने तिथे एका टेबलावर बसून माझ्या पॅराशूटला व्यवस्थित बांधले असेल. तो म्हणतो, ''तो मनुष्य नौदलात असताना गणवेशात कसा दिसत असेल? सफेद हॅट, पाठीमागे स्कार्फ, बेल बॉटम पँट. मी त्याला कितीतरी वेळा पाहिले असेल पण एकदाही त्याला 'गुड मॉर्निंग, कसा आहेस, चांगले काम करतो आहेस, मी तुझ्या कामाला दाद देतो.' असे विचारले नाही. किंवा दुसरा काहीही संवाद केला नाही. कारण मी फायटर पायलट होतो आणि तो साधा खलाशी होता. पण त्याचे काम माझा जीव वाचण्यासाठी पॅराशूट नीट बांधणे असे महत्त्वाचे होते.''

प्लंब अनेक तास विचार करीत होता, त्या खलाशाने कित्येक तास त्या टेबलावर बसून पॅराशूटच्या जाळीचे दोर विणले असतील, पॅराशूटची दांडी हाताने भक्कम केली असेल. तसे करताना तो कोणाचे आयुष्य वाचविणार आहे हे त्याला माहीतही नसणार.

आपल्या भाषणात चार्ली प्लंब सांगतो, ''तुम्ही विचार करा, तुमच्या आयुष्यात जे तुम्हाला जास्त मदत करतात अशा कितीतरी जणांना तुम्ही दुर्लक्ष करून पुढे जाता. तुम्हाला त्यांची नितांत गरज असताना ते दूरवरून येऊन तुम्हाला जीव वाचविण्यास मदत करतात. तुमचा जीव वाचविणारे पॅराशूट ते नीट तयार करतात. ते लोक चाकोरीबाहेर जाऊन तुम्हाला मदत करतात, त्यांना ना किर्तीची ना अभिनंदनाची व प्रशंसेची अपेक्षा असते. ते कसलेही पारितोषिक वा पदक मिळविण्यासाठी हे करत नाहीत. ते फक्त त्यांचे काम करतात. पॅराशूट नीट बांधतात.

माझे जेट जेव्हा शत्रूपक्षाच्या भागात पाडण्यात आले तेव्हा मला अनेक प्रकारची पॅराशूटची आवश्यकता भासली. मला शारीरिक, मानसिक, भावनिक आणि आध्यात्मिक अशी सर्व प्रकारची पॅराशूट हवी होती. मी जमिनीवर येण्याआधी या सर्व पॅराशूट मिळण्यासाठी प्रार्थना करीत होतो. काही वेळा रोजच्या जगण्यातील आव्हानांना तोंड देताना आपण महत्त्वाच्या गोष्टी विसरतो. आपण नुसते हॅलो, प्लीज, थँकस् हे म्हणायला विसरतो. एखाद्याच्या जीवनात अलौकिक घटना घडल्यावरही आपण त्याचे अभिनंदन करायला विसरतो. आपण दुसऱ्याची प्रशंसा हात राखून करतो. आपण कारण नसताना कोणाचे उगाचच भले करीत नाही. या आठवड्यात तुमचे पॅराशूट कोणी कोणी नीट बांधले ते लक्षात घेऊन याची यादी करा.

तुमच्याच संस्थेतील लोकांकडे पाहा की जे संस्थेतील वरिष्ठ पातळीवरील अधिकारी नसतील, मान्यताप्राप्त नेते व डांबरट पुढारी नसतील पण ते संस्थेच्या एकूण कामकाजातील महत्त्वाचा दुवा असतील. त्यांना शोधून त्यांचा सन्मान करा.''

❃ ❃ ❃

# तुम्हाला तुमच्या पित्याचा अभिमान आहे का?

अमेरिकेचे अध्यक्ष अब्राहम लिंकन आपल्या पहिल्या अध्यक्षीय भाषणासाठी सभागृहात शिरत होते. नेमके त्याच वेळी एक सभासद उठून उभा राहिला. तो एक श्रीमंत उमराव होता. तो म्हणाला, ''मि. प्रेसिडेंट, तुमचे वडील आमच्या कुटुंबाचे जोडे बनवून देत होते याचा विसर पडू देऊ नका.''

ते ऐकताच सर्व सभागृह हास्यात बुडून गेले. त्यांचा समज झाला की त्यांनी अब्राहम लिंकनची चांगलीच टर उडविली आहे. परंतु लिंकन आणि त्यांच्यासारखी माणसे वेगळ्याच साच्यातून निघालेली असतात. लिंकनने एकदा त्या उमरावाकडे पाहिले आणि म्हणाले, ''सर, माझे वडील तुमच्या घरी येऊन तुमच्या कुटुंबासाठी जोडे बनवित असत हे मला पुरेपूर ठाऊक आहे. तुमच्याशिवाय असे इतर अनेक असतील. कारण ते जसे जोडे तयार करीत तसे जोडे दुसरे कोणीही बनवू शकत नव्हते.''

त्यांना नवनिर्मितीची जाण व आवड होती. त्यांनी तयार केलेले जोडे हे नुसते जोडेच नव्हते. ते बनविताना त्यांनी आपले तन आणि मन त्यात ओतलेले असे. मला तुम्हाला विचारायचे आहे, तुमची काही त्याबद्दल तक्रार आहे का? कारण मला स्वत:ला जोडे कसे तयार करायचे ते येतात. जर तुमची काही तक्रार असेल तर मी तुमच्यासाठी नवीन जोडे तयार करू शकेन. मला जे काही माहिती आहे त्यानुसार आजपर्यंत माझ्या वडिलांनी बनवलेल्या जोड्याबद्दल कोणाचीही काहीही तक्रार नाही. ते अलौकिक बुद्धिचे निर्माते होते. मला माझ्या वडिलांचा खूप अभिमान आहे.''

संपूर्ण सभागृह नि:शब्द झाले. त्यांना अब्राहम लिंकन काय प्रकारचा माणूस आहे ते कळेना. त्यांना वडिलांचा अभिमान होता त्याचे मुख्य कारण म्हणजे त्यांच्या केलेल्या कामाबद्दल एकाही माणसाची तक्रार नव्हती.

**तात्पर्य :** तुम्ही तुमच्या वडिलांचा व त्यांनी जगण्यासाठी केलेल्या कामाचा अभिमान वाटतो की त्याबद्दल तुम्हाला अवघडल्या सारखे वाटते? तुमच्या संमतीशिवाय दुसरे कोणीही तुम्हाला दुखवू शकत नाहीत. आपल्याला कोणी दुखावले तर मनाला इजा पोहोचते.

❋ ❋ ❋

# तुम्ही खरेच सुखी आहात काय?

लंडनमधील एका प्रसिद्ध व्यवसायाच्या मार्केटिंग डायरेक्टरने आमंत्रित केलेल्या एका स्वागत समारंभात इतर काही डायरेक्टरांच्या पत्नी पण हजर होत्या. त्यांना नवीन आलेल्या डायरेक्टरच्या पत्नीशी अधिक परिचय करून घेण्याची इच्छा होती. त्यापैकी एकीने तिला प्रश्न केला, ''तुमचे पती खरोखरच तुम्हाला आनंदी ठेवतात का?''

तिचे पती त्यावेळी जवळपास नव्हते. परंतु इतक्याच अंतरावर होते की जिथे त्यांना त्यांची पत्नी काय उत्तर देते हे ऐकू जाणे सहज शक्य होते. त्यांनी तो विचारलेला प्रश्न ऐकला आणि जरा सतर्कतेने ताठ बसत त्या चर्चेकडे कान लावले. त्यांना पत्नी होकारात्मकच उत्तर देणार याची खात्री होती. कारण लग्न झाल्यापासून ती यजमानांच्या पूर्णपणे पाठीशी होती. परंतु तिच्या उत्तराने इतर स्त्रीवर्ग आणि पती यांना आश्चर्याचा धक्का बसला. तिने सरळ सांगितले, ''छे छे माझे पती मला कधीच आनंदी ठेवित नाहीत.''

पत्नीचे उत्तर ऐकून हॉलमधील सगळे जण अवघडून स्तब्ध झाले. पतिराज तर एकदम स्तंभित होऊन गेले. आपल्या एका महत्त्वाच्या सभेमध्ये पत्नी असे काही बोलेल यांवर त्याचा विश्वासच बसेना. तिच्या पतीला व इतर सर्वांनाच अचंबा वाटावा अशा पद्धतीने तिने आपल्या डोक्यावर एक अत्यंत मोहक असा काळ रूमाल बांधत ती पुढे बोलू लागली, ''तसे नाही. ते मला आनंदी ठेवित नाहीत... मीच खूप आनंदी आहे. मी सुखी आहे की नाही हे त्यांच्यावर अवलंबून नसते तर ते संपूर्ण माझ्या स्वत:वर अवलंबून असते. फक्त मी स्वत: माझ्या आनंदाला कारणीभूत व जबाबदार असते. प्रत्येक परिस्थितीत व प्रत्येक क्षणाला माझ्या आयुष्यात मी सुख मानायचे की नाही ते ठरविण्याची मलाच संधी असते. दुसऱ्या कोणावर, दुसऱ्या एखाद्या

गोष्टीवर, परिस्थितीनुसार या पृथ्वीवर जर माझे सुख अवलंबून असेल तर मला फार मोठी अडचण निर्माण होईल. या जगात अस्तित्वात असलेली प्रत्येक गोष्ट संक्रमणास्थेत असते. मग ते मनुष्यप्राणी, संपत्ती, माझे शरीर, हवामान, सुख काहीही असो. ही यादी अपरिमित असेल. या माझ्या आयुष्यात मी काही गोष्टी शिकले आहे. मी आनंदी राहण्याचे ठरविले आहे. मग काय होईल ते अनुभव, परिस्थिती, जसे मदत करणे व समजावून घेणे, स्वीकारणे व दुसऱ्याचे ऐकणे, विचारविनिमय त्यावर अवलंबून राहते. मी माझ्या पतीबरोबर ह्याच तत्त्वानुसार राहते आहे आणि आचरणात आणते आहे.''

''आनंद हा नेहमी क्षमा करण्यात आणि स्वत:वर व दुसऱ्यावर प्रेम करण्यात मिळत असतो. मला सुखी करणे ही माझ्या पतीची जबाबदारी नाही. त्यांना त्यांचे स्वत:चे अनुभव व परिस्थिती हाताळायची असतेच. त्यांचे माझ्यावर प्रेम आहे व माझे त्यांच्यावर प्रेम आहे. त्यात त्यांची व माझी परिस्थिती उद्भवत असतेच. ते आणि मी आम्ही दोघेही बदलत असतो, पर्यावरण बदलत असते. सगळे बदलते. क्षमा करून व मनापासून प्रेम करून, होणारे सर्व बदल लहान असो की मोठे असोत त्यांना आनंदाने सामोरे जाऊन राहायला हवे. जर आम्हा दोघांचे एकमेकांवर प्रेम असेल व दोघांच्या मनात क्षमा करण्याची भावना असेल तर हे सर्व बदल, अनुभव व परिस्थिती याच स्वरूपात आम्हाला अधिक समजूतदार बनवतील. त्यामुळे आम्हा दोघांनाही एकत्र राहण्याचा जादा उत्साह मिळेल. अन्यथा ते नुसतेच एकत्र राहणे होईल. मग काही जणांना घटस्फोट हाच पर्याय शिल्लक राहील. खरे प्रेम करणे हे थोडे अवघड असते. त्यासाठी कोणत्याही अटीबिना क्षमा करणे आणि परिस्थिती व अनुभव याचा जसे आहे तसे स्वीकार करणे हाच दृढ विश्वासाने आनंदी राहण्याचा मार्ग असतो.''

अनेक जण तक्रार करतात, ''मी सुखी होऊ शकत नाही कारण मी आजारी आहे, माझ्याजवळ पुरेसे पैसे नाहीत, फारच थंडी आहे, कोणीतरी माझा अपमान केला आहे, कोणीतरी माझ्यावर प्रेम करीत नाही, अथवा कोणीतरी माझे कौतुक करत नाही, किंवा कोणीतरी मला किंमत देत नाही.'' पण यापैकी कोणतेही कारण असले तरी तुम्ही आनंदी राहू शकता.

आनंदी राहणे किंवा आनंद मानणे ही वृत्ती आहे. जीवन जगण्याचा एक दृष्टिकोन आहे. प्रत्येकाने मनात बिंबविले पाहिजे, माझा आनंद हा फक्त माझ्यावर अवलंबून आहे.

❋ ❋ ❋

# तुम्ही नोकरीतून निवृत्त झाला आहात आयुष्यातून नाही

लक्षात ठेवा तुम्ही नोकरीतून निवृत्त झाला असणार किंवा होणार असणार, तुम्ही आयुष्यातून निवृत्त झाला नाही हे पक्के लक्षात ठेवा.

१. निवृत्त होताना तुमच्या हुद्याला व अहंकाराला ऑफिसमध्येच अच्छा करून बाहेर पडा.

२. तुम्हाला फक्त एकच जन्म मिळतो, त्याचा पुरेपूर उपयोग करा.

३. शारीरिक आणि मानसिकदृष्ट्या तंदुरुस्त राहा.

४. टेनिस किंवा गोल्फ खेळा किंवा निदान अर्धा तास रोज चाला.

५. देवाची पूजा करण्यात तासन्‌तास वाया घालवू नका. देव फार समजूतदार आहे. त्याने प्रार्थनेच कोठलेही नियम घालून दिले नाहीत. त्याऐवजी तोच वेळ मजा करण्यात, जसे वाचनात, लिहिण्यात, संगीत ऐकण्यात, बागकामात, प्रवास करण्यात अगर तुमचे आवडते सिनेमा पाहण्यात घालवा.

५. संगणक वापरायला शिका, इंटरनेटच्याद्वारे माहिती मिळवा, सदासर्वकाळ आनंद देणारे सिनेमा व संगीत उतरवून घ्या.

६. तुमचे आवडते पदार्थ खायला संकोच बाळगू नका. सायंकाळी तुमच्या आवडीचे एक दोन पेग जरूर घ्या. खुशवंतसिंग वयाच्या ९८ व्या वर्षी सुद्धा ड्रिंक मजेत घेत होते. त्यांच्या लिखाणावर पुष्कळ पैसे कमवित होते.

७. सामाजिक संबंध वाढवा. गरजूंना मदत करा. देण्यात वेगळाच आनंद मिळतो.

८. तब्बेतीची काळजी घ्या. व्याधी होण्याआधी त्याला प्रतिबंध करणे केव्हाही उत्तम. तुमच्याबरोबर तुमच्या जोडीदाराच्या तब्बेतीची काळजी घ्या.

९. तुमच्या संपत्तीत कोणालाही अगदी तुमच्या मुलांना सुद्धा वाटेकरी करू नका. लक्षात ठेवा, तुम्हाला स्वत:ला आणि जोडीदाराला आयुष्यभर पोसायचे असते.

१०. कोणालाही कर्ज घेण्यासाठी जामिनदार राहू नका.

११. कोणताही कोरा कागद किंवा कुलमुखत्यारपत्रावर न वाचता सही करू नका. त्यासाठी कोणीही गळ घातली, विनवले, आग्रह केला तरी बळी पडू नका.

१२. तुमच्या तब्बेतीविषयी सतत तक्रारी करू नका.

१३. तुमचे काम तुम्ही स्वत: करा. दुसऱ्यावर अवलंबून राहू नका.

१४. तुमच्या वयाचे कारण सांगून असहाय्यता दाखवू नका. लक्षात ठेवा वय हे कोणतेही काम करायला, इच्छा करायला व साध्य करायला आडकाठी करत नाही.

१५. तुमचे मृत्युपत्र तयार करा. मृत्युपत्र व इस्टेटीचे कागद सुरक्षित ठेवा.

१६. इतरांच्या कामात नाक खुपसू नका.

१७. मागितल्याशिवाय कोणालाही अगदी घरातल्या लोकांना सुद्धा फुकट सल्ला देऊ नका.

१८. कुटुंबातील लहानांचे कामगिरीसाठी त्यांचे कौतुक करा.

१९. वाढते वय हा रोग नसून तो विशेषाधिकार आहे. त्याचा आनंद घ्या.

२०. कनिष्ठ दर्जाची सेवा, हलक्या दर्जाची वागणूक व उपरोधात्मक गोष्टींना चांगले प्रत्युत्तर द्या.

२१. जेष्ठ नागरिकांसाठी असलेल्या सार्वजनिक ठिकाणच्या सुविधांचा विशेष सवलतींचा उपयोग करा.

२२. नेहमी रुबाबदार कपडे परिधान करा. का नाही? हे तुमच्या कमाईचे आहे. चेहऱ्यावर हसू ठेवा.

२३. वय वाढल्याबद्दल तक्रार करू नका. कारण कित्येकांना हे नशिबात नसते. कारण वृद्धत्वाला पर्याय एकच– लहान वयात मरण येणे.

२४. शेवटी लक्षात ठेवा, वृद्धत्व हा मनाचा खेळ आहे. तुम्ही त्याची पर्वा केली नाही तर काही बिघडत नाही.

२५. देवा, मला आज आनंदाने जगू दे, म्हणजे कालचा दिवस हा सुखाचे स्वप्न ठरेल व उद्याचा दिवस आशेचा किरण व आत्मविश्वास निर्माण करेल.

❃ ❃ ❃

# त्यांना आहेत तसे स्वीकारा

दक्षिण भारतातील एका लहान गावात राहणारा एक वृद्ध गृहस्थ त्याच्या मुलाकडे मुंबईला प्रथमच आलेला असतो. मुलगा हा पस्तीस–चाळिशीचा एक यशस्वी उद्योजक आपल्या बायको व मुलांबरोबर मुंबईत राहत असतो. त्याचे वडील बहुतेक आयुष्यभर त्यांच्या जन्मगावीच राहिल्यामुळे त्यांना मराठी तर सोडाच पण हिंदी किंवा इंग्रजी भाषेचा गंधही नसतो. परंतु त्यावाचून त्यांचे मुळीच अडत नसते. ‘‘मी माझ्या मुलाकडे त्याच्या आणि त्याच्या कुटुंबाबरोबर काही दिवस राहायला आलो आहे. मला कोठेही बाहेर जाऊन कोणालाही भेटायचे नाही.’’ त्यांचा स्पष्ट विचार.

वडिलांच्या मुंबईला येण्याने मुलगा मात्र खूप उत्साहात होता. त्याला त्या मुंबई भेटीचा वडिलांना खूप आनंद द्यायचा होता. त्याला आणि त्याच्या बायकोला म्हाताऱ्याला मुंबईची वेगवेगळी ठिकाणे दाखवायची होती. मुलाला आपल्या वडिलांबरोबर एखाद्या बारमध्ये जाऊन जोडीने आवडते ड्रिंकचे घोट घेत गप्पा करायला आवडत असे. त्यांच्या भेटीच्या अखेरच्या आठवड्यात

मुलगा फार मस्त मन:स्थितीत होता. वडिलांना घेऊन तो एका उच्च श्रेणीच्या रेस्टॉरंटमध्ये गेला. ती दोघांसाठी फारच छान सायंकाळ होती. जगातील अनेक विषयांवर गप्पा करता करता त्यांनी दोन तीन पेग मजेत घेतले. नेहमीप्रमाणे रेस्टॉरंटमध्ये ड्रिंक्सबरोबर काजू, दाणे, वेफर्स इ. दिले होते. म्हाताऱ्याचे तोंडात फारसे दात शिल्लक नव्हते. त्यामुळे त्याला खाण्यात फारसा रस नव्हता. त्या दिवशी ते उठून निघाल्यानंतर वडिलांनी टेबलावरून मूठभर चणे घेतले व धोतराच्या सोग्यात ठेवले. बहुधा त्यांना ते कारमधून जाताना किंवा नंतर केव्हातरी खायला हवे असणार.

दुर्दैवाने चालताना त्यांचा पाय अडखळतो आणि ते घसरून पडतात. त्यांनी धोतऱ्याच्या सोग्यात घेतलेले फुटाणे जमिनीवर सांडून घरंगळत सगळीकडे पसरतात. ''हरकत नाही. जाऊ दे.'' मुलगा त्यांना उठवित म्हणतो.

आता तुम्ही तो प्रसंग डोळ्यासमोर आणा. त्या मुलाच्या जागी दुसरा कोणी एखादा असता तर तो खजिल झाला असता. शरमिंदा झाला असता. त्याला फजिती झाल्यासारखे वाटले असते. मेल्याहून मेल्यासारखे झाले असते. त्याने वडिलांना दोष देण्याऐवजी स्वत:लाच अशी अवघड अवस्था करून घेतल्याबद्दल दोषी मानले असते. 'आता कधीही अशा तारांकित रेस्टॉरंटमध्ये वडिलांना घेऊन जायचे नाही.' असे मनात ठरविले असते.

नाही पण हा मुलगा तसा नव्हता. हळुवारपणे हाताला आधार देऊन त्याने आपल्या वडिलांना उठायला मदत केली. चिडचिड करण्याऐवजी किंवा रागावण्याऐवजी त्याने ते सगळे गमतीने घेतले. त्याला तो सगळा प्रसंग विनोदी वाटला. दोघे बाप लेक हसत हसतच घरी गेले. जाताना दुसऱ्या दिवशी परत त्याच रेस्टॉरंटमध्ये येण्याचे नक्की केले.

म्हाताऱ्याला ते रेस्टॉरंट तर आवडलेच शिवाय चणे पण खूप आवडले होते. काही दिवसांनंतर मुलाच्या मित्राकडे गप्पा करताना त्याने हा प्रसंग वर्णन करून सांगितला. सगळ्यांची करमणूकच झाली. मित्रांपैकी एक जण मुलाला म्हणाला, ''त्यावेळी तुला फार लाजल्यासारखे झाले असेल ना?'' मुलाने उत्तर दिले, ''छे! छे!! ते माझे वडील आहेत. त्यांना फक्त त्यांची भाषा येते. धोतर नेसायला आवडते. अगदी अशा आलिशान रेस्टॉरंटमध्ये सुद्धा धोतर नेसून जायला त्यांना काहीच चुकीचे वाटले नाही. थोड्या वेळाने खायला म्हणून त्यांनी चणे घेतले. त्यांना जे बरे वाटले ते त्यांनी केले. त्यात काय गैर झाले? मला त्यांच्या सवयी, आवड आणि स्वभावाबद्दल का लाज वाटायला हवी? त्यांना ज्यामध्ये आनंद वाटतो ते करण्यापासून त्यांना कोणीही अडवू शकत नाही. त्यांच्या काहीही करण्याने कोणाला त्रास होता कामा नये इतकेच पाहायचे.''

रेस्टॉरंटमधील काम करणाऱ्या लोकांना त्या प्रसंगाचे काय वाटले त्याचा त्या मुलाने विचारच केला नाही. तो म्हणाला त्या लोकांनी फक्त त्यांच्या बिलाची आणि टिपस्‌ची काळजी करावी. माझ्या वडिलांची काळजी घ्यायला आणि त्यांना आनंद देण्यास मी समर्थ आहे. या मुद्यावर मुलाची पत्नी सुद्धा शंभर टक्के सहमत होती. तिच्या सासऱ्यांकडे इतर अनेक गुण व चांगल्या गोष्टी होत्या आणि त्याचा त्यांना अभिमान वाटत होता. हा प्रसंग मुलाचे आणि सुनेचे म्हाताऱ्यावर असलेले प्रेम व वाटणारी निष्ठा दाखविण्यासाठी फक्त सांगितला नाही. त्यापेक्षा त्यांनी दाखविलेला समजूतदारपणा व वडिलांबद्दल बाळगलेला ठणठणीत नितांत आदर यात दिसून येतो. दुसऱ्याच्या जगण्याच्या जीवनमान पद्धतीचे मनापासून स्वीकारणे यात कळून येते.

''सत्तरहून अधिक वय असलेल्या त्या गृहस्थाला त्याची जगण्याची पद्धत बदलण्याची अजिबात इच्छा नव्हती. तो जसे खातो, कपडे करतो, बोलतो तेच त्याला आवडते. त्याच्या दृष्टीने त्या जुन्या पद्धतीमध्ये काहीही गैर नसते आणि मुलालाही त्यात वावगे वाटत नाही. प्रत्येकाला स्वत:च्या मर्जीप्रमाणे राहण्याचा अधिकार असतो.

''आता या वयात त्याला नको असेल तर सुरी, काटे, चमच्याने जेवणाचा आग्रह कशासाठी करायचा? जर त्यांनी एखादी नैतिकतेविरूद्ध अगर अपायकारक कृती केली तरच मला ते आवडणार व चालणार नाही. अन्यथा माझी कशाला हरकत नसेल. या वयात त्यांना बदलण्याचा मी मुळीच प्रयास करणार नाही. ते माझे वडील आहेत. माझे त्यांच्यावर प्रेम आहे. मला त्यांच्याबद्दल आदर आहे.''

''मित्रांनो, तुम्ही या दृष्टिकोनातून विचार करा. बऱ्याच वेळा त्यांच्या कुटुंबातील लोक जेव्हा अप्रस्तुत किंवा पुरातन पद्धतीने वागतात तेव्हा ते स्वत: उगाचच शरमिंदे होतात. ते त्यांच्या नातेवाइकांच्या मागासलेपणासाठी आणि त्यांच्यातील उणिवांसाठी

बाहेरच्या लोकांची क्षमायाचना करतात. माझ्या पत्नीला नीट इंग्रजी बोलता येत नाही. तिला बाहेरच्या जगात काय चालले आहे याची काहीही कल्पना नसते. त्यामुळे तिला बरोबर नेऊन मित्रांना व व्यवसायातील लोकांना तिची ओळख करून देणे मी टाळतो. माझे आईवडील सुरी, काटे, चमच्यांनी जेवू शकत नाहीत त्यामुळे मी त्यांना घेऊन आलिशान रेस्टॉरंटमध्ये जात नाही. माझे पती साधे कारकून आहेत त्यामुळे मला माझ्या श्रीमंत मैत्रिणींना त्याची ओळख करून देताना लाज वाटते. माझा भाऊ थोडासा मंदबुद्धी आहे. त्याच्याबरोबर बाहेर जायला मला आवडत नाही.''

''तुम्हाला असे विचार भंडावून सोडतात का? किंवा तुम्हाला अशी विचार करणारी माणसे भेटतात का? जर उत्तर हो असेल तर तुम्ही स्वत:लाच विचारा, मी किंवा इतर लोक असा विचार का करतात? खरे तर त्यात कमीपणा वाटण्यासारखे काय असते? इतर लोकांचे काय मत होईल व त्यांचे काय टोमणे ऐकावे लागतील याचेच भय वाटत असते. इतर काहीही म्हणोत त्याची तुम्ही कशाला चिंता करता?''

त्या मुलाचे हे विचार किती आदर्श आहेत नाही?

❋ ❋ ❋

# दी प्रेयिंग हँड्स

**फा**र वर्षांपूर्वी पंधराव्या शतकात एका लहानशा गावात न्यूरेनबर्गजवळ एक सोनाराचे कुटुंब राहात होते. कुटुंबात एकूण अठरा माणसे खाणारी होती. एकच जण कमावणारे होते. त्या अठरा जणांचे जेवण रोज टेबलावर येण्यासाठी कुटुंबप्रमुखाला दर दिवशी किमान अठरा तास काम करावे लागत असे. त्या शिवाय जास्त कमाईसाठी जवळच्या शहरात इतर मजुरी पण करावी लागत असे.

बाह्यत: दिसणाऱ्या या हलाखीच्या परिस्थितीतही मोठ्या दोन भावांना काहीतरी वेगळे करण्याची जबरदस्त इच्छा होती. त्या भावांची नावे अल्बश्ट व अल्बर्ट (Albrecht and Albert) अशी होती. त्यांच्या अंगात असलेल्या कलागुणांना त्यांना जोपासायचे होते. परंतु आपल्या वडिलांना दोघांपैकी एकाला सुद्धा न्यूरेनबर्गला कलाक्षेत्रातील शिक्षणासाठी अकादमीमध्ये पाठविणे आर्थिकदृष्ट्या शक्य होणार नाही हे पक्के ठाऊक होते.

अनेक रात्री दाटीवाटीने झोपलेल्या बेडवर दोघा भावांची चर्चा चालली होती. शेवटी ते एका निर्णयाप्रत आले होते. त्यांनी ओली सुकी नाण्याने करण्याचे ठरविले. जो त्या नाणेफेकीत हरेल त्याने जवळच्या खाणीत जाऊन काम करायचे आणि दुसऱ्या भावाचा अकादमीमध्ये जाऊन शिक्षणाचा खर्च सोसायचा. जिंकलेला भाऊ अकादमीमध्ये जाऊन आपले शिक्षण पूर्ण करेल. चार वर्षांनी शिक्षण पुरे झाल्यावर त्याने परत येऊन आपली कला चित्रे विकून अगर मोठ्यासारखे खाणीत काम करून आपल्या भावाच्या शिक्षणास आर्थिक साहाय्य करायचे.

असे करायचे ठरल्यावर त्यांनी नाणे फेकून कौल घेतला. त्यानुसार अल्बश्ट ड्युररने नाणेफेकीत कौल जिंकला तो लगेच न्यूरेनबर्ग येथील अकादमीमध्ये जाऊन दाखल झाला.

अल्बर्ट खाणीत काम करून चार वर्षे भावाच्या शिक्षणाचा भार वाहात होता. अल्बश्टची पेंटिंग्ज अकादमीमध्ये खूप नावाजली गेली. त्यांनी एकूणच खळबळ माजविली. अल्बश्टची तैलचित्रे, त्याचे लाकडातील कोरीव काम हे फार गाजले. ते कित्येक प्राध्यापकांचे कामापेक्षा जास्त चांगले, सुंदर व सुबक होते. त्याचा अभ्यासक्रम पुरा होता होताच त्याच्या कलाकृतींना चांगली किंमत येऊन तो चांगल्यापैकी पैसे कमावू लागला होता.

चार वर्षांच्या अभ्यासक्रमानंतर ड्युरर कुटुंबाने अल्बश्टच्या यशस्वी पुनरागमनानिमित्त त्यांच्या घरी लॉनवर एक भव्य स्वागत समारंभाची योजना केली होती. अत्यंत अविस्मरणीय जेवण व तितकेच सुमधुर संगीत होते. स्वागत समारंभाचे वेळी अल्बश्टला मानाच्या जागी स्थान दिले होते. तिथून उठून तो आपल्या भावाचे अल्बर्टचे आभार मानण्यासाठी व टोस्ट करण्यासाठी

त्याच्या जवळ आला. गेली चार वर्षे त्याने केलेल्या अथक श्रमांमुळेच अल्बश्टला आपला अभ्यासक्रम पुरा करता आला होता. भावाच्या त्याच्यावरील प्रेमामुळेच त्याचे स्वप्न साकार झाले होते. आपल्या भाषणात या सर्वांचा उल्लेख केल्यानंतर शेवटी अल्बश्ट म्हणाला, ''हे माझ्यावर अत्यंत उपकार केलेल्या माझ्या आदरणीय भावा, आता तुझे स्वप्न तुला पुरे करण्याची वेळ आली आहे. आता मी चार वर्षे काम करेन व तू अकादमीमध्ये जाऊन तुला हवे ते शिक्षण पुरे कर. आता मी तुझी सगळी जबाबदारी घेत आहे.''

सर्वांचे डोळे टेबलाच्या एका टोकाला बसलेल्या अल्बर्टच्या चेहऱ्याकडे लागले होते. अल्बर्टचा चेहऱ्यावर आनंद ओसंडून वाहात होता पण तो सुकलेला होता. त्याच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा लागल्या होत्या. एकीकडे हुंदके देत मानेने आणि शब्दांनी म्हणत होता, ''नाही, नाही, नाही!!'' शेवटी अल्बर्ट उठून उभा राहिला, तो ज्यांच्यावर प्रेम करीत होता अशी सगळी माणसे जमली होती. त्या जमलेल्या सगळ्या माणसांकडे पाहून आपले दोनही हात जोडून उजव्या गालाजवळ नेत तो शांतपणे बोलला, ''नाही बंधू, नाही, आता मी न्यूरेनबर्गला जाऊ शकणार नाही. आता खूप उशीर झाला आहे. माझ्या हातांकडे पाहा. खाणीतील कामाने माझ्या हातांची काय दशा करून टाकली आहे ते पाहा. हाताच्या प्रत्येक बोटांची हाडे किमान एकदा तरी मोडली आहेत. अलीकडे मला संधीवाताचा त्रास होतो आहे. उजवा हात तर इतका दुखावला आहे की मी तुला टोस्ट करण्यासाठी त्या हातात ग्लाससुद्धा पकडू शकत नाही. चर्मपत्रावर, कागदावर, कॅन्व्हासवर किंवा लाकडावर साधी सरळ रेषा काढण्याचा सुद्धा मी विचार करू शकत नाही. पेन किंवा ब्रश मी हातात नीट धरू पण शकत नाही. नाही, नाही माझ्या लाडक्या बंधू आता माझ्यासाठी हा फार उशीर झाला आहे.''

या घटनेला ४५० पेक्षा जास्त वर्षे होऊन गेली. अल्बश्ट ड्युरेरची शेकडो अप्रतिम व्यक्तीचित्रे, पेन्सिल आणि रंगचित्रे, वॉटरकलरमध्ये काढलेली चित्रे, चारकोलने काढलेली चित्रे, लाकडातील कोरीव काम, धातूमधील कोरीव काम, जगातील बहुतेक सगळ्या म्युझियममध्ये पाहायला मिळतात. परंतु या सर्वांपेक्षा अत्यंत आगळेवेगळे असलेले अल्बश्ट ड्युरेरचे एक पेंटिंग सर्व लोकांमध्ये प्रसिद्ध आहे. कदाचित त्याची प्रतिकृती तुमच्या घरातही भिंतीवर टांगलेली असेल.

अल्बर्टने त्याच्यासाठी सहन केलेल्या कष्टांना वंदना करण्यासाठी अल्बश्ट ड्युरेरने आपल्या भावाच्या दोन हातांचे एक पेंटिंग काढले. ते हात म्हणजे चार वर्षे अफाट कष्टामुळे दुर्दशा झालेले, निस्तेज झालेले, सुकलेले असे होते. त्या चित्रामध्ये दोन हात तळव्याने एकत्र करून आकाशाकडे बोटे केलेली होती. अल्बश्टने आपल्या त्या पेंटिंगला नाव दिले होते ''हात'' पण अख्ख्या जगाने त्यातील भाव ओळखून त्या अजरामर पेंटिंगला नाव दिले, ''दी प्रेयिंग हँडस्'' ती त्याने आपल्या भावाला वाहिलेली आदरांजली होती.

❋ ❋ ❋

# दिवसातील एक तास....

विजय ऑफिसमधून उशिरा घरी परत येतो. ऑफिसच्या कामामुळे तो खूप चिडचिडलेला, वैतागलेला व दमलेला असतो. पाच वर्षांचा त्याचा मुलगा चेतन, दारापाशीच त्याची वाट पाहत बसलेला असतो.

विजयला पाहताच चेतन त्याला विचारतो, ''बाबा, मी एक प्रश्न विचारू?''

विजय .... ''हो, काय रे बाळा?'' चेतन विचारतो, ''बाबा, तुला एक तासाच्या कामाचे किती पैसे मिळतात रे?''

विजय रागातच म्हणतो, ''तुला कशाला हव्यात नसत्या चौकशा? असले प्रश्न तू कशाला रे विचारतोस?''

चेतन... ''अरे मला फक्त माहिती करून घ्यायचे आहे. प्लीज सांग ना, तुला एका तासाच्या कामाचे किती पैसे मिळतात?''

विजय गुश्शातच उत्तरतो, ''मिळतात रु. ५००/- एका तासाचे मला.''

मान खाली घालून चेतन म्हणाला, ''अस्स!'' मग पुन्हा मान वर करून तो म्हणाला, ''बाबा, मला प्लीज रु. ३००/- देतोस का?''

विजयचा रागाचा पारा चढला, डोळे वटारून तो चेतनवर खेकसला, ''एखादे फालतू खेळणे घेण्यासाठी किंवा तसेच काहीतरी मूर्खासारखे खरेदी करण्यासाठी तू माझ्याकडून पैसे मागतोस होय? तसे असेल तर तू इथून चालता हो आणि तुझ्या बेडवर जाऊन एकदम आडवा हो. तू इतका का हट्टी होत आहेस याचा तूच विचार कर. तुझ्या ह्या बालिश आणि फालतु हट्टासाठी मी दिवसभर कष्ट करून पैसे कमावित नाही.''

चेतन निमूटपणे आपल्या बेडरुममध्ये जातो आणि नाराज होऊन खोलीचा दरवाजा बंद करून घेतो.

चेतन गेल्यानंतर विजय शांतपणे बसतो अन् चेतनचा प्रश्न आठवून तो अधिकच रागावतो. ''पैसे मागण्यासाठी असले प्रश्न विचारण्याची त्याची हिंमतच कशी होऊ शकते?''

काही वेळानंतर विजय शांत होतो अन् पुन्हा विचार करु लागतो, ''कदाचित त्या रु. ३००/- ची चेतनला खरोखरच आवश्यक असणारी एखादी वस्तू विकत घ्यायची असावी आणि खरं पाहता चेतन काही सारखी सारखी पैशाची मागणी करीत नाही.''

विजय झटकन् चेतनच्या बेडरुमपाशी जातो. रूमचे दार उघडतो. ''बेटा, झोपलास का रे?'' ''नाही बाबा, मी जागाच आहे अजून.'' ''मला वाटते मी मगाशी तुझ्यावर फारच रागावलो. दिवसभराच्या कामामुळे मी वैतागलो होतो आणि त्याचा सगळा राग तुझ्यावर निघाला. हे घे राजा तुला हवे होते ते रु. ३००/-''

लहानगा चेतन ताडकन उठून बसला. त्याच्या चेहऱ्यावर हास्य फुलले. ''ए बाबा, थँक्यू!!'' हर्षभराने तो उद्‌गारला. लगेच त्याचा हात उशीखाली गेला आणि त्याने काही चुरगाळलेल्या नोटा काढल्या. त्याच्या हातातील पैसे पाहून विजयचा पारा पुन्हा एकदा चढला. छोट्या चेतनने हातामधील पैसे मोजले आणि तो बाबाकडे पाहू लागला.

कुरकुऱ्या स्वरात विजयने चेतनला विचारले, ''तुझ्याकडे एवढे पैसे असताना माझ्याकडे पैसे मागण्याची तुला काय गरज होती?''

आपली आर्जवी नजर बाबाकडे लावून चेतन म्हणाला, ''अरे बाबा, माझ्याकडे पैसे आहेत पण ते पुरेसे नव्हते. तू रु. ३००/- दिल्यानंतर ते पुरेसे झाले आहेत. बाबा, आता माझ्याकडे रु.५००/- जमले आहेत.

आता तरी मला तुझा एक तास मिळू शकेल का? प्लीज उद्या एक तास ऑफिसमधून तू लवकर घरी येशील का? मला तुझ्याबरोबर रात्रीचे जेवण घ्यायचे आहे रे.''

**तात्पर्य :** दिवसभर कामाला बांधून घेतलेल्या सर्वांना एक लहानशी आठवण करून द्यायची आहे. आपल्या प्राणापलीकडे प्रिय असणाऱ्या चिमुकल्यांसाठी त्यांना हवा असणारा वेळ देण्यासाठी दिवसातील वेळ काढणे अत्यंत आवश्यक आहे. अन्यथा हा त्यांना जरुरी असणारा वेळ आपल्या हातून निसटून जाईल.

उद्या उठून अचानकपणे या जगाचा निरोप घेतला, तर ज्या कंपनीसाठी आपण दिवस रात्र कष्ट करतो ती कंपनी, आपल्याजागी लगेचच दुसऱ्या व्यक्तीची नेमणूक करील. पण ज्या कुटुंबियांना व मित्रांना आपण मागे सोडून जाऊ त्यांना मात्र आपले नसणे त्यांच्या आयुष्यभर त्रास देत राहील. त्यांना आपली उणीव भासत राहील. जरा विचार करा. आपण आपल्या कुटुंबापेक्षा अधिक आपल्या कामात स्वत:ला बुडवून घेतलेले असते. ही नक्कीच शहाणपणाची गुंतवणूक नसते.

तुमच्या कामावर जरुर प्रेम करा परंतु तुमच्या कंपनीवर मुळीच प्रेम करू नका. कारण तुमची कंपनी तुमच्यावर प्रेम करायचे केव्हा थांबवेल ते तुम्हांला समजणार सुद्धा नाही.

❋ ❋ ❋

# दिसते तसे नसते

**शा**ळेत पाचवीचा वर्ग भरला होता. नवीन वर्षाचा पहिलाच दिवस होता. मिसेस थॉमसन टीचर वर्गावर आल्या. सगळ्या टीचर आल्यावर जशा बघतात तसेच त्यांनी सर्व मुलांकडे एकदा नजर फिरविली. सगळ्या टीचर जशा नेहमी मुलांना खोटेपणाने म्हणतात तसेच त्या म्हणाल्या, मला सगळी मुले सारखीच आवडतात. अर्थात, हे अशक्य होते. कारण पहिल्याच रांगेत गबाळेपणे बसलेला कोको बासी दिसत होता. गेल्या वर्षी टीचरच्या वर्गात कोको होता. तेव्हाच त्यांनी कोकोला पाहिले होते. तो एकटा बसायचा, कोणाशी खेळत नसे. त्याचे कपडे अत्यंत गबाळे, मळके व चुरगाळलेले असायचे. इतकेच नाही तर इतका गलिच्छ असायचा की त्याला अंघोळीची गरज आहे हे कळत असे. शिवाय कोको सर्वांनाच अप्रिय होता. मिसेस थॉमसनना त्याच्या उत्तरपत्रिकेवर चुकल्याची फुली मारून वरच्या बाजूला फेल म्हणून मोठा एफ् काढताना एक असुरी आनंद मिळत असे.

शाळेच्या नियमाप्रमाणे मिसेस थॉमसनना मुलांचे मागचे रिपोर्ट पाहणे आवश्यक असे. आतापर्यंत मिसेस थॉमसननी कोकोला डफ्फड विद्यार्थी म्हणूनच समजले होते. पण जेव्हा त्यांनी कोकोचे मागचे रिपोर्ट काढून पाहिले तेव्हा त्यांना त्यावर विश्वासच बसेना. कोकोच्या प्राथमिक पहिल्या वर्गाच्या टिचरनी लिहिले होते, कोको हा अत्यंत हुशार असून सतत हसरा असतो. तो त्याला दिलेला अभ्यास व्यवस्थित करतो. त्याला खूप चांगले शिष्टाचार आहेत. तो आसपास असणे हा एक प्रकारचा आनंद असतो.

दुसऱ्या वर्षांच्या टीचरनी लिहिले होते, कोको हा फार उत्तम विद्यार्थी आहे. त्याच्या वर्गातील मुलांना तो खूप प्रिय आहे; परंतु त्याची आई सतत आजारी असल्याने त्याला घरी बराच प्रयास पडत असावा.

त्याच्या तिसऱ्या वर्षांच्या टीचरनी लिहिले होते, त्याच्या आईच्या मरणाने त्याच्यावर आभाळ कोसळले आहे. तो सगळे आपले आपण व्यवस्थित करतो. त्याचे वडील त्याच्याकडे फारसे लक्ष देत नाहीत. त्याचे जर कोणीतरी नीट संगोपन केले नाही तर त्याच्या वैयक्तिक आयुष्यावर दुष्परिणाम होतील.

कोकोच्या चवथ्या वर्षीच्या टीचरने नोंद केली होती, की त्याचे शाळेवरचे लक्ष उडाले आहे. त्याला कोणीही जवळचा मित्र नाही. तो कधीकधी वर्गात झोपा काढतो.

हे सर्व पाहून मिसेस थॉमसनना कोकोच्या अडचणी समजल्या. त्याच्या वागण्याची कारणे लक्षात आली. ह्यामुळे तिची तिलाच लाज वाटली. ख्रिसमससाठी वर्गातील मुलांनी वर्गाच्या टीचरला भेटवस्तु आणल्या होत्या.

कोको सोडून इतरांनी त्या व्यवस्थित सुंदर वेष्टणात व छान रिबिनी लावून आकर्षक दिसतील अशा आणल्या होत्या. कोकोने मात्र वाण्याच्या दुकानातून आलेल्या फाटक्या पिशवीत गलथानपणे गुंडाळून त्याची भेटवस्तु आणली होती. त्यावेळी तर मिसेस थॉमसनना त्याची फार दया आली.

तरीही टीचरनी सर्वांसमोर ती भेट उघडून पाहिली. ते रंगीत धातुंचे मणी लावलेले जुने ब्रेसलेट होते. त्यातील काही मणी पडून गेले होते. सोबत कोणीतरी अर्ध्याहून अधिक वापरलेली अशी एक सेंटची बाटली होती. ते पाहून वर्गातील इतर मुले फिदीफिदी हसायला लागली. पण त्यांचे हसणे थांबवून मिसेस थॉमसन म्हणाल्या, ''पाहा किती नाजुक आणि सुंदर ब्रेसलेट आहे.'' असे म्हणून त्यांनी ते हातात घातले. दिलेल्या सेंटच्या बाटलीतून आपल्या मनगटावर थोडे सेंट शिंपडून घेतले व त्याचा वास घेतला.

त्या दिवशी शाळा सुटल्यावर कोको बासी मुद्दाम थांबला होता. त्याने मिसेस थॉमसनना गाठून सांगितले, ''टीचर आज तुमच्या अंगाला अगदी माझ्या ममाच्या अंगाला यायचा तसाच सुगंध येतो आहे.'' मुले शाळेतून गेल्यावर मिसेस थॉमसन जवळजवळ एक तास रडत होत्या. त्याच दिवसापासून त्यांनी मुलांना वाचन, लिहिणे व गणित शिकविणे बंद केले. त्या नंतर फक्त मुलांना संस्कार व शिष्टाचार शिकवू लागल्या. त्यांनी कोकोकडे विशेष लक्ष देण्यास सुरूवात केली. त्याचेबरोबर काम करताना त्यांचे मन उल्हसित होत असे. त्या कोकोला जितके जास्त प्रोत्साहन देत असत तितक्याच उत्साहाने व तत्परतेने कोको प्रतिसाद देत असे. वर्षअखेरीस कोको हा वर्गातील सर्वांत चुणचुणीत व हुशार मुलगा बनला होता. त्यावेळी टीचर जरी म्हणाल्या

की त्यांना सर्व मुले सारखीच प्रिय आहेत तरी वस्तुस्थिती अशी होती की कोको त्यांचा सर्वांत लाडका विद्यार्थी बनला होता. वर्ष अखेरीनंतर त्यांना दाराजवळ कोकोने लिहिलेली एक चिठ्ठी मिळाली. त्याच्या आयुष्यात सर्वांत जास्त आवडणारी व चांगली टीचर मिसेस थॉमसनच असल्याचे त्याने लिहिले होते. सहा वर्षांनंतर परत आलेल्या चिठ्ठीत त्याने लिहिले होते, त्याचे माध्यमिक शालेय शिक्षण पुरे झाले व तो शाळेत तिसऱ्या नंबरने उत्तीर्ण झाला होता. शिवाय ती अजूनही त्याची आतापर्यंतच्या आयुष्यातील सर्वांत आवडती व चांगली टीचर होती.

त्यानंतर चार वर्षे उलटली. परत एक पत्र आले. कधीकधी परिस्थिती अडचणीची निर्माण होऊनही त्यातून मार्ग निघत गेला आणि शालेय शिक्षण पूर्ण झाले. आता लवकरच तो युनिव्हर्सिटीत सर्वश्रेष्ठ सन्मानप्राप्त करून पदवी ग्रहण करणार होता. याही वेळी त्याने टीचरबद्दलच्या त्याच भावना प्रकट केल्या होत्या. परत चार वर्षांनंतर पत्र आले. तेव्हा त्याने पदवी मिळाल्यानंतर पुढे आणखी शिकल्याचे कळविले. त्या पत्रात सही होती, कोको ए. बासी, एम् डी.

ही गोष्ट इथेच संपत नाही. काही दिवसांनंतर परत एक पत्र होते. कोकोला त्याची मैत्रिण भेटली होती आणि ते लवकरच लग्न करणार होते. त्याचे वडील दोन वर्षांपूर्वी वारले होते. त्याला मिसेस थॉमसन त्याच्या लग्नाला यायला हव्या होत्या. त्यांनी कोकोच्या आईसाठी राखून ठेवलेल्या जागेवर बसावे अशी त्याची इच्छा होती.

अर्थातच, मिसेस थॉमसन लग्नासाठी आल्या. अंदाज करा काय झाले असेल. त्यांनी कोकोने भेट दिलेले ते ब्रेसलेट हातात घातले होते. त्याने दिलेला तो सेंट हातावर शिंपडला होता. समारंभात दोघे एकमेकांना कडकडून भेटले. डॉ. बासी टीचरच्या कानात कुजबुजला, ''धन्यवाद टीचर, माझ्यावर तुम्ही विश्वास दाखविलात त्याबद्दल धन्यवाद. माझ्यातील स्वत्त्वाला जागे केलेत त्याबद्दल धन्यवाद. मी नक्की काहीतरी करू शकतो हा विश्वास माझ्यामध्ये निर्माण केल्याबद्दल धन्यवाद.''

मिसेस थॉमसन कोकोच्या कानात म्हणाल्या, ''तुझ्यावर खूप अन्याय होत होता. आपण काहीतरी वेगळे घडवू शकतो हे मी तुझ्याकडून शिकले. तू भेटेपर्यंत कसे शिकवावे ते मला ठाऊक नव्हते.''

❃ ❃ ❃

## दु:खद पण सत्यघटना

एक तरूण गृहस्थ अकाली मरण पावला. त्याचे आईवडील, बायको व ९ वर्षांच्या मुलाला त्याने मागे सोडले होते. गेलेल्या माणसाच्या बॉडीजवळ बसूनच ते धाय मोकलून रडत होते. ते कुटुंब एका धर्मगुरूचे अनुयायी होते. त्यांना ते महाराजजी या नावाने संबोधित असत. महाराजजींना त्या गृहस्थाच्या मृत्युची बातमी समजल्यानंतर ते कुटुंबियांचे सांत्वन करण्यासाठी त्यांच्याकडे येतात. सर्व कुटुंब दु:खात बुडून गेलेले त्यांनी बघितले. महाराजजींना पाहतच मेलेल्या माणसाची पत्नी अधिकच तीव्रतेने रडायला लागली. हुंदके देत ती म्हणाली, ''महाराजजी हे फार अचानक आणि अकाली आम्हाला सोडून गेले. हे काय मरणाचे वय होते का? तुम्ही काहीतरी करून त्यांना परत जिवंत करा. माझ्या लहान मुलाचे कसे होणार? मी अगदी असहाय झाली असून माझी अवस्था दयनीय झाली आहे.''

महाराजजींनी तिला आणि आईवडिलांना शांत करण्याचा खूप प्रयत्न केला; पण त्या गृहस्थाचे जाणे त्या सर्वांना फार असह्य होत होते. शेवटी न राहवून महाराजजी म्हणाले, ''ठीक आहे. एक ग्लासभर पाणी आणा.'' पाणी आणल्यावर महाराजजी त्या माणसाच्या मृत शरीराजवळ बसले. पाण्याचा ग्लास त्याच्या जवळ ठेवला. आणि म्हणाले, ''आता ज्या कोणाला हे जिवंत व्हावेत असे वाटते त्याने या ग्लासातील पाणी प्यायचे. पाणी पिऊन झाले की ते जिवंत होतील पण त्याच वेळी ज्याने पाणी प्यायले असेल ती व्यक्ती तत्काळ मरण पावेल.''

हे ऐकल्यावर स्तब्धता पसरते. ''अरे तुम्ही सगळे म्हणत होतात की हे सर्व कुटुंबाचे पालनपोषण करीत. तेच कुटुंबामध्ये एकटे कमावणारे होते. त्याच्याऐवजी कोणी मरायला तयार आहे? हा योग्य तोडगा नाही का?''

बायको त्या मृत माणसाच्या आईकडे बघायला लागली आणि वृद्ध आई त्या मृताच्या बायकोकडे पाहू लागली. मृत माणसाचे वडील त्याच्या नऊ वर्षांच्या मुलाकडे पाहू लागले; परंतु कोणीही स्वत: मरणाची तयारी दाखविली नाही. महाराजजी वडिलांना म्हणाले, ''बाबूजी तुम्ही तुमच्या मुलासाठी तुमचे प्राण देणार नाही का?''

वडील म्हणाले, ''पण माझ्यावर माझ्या पत्नीची जबाबदारी आहे. मी गेल्यावर तिच्याकडे कोण पाहील? मी माझे प्राण नाही देऊ शकत.'' त्यानंतर महाराजजींनी मृताच्या आईकडे प्रश्नार्थक नजरेने पाहिले. ''अम्मा, तुम्ही?''

अम्मा म्हणाली, ''माझ्या मुलीचे पहिले बाळंतपण जवळ आले आहे, मी गेले तर तिचे कोण करेल? ती महिनाभर माझ्याकडे राहायला येणार आहे. तुम्ही त्याच्याच बायकोला का विचारीत नाही?''

महाराजजी हसले आणि त्यांनी तरूण विधवेकडे पाहिले. तिने आसवांनी भरलेल्या विस्फारलेल्या डोळ्यांनी पाहिले आणि म्हणाली, ''महाराजजी मला माझ्या लहान असलेल्या मुलासाठी जगायला हवे. मी मेले तर त्याचे कोण करेल? त्याला कोण सांभाळेल? त्याला माझी नितांत गरज आहे. कृपया मला हा त्याग करायला सांगू नका.'' महाराजजी सर्वांत शेवटी त्या लहान मुलाला विचारतात, ''बेटा, तुझ्या वडिलांसाठी तू तुझे आयुष्य खर्ची घालण्यास तयार आहेस का?'' मुलगा काही उत्तर देण्याआधीच त्याची आई त्याला जवळ ओढून आपल्या छातीशी धरते आणि म्हणते, ''महाराजजी तुम्हाला काही समजते का? माझा मुलगा फक्त नऊ वर्षांचा आहे. त्याचे तर आयुष्य अजून सुरूच झाले नाही. तुम्ही असे कसे म्हणू शकता, किंबहुना असा विचारच कसा करू शकता?''

महाराजजी त्यावर म्हणतात, ''ठीक आहे तर मग. तुमच्यापैकी प्रत्येकाला काही ना काही या जगात करायचे बाकी आहे. मला वाटते मरण पावले त्यांनाच फक्त जाण्याची हरकत नव्हती. त्यामुळेच परमेश्वराने तुमच्या घरातून त्यांना नेण्याचे ठरविले असावे. आता दु:ख बाजूला ठेवून त्यांचे क्रियाकर्म करण्याच्या तयारीस लागा. आधीच फार उशीर झाला आहे.'' असे म्हणून ते उठले आणि निघून गेले.

माणूस जिवंत असेपर्यंतच त्याच्याबद्दल प्रेम असते. एकदा का तो मरण पावला की उरतात त्या फक्त आठवणी.

❋ ❋ ❋

## देवा मला टीव्ही कर

प्राथमिक इयत्तेचा वर्ग भरला होता. वर्गशिक्षिका मुलांना निबंध लिहायला सांगत होती. आज विषय दिला होता, देवाने तुम्हाला काय बनवावे असे तुम्हाला वाटते? ते मुलांनी त्यांच्या शब्दात लिहायचे होते. तास संपताना शिक्षिकेने मुलांनी लिहिलेले निबंध गोळा केले. घरी गेल्यावर त्यातील एक निबंध वाचताना ती एकदम भावनाप्रधान झाली.

नुकत्याच कामावरून परत आलेल्या तिच्या नवऱ्याने तिच्या डोळ्यांतील आसू पाहून त्याने तिला विचारले, ''काय गं? काय झाले तुला रडायला?''

तिने त्याच्या हातात तो निबंध दिला आणि म्हणाली, '' हा माझ्या वर्गातील एका मुलाने लिहिला आहे. वाचून पाहा.''

तो निबंध असा होता.....

हे परमेश्वरा, आज रात्री मी तुला एक अगदी खास भेट मागणार आहे.

माझ्यावर दया कर आणि मला टेलिव्हिजन कर. मला घरातील टेलिव्हिजनची जागा घ्यायची आहे. मला माझ्या घरातील टेलिव्हिजनसारखे जगायचे आहे.

मी टेलिव्हिजन झालो की माझी स्वत:ची खास जागा असेल. तिथून मला कोणी हलविणार नाही. माझ्या घरातील सर्व लोक माझ्याभोवतीच असतील.

माझ्या बोलण्याकडे घरातील सगळे जण लक्षपूर्वक ऐकतील. मी सर्वांचे मध्यवर्ती आकर्षण होईन. माझ्या बोलण्यात कोणी अडथळा आणणार नाही किंवा मला कोणी उलट प्रश्न करणार नाहीत.

टेलिव्हिजन सुरू नसताना सुद्धा जशी त्याची खास काळजी घेतली जाते तशीच काळजी माझी नेहमी घेतली जाईल. माझे वडील कामावरून घरी परत आल्यानंतर जरी दमले असले तरी ते माझ्याजवळ येतील व माझ्याशी गप्पा करतील. माझी आई थोड्या विवंचनेत असताना किंवा नाराज असताना मला टाळण्याऐवजी ती नक्कीच मला जवळ घेईल. माझा भाऊ माझ्याजवळ येऊन बसण्यासाठी आग्रह धरील आणि जास्तीत जास्त वेळ माझ्यासाठी देईल.'

घरातील सर्वांच्या वागण्याने मला सतत वाटले पाहिजे की सर्व घरदार माझ्याबरोबर वेळ घालविण्यासाठी, त्यांची सगळी कामे सोडून देऊन माझ्याभोवती नाचत आहेत.

आणि हो ! सर्वांत शेवटी पण अत्यंत महत्त्वाचे म्हणजे मी घरातील प्रत्येकाची करमणूक करून त्यांचे मन रिझवू शकलो पाहिजे.

देवा मला यापेक्षा जास्त काहीच नको. मला एकदाच टेलिव्हिजन कर. मला टेलिव्हिजनसारखे जगायचे आहे.

हे वाचून झाल्यावर पती म्हणाला, ''बापरे!! किती गरीब बिचारा तो पोर. काय भयंकर आईबाप त्याचे.''

त्याच्या शिक्षिका पत्नीने फक्त त्याच्याकडे पाहिले आणि म्हणाली,''ठाऊक आहे का तो निबंध दुसऱ्या कोणा मुलाचा नसून आपल्याच लाडक्या मुलाचा आहे!!!''

❃ ❃ ❃

# देवाकडून आलेला संदेश

**मी** परमेश्वर आहे. आज मी तुझ्या सर्व समस्या हाताळणार आहे. मला तुझ्या मदतीची गरज भासणार नाही. जर तुला एखाद्या परिस्थितीत काहीही करणे अशक्य झाले तर तू जास्त प्रयत्न करू नकोस. कृपया ते माझ्यावर सोपव. मी ती समस्या माझ्यावेळेप्रमाणे दूर करीन. तुझ्या वेळेप्रमाणे ते होणार नाही. एकदा ती समस्या तू माझ्यावर सोपविलीस की तू त्यावर विचार करणे बंद कर. त्याऐवजी तुझ्या आयुष्यात असणाऱ्या इतर अनेक अफलातून गोष्टींवर लक्ष केंद्रित कर.

कधी काळी तू वाहतुकीच्या गोंधळात अडकलास तर निराश होऊ नकोस. जगात काही लोकांना ड्रायव्हिंग ही त्यांची मक्तेदारी वाटते.

तुझ्या कामाच्या ठिकाणी एखादा दिवस कटकटीचा वाटला तर, ज्या माणसाला गेली अनेक वर्षं कामच नाही अशा माणसाची आठवण कर.

एखादे दिवशी तुझ्या नातेसंबंधामध्ये बिघाड निर्माण झाला तर, ज्याला आयुष्यात कधी प्रेम काय असते हे मिळालेच नाही किंवा त्याने केलेल्या प्रेमाला प्रतिसादच मिळाला नाही अशा माणसाची आठवण कर.

एखादा आठवडा संपल्याची तुला टोचणी लागली तर, जी स्त्री अहोरात्र आठवड्याचे सात दिवसही बाळाचे संगोपन करते त्या माऊलीची आठवण कर.

जेव्हा तुमची कार बरीच लांबच्या जागेवर जिथे मदत मिळणे अशक्य आहे अशा ठिकाणी नादुरुस्त झाली तर, ज्या लोकांना अर्धांगवायूचा झटका आलेला असतो व त्यांना असे दूरचे अंतर चालत जायला आवडले असते अशा व्यक्तींची आठवण कर.

तुझ्या डोक्यावर केसामध्ये पहिल्यांदाच सोनेरी छत पाहून तुला वाईट वाटेल तेव्हा त्या कॅन्सर रूग्णाची आठवण कर ज्याच्या डोक्यावरचे केस केमोने गळून गेलेले असतील.

तुला कंटाळा येऊन तू आयुष्यात काय उरले आहे किंवा माझ्या आयुष्याचा काय उपयोग असा विचार करशील तेव्हा ज्यांना दिर्घायुष्य लाभले नाही अशा व्यक्तीची आठवण कर.

जेव्हा तुम्हाला इतरांच्या वागण्यातील कटुतेचा, अज्ञानाचा, क्षूद्र मनाचा किंवा असुरक्षिततेचा अनुभव येतो तेव्हा लक्षात ठेवा परिस्थिती याहून वाईट होऊ शकते. कदाचित तुम्ही त्यापैकी एक असू शकता.

❋ ❋ ❋

# निळा गुलाब

आज घरी काही पाहुणे येणार होते. बायको घरातील तयारी करण्यात गुंतलेली होती. त्यामुळे बाजारातून हव्या असणाऱ्या काही वस्तु आणण्यासाठी मी बाहेर पडतो. मला हव्या असणाऱ्या गोष्टी घेऊन झाल्यावर मी पैसे देण्यासाठी वॉलमार्टच्या बिलिंग खिडकीजवळ उभा असतो. रांगेत माझ्यापुढे एक तरूण उभा असतो.

साधारण सोळा वर्षे वयाचा तो तरूण मला थोडासा मंदबुद्धिचा वाटतो. मला फारशी घाई नसल्यामुळे तो वाटेत असूनही शांतपणे मी माझ्या नंबरची वाट पाहत थांबतो. त्याच वेळी त्याने हात हलवून अतिशय उत्तेजित होऊन आपल्या आईला मोठ्याने ओरडून सांगितले, ''ममी मी इथे आहे.''

मी त्याच्या अगदी पाठीमागे उभा असलेला पाहून तो जरा बावचळलाच. तो मंदबुद्धिचा असल्याची आता खात्री झाली. मी जेव्हा त्याला विचारले, ''बडी, तुझे नाव काय?'' तेव्हा तो विस्फालेल्या नजरेने माझ्याकडे पाहतच होता. त्याच्या चेहऱ्यावर आश्चर्य ओसंडून वाहात होते. ''माझे नाव डॅनी आणि मी माझ्या आईबरोबर शॉपिंग करतो आहे.'' मोठ्या अभिमानाने त्याने मला सांगितले. मी पण त्याला म्हणालो, ''वाह! काय छान नाव आहे. माझे नाव डॅनी असायला हवे होते. पण माझे नाव स्टीव्ह आहे. तुझे वय काय डॅनी?''

त्याची आई जवळ आली होती. त्याने तिला विचारले, ''आई, माझे वय किती आहे गं?''

''तुझे वय पंधरा आहे. आता तू शहाणा मुलगा आहेस ना? त्या काकांना जाऊ दे बरं पुढे.'' आई म्हणाली.

मी त्याच्या आईला असू दे म्हणालो आणि पुढे काही मिनिटे डॅनीबरोबर बोलत राहिलो. त्याच्याशी हवा, शाळा, बायसिकल इ. विषयावर बोलत होतो. मला त्याच्या ब्राऊन डोळ्यांतील थयथया नाचणारा उत्साह दिसत होता. कारण त्याची कोणीतरी लक्षपूर्वक विचारपूस करीत असल्याचे ते समाधान होते. पण मधेच वळून खेळण्यांच्या विभागात तो गेला.

डॅनीच्या आईचा चेहरा गोंधळून गेल्यासारखा झाला होता. मी वेळ काढून तिच्या मुलाबरोबर थोडा वेळ बोललो, याबद्दल तिने माझे आभार मानले. तिने सांगितले, बहुतेक लोक डॅनीकडे लक्षसुद्धा देत नाहीत, बोलणे तर दूरच राहिले. मला त्यात आनंद मिळाल्याचे मी तिला म्हणालो. पुढे हेही म्हणालो पण ही बुद्धी मला कशी झाली ते मात्र समजत नाही. कदाचित माझ्या स्वभावातील पवित्र निर्मळ भावनेपोटी मला सद्बुद्धी झाली असावी. मी म्हणालो, देवाने निर्माण केलेल्या बागेत असंख्य लाल, पिवळे, गुलाबी गुलाब फुलत असतात. पण निळे गुलाब फार क्वचित पाहायला मिळतात. त्याच्यातील सौंदर्य आणि वेगळेपणाचे आपण कौतुक केलेच पाहिजे. हे पाहा डॅनी म्हणजे निळा गुलाब आहे. जर कोणी या निळया गुलाबाला पाहून थांबले नाही, त्याचा सुगंध अनुभवला नाही, हृदयात साठवून ठेवला नाही, त्याला स्पर्श केला नाही तर देवाने केलेल्या कृपेचा अवमान केल्यासारखे होईल.

ती दोन मिनिटे नि:शब्द उभी राहिली. मग डोळ्यांत आलेले अश्रू पुसून तिने विचारले, ''आपण कोण आहात?'' एक मिनिटही विचार न करता मी म्हणालो, ''मी साधे डॅडलायन (DANDELION) आहे, पण मला देवाने फुलवलेल्या बागेत राहायला आवडते. ती थोडी पुढे आली आणि माझा हात हातात घेऊन म्हणाली, ''देव तुमचे भले करो.'' माझ्या डोळ्यांत टचकन पाणी आले.

मला सुचवावेसे वाटते की जेव्हा केव्हा तुम्हाला निळा गुलाब दिसेल, त्यावेळी त्यामध्ये कितीही वेगळेपणा, कमीपणा असेल तरी तोंड फिरवून पुढे जाऊ नका. थोडा वेळ काढून त्याचेकडे पाहून स्मितहास्य करा. यामुळे त्याला किंवा त्याच्या घरच्यांना

फार वेगळा आनंद मिळेल.

साधेपणाने राहा. उत्कट प्रेम करा, मनापासून काळजी घ्या, आपलेपणाने बोला. बाकीचे त्या विधात्यावर सोडून द्या. लोक तुमचे बोलणे विसरतील, लोक तुमचे कार्य विसरतील पण तुम्ही त्यांना दिलेला आनंद लोक कधीही विसरणार नाहीत.

❃ ❃ ❃

# नीतिशास्त्राचा धडा

मेजर जनरल ध्रुव सी. कटोच यांनी सांगितलेली त्यांची सत्यकथा, त्यांच्याच शब्दांत,

१९६७ च्या उन्हाळ्याचे ते दिवस होते. मी त्यावेळी १६ वर्षांचा होतो . नुकतीच मी एका मान्यताप्राप्त बोर्डिंग स्कूलमधून शाळेची अखेरची परीक्षा देऊन पुढे काय करायचे ते ठरविण्यासाठी सुट्टीत घरी आलो होतो. माझे वडील आर्मीमध्ये कर्नल होते व त्यांना निवृत्तीला अजून एक वर्ष बाकी होते. आम्ही अजमेर येथील एका अत्यंत आरामदायी बंगल्यात वास्तव्याला होतो. रोजच्या जीवनातील ऐहिक सुखसोयी मात्र आम्हाला फारशा उपलब्ध नव्हत्या. सामाजिक दर्जा दर्शविणाऱ्या कोणत्याच वस्तू म्हणजे कार, स्कूटर इतकेच काय पण रेफ्रिजरेटर सुद्धा नव्हता. टेलिव्हिजनने आपले जाळे अद्याप देशात पसरले नव्हते. बाहेरच्या जगाशी संबंध जोडण्यासाठी व माहिती मिळण्यासाठी छोटासा ट्रान्झिस्टर कामाला येत असे. स्वत:ला कोणत्या तरी अर्थपूर्ण कामात गुंतवून ठेवण्याची अंगभूत सवय व पात्रता जोपासली असल्यामुळे या गोष्टीपासून आपण वंचित आहोत किंवा सुखसोयी आपल्याला मिळाव्यात असे आम्हाला कधीच वाटले नाही.

आपले वडील आपल्याला ऑफिसची जीप मित्रांकडे जायला, बाजारात खरेदीसाठी जायला, किंवा गावात असलेली अनेक प्रेक्षणीय स्थळे बघायला का देत नाहीत या विचाराने सतत अस्वस्थ व्हायला व्हायचे. मी माझे भाऊ आणि बहीण सर्वांना सायकलने किंवा चालत सगळीकडे जावे लागे. आईला सामाजिक कार्यक्रम किंवा तिच्या बाजारासाठी रिक्षानेच जावे लागे. माझे वडील एका खात्याचे प्रमुख म्हणून काम करीत होते. त्यांनी ठरविले असते तर ते ऑफिसचे वाहन स्वत:साठी व कुटुंबासाठी वापरू शकले असते. अनेक सरकारी अधिकारी असा वापर सर्रास करीत होते. परंतु माझ्या वडिलांना मात्र हा विचार करणे सुद्धा अशक्य होते. आम्हा मुलांना सुद्धा असे काही विचारणे हे अशक्य होते. एका सायंकाळी मी मनाचा हिय्या करून ही विचार न करण्यासारखी गोष्ट विचारलीच.

''डॅडी, आम्हाला कधीतरी ऑफिसची जीप वापरायला परवानगी का देत नाही?'' आम्ही सर्व जण बैठकीच्या खोलीत बसलो होतो. डॅडींनी नुकताच त्यांचा रमचा पेग ग्लासमध्ये घेतला होता. आईला आता ही चर्चा कशी वळण घेते याचे कोडे पडून ती ऐकतच राहिली. मात्र तिने तोंडातून एक अक्षरही उच्चारले नाही. डॅडींनी त्यांच्या ड्रिंकचा एक घोट घेतला, माझ्याकडे एकटक पाहत म्हणाले, ''मी परवानगी दिली असती पण बेटा, त्या पेरची फोड माझ्या घशाखाली उतरली नसती.''

''कसली पेरची फोड तुम्ही म्हणता?''

वडील दोन मिनिटे थांबले आणि नंतर त्यांनी एक अत्यंत अद्‌भुत गोष्ट सांगितली. ''मी तुझ्या वयाचा असताना किंवा कदाचित तू आता आहेस त्यापेक्षा कमी वयाचा असताना माझ्या मित्रांबरोबर बाहेर खेळायला गेलो होतो. आमच्या गावाच्या थोडे दूर एक फळांची बाग होती. त्या बागेत झाडावर पेरचा तयार झालेला बहर आलेला होता. इतके मोठे आकर्षण बाजूला सारून आम्ही लहान मुले पुढे जाऊच शकत नव्हतो. आम्ही कुंपणाखालून सरपटत पलीकडे गेलो. एखादा घरफोडीचा धाडसीपणा करावा त्या थाटात आम्ही त्या झाडावरची सगळी पेर उतरवून घेतली. जितकी फळे गोळा करून घेता येतील तेवढी गोळा करून कोणाच्या नजरेस न पडण्यासाठी धूम पळत माघारी आलो. मी माझ्या वाटणीची लूट घेऊन मोठ्या अभिमानाने एखाद्या शूर वीराच्या रूबाबात घरी आलो. एखाद्या महत्त्वाच्या लढाईत यशस्वी झाल्याचा आनंद झाला होता.

मी घरात शिरलो तेव्हा तुझे आजोबा त्यांच्या आवडत्या आरामखुर्चीवर व्हरांड्यात बसले होते. हुक्का पेटवून त्याचे झुरके घेत

होते. तुझ्या आजोबांना आर्मीतून निवृत्त होऊन जवळजवळ दहा वर्षे झाली होती तरीही ते अजून एकदम तंदुरूस्त होते. अजूनही बैलाचे बळ त्यांच्या अंगात होते. त्यांची पाठ अजूनही लोखंडाच्या कांबीसारखी ताठ होती. मला तो प्रसंग जसाच्या तसा डोळ्यांसमोर येतो आहे. तिन्हीसांजेची वेळ होती. सावल्या लांब पडायला लागल्या होत्या. भोवतालचे बर्फाच्छादित डोंगरांचे कळस स्वच्छ निळ्याभोर आकाशातून डोकावत होते. हळूहळू झाकोळले जात होते. वातावरणात भरलेली नीरव शांतता फक्त दोनच आवाजाने भंग पावत होती. हवेतून येणाऱ्या वाऱ्याचा मंद गुणगुणणारा आवाज आणि मधेच येणारा तुझ्या आजोबांच्या हुक्क्याचा आत घेतलेल्या गुळणीचा आवाज.

वडील क्षणभर थांबले जणू ते त्यावेळचे दृश्य प्रत्यक्ष पाहत होते. पुढे सांगू लागले, मी त्यांचा अंदाज घेतला आणि मग कापलेल्या ताज्या पेरांची डिश त्यांच्यासमोर धरली. मला आता आठवत नाही की त्यांनी त्यातून एक फोड घ्यावी की माझ्या पराक्रमाचे त्यांनी कौतुक करावे, का माझ्या बालिशपणाला दाद द्यावी यापैकी कशाची अपेक्षा केली होती. मला जे मिळाले ते याहून अगदी वेगळे होते. तुझ्या आजोबांना देऊ केलेली फळे मी कोठून व कशी मिळविली होती याचा ताबडतोब अंदाज आला होता. पण त्याबद्दल ते मला एक चकार शब्दाने बोलले नाहीत. ते एवढेच म्हणाले, ''ही पेरची फोड माझ्या घशाखाली उतरणे शक्य नाही. जी कोणती गोष्ट अप्रामाणिकपणे मिळविली असेल ती मला खाणे शक्य नाही.'' त्यांच्या बोलण्यात कसलाही नाराजीचा स्वर नव्हता. रागाने त्यांचा आवाज चढला नव्हता. ते फक्त एक सत्य कथन होते. त्यानंतर तुझ्या आजोबांनी तो विषय बंद केला. डॅडी परत थोडे थांबून म्हणाले, मी ती पेरची बशी उचलली. मनाला भयंकर अपराध्याची टोचणी आणि अतीव दु:ख झाले होते. तुझ्या आजोबांच्या नजरेपासून दूर जाऊन मी त्या पेरची एक फोड तोंडात टाकून त्यांच्या म्हणण्याचा पडताळा पाहिला. खरोखरच त्या पेरची फोड मी खाऊ शकलो नाही. माझ्याही घशाखाली ती फोड उतरली नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी प्रथम त्या फळबागेच्या मालकाकडे गेलो. त्याला प्रामाणिकपणे जे केले ते सांगितले. मला अत्यंत नालायकपणाची भावना आली होती ; पण प्रायश्चित घेणे हे माझ्या नामुष्कीवरचा फक्त एकच उपाय होता. मी माझा कबुलीजबाब देत असताना मालक आमच्याजवळचा नातेवाईक असूनही डोळे वटारून पाहत होता. पण कसलाही आरडाओरडा किंवा प्रक्षोभ नव्हता. माझ्या खांद्यावर हात ठेवून ते मला घेऊन आतल्या खोलीत गेले. माझ्या आश्चर्याला सीमा राहिली नाही. त्यांनी टोपलीभर अतिशय रसरशीत छान पिकलेली पेर माझ्या हातात दिली. यावेळी नि:शब्द शांतता पसरली होती.

शेवटी माझे डॅडी मला म्हणाले, ''आयुष्यात प्रलोभने खूप येत असतात पण काही जणांना पेर घशाखाली उतरत नाही.'' आयुष्यात मला मिळालेला हा धडा मी कधीच विसरू शकत नाही.

❋ ❋ ❋

# परमेश्वर आणि सैतान

**प्र**थमत: परमेश्वराने स्वर्ग आणि पृथ्वी निर्माण केली. पृथ्वीवर ब्रोकोली, कॉलिफ्लॉवर, पालक, हिरव्या, पिवळ्या व तांबड्या भाज्या यांनी पृथ्वी सुजलाम सुफलाम केली, ज्यामुळे पुरूष व स्त्रियांना निरोगी व दीर्घायुष्य लाभू शकेल. त्याच वेळी परमेश्वराच्या कृपेने मिळालेल्या कर्तृत्वाने सैतानाने बेन आणि जेरीचे आईस्क्रीम व खुसखुशीत क्रीम डोनटस् तयार केले. सैतानाने विचारले,'' त्याबरोबर चॉकलेट हवे का?'' पुरुष हो म्हणाले तर स्त्री म्हणाली, ''देताच आहात तर काही स्प्रे पण करा.'' आणि त्यांनी दहा पौंड वजन जमा केले. सैतान हसला.

परमेश्वराने आरोग्यदायक दही निर्माण केले की ज्यामुळे स्त्री तिचे शरीर प्रमाणबद्ध राखू शकेल व पुरुषाला ते आवडेल. सैतानाने गव्हापासून मैदा व ऊस आणि बीटापासून साखर तयार केली. त्या सर्वांना एकत्र करण्याने एक चव निर्माण केली. आणि स्त्रीचे आकारमान ६ वरून १४ वर गेले. त्यावर उपाय म्हणून परमेश्वराने सुचविले, ''मी तयार केलेले ताजे सलाड खा.'' पण

सैतानाने त्या सलाडवर घालायला थाऊजंड आयलँड ड्रेसिंग, क्रीमचे क्रूटानस् आणि गार्लिक  टोस्ट बाजूला घ्यायला तयार केले. त्यानंतर पुरुष व स्त्री दोघांनाही त्यांचे कमरेचे पट्टे सैल करावे लागले.

परमेश्वराने हृदय व रक्तप्रसारण व्यवस्थित ठेवण्यासाठी व्हेजिटेबल व ऑलिव्ह तेलाची निर्मिती केली. त्यात स्वयंपाक करायला सांगितला. पण सैतानाने खूप तळलेला मासा व कोंबडीच्या तंगडीची चटक लावली.

त्यासाठी लागणारी मोठी कढई करून दिली. त्याच्या सेवनामुळे स्त्री पुरुष दोघांचेही कोलेस्ट्रॉल आकाशाला भिडले. परमेश्वराने हलका, पोकळ सफेद केक दाखविला, त्याचे नाव त्याने 'एंजल्स फूड केक' असे ठेवले. तर सैतानाने चॉकलेट केक बनविला आणि त्याला नाव दिले 'डेव्हिल्स केक.'

परमेश्वराने आपल्या लेकरांनी वाढवलेले वजन कमी करावे या उद्देशाने पळण्यासाठी खास बूट निर्माण केले. त्याला शह म्हणून सैतानाने केबल टीव्ही व त्याच्या बरोबर रिमोट कंट्रोल माणसाला दान केले. त्यायोगे माणसाला बसल्या बसल्या हवे ते चॅनेल्स बदलता येतील व उठायचे पण कष्ट होणार नाहीत याची तजवीज केली. साहजिकच माणूस हसत व रडत चमचमणाऱ्या निळ्या लाल प्रकाशांच्या टीव्हीच्या मोहमय जाळयात अडकून आणखी पौंड वजन साठवित गेला.

परमेश्वराने बटाट्याची निर्मिती करून कमी चरबीचे व पोषक आहाराचे एक साधन उपलब्ध करून दिले. त्यावर सैतानाने त्या बटाट्याचे आरोग्यदायी साल काढून त्याचे तुकडे करून त्यातील पिष्टमय भाग तसाच ठेवला. ते तुकडे खरपूस तळून त्याची मूलभूत द्रव्ये नष्ट करून टाकली. फक्त चव चटकदार केली. हे माणसाला वजन वाढण्यास पोषक ठरले.

परमेश्वराने काटकुळया मांसाची ओळख करून दिली ज्यामुळे माणसाला कमी कॅलरीज खाऊनही खाण्याचे समाधान मिळेल. पण सैतानाने त्यापासून मॅकडोनल्ड स्वस्त बर्गर तोही भरपूर चीज घालून सादर केला. त्याबरोबर जंबो आकाराचे फ्रेंच फ्राईज देण्यास सुरूवात केली. सैतानाने सांगितले ते चांगले आहे. माणसाने ते ऐकले आणि हृदयरोग पाठीमागे लावून घेतले.

परमेश्वराने शोध लावून विज्ञानाच्या मदतीने हृदयाची बायपास सर्जरी माणसाला शिकविली. तर सैतानाने खाजगी आरोग्य विम्याचा धंदा सुरू केला.

❋ ❋ ❋

# परमेश्वराची बायको

**न्यू** यॉर्कमध्ये एक नावीन्यपूर्ण स्पर्धा होती. सर्वांत जास्त इतरांची काळजी घेणाऱ्या लहान मुलाची निवड करायची होती. त्या स्पर्धेत उतरलेली काही लहान मुले व त्यांची उत्तरे.

१. हा चार वर्षांचा मुलगा होता. त्याचा शेजारी एक वयस्कर गृहस्थ होता. त्याची पत्नी नुकतीच मरण पावली होती. त्या लहान मुलाने शेजारच्या गृहस्थाला रडताना पाहिले. तो लहान मुलगा त्या आजोबांजवळ गेला. जवळ जाताच त्यांच्या मांडीवर जाऊन बसला. त्यांना चिकटून बसला. त्या मुलाच्या आईने त्याला विचारले, तो त्या आजोबांना काय म्हणाला? त्यावर तो लहान मुलगा म्हणाला, ''काही नाही. मी फक्त त्यांना रडायला मदत केली.''

२. एका लहान मुलांच्या वर्गात टीचर एका कुटुंबाच्या फोटोबाबत चर्चा करीत होती. फोटोमधील एका मुलाचे केस इतरांपेक्षा रंगाने वेगळे होते. वर्गातील एक मुलगा त्यावर म्हणाला तो दत्तक घेतलेला असावा. दुसरी एक लहान मुलगी लगेच त्याला सांगते, ''मला दत्तक म्हणजे काय ते सर्व ठाऊक आहे. कारण मी दत्तक घेतलेली आहे.'' ''दत्तक घेणे म्हणजे नक्की काय असते?'' तिसऱ्या एका मुलीने प्रश्न केला. आधीची मुलगी म्हणाली, ''दत्तक जाते ती ममीच्या पोटात नाही तर हृदयात मोठी होते.''

३. मी जेव्हा आयुष्यात निराश होतो त्या वेळी मला त्या लहान मुलाने दिलेल्या उत्तराची आठवण येते. एक मुलगा शाळेच्या नाटकात भाग घेण्यासाठी खूप प्रयत्न करीत होता. त्याची आई म्हणाली त्याने नाटकात भाग मिळण्यासाठी फार मनावर घेतले

आहे. तरी तिला तो निवडला जाणार नाही अशी भीती वाटत होती. ज्या दिवशी नाटकासाठी मुलांची निवड होणार होती त्या दिवशी त्याला शाळेतून घ्यायला मी पण बरोबर गेलो होतो. आम्हाला पाहून तो लहान मुलगा धावतच आला. त्याच्या डोळ्यांत अभिमान आणि तितकाच आनंद होता. जवळ येताच त्याने विचारले,'' आई ओळख पाहू काय झाले असेल. मला टाळ्या वाजवून प्रोत्साहन देण्यासाठी माझी निवड झाली आहे.'' त्याचे हे शब्द कोणालाही शिकण्यासारखे आहेत.

४. डिसेंबर महिन्यातील एका अतिशय थंड हवामानाचा दिवस होता. एक दहा वर्षांचा मुलगा अनवाणी त्या मरणाच्या गारठयात न्यू यॉर्कमधील एका मोठ्या रस्त्यावरील पादत्राणाच्या दुकानाच्या शोकेससमोर उभा राहून आत दिसणारे बूट न्याहाळत होता. दुकानासमोर उभा असताना तो थंडीने कुडकुडत होता. तिथून जाणारी एक युवती त्याच्याजवळ थांबली आणि त्याला म्हणाली,''बापरे! तू त्या काचेतून बूट पाहताना तुझी पार तंद्री लागली होती.'' ''मी परमेश्वराची प्रार्थना करीत होतो की मला एक बुटाची जोडी मिळू दे.'' त्या मुलाने उत्तर दिले. त्या तरूणीने त्या मुलाला हाताला धरून दुकानात नेले. आत गेल्यावर दुकानाच्या माणसाला त्या मुलासाठी मोज्यांचे सहा जोड आणण्यास सांगितले. तिने त्या माणसाला एक मोठे बेसीन व एक टॉवेल देण्याची विनंती केली. त्याने ते लगेच आणून दिले. त्या लहान मुलाला घेऊन ती तरूणी दुकानाच्या मागच्या भागात गेली. स्वत:चे हातमोजे काढून ती गुढघ्यावर बसली. तिने त्या मुलाचे पाय स्वच्छ धुवून टॉवेलने कोरडे केले. तोपर्यंत दुकानाच्या माणसाने मोजे आणले होते. त्यापैकी एक तिने मुलाच्या पायावर चढविला. बाकीचे नीट बांधून ते मुलाला दिले. तिने त्या मुलासाठी एक चांगल्या बुटांची जोडी खरेदी केली. त्याच्या पायावर ती चढवून तिने त्याच्या डोक्यावर थोपटले आणि म्हणाली, ''आता तू खूपच आरामात चालू शकशील. तुला नक्कीच बरे वाटेल.'' ती जेव्हा जायला निघाली तेव्हा अचंबित झालेल्या त्या मुलाने हाताने तिला थांबविले आणि विचारले, ''तुम्ही परमेश्वराची बायको आहात का?''

❋ ❋ ❋

# पाच वस्तुपाठ

**१. पहिला पाठ –** इंजिनिअरिंग कॉलेजच्या सुरूवातीच्या दोन महिन्यांनंतर प्राध्यापक वर्गात एक सामान्यज्ञानाची परीक्षा घेण्याचे ठरवितात. माझे बऱ्यापैकी वाचन असल्याने बहुतेक प्रश्नांची उत्तरे मी लगेच देऊ शकलो. मात्र एक शेवटचा प्रश्न वेगळाच होता. ''आपल्या कॉलेजमध्ये झाडूकाम करणाऱ्या माणसाचे नाव काय?'' असा तो प्रश्न होता.

मी त्या प्रश्नाचे उत्तर न लिहिताच उत्तरपत्रिका दिली. क्लासची वेळ संपण्याच्या काही मिनिटे आधी एका मुलाने प्राध्यापकाला शेवटचा प्रश्नाचे उत्तर लिहायलाच हवे का? असे विचारले. प्राध्यापकांनी ''अगदी अवश्य'' असे सांगितले. ''तुम्ही तुमच्या आयुष्यात अनेक जणांना भेटाल. प्रत्येकाचे काही ना काही महत्त्व असतेच. त्या प्रत्येकाला तुम्ही ओळखणे हे त्यांच्यासाठी आवश्यक असते व ते त्यासाठी पात्र असतात. तुम्हाला जरी ते किरकोळ वाटले तरी एखादे स्मितहास्य किंवा नुसते 'हॅलो' म्हणणे हे सुद्धा त्यांना फार अप्रूप वाटते.''

हा मिळालेला धडा मी आयुष्यात कधीही विसरणार नाही. लगेच जाऊन मी त्या काम करणाऱ्याचे नाव माहीत करून घेतले.

**२. दुसरा पाठ** – जुलै २६, २००५ हा मुंबईतील धो धो पावसाचा दिवस होता. आकाश फाटल्याप्रमाणे पाऊस कोसळत होता. रस्त्यावर गुडघ्यापर्यंत पाणी साचले होते. अशा पावसात एक अगदी अशक्त वृद्ध गृहस्थ रस्त्याच्या कडेला उभा होता. कोणाच्या तरी मदतीची त्याला अपेक्षा होती हे त्याच्याकडे पाहून लक्षात येत होते. त्याची मोटार नादुरूस्त होऊन रस्त्याच्या बाजूला उभी होती. हातातील ओल्या कागदाच्या नळकांडीने तो तिथून जाणाऱ्यांना मदतीची विनंती करत होता. एक तरूण ते पाहून थांबला. त्याने त्याची मोटार ढकलून सुरक्षितपणे रस्त्याच्या कडेला आणून ठेवली. मोटार दुरूस्त करण्यासाठी योग्य त्या ठिकाणी फोन करून मेकॅनिकला बोलावून घेतले. नंतर त्या गृहस्थाला त्याने ऑटो मागवून दिली. तो गृहस्थ फारच घाईत दिसत

होता. तरी जाताना त्याने त्या तरूणाचे नाव व पत्ता मागून घेतला व त्याचे मनापासून आभार मानून गेला.

सात आठ दिवसांनंतर त्या तरूणाच्या घराच्या दाराची घंटा वाजली. ती घंटा त्याला आलेल्या कुरियरसाठी होती. त्याच्यासाठी दोन मोठी खोकी कोणाकडून तरी आली होती. त्याला प्रचंड आश्चर्य वाटले. त्यात एक मोठा संगणक व एक मोठी म्युझिक सिस्टिम होती. सोबत एक चिठ्ठी होती. ''त्या दिवशी आपण मला केलेल्या मदतीसाठी मी आपला फार आभारी आहे. तुमच्या मदतीमुळेच मी मरणाच्या दारात उभ्या असलेल्या माझ्या बायकोला अगदी वेळेवर भेटू शकलो. मला मदत केल्याबद्दल देव तुमचे भले करो.'' त्या खाली सही होती, डॉ. पी. के. सिंघानिया.

**३. तिसरा पाठ –** काही दिवसांपूर्वी जेव्हा आईस्क्रीम महाग नव्हते तेव्हा एका आईस्क्रीम पार्लरमध्ये एक दहा वयाचा मुलगा जातो तो वेटरला त्याच्या सर्वांत आवडत्या आईस्क्रीमची किंमत विचारतो. वेटर त्याला रु.४० सांगतो. मुलगा आपल्या खिशातून पैसे काढून मोजतो. परत दुसऱ्या एका आईस्क्रीमची किंमत विचारतो. इतर बरीच गिऱ्हाईके ऑर्डर देण्यासाठी थांबलेली असल्याने वेटर जरा अस्वस्थ होऊनच त्याला रु. ३० म्हणून सांगतो. मुलगा परत एखादा खिशातील पैसे मोजतो आणि कमी किमतीच्या आईस्क्रीमची ऑर्डर देतो.

वेटर त्याचे आईस्क्रीम व बील आणून देतो. मुलगा आईस्क्रीम खाऊन झाल्यावर कॅश कौंटरवर पैसे देतो व जातो. वेटर टेबलावरची रिकामी प्लेट उचलायला येतो त्याला एकदम रडू येते. कारण टेबलाच्या कडेला रू. १० बशीखाली वेटरला टीप म्हणून ठेवलेले असतात. केवळ वेटरला टीप देता यावी म्हणून त्या मुलाने आपल्या आवडीचे आईस्क्रीम न मागवता कमी किमतीचे आईस्क्रीम मागविलेले असते.

**४. चौथा पाठ –** पूर्वीच्या जमान्यात एका राजाने शहरातील एका मोठ्या रस्त्यावर भला मोठा दगड आणून ठेवला. स्वत: आडोशाला थांबून पाहत होता. तो दगड रस्त्याच्या रहदारीला अडथळा आणित होता. कोणी त्या रस्त्याने जाताना तो अडथळा दूर करण्याचा प्रयत्न करतो का ते राजा पाहत होता. शहरातील मोठे मोठे व्यापारी व धनवान लोक रस्त्याने जात होते; पण ते नुसतेच त्या दगडाकडे पाहून पुढे जात होते. काही जण राजाने असा रहदारीला अडथळा आणणारा दगड रस्त्यात कसा ठेवला असे म्हणून राजाला दोष देऊन पुढे चालू लागत. तो दगड वाटेतून बाजूला हटवण्याचा मात्र कोणीच प्रयत्न केला नाही. नंतर एक शेतकरी आपली भाजी घेऊन त्या रस्त्याने जात होता. त्याने रस्त्यात पडलेला तो दगड पाहून आपले ओझे खाली ठेवले आणि तो दगड रस्त्याच्या बाजूला करण्याचा प्रयत्न केला. खूप ताकद लावून व कष्ट करून त्याने तो दगड रस्त्याच्या कडेला हटविला. वाहतुकीला रस्ता मोकळा झाला. दगड बाजूला केल्यानंतर शेतकरी आपले भाजीचे ओझे उचलून जाऊ लागला तोच त्याला तो दगड ठेवला होता त्या जागेखाली एक थैली पडलेली दिसली. ती सोन्याच्या नाण्यांनी भरलेली होती व त्यात एक चिठ्ठी होती. ती राजाने लिहिलेली होती. त्यानुसार जो कोणी तो दगड हलवेल व रस्ता मोकळा करेल त्याला राजातर्फे ते बक्षीस होते. अनेकांना जे सुचले नाही ते त्या शेतकऱ्याला सुचले.

समोर येणारी प्रत्येक अडचण ही आपल्याला प्रगतीचा मार्ग दाखवून देते.

**५. पाचवा पाठ** – फार दिवसांपूर्वी एका दवाखान्यात एक मुलगी एका असाध्य व भयंकर आजाराने मृत्युशी झुंज देत होती.

शरीरातील रक्त बदलणे एवढा एकच उपाय तिचे प्राण वाचवू शकत होता. असे रक्त फक्त तिच्या पाच वर्षे वयाच्या भावाचे तिला देता येणार होते. तो मुलगा याच आजारातून बरा होऊन आता अशा आजाऱ्यांना रक्त देऊन बरे करू शकत होता. डॉक्टरांनी त्या लहान मुलाला समजेल अशा शब्दांत परिस्थितीचे ज्ञान करून दिले. तो आपल्या बहिणीला त्याचे रक्त देण्यास तयार आहे का विचारले.

एक क्षणभरच त्या मुलाला हो म्हणायला लागला. दीर्घ श्वास घेऊन तो म्हणाला, ''हो मी तयार आहे कारण त्यामुळे माझ्या बहिणीचे प्राण वाचणार आहेत.'' त्याच्या शरीरातून बहिणीच्या शरीरात रक्ताने परिवहन सुरू असताना तो बहिणीच्या बेडशेजारीच बेडवर होता. तिच्याकडे पाहत होता. हळूहळू बहिणीच्या चेहऱ्याचा रंग बदलताना जाणवत होता.

त्याच वेळी त्याचा चेहरा थोडा थोडा निस्तेज होत होता. त्याच्या चेहऱ्यावरचे हास्य मावळत होते. त्याने शेजारी असलेल्या

डॉक्टरांना खोल गेलेल्या आवाजात विचारले, ''माझ्या मरणाला आता लगेच सुरुवात होईल का?''

लहान असल्यामुळे त्या डॉक्टरांच्या सांगण्याचा अर्थ नीट समजला नव्हता. त्याला वाटले होते त्याचे सगळे रक्त बहिणीला द्यावे लागेल. तरच ती वाचू शकेल.

तुम्हाला पैशाची गरज नाही असे समजून जिद्दीने काम करा. तुम्ही कधीच दुखावले गेला नाहीत असे प्रेम करा. तुम्हाला कोणी पाहत नाही असे समजून बेभान होऊन वाचा.

तुम्हाला जर कधीही युद्धाचा थरार अनुभवावा लागला नसेल, सुदैवाने तुरूंगाची हवा खायला लागली नसेल, नशिबाचे फटके व भुकेचे चटके बसले नसतील तर तुम्ही स्वत:ला जगातील पाच कोटी लोकांपेक्षा भाग्यवान आहात असे समजा.

जर तुमच्याकडे पुरेसे अन्न, वस्त्र व निवारा असेल तर तुम्ही जगातील ७५ टक्के लोकांपेक्षा सुदैवी आहात असे समजा.

जर तुमच्या हव्या त्या प्रार्थनास्थळी जाऊन तुम्ही मनोभावे देवाची प्रार्थना करू शकलात व त्यासाठी तुम्हाला कोणी धमकावले नाही, कैद केले नाही, तुमचा छळ केला नाही किंवा जिवे मारले नाही तर तुम्ही जगातील तीन हजार लाख व्यक्तींच्या पेक्षा नशिबवान आहात असे समजा.

जर तुमच्या बँक खात्यात पैसे असतील, तुमच्या पाकिटात थोडेफार पैसे असतील व तुमच्या खिशात थोडीफार सुटी नाणी असतील तर तुम्ही स्वत:ला जगातील ८ टक्के श्रीमंत लोकांपैकी एक समजा.

कोणीतरी म्हटले आहे, काम असे करा की तुम्हाला पैशाची नितांत गरज आहे, प्रेम असे उत्कट करा की तुम्हाला कधी कोणी दुखावलेच नाही, नाचताना अशा धुंदीत नाचा की तुमच्याकडे कोणाचे लक्ष नाही, गाताना असे तल्लीन होऊन गा की कोणी तुमचे गाणे ऐकतच नाही, आणि मुख्य म्हणजे असे तन्मयतेने जगा की तुम्ही पृथ्वीवरील स्वर्गात जगत आहात.

❋ ❋ ❋

## पावसातही नाचावे कसे

**त्या** दिवशी सकाळची गडबडीची साडेआठची वेळ होती. इतक्यात एक साधारण ८० वयाचा एक वृद्ध गृहस्थ थोड्या घाईत असावा असा दवाखान्यात आला. त्याच्या अंगठ्याला घातलेले जखमेवरचे टाके त्याला काढून घ्यायचे होते. तो म्हणाला, ''मी जरा घाईत आहे कारण मी ९.०० वाजता एकाला भेटण्याची वेळ दिली आहे.''

मी त्याच्या इतर तपासण्या केल्या आणि त्याला बसायला सांगितले. मला समजत होते की त्याला ज्याला भेटायला जायचे असेल त्याला अजून एक तास तरी अवकाश असावा. तो वृद्ध सारखा आपल्या घड्याळात वेळ पाहत होता. मला दुसरे कोणी पेशन्ट बघायचे नव्हते त्यामुळे मी त्याची जखम नीट तपासायची ठरविले. मला ती जखम बरीच भरत असल्याचे दिसले. म्हणून मी एका डॉक्टरशी बोलून टाके काढण्याची तयारी केली.

त्याच्या जखमेवर उपचार करीत असताना मी त्याला विचारले, ''आज दुसऱ्या कोणत्या डॉक्टरची अपॉइंटमेंट आहे का? तुम्ही बरेच घाईत दिसता आहात म्हणून विचारले.''

त्या गृहस्थाने मला सांगितले, त्याला लगेच एका नर्सिंग होममध्ये जाणे जरूरीचे आहे. तिथे त्याला त्याच्या पत्नीबरोबर नाश्ता घ्यायचा होता. मी तिच्या प्रकृतीची चौकशी केली. त्याने सांगितले, ''गेले काही महिने ती तिथेच आहे. तिला अलझायमरचा त्रास आहे.''

मी पुढे विचारले,'' तुम्हाला थोडा जरी उशीर झाला तरी तिला अस्वस्थ व्हायला होते का?'' त्यावर ते म्हणाले, ''तिला आता ती कोण आहे हे सुद्धा आठवत नाही. गेल्या पाच वर्षांत तिने मला ओळखले पण नाही.''

मला भयंकर आश्चर्य वाटले आणि मी नकळत म्हणाले, ''तुम्ही कोण आहात हे तिला कळत नसूनही तुम्ही रोज सकाळी न चुकता तिच्याकडे जाता?''

ते गृहस्थ हसले, माझ्या हातावर हलकेच थोपटले आणि उत्तरले, ''ती मला ओळखत नसली म्हणून काय झाले? ती कोण आहे ते मला ठाऊक आहे ना?''

आता गप्प राहून आश्चर्य करण्याची माझी पाळी होती. ते गृहस्थ निघतानाच माझ्या डोळ्यांत पाणी आले. माझ्या अंगावर काटा आला आणि मला वाटले, ''मला माझ्या आयुष्यात अशा प्रकारचे प्रेम मिळायला हवे.'' खरे प्रेम हे फक्त शारीरिक नसते. जसे आहे तसे, जसे घडले तसे, जसे घडणार असेल तसे आणि घडणार नसेल तसेही मनापासून स्वीकारणे यालाच खरे प्रेम म्हणावे लागेल. सुखी माणसांना सगळे उत्तम लाभते असे नाही तर जे त्यांना लाभते त्याचा ते उत्तम उपयोग करून आनंद मिळवितात.

वादळामध्ये तुम्ही स्वत:ला कसे सावरता ह्यापेक्षा मुसळधार पावसात तुम्ही नाचू बागडून कसा आनंद घेता हा जगण्याचा फार मोठा निकष असतो.

❋ ❋ ❋

# पियानो वादन

**पॉ**डेरेस्की (PADEREWSKI) हा प्रसिद्ध पियानोवादक.

आपल्या मुलाच्या पियानो वादनाला उत्तेजन मिळावे यासाठी एका मुलाची आई त्याला घेऊन पॉडेरेस्कीच्या एका कार्यक्रमाला आलेली असते. दोघेजण आपल्या जागेवर स्थानापन्न झाल्यानंतर मुलाच्या आईला तिची मैत्रीण हाक मारते. तिच्याशी दोन शब्द बोलायला आई जाते. ही संधी साधून तो लहान मुलगा त्या मैफिलीच्या हॉलची मजा पाहायला जागेवरून उठून हिंडायला लागतो. तसे हिंडताना तो 'प्रवेश बंद' च्या दारातून थेट रंगमंचावर प्रवेश करतो.

हॉलचे दिवे अंधूक व्हायला लागून मैफिल सुरू होणार असते. मुलाची आई आपल्या जागेवर येऊन पाहते तर तिला तिचा मुलगा जागेवर दिसत नाही. एकाएकी पडदा वर जातो, रंगमंच प्रकाशझोतांनी उजळून निघतो.

रंगमंचावर मध्यभागी अतिशय आकर्षक असा स्टेनवे (Steinway) चा पियानो दिसतो. त्याकडे पाहताना त्या मुलाच्या आईचे डोळे विस्फारतात. तो लहान मुलगा पियानो वाजविण्याच्या कीबोर्डवर पियानो वाजविण्यासाठी बसलेला दिसतो. अत्यंत निरागसपणे तो वाजवू लागतो, ''ट्विंकल ट्विंकल लिटिल स्टार'' तो वाजवित असतानाच प्रसिद्ध पियानोवादक पॉडेरेस्की रंगमंचावर प्रवेश करतो. तत्परतेने तो मुलाच्या मागे उभा राहतो आणि त्याच्या कानात हळूच सांगतो, ''थांबू नको, वाजवित राहा.'' लगेच ओंडवा होऊन डाव्या हाताने त्याच्या वादनाला बासची साथ देतो. त्याच वेळी मुलाच्या उजव्या बाजूने हाताने आवश्यक असलेले स्वर (Obligato) वाजवितो.

त्या निष्णात पियानोवादक आणि नवशिक्या लहान मुलाचे पियानो ऐकून आलेले श्रोते मंत्रमुग्ध होतात. सुरूवातीस उद्भवलेल्या अतिशय भीतिदायक व संभ्रमावस्थेतील अवस्थेनंतर एका अवर्णनीय संगीतातील निर्मिती श्रोत्यांना आनंद देऊन जाते. सर्व श्रोते मोहिनी घातल्यासारखे त्या संगीतात तल्लीन होऊन जातात. हेच तर देवाच्या कृपेचे फळ असते. जे आपण स्वत:च्या हिंमतीवर साध्य करण्याचा प्रयत्न करतो ते उल्लेखनीय ठरत नाही. आपण खूप प्रयत्न केला तरी निर्माण होणारे म्युझिक हव्या त्या उंचीचे व श्रवणीय होत नाही. परंतु निष्णात गुरूच्या मार्गदर्शनाने आपले आयुष्य सार्थकी लागते. पुढच्या वेळी तुम्ही जेव्हा काही साध्य करायचा प्रयत्न कराल तेव्हा तुमच्या कानावर येणारी कुजबुज नीट ऐका, 'सोडू नका, घेत राहा.' त्याच्या प्रेमळ हातांचा विळखा तुमच्याभोवती आहे याची खात्री बाळगा. त्याचे बलदंड हात तुमच्या आयुष्याच्या मैफिलीत रंग भरीत असतात.

❋ ❋ ❋

# प्रज्ञावंत मंत्र - प्रतिसाद की प्रतिक्रिया

**मी** एका रेस्टॉरंटमध्ये बसलो होतो. माझ्यापासून थोड्या अंतरावर काही महिलांचा गट गप्पा मारीत उभा होता. इतक्यात कोठून तरी एक झुरळ उडत येऊन त्यापैकी एका महिलेच्या अंगावर बसले. भीतीपोटी ती महिला किंचाळू लागली. घाबरगुंडी उडून, कर्कश्य आवाजात ती आरडाओरडा करीत नाचू लागली. दोन्ही हातांनी कसेही करून अंगावरचे झुरळ झटकण्याचा ती प्रयत्न करीत होती. तिची ती अवस्था पाहून तिच्या गटातील इतर बायका पण लागण लागल्याप्रमाणे विक्षिप्तपणे ओरडायला लागल्या. अखेरीस त्या महिलेने त्या झुरळाला दुसऱ्या एका बाईच्या अंगावर ढकलण्यात यश मिळविले.

आता त्या दुसऱ्या महिलेची तोच व तसाच तमाशा करण्याची पाळी होती. इतक्यात रेस्टॉरंटचा एक वेटर त्यांच्या मदतीला धावून आला. इकडून तिकडे ते झुरळ उडविण्याच्या प्रयत्नात ते वेटरच्या अंगावर जाऊन बसले. वेटर शांतपणे स्थिर उभा राहिला. त्याने शर्टावर बसलेल्या त्या झुरळाची हालचाल लक्षपूर्वक पाहिली. ज्यावेळी त्याला खात्री वाटली त्यावेळी त्याने झुरळाला दोन बोटांनी पकडले आणि बाहेर फेकून दिले.

मी माझ्या कॉफीचे घोट घेत समोर चाललेली करमणूक पाहत होतो. त्या वेळी माझ्या मनात विचार आले आणि मी त्यावर आश्चर्य करू लागलो.

१. त्या महिलांच्या हास्यास्पद व नाटकी वर्तणुकीला झुरळ जबाबदार होते काय?

२. तसे असेल तर तो वेटर का नाही अस्वस्थ झाला? त्याने परिस्थिती उत्तम रितीने हाताळली. परिपूर्ण रितीने व कोठलाही गोंधळ न होता.

३. म्हणजे झुरळाचा दोष नसून झुरळाने ओढवलेला प्रसंग व अशांततेला हाताळण्याची त्या महिलांची असमर्थता हे त्या गोंधळाचे कारण होते.

माझ्या हेही ध्यानात आले की वडिलांचे माझ्यावर चिडणे किंवा ऑफिसात साहेबाचे ओरडणे हे मला अस्वस्थ करीत नाही तर त्यांचे ते चिडणे व ओरडणे मी समर्थपणे हाताळू न शकल्यामुळे मी अस्वस्थ होतो. त्याचप्रमाणे रस्त्यातील रहदारीतील अडथळे मला अस्वस्थ करीत नसून त्या अडथळ्यातून मार्ग काढण्याची माझी असमर्थता मला अस्वस्थ करते.

मुळातल्या अडचणीपेक्षा त्या अडचणींना माझी होणारी प्रतिक्रिया मला जास्त अस्वस्थ करते. मला अपायकारक ठरते. म्हणून आपण म्हणू शकतो,

महिलांची प्रतिक्रिया आली आणि वेटरने प्रतिसाद दिला.

आपण आयुष्यात प्रतिक्रिया देऊ नये तर प्रतिसाद द्यावा.

प्रतिक्रिया ह्या तत्काळ असतात. प्रतिसाद हा प्रज्ञावंत किंवा बुद्धिवर आधारित असतो.

❋ ❋ ❋

# प्रेमाची व्याख्या - स्वामी विवेकानंद

**स्वा**मी विवेकानंद एका प्रवचनात सांगतात, माझी एक खूप जवळची मैत्रिण होती. एकदा आम्ही एका तलावाकाठी बसलो होतो. तिने तिच्या दोन्ही हातांचे तळवे जुळवून त्यावर पाणी घेतले. ते माझ्यासमोर धरून ती मला म्हणाली, ''तुला हे पाणी दिसते आहे ना? ते माझ्या तळहातावर नीट निरखून पाहा. ते प्रेमाचे प्रतीक आहे.''

ते मी असे पाहिले. जोपर्यंत तुम्ही तुमचे तळवे उघडे ठेवून ते पाणी तसेच राहू देता तोपर्यंत पाणी तसेच थांबून राहील. पण ज्या क्षणाला तुम्ही तुमचे तळवे मिटायचा प्रयत्न कराल व बोटांनी ते पाणी पकडून ठेवायचा प्रयत्न कराल त्या क्षणाला पाण्याला

सापडणाऱ्या बोटाच्या पहिल्याच फटीमधून ते बाहेर जाईल.

लोक हीच तर फार मोठी चूक करतात. त्यांना जेव्हा प्रेम मिळते तेव्हा ते प्रेम ते घट्ट पकडून ठेवायचा हट्ट करतात. ते आग्रहपूर्ण मागणी करतात. ते अपेक्षा करतात. आणि मग पाणी जसे बोटामधून निसटून जाते तसेच प्रेम तुमच्यापासून ओसरून जाते.

प्रेम हे असेच स्वतंत्र, चंचल असते. तुम्ही त्याचा गुणधर्म बदलू शकत नाही. तुम्ही जर कोणावर प्रेम करत असाल तर, देण्याची वृत्ती ठेवा, पण अपेक्षा करू नका. सल्ला जरूर द्या, पण आज्ञा करू नका. तुमच्या शंका विचारा, पण हक्काची मागणी करू नका.

हे वाचायला सोपे वाटेल पण हा प्राथमिक धडा प्रत्यक्ष आचरायला अख्खे आयुष्य खर्ची घालावे लागेल. खऱ्या प्रेमाचे हेच गुपित आहे. हे आचरणात आणण्यासाठी तुम्हाला कसलीही अपेक्षा न करता, तुम्हाला आवडत्या व्यक्तीवर प्रेम करता आले पाहिजे व कोणतीही अट न घालता त्याची काळजी घेता आली पाहिजे.

❋ ❋ ❋

# फॅमिली...

रस्त्याने जाताना एका अनोळखी माणसाशी माझी टक्कर होते, तेव्हा अनाहूतपणे माझ्या तोंडून दिलगिरीचे शब्द येतात, ''प्लीज माफ करा हं.'' तो अनोळखी गृहस्थही अजिजीने म्हणतो, ''मलाही आपण माफ करा. सॉरी. माझे तुमच्याकडे लक्षच नव्हते.'' आम्ही दोघेही एकमेकांशी बोलताना विनम्र होतो. आम्ही पुन्हा आमच्या रस्त्याने चालायला लागतो. याआधी दोघे एकमेकांना 'गुड बाय' करायला मात्र विसरत नाही.

घरी मात्र यापेक्षा वेगळे घडत असते. आपण आपल्या जवळच्यांशी, लहानांशी, थोरांशी किती निराळ्या तऱ्हेने वागत असतो. त्या दिवशी सायंकाळी मी रात्रीचा स्वयंपाक बनवित होते. माझा मुलगा माझ्या नकळत माझ्या शेजारी येऊन स्वस्थ उभा होता. मी बाजूला वळले आणि जवळ जवळ त्याला धडकलेच. ''बाजूला हो पाहू एकदम माझ्या वाटेतून.'' कपाळावर आठ्या घालून नाराजीच्या सुरात त्याच्या अंगावर गेले.

ताबडतोब तो माझ्या वाटेतून दूर झाला. पण मनातून तो फार दुखावला. मी किती कठोरपणे बोलले होते ते त्यावेळी मला जाणवले नाही. रात्री अंथरूणावर जागीच डोळे मिटून शांत पडले होते. कोठून तरी परमेश्वराचे अगदी हळुवार, नाजुक शब्द माझ्या कानावर आले, ''अगदी अनोळखी माणसाशी वागताना सुद्धा सर्वसामान्य शिष्टाचार तू पाळलेस, अत्यंत सभ्यपणे तुझे वागणे होते. परंतु ज्या कुटुंबियांसमवेत तू राहतेस त्यांच्याशी मात्र असभ्य वर्तन करतेस. आत्ताच्या आत्ता ऊठ, आधी जा आणि स्वयंपाकघरांच्या फरशीवर काय दिसते ते पाहा. दाराजवळ पडलेली सुंदर, ताजी टवटवीत फुले तुला दिसतील. ती फुले तुझ्या लेकराने तुझ्यासाठी मोठ्या ममतेने मुद्दाम आणली होती. गुलाबी, पिवळी, लाल, निळी, अशी रंगीबेरंगी फुले त्याने स्वत: जमा करून आणली होती. तो मुद्दामच अतिशय शांतपणे स्तब्ध तुझ्याजवळ येऊन उभा राहिला होता. त्या फुले आणण्यामागचा तुला चकित करून त्याला आनंद घ्यायचा होता. तू त्याच्यावर रागावताच तो एकदम हिरमुसला होऊन, मनातून नाराज झाला. त्याच्या डोळ्यांतून त्या नाराजीने आसवांच्या रूपाने वाट मोकळी करून घेतली. तुला त्याचे आसवांनी डबडबलेले डोळे दिसले नाहीत.''

एव्हाना माझ्या नजरेतून मी स्वत:च उतरून गेले होते. माझ्या डोळ्यांवाटे घळघळ अश्रू वाहायला लागले. मी शांतपणे उठून मुलाच्या बेडजवळ जाऊन गुडघे टेकून बसले. त्याच्या डोक्यावर मायेने हात फिरवून म्हणाले, ''ऊठ माझ्या बाळा! ऊठ रे. जागा हो रे. अरे ही नाजुक सुंदर फुले तू माझ्यासाठी वेचून आणली होतीस ना?''

तो खुदकन हसून म्हणाला, ''हो आई, मला ती बाहेर परसात मिळाली. ती गोळा करून मी तुझ्यासाठीच आणली, कारण ती तुझ्यासारखीच नाजुक, सुंदर आहेत. मला ठाऊक आहे, अशी फुले तुला खूप आवडतात. त्यातील विशेष करून निळ्या

रंगाची. होय ना?''

मी म्हणाले, ''मला माफ कर बेटा. सॉरी. मी आज तुझ्याशी फारच निष्ठुरपणे वागले. मी तुझ्यावर त्या तऱ्हेने चिडून, रागावून ओरडायला नको होते.'' तो मला बिलगला आणि म्हणाला, ''ए आई, जाऊ दे ना, मला तू खूप खूप आवडतेस.''

मीही त्याला जवळ घेऊन थोपटून म्हणाले, ''मला सुद्धा तू खूप आवडतोस आणि हो ही फुले सुद्धा, विशेषत: ही निळी.'' विचार करा आपण आपल्या कुटुंबापेक्षा कितीतरी पटीने स्वत:ला आपल्या कामात गुंतवून घेतो. हे बरे आहे का?

कारण इंग्रजी अक्षरांप्रमाणे 'फॅमिली' म्हणजे

FAMILY = (F)ATHER(A)ND(M)OTHER(I)(L)OVE(Y)OU

❋ ❋ ❋

# बाबांची रिकामी खुर्ची

एका वृद्ध गृहस्थाच्या मुलीने देवळातील गुरूजींना घरी बोलावून आपल्या वडिलांबरोबर थोडावेळ बसून देवाची प्रार्थना करण्याची विनंती केली. गुरूजी आले तेव्हा ते गृहस्थ बेडवर आडवे पडले होते. त्यांचे डोके दोन उशांच्या आधाराने वर उचललेले होते. त्यांच्या बेडजवळ एक रिकामी खुर्ची ठेवलेली होती. गुरूजींना वाटले त्या गृहस्थांना गुरूजी तिथे येणार असण्याची कल्पना होती. ते म्हणाले, ''मला वाटते आपण माझी वाट पाहत होतात.''

''नाही, नाही. आपण कोण?'' वडिलांनी विचारले.

गुरूजींनी नाव सांगितले आणि म्हणाले, ''मी इथे ही रिकामी खुर्ची पाहिली आणि मला वाटले मी येणार असल्याचे आपल्याला ठाऊक होते.''

''ओह! ही रिकामी खुर्ची होय? जरा दार बंद कराल का?'' वडील असे म्हटल्यावर गुरूजी जरा गोंधळले. पण त्यांनी दार बंद केले.

''मी आजवर कोणालाही ही गोष्ट बोललो नाही, अगदी माझ्या मुलीला सुद्धा. मला माझ्या अख्ख्या आयुष्यात प्रार्थना कशी करायची ते माहीत नव्हते. देवळात गुरूजी प्रार्थना कशी करायची ते सांगताना मी ऐकले होते पण ते मला कधीच आकलन झाले नाही. सर्व माझ्या डोक्यावरून जात असे. मी प्रार्थना करणेच सोडून दिले. चार वर्षांपूर्वी माझ्या एका जिवलग दोस्ताने मला सांगितले, 'जगजित, प्रार्थना म्हणजे दुसरे तिसरे काही नसून परमेश्वराबरोबर तुमचे संभाषण असते.' त्याने मला एक सूचना केली. मला खुर्चीवर बसायला सांगून माझ्यासमोर एक रिकामी खुर्ची ठेवायला सांगितली. त्या रिकाम्या खुर्चीवर परमेश्वर बसला आहे अशी कल्पना करायला सांगितले. तो भुतासारखा भीतिदायक नव्हता. देवाने मला वचन दिले की तो कायम त्या खुर्चीत माझ्याबरोबर बसलेला असेल आणि मग मला त्याच्याशी संभाषण करता येईल. आता तुमच्याशी मी संभाषण करीत आहे अगदी तसेच. मला ही कल्पना आवडली, मी तसे करून पाहिले. रोज एक दोन तास मी असे बोलतो. हे मी जरा काळजीपूर्वक करतो कारण माझ्या मुलीने जर मी रिकाम्या खुर्चीबरोबर संभाषण करताना पाहिले तर ती मला घरात न ठेवता कोठेतरी रूग्णालयात ठेवेल आणि तिचे पण मानसिक संतुलन बिघडेल.

त्यानंतर गुरूजींनी त्या वृद्धाबरोबर थोडी प्रार्थना केली, त्याला शुभेच्छा दिल्या आणि ते देवळात परतले. गुरूजी त्या वृद्धाने सांगितलेल्या गोष्टीने भारावून गेले होते. त्यांनी वृद्धाला वर्णन केल्याप्रमाणे करण्यास सांगितले. दोन रात्रीनंतर मुलीनी गुरूजींना फोन केला आणि तिचे वडील दुपारी गेल्याचे कळविले.

गुरूजींनी विचारले, ''तुझे बाबा शांतपणे गेले का?''

''हो! मी साधारण दुपारी दोनच्या सुमारास घरातून बाहेर पडले. त्यापूर्वी बाबांनी मला त्यांच्या बेडजवळ बोलावले आणि त्यांचे माझ्यावर खूप प्रेम असल्याचे म्हणाले. माझ्या गालाचा पापा घेतला. मी जेव्हा माझी खरेदी करून एक तासानी बाहेरून

परत आले तेव्हा त्यांना बेडवर पाहिले तर ते गेलेले होते. पण त्यांच्या मृत्युचे मला गूढच वाटले. कारण मृत्युच्या आधी थोडाच वेळ ते बहुधा त्या रिकाम्या खुर्चीवर डोके टेकून ओणवे झाले असावेत.

त्यांचे डोके बेडजवळच्या खुर्चीवर टेकलेले होते. तुम्हाला काय वाटते काय झाले असावे?''

गुरूजींच्या डोळ्यांतून अश्रू ओघळले. ते म्हणाले, ''आपल्या सगळ्यांना असे मरण यायला हवे.''

प्रार्थना करणे ही ईश्वराची सर्वांत मोठी देणगी आहे.

मी ईश्वराला पाणी मागितले, ईश्वराने समुद्र दिला. मी फूल मागितले, त्याने बागच दिली.

आनंदी असाल तेव्हा ईश्वराची पूजा करा. संकटात असाल तेव्हा देवाला मदतीचे साकडे घाला.

शांत असाल तेव्हा ईश्वराची प्रार्थना करा. समस्या निर्माण होईल तेव्हा ईश्वरावर श्रद्धा ठेवा.

प्रत्येक क्षणाला ईश्वराचे आभार माना.

❋ ❋ ❋

# बांबूचे वन....

एक दिवस मी वैतागलो आणि सगळयाचा शेवट करण्याचे ठरविले. माझी नोकरी, माझे नातेसंबंध, आध्यात्मिक, धार्मिक जीवन, इतकेच नाही तर मी स्वत:ला संपविण्याचे ठरविले.

मी शेवटी जंगलात जाऊन देवाची प्रार्थना करण्याचे ठरविले. मी म्हणालो, ''हे परमेश्वरा, मी अजूनही जगावे यासाठी एखादे तरी सबळ कारण तू मला सांगू शकशील का रे?'' त्याचा प्रतिसाद मला आश्चर्यचकित करून गेला.

मला परमेश्वराचा आवाज आला, ''जरा तुझ्या अवतीभोवती पाहा बरे. तुला छोटी छोटी उगवलेली लव्हाळी आणि तसेच बांबूचे रान दिसते आहे का?'' मी हो म्हणालो.

परमेश्वर पुढे म्हणाला, 'मी जेव्हा या छोट्या छोट्या लव्हाळींचे आणि त्याचबरोबर बांबूचे बीज पेरले तेव्हा दोन्हींचीही मनापासून काळजी घेतली. मी त्यांना हवा तसा प्रकाश दिला. हवे तेवढे पाणी दिले. जमिनीतून लव्हाळी भराभर उगवली, फोफावली. त्यांच्या हिरव्यागार रंगाने वसुंधरा उजळून, बहरून आली. सतेज दिसू लागली. परंतु या वेळी बांबूसाठी पेरलेल्या बीजामधून मात्र काहीही उगवले नाही. पण म्हणून मी त्या बांबूच्या पिकाला वाऱ्यावर सोडून दिले नाही. त्याकडे दुर्लक्ष करून विसरून गेलो नाही. दुसऱ्या वर्षी लव्हाळी आणखीनच जोमाने उफाळून उगवली. त्याही वर्षी बांबूच्या पेरणीला अंकुर फुटला नाही. पण म्हणून मी काही बांबूच्या पिकाची आशा सोडून दिली नाही. तिसऱ्या वर्षीही पुन्हा तेच घडले. बांबूच्या पिकाला अजूनही उगवणे जमले नव्हते. तरीही मी माझा त्यांच्यावरचा विश्वास सोडला नाही. त्यांची काळजी घेतच राहिलो. चवथ्याही वर्षी यात फरक झाला नाही. मी माझे काम करीतच राहिलो. ते थांबवले नाही.

पाचव्या वर्षी मात्र या बांबूच्या बिजाला लहानसा अंकुर फुटला. धरणीमातेच्या पोटातून तो अंकुर बाहेर डोकावला. इतर तरारून आलेल्या लव्हाळींच्या मानाने हे अंकुर अगदी नगण्य होते. पण त्यानंतर केवळ सहा महिन्यांत हे उगवलेले अंकुर १०० फुटापर्यंत बांबूच्या स्वरूपात ताडमाड वाढले. त्यांनी आपली पाळेमुळे रूजविण्यासाठी तब्बल पाच वर्षांचा अवधी घेतला होता. या जमिनीच्या गर्भात रुजलेल्या पाळेमुळांनी या बांबूंना अतिशय मजबूत बनविले होते. जगण्यासाठी, तग धरण्यासाठी त्या मुळांनी त्या बांबूंना सर्व शक्ती दिली होती. मी माझ्या कोणत्याही निर्मितीला त्याला स्वत:ला पेलवणार नाही असे आव्हान देणारच नाही. तुझ्या लक्षात येते आहे का? इतकी सर्व वर्षे तुझा जगण्यासाठी झगडा सुरू होता. तुझी धडपड अव्याहतपणे सुरू होती. म्हणजेच तू तुझी पाळेमुळे घट्ट रोवित होतास. मी जसा बांबूंनी तग धरून उंच होण्यासाठी त्यांच्यावर लक्ष ठेवून होतो आणि त्यांना वाऱ्यावर सोडून दिले नाही तसाच मी तुलाही स्वत:ला संपवू देणार नाही. तू स्वत:ची तुलना इतरांशी करू नकोस.''

परमेश्वर पुढे म्हणाला, ''लव्हाळयांपेक्षा बांबूंचे उद्दिष्ट वेगळे होते. तरीही त्या दोघांच्या एकत्रित अस्तित्वाने हे रान, हा परिसर, सुंदर बनून गेला. तुलाही योग्य संधी योग्य वेळी प्राप्त होईल. तुझीही वेळ येईल. त्यावेळी तुलाही अर्थ प्राप्त होईल. महत्त्व

निर्माण होईल. धीर धर.''

मी नकळत विचारले, ''मला किती महत्त्व प्राप्त होईल? मला किती मोठे यश मिळेल?'' ईश्वराने उलटा प्रश्न केला, ''बांबूंनी किती उंच व्हावे असे तुला वाटते?'' मी विचारले, ''त्यांना जेवढे उंच व्हावेसे वाटेल तेव्हढे त्यांनी उंच व्हावे का?'' ''अर्थातच! तू सुद्धा जेवढी उंच यशाची शिखरे गाठशील तेवढे जास्त समाधान मला मिळेल. तेवढे जास्त कृतकृत्य मला वाटेल.''

माझी पावले नकळत परत फिरली. पुन्हा जिद्दीने जगण्याची उमेद घेऊनच. परमेश्वर आपल्यावरचा वरदहस्त केव्हाही दूर करणार नाही याची खात्री वाटून.

म्हणूनच आयुष्य हे फक्त आलेल्या अडचणींवर उपाय शोधण्यासाठी नसते तर जगण्यातील आनंद उपभोगण्यासाठी, ती एक परमेश्वराने दिलेली देणगी असते. हे जग फार सुंदर आहे. इथे रोज अनेक नवीन नवीन उत्तमोत्तम संधी तुमची वाट पाहात असतात. प्रत्येक उगवत्या दिवशी अत्युच्च आनंदाचे क्षण तुमच्यासाठी थांबून राहिलेले असतात.

❋ ❋ ❋

# बिनशर्त अंगीकार

नुकतेच मी पदवीसाठी कॉलेजमध्ये समाजशास्त्राच्या वर्गात प्रवेश घेतला होता. वर्गाची शिक्षका म्हणजे अतिशय प्रेरणादायी गुणधर्म असलेली व्यक्ती होती. मला वाटते प्रत्येक माणसाला असे सद्‌गुण लाभले पाहिजेत. तिने वर्षाचा शेवटचा प्रॉजेक्ट दिला होता त्याचे नाव होते ''स्मितहास्य''. त्या प्रॉजेक्टप्रमाणे प्रत्येक विद्यार्थ्याने तीन अनोळखी माणसांना स्मितहास्य करून अभिवादन करायचे आणि त्यावरचा त्यांचा मिळणारा प्रतिसाद नोंदवायचा. दिसायला इतका साधा होता तो प्रॉजेक्ट.

तशी मी लोकांत मिसळणारी, कायम हसून अभिवादन करणारी व चटकन मैत्री साधणाऱ्या स्वभावाची आहे. त्यामुळे हा प्रॉजेक्ट म्हणजे मला माझे नेहमीचेच वागणे आहे असे वाटले. त्या दिवशी मी माझा सर्वांत लहान मुलगा व नवऱ्याबरोबर मॅकडोनल्ड रेस्टॉरंटमध्ये गेले होते. थंडीच्या दिवसाची सकाळ होती. आम्ही काउंटरसमोर रांगेत उभे होतो. इतक्यात रांगेतील सगळे जण बाजूला जायला लागले. माझा नवरा पण तसाच बाजूला सरकला. मी जराशीही हलले नाही. सगळे जण असे का बाजूला सरकत आहेत हे पाहण्यास मी मागे वळून पाहिले आणि माझ्या मनात एक प्रकारची घबराट उत्पन्न झाली. मी मागे वळून पाहताच मला शरीराची भयंकर दुर्गंधी आली. ती दुर्गंधी मागे रांगेत उभ्या असलेल्या दोन माणसांच्या शरीराची होती. ते दोघे दरिद्री होमलेस (भिकारी) होते. मी त्यांच्यापैकी लहान असलेल्या माणसाकडे पाहिले तर तो माझ्याकडे पाहून हसत होता. त्याचे आकाशी निळे डोळे अत्यंत बोलके होते. त्याने स्मितहास्य करून माझ्या प्रतिसादाची अपेक्षा केली होती. त्याच्या डोळ्यांत ती आशा दिसत होती.

हातातील मोजकी नाणी परत एकदा मोजतानाच त्याने मला 'गुड डे' म्हणून अभिवादन केले. त्याच्या मागे असणाऱ्या दुसऱ्या माणसाने पहिल्याच्या खांद्यावर चाचपडले. त्याच्या हालचालीवरून तो मंदबुद्धी होता हे कळले. पुढचा निळ्या डोळ्यांचा माणूस त्याला सांभाळून घेत होता. मी माझ्या डोळ्यांत आलेल्या अश्रूंना आवर घातला. काउंटरवरच्या मुलीने त्याला काय हवे म्हणून वीचारले. ''फक्त एक कॉफी'' त्याने सांगितले. कारण तेवढी एकच गोष्ट घेण्यापुरते पैसे त्याच्याकडे होते. रेस्टॉरंटमध्ये काही वेळ बसण्यासाठी एक तरी गोष्ट विकत घेणे आवश्यक होते आणि बाहेरच्या थंडीपासून थोडी ऊब मिळण्यासाठी त्यांना थोडा वेळ तरी बसणे जरूरीचे होते. ते ऐकून मला कसेतरीच झाले. मी न राहवून त्या दोघांच्या जवळ गेले. माझा आवेश इतका होता की मी जणू काही त्यांना जाऊन मिठी मारते की काय असे वाटावे. मी लगेच काऊंटरकडे वळून त्या मुलीला दोन नाश्ता स्वतंत्र ट्रेमध्ये देण्यास सांगितले. ट्रे मिळाल्यानंतर ते दोघे ज्या टेबलावर बसले होते त्या टेबलाजवळ गेले. तो ट्रे टेबलावर ठेवून त्या निळ्या डोळ्यांच्या माणसाच्या थंडगार हातावर माझा हात ठेवला. त्याने वर माझ्याकडे पाहिले. त्याचे डोळे भरून आले होते. तो म्हणाला, ''थँक यू'' मी थोडीशी खाली वाकून त्याच्या हातावर थोपटले आणि म्हणाले,''मी हे तुमच्यासाठी म्हणून केले नाही. माझ्यातील उपजत प्रेरणेने हे केले. त्यायोगे तुमच्या मनात आशेचा किरण जागवला.''

असे म्हणून मी माझ्या जागेवर यायला निघाले. डोळ्यांत कर्तव्यपूर्तीचे अश्रू आले होते. नवरा व मुलाबरोबर येऊन बसले. बसल्यावर माझा नवरा हसून मला म्हणाला, ''यासाठीच तर देवाने मला तू दिली आहे. तूच तर माझी आशा पल्लवित करतेस.'' आम्ही दोघांनी हातात हात घेतले. आम्ही समजून चुकलो की आम्हाला जे नशिबाने मिळते त्यामुळेच आम्ही ते इतरांना देऊ शकतो. आम्ही फार आस्तिक आहोत असे नाही; पण आम्ही देवावर व अज्ञात शक्तिवर विश्वास ठेवणारे आहोत.

वर्षाच्या शेवटच्या दिवशी मी कॉलेजमध्ये माझ्या प्रॉजेक्टचा पेपर घेऊन गेले. टीचरने माझा पेपर वाचला आणि मला विचारले, ''वर्गाला वाचून दाखवू का?'' मी हो म्हटल्यावर तिने वर्गात शांतता राखायला सांगितले. तिने पेपर वाचला. मला कळून चुकले होते की सर्व माणसांमध्ये देवाचा अंश असतो. त्यांच्यामुळेच माणूस दुसऱ्याचे दु:ख जाणून ते हलके करू शकतो. माझ्या अंदाजाने त्या दिवशी माझ्या वागण्याने मॅकडोनल्डमध्ये हजर असलेल्या लोकांना, माझ्या मुलाला, माझ्या टीचरला, वर्गमित्रांना मी अंतर्मुख केले होते. तो कॉलेजचा शेवटचा दिवस होता. मी पदवीबरोबरच एक फार मोठा धडा शिकले.

''बिनशर्त अंगीकार'' लोकांवर प्रेम करा, वस्तुंचा वापर करा. याउलट करू नका. म्हणजे वस्तुंवर प्रेम व लोकांचा वापर करू नका.

❋ ❋ ❋

# बियाणांचा नियम

सफरचंदाच्या झाडाकडे पाहा. झाडावर निदान पाचशे तरी सफरचंद असतील आणि प्रत्येक सफरचंदात निदान दहा तरी बियाणे असतील. केवढी तरी बियाणे आहेत ना? तुम्ही विचाराल की, थोडीशीच सफरचंदाची झाडे लावण्यासाठी इतकी बियाणे कशाला हवी आहेत? निसर्ग आपल्याला काहीतरी शिकवित असतो. तो आपल्याला सांगतो आहे की, ''सर्वच, बियांपासून अंकुर फुटत नाही. अनेक बियांपासून कधीच रोपे उगवत नाही. त्यामुळे जर तुम्हाला खरेच काही घडायला हवे असेल तर एकापेक्षा अनेक पर्याय उपलब्ध असणे गरजेचे असते.''

याचाच अर्थ, तुम्ही एक नोकरी मिळण्यासाठी वीस मुलाखतींना जाता, किंवा एक चांगला इंजिनिअर मिळण्यासाठी तुम्ही चाळीस इंजिनिअरना मुलाखतीस बोलावता. एक घर विकण्यासाठी तुम्ही पन्नास लोकांशी बोलता.

एक कार, एक व्हॅक्युम क्लिनर, अथवा एक विमापॉलिसी, एक बिझिनेस कल्पना साकारण्यासाठी तुम्ही अनेकांना भेटता. एक सच्चा दोस्त मिळण्यापूर्वी तुम्ही शेकडो लोकांशी संपर्क जोडता.

आपण जेव्हा बियाणांचा नियम समजावून घेतो त्यानंतर आपला अपेक्षाभंग होत नाही. आपण बळी गेल्यासारखे वाटत नाही. आपल्याबाबतीत घडणाऱ्या घटनांना कसे सामोरे जायचे ते आपण शिकतो. निसर्गाचे नियम हे वैयक्तिक पातळीवर घ्यायचे नसतात. आपण ते समजावून घेऊन त्यांच्या साहाय्याने जगायचे असते.

थोडक्यात सांगायचे तर यशस्वी माणसे जास्त वेळा चुकतात, पण ते तसेच जास्त वेळा बियाणे पेरतात. जेव्हा गोष्टी तुमच्या हाताबाहेर जातात, तेव्हा आयुष्यातील दैन्यावस्था टाळण्यासाठी काही गोष्टी जाणीवपूर्वक टाळाव्या लागतात. जग कसे असावे हे ठरविण्याचा अधिकार तुमचा नसतो. इतरांनी कसे वागावे याचे नियम तुम्ही घालून द्यायचे नसतात. तुम्ही घालून दिलेले नियम जगाने आचरणात आणले नाहीत तर तुम्हाला राग येतो. कपाळकरंटे लोक नेमके हेच करतात.

याउलट तुम्ही वेगवेगळ्या अपेक्षा मनात धरलेल्या असतात. मित्रांनी आपण केलेल्या उपकाराची परतफेड करायला हवी, लोकांनी तुमच्या कामाचे कौतुक केले पाहिजे. विमान वेळेत पोहोचले पाहिजे. सर्व लोक प्रामाणिक असायला हवेत. तुमच्या नवऱ्याच्या किंवा तुमच्या जवळच्या मित्राला तुमचा वाढदिवस लक्षात असला पाहिजे. या अपेक्षा अगदी किरकोळ पण योग्य वाटतात. तरीही यापैकी अनेक गोष्टी घडत नाहीत. त्यामुळे तुमचे चित्त ठिकाणावर राहत नाही. तुम्हाला नैराश्य येऊन तुमचा अपेक्षाभंग होतो.

यासाठी निराळा बरा पर्याय आहे. तुमच्या मागण्या कमी करा त्याऐवजी पसंती (Preference) नक्की करा.

ज्या गोष्टी तुमच्या आटोक्याबाहेरच्या असतील त्याबद्दल स्वत:ला बजावा की, ''माझी याला पसंती असेल पण जर हे घडले नाही तर ठीक आहे.'' हा तुमच्या विचारसरणीत करण्याचा फरक आहे. हा तुमच्या दृष्टिकोनात घडणारा फरक आहे. तो तुम्हाला मन:शांती देऊ शकेल. लोकांनी विनम्र असावे अशी तुमची अपेक्षा असेल पण जेव्हा ते उद्धटपणे वागतील तेव्हा तुमचा दिवस खराब जाणार नाही. तुम्हाला प्रखर सूर्यप्रकाश हवा असेल पण तरी पाऊस पडला तरी तुम्हाला चालेल.

सुखी होण्यासाठी जग बदलणे आवश्यक असते किंवा स्वत:चे विचार बदलणे आवश्यक ठरते. दोन्हीपैकी स्वत:चे विचार बदलणे सोपे असते.

थोडक्यात, मुळातील समस्या ही तुमची अडचण नसते तर तुमचा समस्येकडे पाहण्याचा दृष्टिकोन हीच तुमची खरी अडचण असते. घडणाऱ्या घटना तुम्हाला सुखी करीत नाहीत तर घडलेल्या घटनांबद्दल तुमच्या मनात आलेले विचार तुम्हाला सुख देत असतात.

❋ ❋ ❋

# भिंतीवर टांगलेला जुना टेलिफोन

**मी** लहान असताना आमच्या राहण्याच्या भागात आमच्याकडे सर्वांत प्रथम टेलिफोन आला होता. मला आठवतो तो भिंतीवर टांगलेला जुन्या पद्धतीचा पॉलिशमुळे चकचकीत दिसणारा काळा फोन. फोनच्या बॉक्सच्या बाजूला चकचकीत रिसिव्हर अडकवलेला असे. माझ्या कमी उंचीमुळे माझा हात फोनला पोहोचत नसे. पण आई फोनवर बोलत असताना मी मोठ्या कुतूहलाने ते ऐकत असे.

पुढे माझ्या असे लक्षात आले की त्या अद्‌भुत अशा उपकरणामध्ये कोणीतरी अचाट अशी स्त्री राहत होती आणि तिचे नाव 'इन्फर्मेशन प्लीज' असे होते. तिला कोणतीही गोष्ट ठाऊक नाही असे नव्हते. 'इन्फर्मेशन प्लीज' कोणाचाही टेलिफोन नंबर व अचूक वेळ सांगत असे.

एक दिवस माझी आई शेजारी काही कामासाठी गेली होती. त्यावेळी मला त्या टेलिफोनमधील अदृश्य व्यक्तीशी बोलण्याची संधी मिळाली. त्याचे असे झाले की, मी तळघरात गंमत म्हणून घरात लागणाऱ्या हत्याराच्या पेटीतील खिळे आणि हातोडी यासोबत खेळ करीत होतो. खिळा ठोकताना हातोड्याचा दणका माझ्या अंगठ्यावर बसला. मला मरणाच्या वेदना झाल्या; पण त्यासाठी दु:ख करत बसून काहीच उपयोग नव्हता. घरात कोणीच मोठे माणूस मला सहानुभूती दाखवायला नव्हते.

मी घरभर माझा ठणकणारा अंगठा तोंडात चोखत हिंडत होतो. हिंडता हिंडता मी जिन्यापाशी आलो आणि मला एकदम टेलिफोनची आठवण झाली. मी धावत जाऊन दिवाणखान्यातून स्टूल घेतले. ओढत ओढत ते स्टूल मी टेलिफोनजवळ आणले. स्टुलावर चढून टेलिफोनचा रिसिव्हर काढून कानाला लावला. मी त्याच्या एका बाजूला बोलण्यासाठी असलेल्या भागाला तोंड लावून म्हणालो, 'इन्फर्मेशन'

एक दोन सेकंदात मला आवाज ऐकू आला 'इन्फर्मेशन'

''माझ्या बोटाला लागले आहे'' मी टेलिफोनमधून मिळणाऱ्या प्रतिसादाची वाट पाहत होतो. टेलिफोनमध्ये का होईना कोणीतरी माझे गाऱ्हाणे ऐकते आहे हे समजल्यावर मला अश्रू आवरेनात.

''तुझी आई घरात नाही का?'' पलीकडचा आवाज. ''तुझ्या बोटातून रक्त येते आहे का?'' विचारणा झाली.

''नाही. माझ्या बोटावर हातोड्याचा दणका बसला. ते खूप दुखते आहे.''

''तू फ्रीजमधील आईसबॉक्स उघडू शकतोस का?'' टेलिफोनमधून विचारले गेले. मी हो म्हटल्यावर ''त्यातील थोडा बर्फ तुझ्या दुखऱ्या बोटावर दाबून धर.'' पलीकडून आवाज आला.

त्या दिवसानंतर मी ''इन्फर्मेशन प्लीज'' ला प्रत्येक गोष्ट विचारू लागलो. मी तिला माझे भूगोलाचे प्रश्न विचारीत असे. ती

मला शहरांची माहिती देत असे. मी तिची गणिते सोडवायला मदत घेत असे. मला दोन दिवसांपूर्वी बागेत मिळालेल्या पेटला फळे व दाणे खायला देऊ का म्हणून विचारीत असे. एकदा आमचे कुत्रे मरण पावले ते पण मी तिला सांगितले. तिने ते ऐकले आणि माझी समजूत काढली. मी तिला विचारले,''पक्षी इतके गोड गाणे गाऊन माणसांची करमणूक करतात आणि शेवटी मरताना फक्त पिंजऱ्यात तळाशी खंडीभर पिसे बाकी राहतात. असे का?''

तिला माझ्या विचारण्यामागची माझ्या जीवाची तगमग समजली. ती म्हणाली, ''त्याच्या गाण्यासाठी दुसरे जग वाट पाहत असते.'' त्या उत्तराने माझे थोडेफार समाधान झाले. एकदा मी टेलिफोन केला ''इन्फर्मेशन प्लीज'' ''इन्फर्मेशन'' पलीकडून ओळखीचा आवाज आला.''मी फिक्सचे स्पेलिंग काय'' म्हणून विचारले.

हे सर्व आम्ही राहत होतो त्या छोट्या शहरात घडत होते. मी नऊ वर्षांचा असताना आम्ही दुसऱ्या एका मोठ्या शहरात स्थलांतर केले. मी माझ्या टेलिफोनमधील त्या मैत्रिणीच्या गप्पांना मुकलो. ''इन्फर्मेशन प्लीज'' हे त्या जुन्या चकचकीत भिंतीवरील टेलिफोनमध्ये तिकडेच राहून गेले. मोठ्या शहरात दिवाणखान्यात टेबलावर ठेवलेल्या नवीन टेलिफोनमधून तिच्याशी बोलण्याचा मी कधी प्रयत्न केला नाही. मी थोडा मोठा झालो तरी बालपणातील त्या आठवणी मी कधीच विसरू शकलो नाही. अनेक वेळा शंका येत किंवा चक्रावून जायला होत असे, तेव्हा तो धीरगंभीर आवाजातील मला मिळत असलेला आधार आठवत असे. अशा वेळी तिचे धैर्य, समजूतदारपणा आणि दयाळूपणा याला मी सलाम करीत असे. तिने माझ्यासारख्या लहान मुलाला दिलेला वेळ हा अमूल्य असा होता.

पुढे मी कॉलेजच्या अभ्यासासाठी आणखी दूर गेलो. एकदा प्रवासात एका मोठ्या विमानतळावर वेळ होता. त्या वेळात तिथेच असणाऱ्या माझ्या बहिणीशी मी बोललो. तरीही हाताशी वेळ होता. का कोण जाणे मला त्या जुन्या टेलिफोनमधील संवादाची आठवण आली. मी माझ्या लहानपणच्या गावात फोन लावला आणि म्हणालो, ''इन्फर्मेशन प्लीज'' अद्भुतरित्या मला परिचित असलेला स्पष्ट हळुवार शब्द ऐकू आला, ''इन्फर्मेशन'' मी अपेक्षा केली नव्हती तरी पलीकडून आवाज आला, ''फिक्सचे स्पेलींग काय आहे. सांगू शकशील का?'' मी एक मोठा पॉझ घेतला. तोच पलीकडून परत आवाज आला, ''मला वाटते तुझे बोट बरे आहे ना?''

मी मोठ्याने हसलो आणि म्हणालो, ''तर खरेच तू आहेस. तुला कल्पना नसेल त्या दिवसात तू माझा केव्हढा मोठा आधार होतीस.'' त्यावर ती म्हणाली, ''तुलाही ठाऊक नाही, तुझा फोन येणे हे मला किती महत्त्वाचे होते. मला कोणी मूल नव्हते आणि म्हणून मी तुझ्या फोनकडे कान लावून बसलेली असायची.''

मला तिची कायमच प्रकर्षाने आठवण येत असे हे सांगून मी परत या भागात आलो की तिला फोन केला तर चालेल का म्हणून विचारले. ''हो जरूर फोन कर आणि सॅली आहे का असे विचार.''

तीन महिन्यांनंतर मी परत त्या भागात गेलो होतो. पण मी फोन केल्यावर वेगळाच आवाज ऐकू आला.

''इन्फर्मेशन'' मी सॅली आहे का विचारले. ''तू तिचा मित्र आहेस का?'' ''हो फार जुना मित्र'' माझे उत्तर.

''मला सांगायला वाईट वाटते, सॅली गेली काही वर्षे अर्धा दिवसच काम करीत होती कारण ती आजारी असायची. पाच आठवड्यांपूर्वी ती गेली.''

मी फोन बंद करण्याआधी तिने घाईने मला विचारले,''तुझे नाव रॉबर्ट आहे का?'' मी हो म्हणालो.

''ओ!! सॅलीने तुझ्यासाठी निरोप ठेवला आहे. तिने लिहून माझ्याकडे दिला आणि जर तू फोन केलास तर तुला तो वाचून दाखवायला सांगितला आहे. तिने लिहिले आहे, तिकडे दुसरे जग आहे जिथे पक्षी गायला जातात. चिठ्ठी तुला दिली की तुला त्याचा अर्थ समजेल असेही ती म्हणाली होती.''

मी फोन बंद केला आणि सॅलीला काय म्हणायचे होते ते समजलो.

तुमच्या बोलण्यावागण्यामुळे दुसऱ्या एखाद्या व्यक्तीच्या आयुष्यावर किती परिणाम घडतो ते कधी कधी तुमच्या लक्षात येत नाही. गरूडाची भरारी मारून तुम्ही त्या व्यक्तीच्या हृदयाला स्पर्श केलेला असतो. तुम्हाला अपेक्षित असलेला आनंद आणि शांती तुम्हाला लाभो. आयुष्य हा एक प्रवास आहे, ते पथदर्शक पर्यटन नव्हे.

❋ ❋ ❋

# भोवतालच्या लोकांकडे पाहण्याचा दृष्टिकोन

समजा त्या मुलीला तुम्ही तुमच्या मित्राच्या घरच्या पार्टीमध्ये प्रथमच पाहत आहात. ती एकाकी बसून असेल आणि तिचे कपडे तितकेसे रूबाबदार नसतील. तुमच्या मित्रपरिवारात असलेला तरतरीतपणा, चलाखी तिच्याजवळ नसेल.

आणखी एक न आवडणारी गोष्ट म्हणजे ती तोंडात अन्नाचा घास ठेवूनच बोलण्याचा प्रयत्न करत असेल. हे सर्व पाहत असताना तुमच्या मनात नक्की विचार येत असतील की अशा कोणत्याही व्यक्तीच्या जवळपास सुद्धा आपणास जायला आवडणार नाही.

तुम्ही आतापर्यंत किती वेळा असे अनुभवले असेल?

काही दिवसांनंतर तुम्हाला लक्षात येईल की, जी मुलगी त्या दिवशी आपल्याला पार्टीमध्ये भेटली होती ती आपल्या मित्राच्या दृष्टीने एक फार चांगली व्यक्ती आहे. तिचे आतापर्यंतचे आयुष्य खूप खडतर होते. त्याच वेळी तुम्हाला प्रथम भेटीतील तिचे तोंड भरून हसणे आठवते. इतक्या कठीण कष्टदायक आयुष्यातून जाताना एखादी व्यक्ती इतके तोंडभरून प्रसन्न हास्य कसे चेहऱ्यावर आणू शकते याचे तुम्हाला फार आश्चर्य वाटते.

कित्येक वेळा एखाद्या माणसाबद्दल पहिल्या भेटीतच त्याच्याबद्दल मनाशी काही मते पक्की करून टाकता. त्यानंतर तुमच्या मनाने ठरविलेल्या मतानुसारच त्याच्या प्रत्येक कृतीकडे पाहत असता.

नशिबाने किंवा कमनशिबाने आपण माणसे काही तितकेसे सरळ साधे नसतो. कधी कधी आपण अगदी देवदूतासारखे वागतो तर केव्हातरी आपण अगदी ओंगळपणे खवचटासारखे वागतो. आपल्यापैकी प्रत्येकाजवळ काही असाधारण गुण असतात तसेच काही अत्यंत पराकोटीचे दुर्गुण असतात. तुम्हाला सहा आंधळ्यांनी हत्तीला हात लावून तो कसा दिसतो त्याचे वर्णन आपआपल्या समजुतीनुसार केले ती गोष्ट आठवत असेल ना? सोंडेला हात लावणाऱ्याला हत्ती सापासारखा वाटला. सुरा हाताला लागला त्याला बाणा सारखा भासला.. दोघेही जण प्रत्यक्षापासून खूप दूर होते. आपली अवस्था या दोन आंधळ्यांसारखीच असते.

एखाद्या व्यक्तीबद्दल मत बनविताना आपण त्याच्या ठरावीक स्वभावविशेषांकडे लक्ष देतो आणि त्यावरूनच आपण त्याचे व्यक्तिमत्त्व नक्की करतो.

आपण लोकांच्या चुकांकडे फार चटकन अंगुली दर्शवितो. स्वत:च्या चुका आणि कमीपणा याकडे मात्र काणाडोळा करतो. आपण अत्यंत ठामपणे दुसऱ्याबद्दल मतप्रदर्शन करतो आणि यामुळे आपण स्वत:चेच फार मोठे नुकसान करून घेत असतो. आपण त्यांच्याजवळच्या गुणांना वंचित होतो. मुख्य म्हणजे आपण एक चांगल्या मैत्रीला किंवा नातेसंबंधाला मुकतो. प्रत्येक व्यक्तीकडून काही ना काही शिकण्यासारखे असतेच. पण त्यासाठी आपण पूर्व ग्रहरहित असता कामा नये.

यासाठीच जॉर्ज बर्नार्ड शॉचे म्हणणे आठवते. त्याने म्हटले आहे, ''त्याला भेटलेला सर्वांत बुद्धिमान माणूस म्हणजे त्याचा शिंपी. कारण प्रत्येक खेपेला कपडे शिवताना तो माझे नव्याने माप घेतो.'' याप्रमाणेच आपण माणसाबद्दलचे मत प्रत्येक भेटी नंतर बदलायला शिकले पाहिजे. प्रत्येक वेळी त्याच्याकडे कोऱ्या व साफ नजरेतून पाहिले गेले पाहिजे. अशा चुकीच्या सवयीपासून मुक्त होण्यासाठी आणखी एक उपाय करावा लागेल. लोकांविषयी मते बनविताना समजूतदारपणा आणि समानुभूती बाळगणे गरजेचे ठरेल. प्रत्येकालाच काही ना काही त्रास कटकटी असतातच.

प्रत्येकाला कोणत्यातरी दिव्यातून जावे लागतेच. दुसऱ्याबरोबर बोलताना, वागताना या गोष्टीची जाणीव ठेवली तर आपले आयुष्य सुखकर होईलच आणि मन:शांती लाभेल. आपण त्याच्या जागी असतो तर आपल्याला काय वाटेल हे लक्षात घ्यावे. अशावेळी आपण दुसऱ्या पद्धतीने वागलो असतो का असे स्वत:लाच विचारावे. दुसऱ्याबद्दल मत बनविताना हे प्रश्न स्वत:च्या मनाला जरूर विचारावेत. आपल्या समजुतीपेक्षा लोक अधिक गुणसंपन्न असतात. अगदी वरपांगी आणि उथळ वाटणारा मनुष्य खूप मनस्वी, विचारी असू शकतो. त्याच्या उलट आपल्या नजरेत अत्यंत सद्वर्तनी माणसामध्ये छुपे दुर्गुण असू शकतात. यातून आपल्याला बऱ्याच गोष्टी शिकता येतील, खरेच बदल करता येतील आणि जेव्हा आपण हे डोळसपणे पाहू शकू किंवा हवा तसा बदल आपल्या स्वभावात घडवून आणू शकू तेव्हाच जगाकडे आणि भोवतालच्या लोकांकडे समजुतीच्या नजरेतून पाहू शकू. तेव्हाच मैत्रीचा आणि नातेसंबंधाचा आनंद घेता येईल.

❋ ❋ ❋

# मला काय हवे आणि मला काय आवश्यक आहे?

काल कार चालविताना काही सेकंद रेडिओ बंद पडला. लगेच मला वाटले माझ्याकडे आयफोन हवा होता. एकदम मला आठवले की मी माझा आयपॉड गेल्या सहा महिन्यांत वापरला नाही आणि इतरही अनेक वस्तु बरेच दिवसांत वापरल्या नाहीत. हँडी कॅम गेल्या दोन वर्षांत, डिजिटल कॅमेरा दोन महिन्यांत, डिव्हीडी प्लेअर गेल्या दोन महिन्यांत आणि पुष्कळ गोष्टी. आता मला आठवते आहे की हँडी कॅम मी फक्त हव्यासापोटी विकत आणला पण गेल्या चार वर्षांत वापरला फक्त दोन वेळा.

म्हणून विचार केला की, काय आणि कोठे चुकते आहे? मी माझ्याकडे किंवा माझ्या मित्रांकडे पाहतो तेव्हा हेच चित्र सर्वत्र दिसते. आमच्याजवळ जे असते त्याने आम्ही समाधानी नसतो. पण ज्या वस्तु आमच्याजवळ नसतात त्यांची हाव वाटून आम्हाला वाईट वाटून त्या नसल्याचा आम्हाला ताण येतो. तुमच्याजवळ सँट्रो आहे पण तुम्हाला होंडा हवी असते, होंडा असली तर तुम्हाला स्कोडा हवी असते. एक फोन विकत घेतला की दुसरा हवा असतो. आहे त्यापेक्षा बरा लॅपटॉप, मोठा टीव्ही, वेगवान कार, मोठे घर, जास्त पैसे, ही उदाहरणे अगणित आहेत. प्रश्न असा आहे की या गोष्टी महत्त्वाच्या आहेत का? आपल्याला त्या हव्या असे वाटण्यापूर्वी आपल्याला त्या आवश्यक आहेत का याचा आपण कधी विचार करतो का?

यानंतर मला काय जरूर आहे व काय जरूरीचे नाही याचा विचार करणे भाग पडले. कदाचित मला तो हँडी कॅम, तो आयपॉड किंवा डिव्हीडी प्लेअर याची जरूरी नव्हती. जेव्हा मला माझ्या वडिलांची आठवण येते तेव्हा लक्षात येते की त्यांच्याकडे साधा रंगीत टीव्ही आहे, ३२ इंची प्लाझ्मा, भिंतीवरचा सोनी टीव्ही नाही. त्यांच्याकडे साधा रु. २,५०० चा फोन आहे. तो बदलायचा असे विचारले की म्हणतात हा माझा फोनच आहे आणि मला फक्त फोन घेण्या आणि करण्यासाठी लागतो. माझी खात्री आहे ते या साध्यासाध्या साधनांमुळे आणि उपयोगितेमुळे रोजच्या जगण्यात माझ्यापेक्षा सुखी आहेत. ज्या काही छोट्या छोट्या वस्तू असूनही ते सुखी असण्याचे कारण म्हणजे त्यांना त्याच वस्तू चैनीच्या असाव्यात असा आग्रह नसतो. साध्या आणि चैनीच्या वस्तू वापरण्यात एक फार अंधुक अशी रेषा असते पण माझ्या वडिलांच्या राहण्याकडे पाहिल्यावर मला त्यात फार मोठे तथ्य वाटते. त्यांना फोन हवा आहे पण आयफोन हवा आहे असे नाही. त्यांना टीव्ही हवा आहे पण ३२ इंची प्लाझ्मा सोनी टीव्ही हवा असे नाही. त्यांना कार हवी आहे पण फार महागडी नको.

आपल्या पूर्वजांना जरूरी या चैनीच्या वाटत होत्या. आपल्याला आता चैनीच्या गोष्टी जरूरीच्या वाटू लागल्या आहेत. यामुळे आपले जगणे मोठे दयनीय होऊन गेले आहे.

❃ ❃ ❃

# महर्षी धोंडो केशव कर्वे आणि साहित्य सम्राट केळकर

## हे देणारे कुबेर कुठे गेले? (मंगेश तेंडुलकर)

असाधारण आणि असामान्य माणसं त्यांच्या वागण्या वावरण्यातून इतरांना बरंच मोलाचं असं काही देत असतात. त्यांच्याकडे पाहणाऱ्यांना सुद्धा बरंच काही मिळवता येतं. क्वचित एखाद्या प्रसंगात काही क्षण ही लोकोत्तर माणसं आपल्यासमोर येतात. पण आयुष्यभर लक्षात राहतात. न बोलता देखील खूप काही सांगून जातात. पुण्यातला तेव्हाचा लकडी पूल आणि जोंधळे चौक या दरम्यान (१९४१-४२ च्या आसपास) माझ्या वडिलांचं पुस्तकांचं दुकान होतं. समोर रस्त्याच्या पलीकडे किराणामालाचं एक मोठं दुकान होतं. घरी माझा व्रात्यपणा नियंत्रणाबाहेर जात असल्याकारणानं वडील मला दुकानात न्यायचे. संध्याकाळचा साडेपाचचा सुमार. समोर दुकानात आणि रस्त्यावर तुरळक वर्दळ होती. ते समोर दुकानात पाहिलेस? ते आपले धोंडो केशव कर्वे आहेत. वडिलांनी सांगताच माझं लक्ष त्यांच्याकडं गेलं. डोक्यावर टोपी, कृश, पाठीत पोक असलेले शांत गृहस्थ. त्यांनी तिथं धान्य खरेदी केलं. जवळपास अर्धं पोतं भरेल इतकं. दुकानाच्या कट्ट्याच्या पायऱ्या उतरून रस्त्यावर आले. कट्ट्यावरचं

धान्याचं पोतं पाठीवर घेतलं आणि रस्त्याकडं बघत पुलाच्या दिशेनं चालायला सुरुवात केली.

कुणी आपल्याकडं बघेल, मदत करील ही अपेक्षाच त्यांच्या चेहऱ्यावर नव्हती. हे माझं काम आहे आणि मीच ते करायचं, इतक्या सहजतेनं ते पोत्याचं ओझं पाठीवर घेऊन चालत होते. कर्मभूमी हिंगण्याच्या दिशेनं, त्यांची पावलं सावकाश चालत अंतर कापत होती.

जो तेव्हा पुण्यातला सर्वाधिक उद्धट, उर्मट समजला जायचा असा टांगेवाला धोंडो केशवांच्या दिशेनं पुढं गेला आणि त्यानं वळून पाहिलं. धोंडो केशवांना त्यानं ओळखलं. टांगा उभा करून तो खाली उतरला. धोंडो केशव त्याला हातानंच पुढं जायला सांगत होते.

धोंडो केशव यांच्या पायाला स्पर्श करून तो म्हणाला, माझ्या बापा. तुझ्या पाठीवरचं ओझं बघून मी पुढं गेलो तर देव मला नरकात पाठवील रे. आण ते पोतं इकडं.

पाठीवरचं पोतं घेऊन टांगेवाल्यानं ते त्याच्या टांग्यांत टाकलं. धोंडो केशव यांना हाताला धरून टांग्यात बसवलं आणि तो टांगा हिंगण्याच्या दिशेनं निघाला. हा प्रसंग, आज ७० वर्षं झाली तरी, जसाच्या तसा स्मरणात राहिला आहे. जे काम मी माझं म्हणून स्वीकारलं, ते मीच करायचं. कौतुकाची, मदतीची अपेक्षा न ठेवता ते करायचं. ज्यांच्यासाठी करायचं, त्यांच्यावर उपकार केल्याची भावना ठेवायची नाही. प्रसंगी कृतघ्नपणासुद्धा मुकाट स्वीकारायचा. नाउमेद व्हायचं नाही. करतो आहे ते चांगलं काम आहे. करत राहीन. माझ्या निर्णयाचा मान माझ्या वयाला आणि प्रकृतीला राखावाच लागेल... यातलं एक अक्षरही न बोलता, धोंडो केशव हे सांगून गेले. नुसतेच सांगून गेले, असं नाही तर पाहणाऱ्याच्या आयुष्यभर लक्षात राहील, असा परिणाम साधून गेले. धोंडो केशव यांच्या इतकाच तो अज्ञात टांगेवाला पण जन्मभर लक्षात राहिला. पेशा कोणताही असो, सर्वप्रथम मी जाणिवा जाग्या असलेला छान माणूस आहे. हे त्या टांगेवाल्याइतकं उत्कटपणे नाटका सिनेमांत आणि कथा कादंबऱ्यांत देखील कुणाला व्यक्त करता आलेलं नाही. थोडाथोडका नव्हे तर, ७० वर्षांहून अधिक काळ जसाच्या तसा परिणाम राहावा असा तो काही क्षणांचा प्रसंग, मजसारख्या सामान्य इसमाला नको इतके देऊन गेला. याच दरम्यानच्या काळात मला साहित्यसम्राट नरसिंह चिंतामण केळकर प्रथमच आणि एकदाच पाहायला मिळाले. माझ्या मित्राच्या नादाला लागून त्याच्याबरोबर मी गायनवादनाच्या एका क्लासला जात असे. हा प्रांत माझा नव्हता. फक्त कुतूहल होतं. तिथं विद्यार्थ्यांसमवेत गुरूजी बसलेले असताना कुणीतरी त्यांना सांगत आलं, बाहेर तात्यासाहेब आलेत. गुरूजी तेव्हाच्या रिवाजाप्रमाणं डोक्यावर काळी टोपी, खांद्यावर चवाळीचा पंचा ठेवत. धोतर गुडघ्याखाली ओढत तात्यासाहेबांना भेटायला, क्लासच्या दारात गेले. नरसिंह चिंतामण केळकर हे नाव घरी माझ्या कानावर पडत असे. ते कोण आहेत, ते मी आज पाहत होतो. प्रसन्न चेहरा, डोक्यावर पगडी, हातात चांदीच्या मुठीचा सोट (काठी नव्हे), लालकाडीचं धोतर, निळा लांब कोट, उपरणं आणि पायात तांबडे पुणेरी जोडे. स्थूल. पोट पुढं काढून उभे. तात्यासाहेब, आज माझ्याकडे काय काम काढलंत? गुरूजींनी नम्रपणे विचारलं. सुपारीचं खांड गालाच्या दिशेनं वळवून तात्यासाहेब उत्तर देत होते. आयुष्यात जे जे करावंसं वाटलं, ते करून झालं. साहित्य झालं. समाजकारण झालं. राजकारण झालं. केसरीच्या संपादकपदावरूनही आता निवृत्त झालो. आता गाणं शिकायचं म्हणतो.

हे ऐकून गुरुजी स्तिमित झाले; पण ते फटकळ तोंडाचे मनात येईल ते बंदुकीच्या गोळीसारखं धाडदिशी बोलायचे. क्षणार्धात ते तात्यासाहेबांना म्हणाले, 'गाणं शिकायचं म्हणता, ते ठीक आहे. पण आता उशीर झाला, हे ऐकून तात्यासाहेब डिस्टर्ब झाले. पण मनातला डिस्टर्बन्स त्यांनी सुपारीच्या खांडासोबत गिळला. म्हणाले, ''मास्तर, असं पाहा.... मी केसरीचा संपादक असलो म्हणजे मला गाणंसुद्धा येतं, असा मी समज करून घेतला असता तर नारायण पेठेतल्या गायकवाडवाड्यानजिकची निम्मी वस्ती उठून निघून गेली असती. केसरीचा संपादक असलो, तरी गाण्याच्या प्रांतात मी ''ढ! एवढ्यासाठी तुम्हाला विचारायला आलो, गाणं शिकवता का? तर तुम्ही मला अध्यात्म सांगायला सुरुवात केलीत. उशीर झाला, वगैरे.

''गाण्यातले तुम्ही गुरू म्हणजे तुम्हाला अध्यात्मपण समजले, हा स्वत:बद्दलच्या गैरसमजाचा विपर्यास झाला. सोडून द्यावा तो. तुमच्या माहितीसाठी एवढंच सांगतो, कलेच्या प्रांतातले प्रवास कधी एका जन्मात संपत नाहीत. जन्मजन्मांतरी चालू

राहतात. मी आता गाणं शिकलो, तर मला पुढच्या जन्मात नक्की उपयोग होईल. मग काय करता? ''

गुरूजी विनम्रपणे तात्यासाहेबांना म्हणाले, ''या मग उद्यापासून.''

दुसऱ्या दिवशी सकाळी साडेसात वाजता ती पगडी हातात तानपुरा घेऊन सप्तकं आळवत बसलेली मी पाहिली.

या प्रसंगातून तेव्हा जो खजिना मी पळवला, त्याची मोजदाद मला आजदेखील पूर्ण करता आलेली नाही.

❋ ❋ ❋

# माझ्या मुलाला न्या

एक अत्यंत श्रीमंत माणूस आणि त्याचा मुलगा दोघेही जण कलेचे भोक्ते होते. त्यांनी बऱ्याच प्रसिद्ध कलाकारांच्या पेंटिंग्जचा संग्रह केला होता. त्यांच्या संग्रहामध्ये सर्व मोठमोठे कलाकार पिकासोपासून ते रफेल, इ. सगळ्यांची पेंटिंग्ज होती. बाप लेक दोघे अनेक वेळा एकत्र बसत, पेंटिंग्जवर चर्चा करीत, त्यातील बारकावे बोलून दाखवित. त्या पेंटिंग्जच्या श्रेष्ठत्वावर टिप्पणी करत.

व्हिएतनाम युद्ध सुरू झाले. मुलगा अतिशय धैर्याचा होता. तो लढाईत फ्रंटवर गेला. दुसऱ्या सैनिकाला वाचविताना आपला जीव धोक्यात घातला आणि दुर्दैवाने त्याला वीरश्री प्राप्त झाली. वडिलांना कळविण्यात आले. त्यांचे सांत्वन करण्यात आले. एकुलता एक मुलगा गमावल्याबद्दल सगळ्यांनी त्यांना आधार दिला.

त्यानंतर साधारण ख्रिसमसच्या आधी एक आठवडा त्यांच्या घराच्या दारावरची बेल वाजली. एक तरूण हातात भले मोठे पॅकेज घेऊन उभा होता. तो म्हणाला, ''सर तुम्ही मला ओळखत नाही. पण तुमच्या मुलाने ज्याच्यासाठी आपले प्राण गमावले तोच मी सैनिक आहे. माझ्याआधी त्याने अनेक सैनिकांचे प्राण वाचविले. मी जखमी झाल्यानंतर मला उचलून सुरक्षित जागी आणीत असताना त्याला शत्रूची गोळी छातीत लागली. त्यात त्याला तत्काळ वीरमरण आले. सर तो नेहमी तुमच्याबद्दल बोलत असे. तुमच्या कलेवरच्या प्रेमाबद्दलही बोलत असे.'' त्या तरूणाने बरोबर आणलेले ते पॅकेट पुढे केले. ''मला ठाऊक आहे हे फारसे काहीच नाही. मी काही फार चांगला कलाकार नाही. पण मला वाटते की तुमच्या मुलाला हे पेंटिंग तुमच्याजवळ असावे असे नक्की वाटत असावे.'' वडिलांनी ते पॅकेट उघडले. त्या सैनिकाने केलेले त्या मुलाचे पेंटिंग होते. त्या पेंटिंगकडे वडील आश्चर्याने एकटक पाहतच राहिले. सैनिकाने मुलाच्या व्यक्तिमत्त्वाचे अप्रतिम गुणविशेष चित्रित केले होते. चित्रामध्ये मुलाचे डोळे इतके पाणीदार आले होते की वडिलांचे डोळे चटकन पाणावले. त्यांनी सैनिकाचे आभार मानले आणि त्याला पेंटिंगसाठी पैसे देऊ केले.

''नाही नाही सर, तुमच्या मुलाने माझ्यासाठी काय केले ते मी सांगू शकत नाही. मला त्याची परतफेड करणे अशक्य आहे. माझ्यातर्फे ही तुम्हाला आदरपूर्वक भेट आहे.''

वडिलांनी ते पेंटिंग आकर्षक जागेवर लावून ठेवले. जी जी माणसे त्यांचे पेंटिंग्जचे प्रदर्शन पाहायला येत, त्या सगळ्यांना इतर पेटिंग्ज दाखविण्याआधी मुलाचे पोट्रेट ते आवर्जून दाखवित असत.

तो श्रीमंत मनुष्य थोड्या महिन्यातच निधन पावला. त्याने जमविलेल्या असंख्य पेंटिंग्जचा लिलाव होणार असतो. अनेक धनाढ्य लोक, अनेक चित्रकलेचे शौकिन लोक त्या लिलावात असलेल्या अनेक प्रसिद्ध चित्रकारांची चित्रे खरेदी करण्यास उत्सुक असतात. ती एक त्यांच्यासाठी उत्तम पेंटिंग्ज संग्रही ठेवण्याची पर्वणीच असते. लिलावाच्या सभागृहात मुलांचे पेंटिंग चौथऱ्यावर उभे करून ठेवलेले असते. लिलाव करणारा लिलाव सुरू करण्यासाठी त्याचा गाँग वाजवतो. ''सर्वप्रथम आपण त्यांच्या मुलाच्या पेंटिंगच्या लिलावापासून सुरूवात करणार आहोत. कोण कितीची बोली लावतो आहे?''

मागून आवाज येतो. ''आम्ही येथे प्रसिद्ध चित्रकारांची पेंटिंग्ज विकत घ्यायला आलो आहोत. हे पेंटिंग बाजूला ठेवा.'' परंतु

लिलावाचा व्यवस्थापक त्याच्या म्हणण्यावर ठाम असतो. ''बोला कोण हे चित्र विकत घेऊ इच्छितो? १०० डॉलर, २०० डॉलर?'' आणखी एक रागावलेला आवाज येतो. ''आम्ही ही असली चित्रे पाहायला आलो नाही. पिकासो, व्हॅन गोव्ह, अशा थोर कलाकारांची पेंटिंग्जच्या लिलावास सुरुवात करा.''

तरीही लिलाव करणारा पुढे म्हणाला, ''मुलाचे पेंटिंग! मुलाचे पेंटिंग!! कोण घेणार मुलाला?'' शेवटी अगदी पाठीमागून आवाज आला. तो आवाज त्या बंगल्याचे बागकाम गेली अनेक वर्षे करणाऱ्या माळ्याचा होता. ''मी दहा डॉलरला ते पेंटिंग विकत घेऊ इच्छितो.'' गरीब असल्याने तो तेवढीच किंमत देऊ शकत होता.''बोला, दहा डॉलरची बोली आली आहे. कोणी वीस डॉलरची बोली करू इच्छितो आहे का?''

''देऊन टाका हे त्याला आणि आता उत्तम पेंटिंग्ज दाखवा.'' जमलेले लोक अस्वस्थ होत होते. त्यांना राग येत होता. त्यांना ते मुलाचे चित्र नको होते. व्यवस्थापकाने परत गाँग वाजविला. ''एक बोली, दोन बोली. चित्र दहा डॉलरला विकले.'' त्याने त्याच्या हातातील गाँग खाली ठेवून सांगितले, ''माफ करा पण लिलाव संपला आहे. मला जेव्हा लिलाव करण्यास बोलावले गेले, तेव्हा एक अट मृत्युपत्राप्रमाणे गुप्त ठेवण्यात आली होती. मुलाचे चित्र विकले गेल्यानंतरच ती गुप्त अट उघड करायला मला परवानगी होती. त्या अटीप्रमाणे जो कोणी मुलाचे पेंटिंग विकत घेईल तोच या सर्व इस्टेटीचा व पर्यायाने सगळ्या पेंटिंग्जचा वारसदार होईल. ज्या माणसाने मुलाला घेतले त्याला सगळे मिळेल.''

जमलेले सगळे अवाक् होऊन पाहतच राहिले.

❃ ❃ ❃

# माणुसकीचे नाते....

**त्या** जोडप्याला लग्नानंतर अकरा वर्षांनंतर पुत्रप्राप्ती झाली होती. त्या दोघांचे एकमेकांवर अफाट प्रेम होते. बऱ्याच उशिरा झालेल्या आपल्या मुलावर त्यांचे प्राणापलीकडे प्रेम होते. मुलगा दोन वर्षांचा झाला होता.

रोजच्याप्रमाणे घाईघाईने ऑफिसला जाताना एके दिवशी सकाळी नवऱ्याने जमिनीवर पडलेली एक औषधाची बाटली पाहिली. ऑफिसला उशीर होत असल्या कारणाने जाता जाता ती औषधाची बाटली आठवणीने बंद करून कपाटात ठेवण्यास त्याने पत्नीला बजावले. पत्नी हो म्हणाली परंतु ती स्वयंपाकघरात कामात खूप बिझी होती. त्यामुळे ती बाटली उचलून ठेवण्यास ती साफ विसरून गेली. तो दोन वर्षांचा मुलगा खेळतच होता. त्याला खेळता खेळता ती खाली असलेली औषधाची बाटली दिसली. त्यातील औषधाच्या रंगाचे त्याला खूप आकर्षण वाटले. दुर्दैवाने ते औषध अपायकारक विषारी होते. मोठ्या माणसांना सुद्धा अगदी प्रमाणात व तेही डॉक्टरांच्या सल्ल्याने घेण्याच्या त्यावर सूचना होत्या. गंमत वाटून त्या मुलाने ती औषधाची बाटली तोंडाला लावली व त्यातील औषध पिऊन टाकले. मुलगा तत्काळ बेशुद्ध पडला. त्याच्या आईच्या लक्षात येताच तिने त्याला ताबडतोब दवाखान्यात नेले. पण तोवर व्हायचा तो वाईट परिणाम त्या औषधाने केला होता. त्या मुलाचे प्राण डॉक्टर वाचवू शकले नाहीत. मुलाची आई सुन्न होऊन गेली. मुलाच्या जाण्याचे दु:ख तर होतेच पण या परिस्थितीत नवऱ्याला कसे सामोरे जायचे या भीतिने तिला दरदरून घाम फुटला.

काही वेळातच ही घटना समजल्यामुळे बधीर झालेला त्या मुलाचा बाप लगेच दवाखान्यात हजर झाला. त्याने गतप्राण झालेल्या आपल्या लाडक्या मुलाकडे डोळे भरून पाहिले. निर्विकारपणे दोन मिनिटे उभा राहिला. जवळच असलेल्या आपल्या पत्नीकडे त्याने साश्रू नयनांनी पाहिले आणि तो तिला एवढेच म्हणाला ''हे पाहा, तुला काय वाटते ते मी समजू शकतो. मी तुझ्या पाठीशी आहे.''

नवऱ्याचे ते शब्द तिला अनपेक्षित होते. त्या परिस्थितीत तिला समजावून घेऊन धीर देणारे होते.

घडलेल्या घटनेमुळे मुलाचे प्राण तर गेलेच होते. त्याला पुन्हा जिवंत करणे हे तर अशक्यच होते.

त्याबद्दल पत्नीला दोष देण्याने काहीच साध्य होणार नव्हते. ऑफिसला जाण्यापूर्वी त्याने स्वत:च उघडी पडलेली औषधाची ती बाटली बंद करून कपाटात ठेवली असती तर हा प्रसंगच उद्‌भवला नसता, याची त्याला मनोमन जाणीव होती.

दोष कोणी कोणाला देऊ शकत नव्हते. त्या स्त्रीने सुद्धा आपला एकुलता एक मुलगा गमावला होता. तिला त्या वेळी जरुरी होती सहानुभूतिची, आधाराची, तिला समजून घेण्याची आणि तिच्या पतीने हेच तिला पुरेपूर दिले.

या जगात प्रत्येक जण असा विचार करून दयाळू, कनवाळू वृत्तीने आणि समजूतदारपणे वागेल तर अनेक प्रश्न चुटकीसरशी सुटतील व आपआपसातील मतभेद, गैरसमज फार कमी शिल्लक राहतील.

''एक छोटे पाऊल उचलल्यामुळे हजारो मैलांचा प्रवास सुखकर होतो.''

तुमच्या मनात दुसऱ्याबद्दलचे असणारे वैर, विरोध, मत्सर, हेवा याचा नाश करा. स्वार्थीपणा, दुसऱ्याला माफ न करण्याची वृत्ती आणि त्याबरोबरच मनातील भीती यांना थारा देऊ नका. हे तुम्ही केलेत तर कोणतीही गोष्ट खरोखरच कठीण नाही हे तुमच्या ध्यानात येईल.

अनेक वेळा आपण कोणत्याही घटनेला कोण जबाबदार आहे याचा शोध घेण्याचा प्रयत्न करतो.

त्यासाठी कोणाला दोष द्यायचा हे जाणून घेण्यासाठी जिवाचा आटापिटा करतो. मग ते आपल्या नातेसंबंधात असो, नोकरीच्या ठिकाणी असो, अगर आपल्या भोवतालच्या ओळखीच्या लोकांमध्ये असो. हे करीत असताना आपण परस्परांमधील जिव्हाळा, प्रेम, आपलेपणा हरवून बसतो.

❋ ❋ ❋

# मुंगीकडून मिळालेला धडा

रविवारची सकाळ. एक श्रीमंत माणूस घराच्या बाल्कनीमध्ये सूर्यकिरणांचा आनंद घेत बसला होता. कॉफी घेत असताना एक मुंगी त्याचे लक्ष वेधून घेते. मुंगी बाल्कनीच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकाला जात होती. जात असताना ती भले मोठे झाडाचे पान बरोबर ओढून नेत होती. ते पान तिच्यापेक्षा कितीतरी पट मोठे होते. तो माणूस मुंगीचा हा प्रवास एक तास पाहत होता. त्याला मुंगीच्या त्या प्रवासात आलेले अनेक अडथळे दृष्टीस पडले. पण त्या वेळी मुंगी जरा थांबली, वेगळा रस्ता घेतला आणि आपल्या नियोजित ठिकाणाकडे पुढे गेली. एका जागेवर तो लहानसा प्राणी जमिनीच्या एका भेगेपाशी येऊन अडकला. थोडा वेळ मुंगी थांबली. परिस्थितीचा विचार केला. विचारांती ते झाडाचे पान मुंगीने त्या जमिनीच्या भेगेवर आणले. स्वत: त्याच पानावरून भेगेच्या पलीकडे गेली. परत ते पान पकडले आणि आपला पुढचा प्रवास सुरू केला.

मुंगीच्या त्या हुशारीने माणूस मंत्रमुग्ध झाला. देवाने निर्मिलेला लहानात लहान प्राणी. माणूस थक्क होऊन त्या लहानशा प्राण्याच्या निर्मितीबद्दल खोल विचार करायला लागला. त्या छोट्या प्राण्याचा मोठेपणा दिसून आला. देवाने निर्मिलेला तो लहानसा प्राणी त्याच्या नजरेसमोर होता. आकाराने लहान असला तरी बुद्धिने अफाट होता. परिस्थितीचे विश्लेषण, गंभीर विचार करणे, कारणमिमांसा करणे, उपाय शोधणे, तो अमलात आणणे आणि आलेल्या अडचणीतून बाहेर पडणे. अचंबा वाटावे असेच होते. या त्याच्या अफाट क्षमतेबरोबरच मानवाच्या उणिवा पण त्याच्यामध्ये असलेल्या त्या माणसाच्या ध्यानात आल्या.

एक तासाच्या अखंड प्रयत्नानंतर तो लहानसा प्राणी त्याच्या नियोजित मुक्कामाला पोहोचला. जमिनीला असणारे छोटेसे भोक त्याला दिसले. इतक्या दूरवरून सर्व शक्ती व प्रयत्नांनी ओढून आणलेले त्याच्या शरीरापेक्षा अनेक पटीने मोठे असणारे पान तो आपल्या छोट्याशा प्रवेशद्वारातून आत नेणे शक्यच नव्हते. त्यामुळे त्या छोट्या प्राण्याला कुशलतेने, अनेक अडचणींवर मात करून वाहून आणलेले ते पान तसेच सोडून देऊन आपल्या निवासात परतावे लागले होते.

हा खडतर प्रवास सुरू करण्यापूर्वी मुंगी अखेरच्या टप्प्यातील या अडचणीचा विचार करू शकली नव्हती. त्यामुळे संपूर्ण

प्रवासात ते झाडाचे पान म्हणजे मुंगीला एक ओझे वाहून आणल्यासारखे झाले. त्या लहान प्राण्याला ते निवासाबाहेर सोडून येण्याशिवाय दुसरा पर्यायच नव्हता.

त्या माणसाला एक महत्त्वाचा धडा त्या दिवशी मिळाला. त्याच्याही आयुष्यात हेच घडते असे नाही का? आपण आपल्या कुटुंबाची चिंता करतो. आपल्या नोकरीची चिंता करतो. जास्त पैसे कसे मिळवायचे याची चिंता करतो. आपण कोठे राहायचे, ५ बेडरूम की ६ बेडरूमचे घर घ्यायचे, कोणती कार घ्यायची, मर्सिडीज, बीएम्डब्ल्यू का लेक्सस, कोणते कपडे वापरायचे एक ना अनेक चिंता आपल्याला छळत असतात. त्या घेऊनच आपण आपल्या शेवटच्या मुक्कामाला पोहोचतो.... स्मशानात. आपल्या आयुष्याच्या प्रवासात आपण हे जरूरी नसलेले ओझे उगाचच काळजी करून वाहात आहोत हे ध्यानातच येत नाही. हवे असलेले ते सर्व आपण गमावू या भीतिपोटी आपण ते सांभाळीत बसतो. आयुष्याच्या अखेरीस ते सगळे इथेच सोडून जायचे असते.

❋ ❋ ❋

# मुलगा आणि परमेश्वर

मुलाच्या ऑपरेशनसाठी ती हॉस्पिटलच्या बाकावर बसली होती. सर्जन ऑपरेशनरूममधून बाहेर पडलेले दिसताच तिने धावत जाऊन विचारले, ''कसा आहे माझा छोकरा? तो बरा होईल ना? मी त्याला कधी भेटू शकेन?'' सर्जनने गंभीर होत सांगितले, ''माफ करा, आम्ही प्रयत्नांची शिकस्त केली पण नाइलाज झाला.'' सॅली म्हणाली, ''लहान मुलांना का म्हणून कॅन्सर होतो? परमेश्वर त्यांची काळजी घेत नाही का? परमेश्वरा, माझ्या मुलाला जेव्हा तुझी जरूरी होती तेव्हा तू कोठे होतास?''

सर्जनने सॅलीला विचारले, ''तुला तुझ्या मुलाजवळ थोडा वेळ एकटीला बसायचे आहे का? एक नर्स थोड्याच वेळात बाहेर येईल. मग तुझ्या मुलाला आम्ही युनिव्हर्सिटीत घेऊन जाऊ.''

पण सॅलीने नर्सला ती मुलाचे शेवटचे दर्शन घेताना तिथेच थांबायला सांगितले. तिने जिमीच्या दाट, भुऱ्या, कुरळ्या केसातून आपली बोटे अत्यंत प्रेमाने फिरविली. ते पाहून नर्सने सॅलीला विचारले, ''तुम्हाला त्याच्या केसांची बट आठवण म्हणून हवी आहे का?'' सॅलीने मानेनेच हो म्हटले. नर्सने केसांचा एक पुंजका कापून एका प्लास्टिक पिशवीत भरून तो सॅलीला दिला.

सॅली सांगू लागली, ''अभ्यास व रिसर्चसाठी तो गेल्यानंतर त्याची बॉडी युनिव्हर्सिटीला दान करावी अशी जिमीचीच इच्छा होती. तो म्हणाला तसे केल्याने दुसऱ्या कोणाला तरी त्याचा फायदा होईल. मी प्रथमत: त्यासाठी तयार नव्हते. पण जिमी परत म्हणाला, मी गेल्यावर मला त्या बॉडीचा काहीच उपयोग नाही. कदाचित त्याच्या अभ्यासामुळे एखाद्या मुलाला एक दिवस जास्त त्याच्या आईबरोबर राहता येईल की नाही मॉम? माझा जिमी मनाने फार चांगला होता, त्याच्या हृदयात सतत कणव असे. त्याला शक्य होईल तेवढी तो इतरांना मदत करीत असे.''

गेल्या सहा महिन्यांत ती जिमीसाठी हॉस्पिटलमध्येच त्याच्याबरोबर राहिली होती. सहा महिन्यांनंतर ती तिथून बाहेर पडत होती. जिमीच्या सगळ्या वस्तू भरलेली बॅग तिने कारमध्ये शेजारच्या सीटवर ठेवली. एकटीला गाडी चालवित घरी येणे तिला फार जड जात होते. त्याहीपेक्षा घर उघडून रिकाम्या घरात पाऊल ठेवणे अत्यंत कठीण होते. कसेतरी स्वत:ला सावरीत जिमीच्या सामानाची बॅग व त्याच्या केसांच्या बटांची प्लास्टिक पिशवी घेऊन ती सरळ जिमीच्या खोलीतच शिरली.

जिमीच्या आवडत्या कार मॉडेल्स तिने त्याच्या नेहमीच्या जागी लावून ठेवल्या. त्याचे इतर सामानही तो जसे ज्या जागी ठेवित होता तसेच त्या जागी तिने ठेवले. त्याच्या बेडवर तोंड खुपसून ती आडवी झाली. उशीला घट्ट कुशीत घेऊन मिठी मारली. तिला कधी डोळा लागला समजलेच नाही. मध्यरात्री केव्हातरी सॅलीला जाग आली. तिच्याशेजारी बेडवर एक लिफाफा पडलेला तिला आढळला. लिफाफा उघडून त्यातील पत्र ती वाचू लागली. ''मला ठाऊक आहे, माझे नसणे तुला फार त्रास देणार आहे. पण मी तुला कधी विसरेन, किंवा माझे तुझ्यावरचे प्रेम कमी होईल, असे मुळीच समजू नकोस. फक्त मी तुझ्याजवळ

नाही आणि मी 'आय् लव्ह यू' असे म्हणायला नाही; पण मी तुझ्यावर कायमच प्रेम करतो. प्रत्येक दिवशी थोडे जास्तच. पुढे काही दिवसांनंतर आपण परत भेटणार आहोत. तुला एकटे वाटू नये म्हणून तू त्या वेळेपर्यंत एखादा छोटा मुलगा दत्तक घेतलास तरी माझी हरकत नाही. मला नक्की ते चालेल. त्याला माझी रूम आणि माझी खेळणी आणि इतर वस्तू खुशाल वापरू दे. पण मुलाऐवजी जर तू मुलीला दत्तक घेतलेस तर कदाचित मुलाला आवडतील तशा माझ्या वस्तू व खेळणी तिला आवडणार नाहीत. तुला तिच्यासाठी बाहुल्या आणि मुलींना आवडतात त्या सगळ्या गोष्टी आणाव्या लागतील.

माझा विचार करत बसून दु:खी राहू नकोस. खरोखरच ही फार मस्त जागा आहे. मी इथे आल्याबरोबर मला आजी आणि आजोबा भेटले. त्यांनी मला हिंडून बरेच दाखविले. सगळे पाहायला बराच वेळ लागेल. देवदूत फार छान आहेत. अगदी शांत आहेत. त्यांना उडत जाताना पाहून मला खूप मजा वाटते आणि तुला ठाऊक नाही, अगं जीजस जसा त्याच्या फोटोत दिसतो तसा दिसत नाही. तरी जेव्हा मी पाहिले तेव्हा त्याला लगेच ओळखले. जीजस स्वत: मला परमेश्वराकडे घेऊन गेला आणि ओळख पाहू मॉम तिथे काय झाले असेल. मला परमेश्वराने मांडीवर बसवून घेतले आणि जणू काही मी फार महत्त्वाची व्यक्ती असावी अशातऱ्हेने परमेश्वर माझ्याशी बोलला. तेव्हाच तर मी त्याला सांगितले की मला तुला अच्छा करण्यासाठी व इथली खुशाली कळविण्यासाठी पत्र लिहायचे आहे. पण तसे करता येणार नाही हे मला आधीच माहीत होते. मग काय झाले मॉम, परमेश्वराने मला कागद आणि त्याचे स्वत:चे पेन काढून दिले. त्यानेच तर मी तुला हे पत्र लिहीत आहे. मला वाटते तुझ्याकडे हे पत्र नेऊन देणाऱ्या देवदूताचे नाव गॅब्रियल आहे. परमेश्वर म्हणाला तू विचारलेल्या एका प्रश्नाचे उत्तर मी तुला पत्रातून कळवावे. तू विचारले होतेस, मला जेव्हा जरूरी होती तेव्हा परमेश्वर कोठे होता? परमेश्वर म्हणाला तो माझ्याजवळच होता. तसाच तो जीजस क्रॉसवर गेला तेव्हाही तिथे त्याच्याजवळ होता. तो असाच त्याच्या सर्व मुलांबरोबर असतो.

ओह! अगं मॉम तुझ्याशिवाय इतर कोणीही हे पत्र वाचू शकणार नाही. इतरांसाठी हा नुसता कोरा कागद आहे. आहे की नाही गंमत? आता मला परमेश्वराला त्याचे पेन परत द्यायचे आहे. आणखी काही लोकांची नावे त्याच्या यादीत लिहिण्यासाठी त्याला त्याचे पेन हवे आहे. आज रात्री मी जीजसबरोबर जेवण करणार आहे. जेवण नक्कीच चविष्ट असेल.

आणखी एक गोष्ट तुला सांगायची राहूनच गेली. मला आता कसलाही त्रास होत नाही. माझा कॅन्सर पूर्ण बरा झाला आहे. मला खूप आनंद होत आहे कारण मी ते दुखणे सहन करून शकत नव्हतो. देवालाही माझे दु:ख जास्त पाहवत नव्हते. म्हणून तर दयेच्या देवदूताला परमेश्वराने मला घ्यायला पाठविले होते. मी म्हणजे खास बोलावून आणलेला आहे. काय कसे वाटले?

खाली सही करणार, देवाच्या कृपेने, जीजस आणि मी.

❋ ❋ ❋

# मोअर दॅन अ हिरो : मुहमद अलीज लाईफ लेसन्स

खाली दिलेला प्रसंग मुहमद अलीच्या मुली जेव्हा घरी येतात तेव्हा घडलेला आहे. त्यावेळी मुलींनी मर्यादाशील कपडे न परिधान करता अशोभनीय कपडे परिधान केले होते. त्याच्या एका मुलीने वर्णन केलेली ही कथा आहे. आम्ही जेव्हा घरी पोहोचलो तेव्हा आमच्या कारच्या ड्रायव्हरने आम्हाला घरात आणून सोडले. लैला आणि मी तडक वडिलांच्या खोलीत गेलो. नेहमीप्रमाणे डॅडी दारामागे आमची थट्टा करण्यासाठी लपून उभे होते. आम्हाला पाहताच अनेक वेळा त्यांनी आम्हाला जवळ घेतले. थोपटले. गालाचे मुके घेतले. केसावरून हात फिरविला.

डॅडींनी आमच्याकडे एकदा खालपासून वरपर्यंत बघितले. नंतर ते मला त्यांच्या मांडीवर घेऊन बसले आणि ते जे बोलले ते मी आयुष्यभर कधीही विसरू शकणार नाही. त्यांनी माझ्या सरळ डोळ्याला डोळा भिडवून पाहत ते म्हणाले, ''हना, ईश्वराने जे जे मौल्यवान या पृथ्वीवर आणले ते ते सगळे झाकलेल्या अवस्थेत आपल्याला दिसले. ते सगळे मिळवायला फार कष्ट पडतात.

आपल्याला डायमंड – हिरे कोठे मिळतात? अगदी जमिनीखाली, खूप स्तरांनी झाकलेले व सुरक्षित असलेले. आपल्याला पर्ल – मोती कोठे मिळतात? खोल महासागराच्या तळाशी, तेही सुंदर अशा शिंपल्यात सुरक्षित व आच्छादित असतात. आपल्याला सोने कोठे मिळते? खूप खाली खाणीमध्ये, ते सुद्धा अनेक खडकांच्या थराखाली मातीत दडून बसलेले असते. हे सर्व मिळविण्यासाठी माणसाला अपार कष्ट करावे लागतात.''

त्यांनी एकवार माझ्याकडे गंभीरपणे पाहिले, पुढे म्हणाले, ''तुमचे शरीर अलौकिक व पवित्र आहे. माझ्यासाठी तुम्ही हिरे, मोत्यापेक्षा फार मौल्यवान आहात. त्यामुळे तुमचे शरीर पण पूर्ण आच्छादित व सुरक्षित असले पाहिजे.''

तीन वेळा हेवीवेट मुष्टीयुद्धाचा जगज्जेता हा जगाला एक थोर माणूस म्हणून परिचित आहे. त्याच्या मुलींना तो फक्त डॅडी म्हणून माहीत होता. त्याच्या मुलीने, हॅनाने त्याच्या आठवणी त्याला आदरांजली म्हणून प्रसिद्ध केल्या आहेत. तिच्यासाठी आणि जगासाठी त्या आठवणी म्हणजे जगण्याचे पाठ आहेत. जगातील एका अतिशय आदरणीय व्यक्तीचे वैयक्तिक पण लक्षणीय विचार पुस्तकरूपाने जगासमोर आणले आहेत. हॅनाने पुस्तकात अलीचे मौलिक विचार, कविता, दुर्मीळ फोटो एकत्र केले आहेत. तिने या जगप्रसिद्ध व्यक्तीचे ज्ञान, समज व सामाजिक बांधिलकी हे पैलू पण विश्वासपूर्वक वर्णन केले आहेत. मुहमद अली दुर्दैवाने पार्किनसन सारख्या दुर्धर आजाराला सामना करत होता. पण त्या आजाराला न जुमानता तो आफ्रिका आणि अमेरिकेचा अभिमान म्हणूनच जगला. शेवटपर्यंत तो दारिद्र्य व वंशवाद या विरोधात लढत होता.

वरील मजकूर हॅनाने लिहिलेल्या 'मोअर दॅन अ हिरो : मुहमद अली' या पुस्तकातून घेतला आहे.

❋ ❋ ❋

# युक्तिवाद कसा करावा व त्यात जिंकावे कसे

युक्तिवाद किंवा वादविवाद करण्याच्या प्रक्रियेत दुसऱ्याला न दुखावता आपले मुद्दे कसे मांडावेत हा बऱ्याच लोकांना प्रश्न पडतो. तुमची मते मांडून परिणामकारकरितीने समस्यापूर्ती कशी करायची यासाठी काही क्लृप्त्या आहेत. तसेच युक्तिवाद कसा यशस्वीपणे करायचा याच्या पण काही मौलिक सूचना आहेत.

युक्तिवादादरम्यान मन शांत ठेवा आणि तुमच्या आवाजाची पातळी खालची ठेवा. तुमच्या बोलण्यातून बाहेर पडणारी ऊर्जा समोरच्या माणसाला मिळते. तुमच्या शांत असण्याचा समोरचा मनुष्य वेगळा अर्थ काढतो. त्याला तुमच्यापासून फारसा धोका दिसत नाही आणि तो निष्काळजी राहतो. तुम्ही जरी भावनाविवश झालात तरी तुमची प्रतिष्ठा कमी होऊ देऊ नका. अचानकपणे एकदम आक्रमक बनू नका. तुमच्या आवाजाची पातळी वाढू देऊ नका. अत्यंत धीमेपणाने मुद्दे मांडा. आवाजाची पातळी व बोलण्याचा वेग यात सातत्य ठेवा. शक्यतो आरामात बोला. तुमच्या शरीराच्या हालचालीवर ताबा ठेवा. ताठ सरळ व आरामात बसण्याने तुम्ही जबरदस्त वाटाल पण आक्रमक होऊ नका. बोलण्यातून दुसऱ्याचा अपमान करू नका. जेव्हा लोक रागात असतात तेव्हा ते जास्तच संवेदनाशील असतात. अगदी छोटी केलेली टिप्पणीसुद्धा त्यांचा अपमान करायला पुरेशी ठरते. तुम्ही दुसऱ्याचे ऐकून घेण्याची तयारी दाखवा. दुसऱ्याचा आदर होईल असेच बोला. तुम्ही दुसरे जे म्हणतात त्याच्याशी सहमत होत नसाल; पण तुम्ही जसे तुमच्या मतावर ठाम असता तसेच ते त्यांच्या मतावर ठाम असतात हे लक्षात ठेवा.

उचित मध्यम मार्ग स्वीकारा. वादातून निष्पन्न होणारे निष्कर्ष संपूर्णत: तुमच्या मनाप्रमाणेच असतील असे समजू नका. तुम्हाला हवे तसेच सदासर्वदा घडेल असे गृहीत धरू नका. संवाद फार लांबवू नका. फार ताणून धरले तर त्या मुद्याचे महत्त्वच कमी होते. वादविवादात भाग घेतलेल्या प्रत्येकास बोलण्याची व त्याचे मुद्दे मांडण्याची संधी द्या. आपले म्हणणे कोठवर ताणून धरायचे ते मनाने निश्चित करा. समोरचा माणूस जर रागात असेल, उपद्रवी असेल किंवा हलक्या शब्दांचा वापर करीत असेल तर त्याच्याशी संवाद करणे अशक्य होईल. अशा वेळी तुम्ही तिथून निघून जाणे हेच शहाणपणाचे ठरेल. तुमचा वाद जर खालच्या

दर्ज्याच्या माणसाशी होत असेल व त्यातून काही निष्पन्न होत नसेल तर वरिष्ठांशी संपर्क साधा किंवा त्या वेळी त्यांच्याशी संपर्क साधणे शक्य नसेल तर त्यांचा फोननंबर मागून घ्या.

युक्तिवादात यशस्वी होण्यासाठी.....

१. तुमच्याकडून मांडल्या जाणाऱ्या मुद्यांच्या बाजूने व विरूद्ध होऊ शकणाऱ्या युक्तिवादाचा स्वत:कडून व समोरच्या व्यक्तीकडून कसा विचार मांडला जाईल ते योजून ठेवा. जर तुमच्या मुद्यामध्ये एखादा कच्चा दुवा असेल तर वाद सुरू होण्यापूर्वीच त्याबद्दल मनात योजना आखून ठेवा. अन्यथा त्या मुद्यावरून तुम्हाला हार मानावी लागेल.

२. समोरच्या माणसाची कमतरता जाणून घ्या. एक हलकीशी कोपरखळी समोरच्याला चुकीचे विधान करायला भाग पाडेल. तेच चुकीचे विधान तुम्हाला एकूणच वादविवाद निर्णयाप्रत नेऊ शकतो. विरूद्ध माणसाला मानसिक जाळयात अडकवून त्याच्या युक्तिवादाला बाधा आणू शकते. तुम्ही यशाला हात घालू शकता. वादविवादाची अखेर नेहमी तर्कशुद्ध असेल असे पाहावे.

३. विरूद्ध बाजूचे चुकीचे मुद्दे हे नेहमी आपल्या फायद्याचे करून घ्या. त्यांच्या अतर्क मुद्यांना तर्कशुद्ध उत्तरे देऊन नामोहरम करण्याचा प्रयत्न करा.

४. तुमच्या मुद्यांमध्ये जर काही विसंगती किंवा अधुरेपणा असेल तर तुमची हार होऊ शकते. तसे असेल तर मोकळया मनाने हार पत्करा. काही वेळा दोनही बाजू तितक्याच बरोबरीच्या पातळीवर येऊ शकतात. कोणीही जिंकत नाही किंवा कोणीही हरत नाही. अशावेळी वादविवाद अर्धवट सोडून द्यायला शिका. कारण त्यातून काहीही निष्पन्न होणार नसते. अशावेळी स्वत:चा तोल जाऊ देऊ नका.

❋ ❋ ❋

# रागाच्या अवस्थेत आपण का ओरडतो ?

**ए**का साधूने आपल्या शिष्यांना प्रश्न केला, ''आपण जेव्हा रागावलेलो असतो तेव्हा आपण ओरडून का बोलतो? जेव्हा लोकांचे चित्त ताळ्यावर नसते तेव्हा साधारणपणे ते वरच्या पट्टीत का बोलतात?''

सगळे शिष्य विचारात पडले. एका शिष्याने सांगितले, ''कारण आपली मन:शांती आपण गमावलेली असते त्यामुळे आपण ओरडतो.''

''परंतु जर दुसरी व्यक्ती तुमच्याजवळच असेल तर ओरडून बोलण्याची काय गरज पडते? त्याच्याशी अगर तिच्याशी मृदु आवाजात बोलणे शक्य नसते का? रागामध्ये ओरडूनच कशाला बोलायला पाहिजे?''

साधूने पुन्हा प्रश्न केला.

शिष्यगणांनी आणखी काही उत्तरे दिली परंतु साधू महाराजांचे समाधान झाले नाही.

सरतेशेवटी साधू महाराजांनी त्याचे कारण सांगितले ते असे.

''जेव्हां दोन माणसे एकमेकांवर चिडलेली असतात, तेव्हा त्यांची मने.... हृदये एकमेकांपासून खूप दूर गेलेली असतात. आपले म्हणणे दुसऱ्याला ऐकू जावे म्हणून दोघेही ओरडून बोलतात. ते जितके जास्त रागावलेले असतात तितके जास्त मोठ्याने त्यांना बोलावे लागते. तसे केले तरच दोघांच्या मनामध्ये पडलेले अंतर कापून दुसऱ्याला आपले बोलणे ऐकू जाईल अशी त्यांची समजूत असते.''

साधू महाराज पुढचा प्रश्न विचारतात, ''जेव्हा दोन व्यक्तीमध्ये मित्रत्वाचे, प्रेमाचे किंवा जिव्हाळ्याचे संबंध असतात तेव्हा त्या व्यक्ती एकमेकांशी अतिशय कोमल किंवा मृदू आवाजात का बोलतात?''

कारण अशा अवस्थेत त्या दोघांची मने जुळलेली असतात. दोन हृदयातील अंतर खूप कमी असते.

दोघांमधील प्रेम जेव्हा अधिक दृढ होते तेव्हा ते कसे बोलतात? अशा वेळी ते बोलत नाहीतच. ते फार हळुवारपणे

कुजबुजतात. त्यामुळे प्रेमाच्या परमोच्च क्षणी ते त्याहूनही कोमल स्वरात बोलतात.

त्याहूनही प्रेमाची सीमा उंचावली की त्यांना शब्दांची आवश्यकता भासत नाही. ते एकमेकांकडे नुसते पाहतात आणि श्वासानेच काय म्हणायचे ते सांगतात. ती भाषा दोघांनाही समजते. त्यांची हृदये... मने एकरूप झालेली असतात.

**तात्पर्य :** जेव्हा तुम्ही भांडता किंवा जेव्हा तुमची बोलाचाली होते तेव्हा तुमची मने एक दुसऱ्यापासून दूर जाऊ देऊ नका. शब्द वापरताना दुसऱ्याचे मन दुखावणार नाही अशी काळजी घ्या. जर दोघांच्या मनातील अंतर वाढत गेले तर एक दिवस असा येईल की दोघांची मने सांधण्याचा रस्ताच नाहीसा होईल आणि दोघांचे संबंध सुधारण्याचा मार्गच बंद होईल.

❋ ❋ ❋

# रॉबीची मैफल

**मा**झ्या अनेक मित्रांनी मला आग्रह करून भरीस पाडले म्हणून मी ही गोष्ट लिहायला घेतली नाही. मी एका प्राथमिक शाळेत म्युझिक शिक्षिका म्हणून काम करीत होते. गेली तीस वर्षे शाळेची नोकरी सांभाळून मी घरी येणाऱ्या मुलांना पियानो शिकविण्याचे वर्ग घेत आहे. माझ्या गेल्या तीस वर्षांच्या अनुभवाने मी सांगू शकते की मुलांच्या संगीत शिकण्याच्या व आत्मसात करण्याच्या क्षमतेच्या वेगवेगळ्या पातळया असतात. माझ्याकडून अनेक कलावंत व हुशार मुले संगीत शिकून गेली; परंतु अद्याप मला एखादा असामान्य प्रतिभेचा विद्यार्थी लाभला नव्हता.

अर्थात, संगीत हे ज्यांना एक प्रकारचे आव्हान आहे, अशा काही लहान मुलांना शिकविणे हे माझ्या दृष्टीने मला असलेले एक आव्हानच होते. असा माझा एक विद्यार्थी म्हणजे रॉबी होता. त्याच्या आईने तो अकरा वर्षे वयाचा असताना प्रथम माझ्याकडे पियानो शिकवायला आणले होते. मुलांनी लहानवयातच संगीत शिकायला सुरुवात करणे फायदेशीर असते असे माझे पक्के मत आहे. मी तसे रॉबीला पहिल्याच दिवशी सांगितले.

त्यावर रॉबी म्हणाला, ''मी पियानो शिकावा व माझ्या आईला तो ऐकता यावा असे तिचे अत्यंत आवडते स्वप्न आहे.'' त्यामुळे मी त्याला माझ्या घरच्या वर्गात विद्यार्थी म्हणून प्रवेश दिला. रॉबीने त्याचे पियानोचे शिक्षण सुरू केले त्याच वेळी त्याला शिकविणे म्हणजे एक विफल प्रयास आहे हे मला लक्षात आले होते. मी कितीही प्रयत्न केला तरी सूर, लय, ताल यात त्याला शून्य गती होती. मी त्याला मूलभूत स्वर व लय ताल शिकविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होते; पण तो साधे सोपे संगीत जे प्राथमिक काळात मी सगळया मुलांना शिकवित असे, तेवढेच गिरवीत असे.

काही महिने त्याने प्रयत्न केला. मी पण ऐकत होते, तो शिकू शकेल ही फारशी आशा वाटत नव्हती. तरी मी त्याला सतत प्रोत्साहन देत होते. दर आठवड्याच्या शेवटी तो नेहमी म्हणायचा, ''एक दिवस माझी मॉम माझे पियानो वाजविणे नक्की ऐकणार आहे.'' मला तर त्याची काहीच आशा नव्हती. त्याची मॉम त्याला सोडायला तिच्या जुन्यापुराण्या गाडीतून येत असे. त्याला सोडून त्याची वाट पाहत गाडीत बसून राहत असे. मी तिला तशीच अंतरावरून पाहिली होती. कधी कधी ती हात हलवून हसत असे, पण ती आत कधीच आली नाही. मग एक दिवस अचानक रॉबी क्लासला यायचा बंद झाला. मी त्याला फोन करण्याचा विचार केला होता; पण मला वाटले की, त्याच्या संगीत शिकण्याच्या असमर्थतेने त्यानेच दुसरे काहीतरी करायचा विचार केलेला असावा. तो येण्याचा बंद झाल्याने मलाही एकप्रकारे बरे वाटले. तो म्हणजे माझ्या शिकविण्याची चालतीबोलती खराब जाहिरात होता.

बऱ्याच आठवड्यांनंतर क्लासच्या वार्षिक संगीत सभेसाठी मी सर्व विद्यार्थ्यांना इमेल व माहितीपत्रक पाठविले. मला आश्चर्य वाटले की ती इमेल व माहितीपत्रक रॉबीलाही पोहोचले होते. त्या संगीत सभेमध्ये पियानो वाजविण्यासाठी त्याने परवानगी मागितली. मी त्याला कळविले की, ''हा कार्यक्रम आता क्लासला येणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीच आहे. तू क्लासला येणे बंद केले आहेस त्यामुळे तुला त्या सभेत भाग घेता येणार नाही.'' त्याने परत कळविले की त्याची आई आजारी होती त्यामुळे त्याला

क्लासला येता येत नव्हते. पण तो घरी रोज प्रॅक्टीस करीत होता. कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी त्याने खूप गयावया केली.

त्याला मी का हो म्हटले ते मला आठवत नाही. कदाचित त्याने दाखविलेली चिकाटी असेल किंवा मला आतला आवाज सांगत होता की जाऊ दे वाजवू दे त्याला. संगीत सभेची सायंकाळ झाली. सभेसाठी घेतलेले शाळेचे सभागृह पालक, मित्र व नातेवाईक यांनी भरगच्च भरून गेले. मी रॉबीचे वाजविणे सर्वांत शेवटी मुद्दाम ठेवले होते. त्याच्यानंतर मी रंगमंचावर येऊन आभारप्रदर्शन व थोडीफार माझी कला सादर करून सभेचा समारोप करणार होते. मी विचार केला होता रॉबीच्या सादरीकरणाने काही गोंधळ झालाच किंवा सभेचा रंग बिघडला तर तो सावरून घेण्यास मी रंगमंचावर जाणारच होते. माझ्या समारोपाच्या वादनामुळे त्यावर पांघरूण घातले जाईल. एकूण कार्यक्रम व्यवस्थित पार पडला. विद्यार्थ्यांनी मेहनत घेतली होती ती दिसून आली. सर्वांत शेवटचा विद्यार्थी म्हणून रॉबी रंगमंचावर आला. त्याचे कपडे अत्यंत अव्यवस्थित, गबाळे व चुरगाळलेले होते. केस विस्कटलेले होते. मला वाटले, 'इतर मुलांसारखे याला व्यवस्थित कपडे करून यायला काय बिघडले होते? अशा खास वेळेसाठी म्हणून तरी त्याच्या आईने त्याचे केस विंचरून द्यायला हवे होते.'

रॉबी पियानोच्या बाकावर बसला आणि सुरुवात केली. मोझार्टची एक लोकप्रिय रचना तो वाजवणार असल्याचे रॉबीने जाहीर केले. ते ऐकूनच मला दरदरून घाम फुटला. पुढील काही मिनिटे मी काय ऐकणार आहे याची मला पुसटशी पण कल्पना नव्हती. रॉबीची बोटे पियानोवरून हळुवारपणे फिरत होती. पियानोच्या कीबोर्डवरून त्याची बोटे जणू नाचत होती. सर्व सप्तकात तो वाजवित होता. मोझार्टच्या संगीताच्या गुंफणीमध्ये असलेले सर्व बारकावे रॉबी अप्रतिमपणे सादर करीत होता. त्याच्या वयाच्या एकाही मुलाने इतक्या समरसतेने व तंतोतंत वाजविलेली मोझार्टची रचना मी कधीही ऐकली नव्हती. सात आठ मिनिटाच्या त्याच्या वादनात शेवटी द्रुत गतीत नेऊन त्याने सादरीकरण समाप्त केले. संपूर्ण सभागृह उभे राहून टाळयांच्या गजरात त्याचे कौतुक करीत होते. अत्यंत हर्षभराने व सद्‌गदित होऊन मी रंगमंचावर धावतच गेले. जाऊन रॉबीला अतिशय समाधानाने मिठी मारली. ''रॉबी तू इतके अप्रतिम पियानो वाजविताना मी कधीच ऐकले नव्हते. तू हे कसे काय केलेस?''

रॉबीसमोरच मायक्रोफोन होता. तो तसाच चालू ठेवून त्याने सांगितले, ''टीचर तुम्हाला आठवते, मी तुम्हाला सांगत होतो की माझी आई आजारी आहे म्हणून. ती कॅन्सरने आजारी होती. दुर्दैवाने ती आज सकाळीच वारली. ती जन्मत:च बहिरी होती. त्यामुळे आज रात्री पहिल्यांदाच ती माझे पियानो वाजविणे ऐकू शकणार होती. म्हणूनच ही संधी मला वाया घालवायची नव्हती. तिच्यासाठी आजचे माझे हे सादरीकरण अगदी खास होते.''

संपूर्ण सभागृहात एकही श्रोता असा नव्हता की ज्याच्या डोळ्यांना अश्रूच्या धारा लागल्या नव्हत्या. रॉबीला अनाथगृहात सांभाळण्यासाठी न्यायला आलेल्या सामाजिक कार्यकर्त्यांना सुद्धा ऐकून अंगावर काटा आला. त्यांचे डोळे सुद्धा कोरडे राहणे अशक्य झाले. असा विद्यार्थी मला लाभल्याबद्दल मला स्वत:ला धन्य वाटले. माझ्या आयुष्याचे सार्थक झाल्यासारखे वाटले.

त्या दिवशीपर्यंत मला असामान्य प्रतिभेचा एकही विद्यार्थी मिळाला नव्हता. पण त्या रात्री मात्र मी रॉबीची असामान्य विद्यार्थिनी झाले. तो माझा गुरू झाला आणि मी शिष्या. त्या रात्री मी चिकाटी, उत्कट प्रेम, आत्मविश्वास, दुसऱ्यावर ठेवण्याचा विश्वास आणि इतर कितीतरी गोष्टी नव्याने शिकले.

दुर्दैवाने रॉबी हा ओक्लामा शहराच्या एका अनाकलनीय बाँब हल्ल्यात एप्रिल १९९५ मध्ये नाहक बळी गेला.

❋ ❋ ❋

## लाकडाचा वाडगा

तुम्ही आता वाचणार असलेली गोष्ट तुमच्या कायम म्हणजे उद्या, परवा, महिन्यानंतर, वर्षानंतर इतकेच नाही तर अगदी आयुष्याच्या शेवटपर्यंत लक्षात राहील याची खात्री आहे.

एक वयोमानामुळे खूप अशक्त झालेला म्हातारा त्याच्या मुलाकडे राहायला आलेला असतो. मुलांच्या बरोबर त्याची पत्नी व एक चार वर्षांचा मुलगा असतात. म्हातारा एकटा असल्याने मुलाकडे आल्यामुळे त्याला आनंद झाला होता. वार्धक्यामुळे त्याचे हातपाय लटलटा कापत होते. त्याची दृष्टी खूप अंधुक झाली होती, आणि चालताना त्याचा सतत तोल जात होता.

रोज सायंकाळचे भोजन सगळे कुटुंब एकत्र टेबलावर बसून घेण्याची त्यांची पद्धत होती. घरातील इतर तिघांबरोबर हे वृद्ध गृहस्थ सुद्धा त्यांच्याबरोबर रोज टेबलावर बसून जेवण करीत असत; परंतु त्यांच्या थरथरणाऱ्या हातामुळे व अंधुक दृष्टीमुळे व्यवस्थितपणे जेवण करणे जमत नसे. चमच्याने खाताना चमच्यातील अन्न टेबलावर व जमिनीवर सांडत असे. दुधाचा ग्लास तोंडाला लावताना अर्धेअधिक दूध टेबलावर सांडत असे. त्यामुळे टेबलावरील टेबलक्लॉथ नेहमी खराब होत असे. नकळत होत असले तरी आजोबांना ओशाळल्यासारखे होत असे.

आपल्या वडिलांच्या या अव्यवस्थितपणाला मुलगा आणि त्याची पत्नी नाराज होऊन मनातून वैतागून गेले होते. हे सर्व सहन न झाल्यामुळे मुलगा पत्नीला म्हणाला, ''आता मात्र बाबांच्या या सवयीबद्दल काहीतरी करण्याची वेळ आली आहे. मी आजपर्यंत बरीच वाट पाहिली. रोजचे त्यांचे टेबलावर दूध सांडणे, जमिनीवर खरकटं सांडणे आणि खाताना मचमच आवाज करणे आता माझ्याच्याने सहन होत नाही.''

त्या रात्री नवरा बायकोने विचारविनिमय करुन एका कोपऱ्यात एक छोटेसे टेबल मांडले. दुसऱ्या दिवसापासून आजोबा त्या कोपऱ्यातील टेबलावर एकटे बसून जेवण करू लागले. मुलगा, सून व नातू मात्र रोजच्या टेबलावर एकत्र बसून जेवण करू लागले. त्यापूर्वी आजोबांच्या हातून एकदोन वेळा जेवणाची काचेची बशी खाली पडून ती फुटली होती. ते कारण लक्षात घेऊन आजोबांना आता जेवण लाकडाच्या वाडग्यात देण्यात येत असे.

कधी कधी जेवण करीत असताना कोपऱ्यात बसलेल्या आजोबांकडे मुलाचे आणि सुनेचे लक्ष जात असे. आजोबांना एकटे बसावे लागल्या कारणाने डोळ्यांत अश्रू येत असत. मुलाच्या आणि सुनेच्या ते लक्षात येत असे. तरीही नवरा बायको फक्त कडवट शब्दांत आजोबांना सक्त ताकीद देत असत. त्यांना चमचा काटा खाली न पाडणे व दूध पिताना ते खाली सांडणार नाही याची काळजी घेण्यासाठी निष्ठुर शब्दांत समज दिली जात असे.

आजोबांचा पाच वर्षांचा नातू शांतपणे पण लक्षपूर्वक हे सर्व पाहत असे. त्याच्या छोट्या बुद्धिप्रमाणे ते स्मरणात ठेवित असे.

एका सायंकाळी जेवणाच्या थोडे आधी तो छोटा मुलगा जमिनीवर बसून एका लाकडाच्या ठोकळयावर खेळातील हातोडीने घाव घालीत होता. त्याच्या वडिलांनी मोठ्या कौतुकाने त्याच्याकडे पाहून त्याला विचारले, ''बेटा, हे तू काय बनवित आहेस?'' मुलाने पण तितक्याच प्रेमाने वडिलांना सांगितले,

''हे होय? मी या लाकडाचा छानसा वाडगा बनवित आहे. तुमच्यासाठी आणि आईसाठी. मी मोठा झालो की तुम्हाला जेवणासाठी हे दोन वाडगे मला द्यावे लागतील ना?''

तो पाच वर्षांचा मुलगा हसला आणि परत आपल्या हातात घेतलेल्या उद्योगात मग्न झाला. त्याचे ते बालिश पण अर्थपूर्ण असलेले शब्द त्या नवराबायकोच्या मनाला जागे करून गेले. त्या दोघांच्याही तोंडून शब्द फुटेना. अवाक् होऊन एकमेकांकडे पाहत राहिले. सद्‌गदित होऊन त्यांच्या गालावरून अश्रू ओघळू लागले. एकही शब्द न उच्चारता काय करायला हवे ते त्यांच्या क्षणार्धात लक्षात आले.

त्या दिवशीच्या सायंकाळच्या जेवणाच्या वेळी मुलाने आजोबांना हाताला धरून आपलेपणाने व प्रेमाने एकत्र जेवणाच्या टेबलावर आणून बसवले. तिथून पुढचे सगळे आयुष्य आजोबा सगळ्यांबरोबर बसून त्या टेबलावरच जेवण करीत होते. त्यांच्याहातून चमचा, काटा खाली पडला किंवा दूध टेबलावर सांडले आणि टेबल क्लॉथ खराब झाला तरी ते आजोबांना मुळीच बोलत नसत. रागवित नसत. यातून आपल्याला बऱ्याच गोष्टी शिकता येतील. आयुष्याकडे साधकबाधक दृष्टिकोनातून पाहिले की आपल्या लक्षात येते की, जे घडते ते घडतच असते, आयुष्य हे पुढे जात असतेच. ते हळूहळू चांगले होत असते.

एखादा माणूस कोसळणाऱ्या पावसात कसा वागतो किंवा संकटात सापडल्यावर तो कसा वागतो, वडिलधाऱ्यांशी त्याचे

वागणे कसे असते, त्याची महत्त्वाची वस्तू हरवली की तो किती अस्वस्थ होतो, किंवा एखाद्या प्रसंगाचा गुंता सोडविताना कसा सामोरा जातो हे पाहिले की त्या माणसाबद्दल तुम्हाला बरेच काही समजून येते. त्याच्या स्वभावाची वैशिष्ट्ये लक्षात येतात.

वाट्याला आलेले जीवन जगणे यापेक्षा ते जीवन अर्थपूर्ण व आनंदी करून जगणे हे महत्त्वाचे आहे.

आयुष्य तुम्हाला बरेच वेळा दुसरी संधी निर्माण करून देत असते.

आयुष्य जगताना सतत दुसऱ्याकडून काहीतरी मिळण्यासाठी हात पुढे करू नयेत तर दुसऱ्याला काहीतरी देण्यासाठी, परतफेड करण्यासाठी आपल्या हातांचा उपयोग करावा.

आयुष्यात सुखाच्या मागे धावलात तर सुख तुम्हाला हुलकावण्या देईल; पण तुम्ही तुमच्या कुटुंबाच्या कल्याणाकडे लक्ष केंद्रित केलेत, मित्र परिवार व इतर जवळच्या लोकांच्या गरजा जाणून त्या पुऱ्या करण्याचा प्रयत्न केलात आणि तुमचे रोजचे काम उत्तम रितीने केलेत तर सुख तुमच्याजवळ येईल. आपोआप सुख तुम्हाला गवसेल.

तुम्ही जेव्हा मोकळ्या मनाने व शुद्ध अंत:करणाने विचारपूर्वक निर्णय घेता, तेव्हा साधारण ते निर्णय अचूक ठरतात. तुम्हाला जरी एखाद्या गोष्टीचे दु:ख झाले तरी कधीही तुम्ही स्वत: दुसऱ्याच्या दु:खाचे कारण होता कामा नये.

प्रत्येक दिवशी तुम्ही कोणाच्या तरी पाठीवरून हात फिरवून त्याला जवळ केले पाहिजे. असा प्रेमळ स्पर्श व भावना लोकांना खूप आवडतात. असा स्पर्श मग तो साधा हातात हात घेणे असो, वा छोटीशी मिठी असो किंवा नुसते आपलेपणाने थोपटणे असो. कितीही वय झाले तरी नवीन शिकायचे वय कधीच उलटून जात नाही.

मित्रत्वाची, बंधुभावनेची व आपलेपणाची ही पणती अशीच तेवत राहू दे.

❋ ❋ ❋

# वचनपूर्ती

सुट्टीचा दिवस होता. विजय आरामात पेपर वाचीत बसला होता. स्वयंपाकघरातून सुनिताचा आवाज आला, ''अहो! किती वेळ तुम्ही पेपरात डोके खुपसून बसणार आहात? जरा इकडे येऊन लाडक्या कन्येला नीट जेवण करायला सांगाल का?'' विजयने एका झटक्यात पेपर बाजूला टाकला आणि झटकन् स्वयंपाकघरात शिरला. त्याची एकुलती लाडकी कन्या खूपच घाबरलेली दिसत होती. तिचे डोळे पाण्याने डबडबलेले होते. तिच्या पुढ्यात ताटलीमध्ये दहीभात कालवलेला ठेवला होता. खरं तर अनू तिच्या वयाच्या मानाने शांत, समजूतदार आणि अत्यंत हुशार होती. नुकतेच तिला आठवे वर्ष लागले होते. तिला विशेषत: दहीभात आवडत नसे. विजयची आई आणि विजयची पत्नी जुन्या वळणाच्या आणि जुन्या मतांच्या होत्या. त्या दोघींच्या मताने दहीभात खाल्ल्याने मुलांच्या पोटात शांत होते व वृत्ती थंड राहते.

विजयने सावकाशपणे एक आवंढा गिळला आणि अनुच्या समोरची दहीभाताची ताटली हातात घेतली. समजावण्याच्या सुरात तो अनुला म्हणाला, ''बेटा तुझ्या बाबांसाठी तरी खा ना. नाहीतर तुझी आई माझ्यावर रागवेल ना.'' विजयला त्याच क्षणी मागच्या बाजूने एक रागाचा उच्छ्वास सोडल्याचे जाणवले. विजय पुन्हा एकदा अनुला कळकळीने विनवित म्हणाला, ''अगं या ताटलीतील दहीभातापैकी थोडेतरी घास खा ना अनू बेटा.'' अनू विजयच्या शब्दांनी थोडीशी विरघळली. हाताच्या तळव्याने तिने डोळ्यांतील अश्रू पुसले आणि म्हणाली , ''ठीक आहे बाबा. मी जरूर खाते. थोडासा नाही तर ताटलीत दिलेला सगळा दहीभात संपविते. पण मी जे मागेन ते तुम्ही मला द्याल का?''

विजय तत्काळ म्हणाला, ''हो. अगदी नक्की.''

''बघा हं ! वचन द्या मला तसे''....अनू म्हणाली. विजयने छोट्या अनुचा गुलाबी मऊ मऊ हात आपल्या हातात घेतला आणि पुन्हा एकदा वचनपूर्तीचा शब्द दिला. ''पण बाबा तुमच्यासारखे आईला पण वचन देऊ दे.'' अनुने ठामपणे मागणी केली. सुनितानेही लगेचच आपला हात अनुच्या हातात दिला आणि ती पण वचनबद्ध झाली. आता विजय थोडासा अस्वस्थ

झाला होता. सुनिता अनूला म्हणाली, ''पण बरं का अनू, कॉम्प्युटर वगैरे अति महागाचे काही मागायचे नाही हं! यांच्याजवळ खर्च करण्यासाठी जास्त पैसे नाहीत बरं का.''

अनू म्हणाली, ''नाही बाबा मी महागाची कोणतीही गोष्ट मागणार नाही.'' आणि मग तिने त्या ताटलीतील दहीभात थोड्याच वेळात खाऊन टाकला. त्याच्या छकुल्या अनुला, तिला आवडत नसतानाही तो दहीभात सक्तीने खायला लावल्याबद्दल विजय त्याच्या आईवर आणि पत्नीवर रागावला होता. दहीभात खाऊन झाल्यानंतर अनू विजयजवळ आली. तिच्या डोळ्यांत विजयने दिलेला शब्द पुरा होण्याची अपेक्षा स्पष्ट दिसत होती. त्यावेळी तिघांचेही लक्ष ती काय मागणी करणार याकडे लागून राहिले होते.

''बाबा येत्या रविवारी माझ्या डोक्यावरील सर्व केस काढून मला डोक्याचा गोटा करायचा आहे.'' तिने आपल्या मागणीचा बाँब टाकला. ''काहीतरी भयंकरच.'' सुनिता दचकून किंचाळलीच. ''मुलीने डोक्याचे केस काढून गोटा करणे अशक्य.'' ''आपल्या मागच्या कोणत्याही पिढीत कोणीही केलेले नाही.'' आईने सुनिताला साथ देत आपले म्हणणे मांडले. ''या टी. व्ही. वरील कार्यक्रमांमुळे आजकालच्या मुलांनी ताळतंत्रच सोडला आहे. नाहीतरी आपली अनू फार वेळ टी. व्ही. पाहते.''

विजयने परत एकदा समजूत काढायला अनुला विचारले, ''तू दुसरे काहीतरी का नाही मागत? अगं तुझे केस काढलेले गोटा केलेले डोके पाहताना आम्हाला किती दु:ख होईल याचा विचार कर.''

''नाही हं बाबा, या खेरीज मला दुसरे काहीही नको.' तिने निर्धारपूर्वक सांगून टाकले.

''अगं अनू तू समजून का घेत नाहीस? आम्हाला किती वाईट वाटेल याचा विचार कर.'' विजयने पुन्हा एकदा विनविले. ''बाबा मला तो दहीभात खाणे किती कष्टाचे व मनाविरुद्ध होते ते तुम्ही मगाशी पाहिलेत ना? आणि मी जे मागेन ते देण्याचे तुम्ही वचन दिले होतेत. आता का नाही तुम्ही तुमचा दिलेला शब्द पाळीत? तुम्हीच मला राजा हरिश्चंद्राची गोष्ट सांगितली होती ना? आपला एखाद्याला दिलेला शब्द काहीही झाले तरी पाळायलाच हवा हेच तर त्या गोष्टीतून तुम्ही मला शिकविलेत. मग आज तुम्हीच....'' अनूचे डोळे पुन्हा एकदा पाण्याने भरले.

विजयला उत्तर देण्याची वेळ आली होती. ''हो बरोबरच आहे मी दिलेला शब्द पाळायलाच हवा.'' विजय असे म्हणाल्याबरोबर त्याची आई आणि पत्नी एका सुरात गरजल्या, ''काय डोकं ताळयावर आहे ना तुझे?'' ''तसे नाही पण आपणच आपला शब्द पाळला नाही तर अनू तिचा शब्द पाळायला कधीही शिकणार नाही.'' विजय उद्गारला.

रविवारी गोटा करुन आल्यानंतर अनूचा चेहरा गोल दिसायला लागला. तिचे डोळे मोठे, चमकदार व सुंदर दिसू लागले. सोमवारी सकाळी नेहमीप्रमाणे विजयने तिला शाळेत सोडले. तुळतुळीत केस नसलेल्या डोक्याच्या अनूकडे, ती वर्गाकडे जाताना पाहून विजयला कसेतरीच वाटले. तिने मागे वळून विजयकडे पाहिले अन् हसून त्याला अच्छा म्हटले. विजयनेही हात हलवून तिचा निरोप घेतला. तो निघण्यासाठी वळला. तेवढ्यात त्याला एक मुलगा कारमधून उतरून येत असलेला दिसला. त्याने अनुला मारलेली हाक विजयने ऐकली. ''अनू जरा थांब ना माझ्यासाठी.'' क्षणार्धात विजयच्या नजरेत भरले ते त्या मुलाचे केस नसलेले तुळतुळीत डोके. विजयच्या डोक्यात विचार आला, ''हेच अनूचे केस काढण्यामागचे गुपित असावे.''

''ऐकले का? तुमची मुलगी खरोखरच ग्रेट आहे.'' त्या कारमधून बाहेर पडत एक महिला बोलत होती. ती पुढे सांगू लागली, ''तुमच्या कन्येबरोबर आत्ताच गेलेला माझा मुलगा हरीष आहे. त्याच्या दुर्दैवाने त्याला ल्युकेमिया झाला आहे. गेला महिनाभर हरीष शाळेत हजर राहू शकला नव्हता. त्याला देण्यात येणाऱ्या केमोथेरेपीच्या औषधामुळे त्याच्या डोक्यावरचे सर्व केस गळून गेले होते. त्याच्या केसविरहित गुळगुळीत डोक्यावरुन वर्गातील मुले असमंजसपणाने पण फार बोचरे वाटेल असे त्याला चिडवित होती. त्याचे हरीषला दु:ख व भय वाटत होते. तुमची अनू मागच्या आठवड्यात त्याला भेटायला घरी आली होती. तिने त्याला धीर दिला आणि सांगितले की, ज्यावरुन त्याला चिडविले जाते आहे त्यावर काहीतरी इलाज शोधून काढील. परंतु त्या वेळी ही मुलगी माझ्या मुलासाठी स्वत:चे सुंदर केस कापून घेईल व अशा पद्धतीने कुर्बानी करेल असे माझ्या स्वप्नातही आले नव्हते. खरोखर अशी गुणी व सहृदय मुलगी असल्याबद्दल तुम्ही व तुमच्या पत्नीने स्वत:ला भाग्यवान समजले पाहिजे.''

एका दमात त्या मातेने हे सर्व सांगून मग नंतरच घशात आलेला हुंदका आवरला.

विजय अवाक होऊन पाहतच राहिला आणि सद्‌गदित होऊन मनात म्हणाला, ''माझ्या लाडक्या लेकरा, मला एक वरदान देशिल का? खरोखरच पुनर्जन्म असेल तर मला तुझ्या पोटी जन्म घेऊ दे. मग तू मला माणुसकी आणि प्रेम म्हणजे काय हे शिकवू शकशील.''

❋ ❋ ❋

# वडील, मुलगी आणि कुत्रा

''**को**ठे लक्ष आहे तुझे? गाडी नीट चालव ना. शेजारच्या गाडीला घासून जाणार होतीस. तू कोणतीच गोष्ट शांतपणे करू शकत नाहीस का गं?'' माझे वडील माझ्या अंगावर खेकसले.

त्याचे ते शब्द मला फार जिव्हारी लागले. शेजारच्या सीटवर बसलेल्या माझ्या वडिलांकडे मी जळजळीत नजरेने पाहिले. मला रागाने घशातील आंवढा गिळता येईना. मी माझी नजर त्यांच्याकडून मुद्दाम होऊन दुसरीकडे वळवली. मला पुन्हा एकदा शब्दाशब्दी नको होती. ''माझे त्या कारकडे लक्ष होते. डॅडी, मी गाडी चालवित असताना प्लीज असे वसकन ओरडू नका.'' माझा आवाज मी जाणूनबुजून कमी कठोर ठेवला. मला आलेल्या रागाच्या मानाने तो आवाज खूपच मार्दव होता.

डॅडींनी माझ्याकडे तिरस्काराने पाहिले आणि मग तोंड वळवून आपल्या सीटवर स्वस्थ बसले. घरी गेल्यावर डॅडींना टीव्हीसमोर बसविले आणि मी शांतपणे विचार करायला परत बाहेर पडले. काळे, पावसाळी ढग आकाशात दाटून आले होते. पावसाचा रंग दिसत होता. दूरवर होणाऱ्या पावसाळी ढगांच्या गडगडामुळे माझ्या मनात जास्तच अशांतता निर्माण होत होती.

डॅडी वॉशिंग्टन आणि ओरेगॉन येथे बरीच वर्षे लाकूडतोड्याचा व्यवसाय करीत असत. त्यांना जंगलात काम करायला आवडत असे. झाडावर आपली कुऱ्हाड चालविताना त्यांच्या शक्तीचा अभिमान वाटत असे. त्यांनी अनेक वेळा लाकूडतोडीच्या स्पर्धांमध्ये भाग घेऊन अनेकवेळा पारितोषिके मिळविली होती. घरातील शोकेस त्यांना मिळालेल्या ट्रॉफीज व बक्षिसांनी भरलेली होती. त्यांच्या कामातील प्रावीण्याचे ते दर्शक होते. त्यांच्या अविश्रांत कामात वर्षांमागून वर्षे गेली. प्रथमत: जेव्हा त्यांना लाकडाचा ओंडका उचलताना श्रम वाटले तेव्हा त्या क्षणी त्यांनी ते हसण्यावारी नेले. पण त्याच सायंकाळी मी त्यांना ओंडके उचलून आपली ताकद आजमावण्याचा प्रयत्न करताना पाहिले. त्यानंतर त्यांना वय झाल्याची कोणी आठवणही करून दिली तरी त्यांची चिडचिड होत असे. पूर्वी करू शकत होते ते एखादे काम त्यांना करता आले नाही की त्यांना अस्वस्थ होत असे.

वयाच्या सदुसष्ठाव्या वाढदिवसानंतर चार दिवसांनी त्यांना हार्टअ‍ॅटक आला. ताबडतोब अ‍ॅम्ब्युलन्सने त्यांना दवाखान्यात नेले. तिथल्या उपचारांनी त्यांचे रक्त व प्राणवायू नियमित राहण्यात यश मिळाले. त्यांचे ऑपरेशन करावे लागले पण त्यातून ते सहीसलामत बाहेर पडले. पण आजारपणानंतर डॅडींमधील चैतन्य हरवून गेले. त्यांची जगण्याची इच्छाच मरून गेली. ते जाणीवपूर्वक डॉक्टरांच्या सूचना पाळण्याचे नाकारीत. देऊ केलेली मदत व सूचना ते उपरोधाने धुडकावून लावीत. वर इतरांचा अपमानही करीत. याचा परिणाम म्हणून त्यांना भेटायला येणाऱ्यांची संख्या कमी होऊ लागली. शेवटी कोणीही येईनासे झाले. डॅडी एकटे पडले.

मी आणि माझ्या नवऱ्याने डॅडींना आमच्या छोट्याशा फार्महाऊसवर राहायला आणले. आम्हाला वाटले स्वच्छ हवा आणि गावाकडील मोकळे वातावरण त्यांना उभारी आणेल. पण एक आठवड्यात मला त्यांना आणल्याचा पश्चात्ताप झाला. त्यांना कोणतीच गोष्ट मनास येत नव्हती. मी केलेल्या प्रत्येक गोष्टीची ते चेष्टाच करीत. मी फार निराश होऊन माझी मन:स्थिती बिघडली. हळूहळू त्याचा सगळा राग मी माझ्या नवऱ्यावर काढू लागले. आमच्यात कुरबुर होऊन वादावादी होऊ लागली.

माझ्या नवऱ्याने परिस्थितीचे गांभीर्य समजून चर्चच्या पाद्रींचा सल्ला घेतला. त्यांनी दर आठवड्याला आमच्याशी बोलून मानसिक उपचार सुरू केले. प्रत्येक भेटीत ते वडिलांना बरे वाटावे यासाठी देवाची प्रार्थना करीत; पण महिने होऊन गेले तरी देवाची कृपा होईना. काहीतरी करायला हवे होते आणि ते मीच करणे जरूरीचे होते. दुसरे दिवशी मी टेलिफोनची डिरेक्टरी घेऊन बसले आणि यलो पेजेसमध्ये पाहून होत्या त्या सर्व मानसिक सल्ला केंद्रांना फोन केला. माझी समस्या मी पलीकडून येणाऱ्या प्रत्येक सेवाभावी सहानुभूतिने बोलणाऱ्या व्यक्तीबरोबर चर्चिली. पण कोणीच नक्की असे त्यावर उपाय सांगू शकले नाही. मी आशा सोडून देण्याच्या मन:स्थितीत असतानाच एक आशेचा किरण असल्यासारखा आवाज आला. ''मी आताच एका मासिकात एक लेख वाचला. कदाचित त्यात दिलेला पर्याय तुम्हाला उपयोगी पडेल असे वाटते.'' तिने तो लेख फोनवरच वाचून दाखविला. मी लक्षपूर्वक तो ऐकला. एका नर्सिंग होमने केलेले ते संशोधन होते. दीर्घकाल असणाऱ्या औदासिन्याने पछाडलेले लोक तिथे उपचार घेत होते. त्यांना एक कुत्रा पाळायला दिल्यानंतर त्यांच्या वागण्यात व विचारात आमूलाग्र बदल झालेला दिसून आला होता.

त्या दुपारी मी कुत्र्यांच्या बेवारस आश्रयघरात गेले. जरुरी असणारे माझ्याबद्दलचे माहितीपत्रक भरल्यावर तिथल्या अधिकाऱ्याने मला कुत्री जिथे घरात ठेवली होती तिथे नेले. त्या निराधार कुत्र्यांना रोगमुक्त करण्यासाठी मारण्यात येणाऱ्या औषधाच्या फवाऱ्याने माझ्या नाकाला झिणझिण्या आल्या. प्रत्येक कपौंडमध्ये पाच ते सात कुत्री होती. लांब केसांची, कुरळया केसांची, काळया रंगाची, ठिपके असलेली अशी निरनिराळी कुत्री उड्या मारून माझ्या जवळ येण्याचा प्रयत्न करीत होती. मी एकएक कुत्र्याचे निरीक्षण करून ते बाद करीत होते. कारणे विविध होती. कोणी फार मोठे होते, फार केसाळ होते, कोणाचे केस जास्त गळत होते. पहात पहात मी शेवटच्या पिंजऱ्याजवळ आले. त्या पिंजऱ्यात एका कोपऱ्यात सावलीत बसलेला एक कुत्रा पायाने लंगडत होता. तो चालतच जवळ आला आणि खाली बसला. तो पॉइंटर जातीचा होता. तो कुत्र्यांच्या उमराव घराण्यातील होता; पण तो त्या जातीचे व्यंगचित्र असल्यासारखा दिसत होता.

त्याचा चेहरा सुरकुतलेला आणि तोंड सुकून गेलेले होते. त्याच्या पाठीला पोक आले होते, हाडे एका बाजूला वाकली होती. पण त्याच्या डोळ्यांनी मला आकर्षित केले. स्वच्छ, शांत व भावपूर्ण डोळे होते. मी त्याच्याकडे बोट दाखवून त्याच्याविषयी अधिक माहिती देण्यास सांगितले. त्या बेवारस कुत्र्याच्या आश्रमाच्या माणसाने साशंक नजरेने माझ्याकडे पाहिले. ''ते कुत्रे फार मजेशीर आहे. बेवारसपणे गेटच्या बाहेरच बसले होते. आम्ही त्याला आत आणले. कोणीतरी त्याला नेईल असे वाटत होते. दोन आठवड्यांपासून ते इथे आहे. आता त्याचे दिवस भरले आहेत. आम्हाला बहुतेक उद्या त्याच्यावर नाइलाजास्तव कठोर कारवाई करावी लागेल.

त्याचे सांगणे झाल्यावर मी त्याच्याकडे भयावह नजरेने पाहिले. ''म्हणजे उद्या तुम्ही त्याला मारणार आहात का?'' ''मॅडम त्याला इलाज नाही. ते आमचे ठरलेले नियम आहेत. प्रत्येक बेवारशी कुत्र्याला आम्ही पाळू शकत नाही.'' मी परत एकदा पॉइंटरला बघितले. ते तपकिरी शांत डोळे माझ्या निर्णयाची वाट पाहत होते.''मी त्याला घेऊन जाते.'' मी म्हणाले. कुत्र्याला शेजारच्या सीटवर घेऊन मी घरी आले. घरी पोहोचल्यावर मी दोन वेळा गाडीचा हॉर्न वाजविला. डॅडी बाहेरच्या व्हरांडयात येऊन उभे होते. मी कारमधून माझे डॅडींसाठी आणलेली भेट बाहेर काढीत होते. त्यांना पाहिल्याबरोबर ''डॅडी हे पाहा तुमच्यासाठी काय घेऊन आले आहे ते.'' उत्साहाने मी ओरडले. डॅडींचा चेहरा तेव्हा असाच सुरकुत्या पडलेला व उबग आलेला दिसत होता. ''माझ्यासाठी हवा असता तर या हाडाच्या सापळयाऐवजी त्यापैकी बरा कुत्रा निवडला असता. तुलाच ठेव मला नको आहे.'' माझी भेट धुडकावून लावीत ते आत निघून गेले. माझा आतल्या आत जळफळाट झाला. माझ्या श्वासनलिका ताठ झाल्या. नाक फेंदारले गेले. ''डॅडी तुम्ही त्याला जवळ घेऊन तर पाहा. तुम्हाला आवडेल तो. मी त्याला आपल्याकडे ठेवणारच आहे.''

डॅडींनी माझ्याकडे दुर्लक्ष केले. ''मी काय म्हणाले ते ऐकलेत का तुम्ही डॅडी?'' मी चिडून बोलले. ते ऐकून डॅडी गर्रकन फिरले, आपल्या बाजूला मुठी आवळून धरल्या. त्यांचे डोळे बारीक होऊन तिरस्कार भरलेला मला दिसला. आम्ही दोघे

एकमेकांकडे एकटक एखाद्या द्वंद्वयोध्याप्रमाणे रोखून बघत होतो. त्याच वेळी संधी साधून पॉइंटर माझ्या हातातून सुटून वडिलांकडे पळत गेला. जवळ जाताच तो त्यांच्या पायाशी बसला. अंदाज घेऊन हलकेच त्याने आपला पंजा उचलला.

पॉइंटरने पंजा उचलायला सुरूवात केल्याबरोबर डॅडींचा खालच्या ओठाला कंप सुटला. त्याच्या डोळ्यात रागाची जागा गोंधळाने घेतली. पॉइंटर शांतपणे थांबला. तोच डॅडी गुढग्यावर खाली वाकून बसले आणि त्यांनी पॉइंटरला घट्ट जवळ केले. ती एका आपुलकीच्या व अतिशय घनिष्ठ मैत्रीची सुरुवात होती. डॅडींनी त्याचे नाव ज्योयी असे ठेवले. रोज डॅडी आणि ज्योयी परिसरात फिरायला जात. गावातील सर्व गल्ल्यांमधून ते दोघे तासनतास भटकत असत. जवळच्या झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याकाठी ते दोघे मजेत हिंडत. मासे पकडीत. ते रविवारच्या सकाळी चर्चमधील प्रार्थनेला पण नियमाने जात. डॅडी बाकावर बसले की ज्योयी त्यांच्या पायाजवळ बसत असे.

डॅडी आणि ज्योयी पुढची तीन वर्षे एकमेकांशिवाय जगणे शक्यच नव्हते. डॅडींच्या स्वभावातील कडवटपणा गेला होता. त्यांची आणि ज्योयीची बरेच लोकांशी मैत्री झाली होती. एक दिवस मध्यरात्री ज्योयी आमच्या बेडवर येऊन त्याचे थंड नाक बेडवर घाशीत होता. ते पाहून मी विस्मित झाले. तो यापूर्वी अपरात्री आमच्या बेडरूममध्ये केव्हाच आला नव्हता. मी नवऱ्याला उठविले, अंगावर गाऊन चढविला आणि आम्ही डॅडींच्या बेडरूमकडे पळालो. डॅडी धीरगंभीर चेहऱ्याने बेडवर आडवे पडले होते. पण रात्री केव्हातरी त्यांचा प्राण अंतरात विलीन झाला होता.

दोन दिवसांनंतर माझे दु:ख आणि मनाला बसलेला चटका आणखीनच खोलवर गेला. ज्योयी डॅडींच्या बेडजवळ मेलेला होता. मी आणि नवऱ्याने मिळून त्याला त्याच्याच ब्लँकेटमध्ये गुंडाळले. जवळच्या त्याच्या आवडत्या झऱ्याजवळ एका खड्ड्यात त्याला चिरनिद्रा दिली. मनातून मी ज्योयीला लाखभर धन्यवाद दिले. डॅडींच्या त्या अवघड अवस्थेत त्यानेच डॅडींना शांत केले होते. त्यानेच त्यांच्या मनाला फुंकर घातली होती.

डॅडींच्या अंत्यसंस्काराच्या सूर्योदयालाच आभाळ अभ्राच्छादित होऊन उदास वाटत होते. चर्चमध्ये प्रार्थनेसाठी मी जेव्हा जात होते तेव्हा डॅडी आणि ज्योयीने जोडलेले अनेक मित्र जमा झाले होते. चर्च माणसांनी भरून गेले होते. चर्चच्या पास्टरने त्याचे श्रद्धांजलीचे भाषण सुरू केले. त्याने दोघांचीही खूप स्तुती केली. ती दोघांनाही श्रद्धांजली होती. ज्योयीने डॅडींचे आयुष्यच बदलून टाकले होते. पास्टरने सांगितले, ''दारी आलेल्या कोणालाही आदर केल्याशिवाय माघारी पाठवू नका. त्याच्या रूपाने एखादा देवदूत तुमच्याकडे आलेला असेल. अनेक वेळा परमेश्वरानेच असा देवदूत पाठवलेला असतो.'' मला गतकालातील घटना माझ्या मनातील कोडे सोडविण्यास उपयोगी पडल्या. त्या दिवशी अचानक मला तो लेख वाचून दाखविणारा मधाळ आवाज, ज्योयीचे अचानक बेवारसी आश्रयघरात भेटणे, त्याचे शांतपणे घरात वावरणे, त्याने डॅडींना दिलेले निर्व्याज प्रेम आणि सर्वांत दोघांचेही थोड्याच दिवसांच्या अंतराने आलेले मरण, सर्वच अनाकलनीय व आश्चर्यकारक होते आणि मला कळून चुकले की देवाने माझ्या प्रार्थनेला प्रतिसाद दिला होता.

❋ ❋ ❋

# विचार करा....

एकदा एक प्रेमी युगुल डोंगराळ प्रदेशामधून एका बसमधून प्रवास करीत होते. बाहेरचे सृष्टीसौंदर्य पाहताना ते एका निसर्गसुंदर जागी बसमधून उतरण्याचा निर्णय घेतात. बस थांबते. ते प्रेमी जोडपे बसमधून खाली उतरते. बस पुन्हा सुरू होते. ती बस फक्त काही अंतर पुढे जाते. तोच एक अनर्थ घडतो. रस्त्याच्या बाजूला असलेल्या त्या उंच डोंगराचा एक भला मोठा कडा सुटतो आणि खाली कोसळतो. तो नेमका त्या बसवरच येऊन पडतो. तो खडक इतका प्रचंड असतो की क्षणार्धात ती बस त्याखाली चेंगरून दडपून जाते. बसमधील एकूण एक प्रवासी त्या अपघातात चिरडून मरण पावतात.

काही क्षणांपूर्वी त्या बसमधून खाली उतरलेल्या त्या प्रेमी युगुलांच्या डोळ्यांदेखत हे घडते. ते दोघे चक्रावून जातात. सुन्न होतात.

नकळत त्या माणसाच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडतो, ''अरेरे!! काय भयंकर घडले आहे. आपण त्या बसमध्ये असायला हवे होते.''

आश्चर्य वाटले ना त्याचे हे उद्‌गार ऐकून? पण त्यांनी विचार केला होता, ''आपण त्या बसमधून खाली उतरण्याऐवजी तिच्याबरोबरच पुढचा प्रवास केला असता तर आपल्याला खाली उतरण्यासाठी जो वेळ वाया गेला तो गेला नसता. त्याच वेळात बसने रस्त्याचा आणखी काही भाग पार केला असता. पडलेला खडक बसवर पडलाच नसता. ही दुर्घटना घडलीच नसती.''

यालाच सकारात्मक विचार म्हणतात. आयुष्यात नेहमी सकारात्मक दृष्टिकोन ठेवा व इतरांना मदत करण्याची कोणतीही संधी हातून जाऊ देऊ नका.

❋ ❋ ❋

# विद्यार्थीदशेतील महात्मा गांधी

महात्मा गांधी युनिव्हर्सिटी कॉलेज ऑफ लंडनमध्ये लॉचा अभ्यास करत असताना, एक पिटर्स नावाचे प्राध्यापक होते. ते गांधींचा फार द्वेष करीत. गांधीजी त्यांच्यापुढे कधीच वाकले नाहीत. त्यांचे एकमेकांविरूद्धचे वाग्युद्ध सर्वांना परिचित होते.

एकदा प्रा. पिटर्स युनिव्हर्सिटीच्या जेवणाच्या हॉलमध्ये टेबलावर जेवण करीत होते. गांधीजी आपले जेवण घेऊन आले आणि त्याच टेबलावर प्राध्यापकासमोर बसले. प्राध्यापक नेहमीच्या अहंकारी पद्धतीने म्हणाले, ''मि. गांधी, डुक्कर आणि पक्षी कधीही एकत्र बसून जेवण करीत नाहीत, हे तुम्हाला ठाऊक नाही का?'' महात्मा गांधींनी त्याना लगेच उत्तर दिले, ''बरे! मी इथून उडून जातो.'' आणि उठून दुसरीकडे निघून गेले.

प्राध्यापकांना अत्यंत क्रोध येऊन त्यांनी याचा वचपा परीक्षेच्या मार्कांमध्ये काढायचे ठरविले. पुढच्या परीक्षेत गांधीजींनी सर्व पेपर अतिशय उत्तमतऱ्हेने लिहिला होता. त्यानंतर प्राध्यापकांनी गांधींना विचारले. ''मि. गांधी, समजा तुम्ही रस्त्यातून चालताना तुम्हाला दोन पुडकी पडलेली दिसली, ज्यापैकी एकात पैसे व एकात अक्कल भरलेली असेल तर तुम्ही कोणते पुडके उचलून घ्याल?''

कोणत्याही प्रकारे संभ्रम न दाखवता ते म्हणाले,'' अर्थातच ज्यात पैसे असतील तेच पुडके मी उचलीन.''

प्राध्यापक महाशय म्हणाले, ''तुमच्याजागी मी असतो तर नक्की अक्कल भरलेले पुडके उचलले असते.''

''ज्याच्याजवळ जे नाही तेच तो उचलणार ना?'' गांधीजी क्षणार्धात उत्तरले.

प्राध्यापक बेभान होऊन त्यांनी गांधीजींच्या उत्तरपत्रिकेवर एक शेरा मारला 'इडियट' आणि गांधीजींना तो दिला. गांधीजींनी तो घेतला आणि मुकाट्याने जाऊन बसले. थोड्या वेळाने ते प्राध्यापक महाशयांकडे आले आणि म्हणाले, ''मि. पिटर्स, आपण सही केली आहे पण गुण देण्यास विसरला आहात.''

❋ ❋ ❋

# विश्वास मैत्रीचा

दोन जिवाभावाचे मित्र युद्धात एकाच आघाडीवर एकाच पलटणीमधून लढत असतात. दुर्दैवाने शत्रूकडून दोघांपैकी एक गंभीर जखमी होऊन पडतो. दुसरा मित्र अर्थातच दु:खी होतो. तो आपल्या लेफ्टनंटला विचारतो, ''सर, मी माझ्या जखमी साथीदाराला घेऊन येऊ का?''

''तू जाऊ शकतोस.'' लेफ्टनंट म्हणाला, ''पण मला वाटत नाही की त्याचा काही उपयोग होईल. तुझा मित्र बहुतेक बळी पडला असेल. आणि तिकडे जाऊन तू सुद्धा तुझे प्राण धोक्यात घालशील.''

परवानगी मिळताच तो मित्र लेफ्टनंटचे शेवटचे शब्द ऐकायला न थांबता तडक आपल्या मित्राच्या दिशेने धावला.

अत्यंत आश्चर्यकारकरित्या आपल्या जखमी होऊन पडलेल्या मित्राच्या जवळ तो पोहोचला. ताबडतोब त्याने त्याला

आपल्या पाठंगुळी घेतले आणि तडक त्याला तो आपल्या खंदकातील छावणीमध्ये घेऊन आला.

पलटणीच्या लेफ्टनंटने त्या जखमी शिपायाला तपासले. एक श्वास सोडला आणि त्या शिपायाकडे दयाळू नजरेने पाहत सद्‌गदीत स्वरात म्हणाला, ''पाहा, मी तुला सांगितले होते की उपयोग होणार नाही म्हणून. सॉरी, पण तुझा साथीदार वाचू शकला नाही. तो तर आपल्याला सोडून गेलाच, पण तू सुद्धा जबर जखमी होऊन मरता मरता वाचलास. तुझे हे धाडस सार्थ ठरले नाही.''

त्यावर त्या शूर शिपाई मित्राने उत्तर दिले, ''होय, सर, पण माझे जाणे निरर्थक नव्हते. उलट ते अगदी योग्य आणि मोलाचे होते. कारण मी जेव्हा त्याच्याजवळ पोहोचलो तेव्हा माझा मित्र जिवंत होता. तो माझ्याशी बोलला त्याचे मला अत्यंत समाधान मिळाले. कारण त्याचे शेवटचे शब्द माझ्या कानावर पडले, तो म्हणाला, मित्रा, तू येशील याची मला खात्री होती!''

मित्रच तुमच्या आयुष्याला अर्थ प्राप्त करून देतात!!!

❋ ❋ ❋

## वैगुण्याचे वरदान

१९८० साली अमेरिकेतील एका विद्यापिठाने एक आगळावेगळा अभ्यास करून आश्चर्यचकित करणारा निष्कर्ष काढला. त्यांनी डेव्हिड आणि जॉन असे काल्पनिक नोकरी मिळविण्यासाठीचे उमेदवार उभे केले. त्या दोघा नकली उमेदवारांना पुढे करून त्या विद्यापिठाने तो वेगळा प्रयोग अमलात आणला.

या दोन्ही उमेदवारांची वैयक्तिक माहिती तंतोतंत एकसारखी होती. त्यांनी सादर केलेली शिफारसपत्रे सुद्धा मिळतीजुळती होती. फरक होता तो जॉनने सादर केलेल्या शिफारसपत्रातील फक्त एका वाक्याचा. ते वाक्य असे होते, ''कधी कधी जॉनबरोबर जमवून घेणे इतरांना कठीण जाते.''

या दोघांची माहितीपत्रके एकाच वेळी विविध व्यवसायाच्या मनुष्यबळ विकास खात्याकडे निवड करण्यासाठी सादर करण्यात आली. त्यांनी त्यावर चर्चा केल्या. मनुष्यबळ विकास खात्याच्या पदाधिकाऱ्यांनी आपली पसंती जॉनच्या नावाला दिली. जॉनच्या शिफारसपत्रात त्याच्या स्वभावासंबंधी ते वेगळे मत नमूद करण्यात आले होते. निवड समितीच्या सदस्यांचे लक्ष या वाक्याने वेधून घेतले होते. जॉनमधील वेगळेपणा त्यांच्या नजरेने टिपला होता.

विद्यापिठातील अभ्यासकांनी या निर्णयाचा असा निष्कर्ष काढला की, जॉनच्या शिफारसपत्रामधील त्याच्या दोषाची किंवा वैगुण्याची केलेली नोंदच त्याची निवड होण्यासाठी त्याच्या उपयोगात आली. कारण दोनही शिफारसपत्रांपैकी एका शिफारसपत्रात असलेले हे वाक्य बोलके होते. हे वाक्यच जास्त विश्वसनीय वाटत होते. जॉनच्या स्वभावाबद्दल बरेच काही सांगून जात होते. जॉनच्या विरोधातील हे स्पष्ट मतच त्याच्या बाजूने कौल देऊन गेले.

याचाच अर्थ आपल्यामधील प्रतिकूल किंवा अभावसूचक मुद्देच आपली विश्वासपात्रता इतरांना सिद्ध करून दाखवितात. स्वत:ला जगात लोकांसमोर प्रकर्षाने मांडण्याचा हा एक कानमंत्रच होता.

❋ ❋ ❋

## शहरी आगंतुक सल्ला (अंतिम ध्येय)

स्वत:ला विचारवंत म्हणवणारा एक मुंबईकर जीवाची मौज करायला गोव्यातील समुद्रकिनारी एका छोट्या वस्तीवर येतो. ती कोळी लोकांची वस्ती असते. नुकतेच मासे पकडून आलेला एक कोळी बोट किनाऱ्याला लावून मासे निवडीत बसलेला असतो. ताजे रंगीबेरंगी मासे पाहून तो मुंबईकर एकदम खूश होऊन जातो. जवळ जाऊन अगदी आपलेपणाने तो कोळ्याला

विचारतो, ''भाऊ किती वेळ लागला रे तुला हे सगळे मासे पकडायला?''

''फारसा वेळ नाही लागला''... कोळी.

''मग तू समुद्रावर जास्त वेळ राहून जास्त मासे का पकडत नाहीस?'' मुंबईकराने आणखी जवळीक केली.

तोंडावर समाधानाचे हसू आणून कोळयाने सांगितले, ''दादा हे एव्हढे मासे मिळाले की माझे आणि माझ्या कुटुंबाचे लई बेस भागते.''

न राहवून मुंबईकराने प्रश्न केला, ''अरे पण भाऊ इतर राहिलेला वेळ तू कसा घालवतोस?''

''रोजच मी उशिरा उठतो. थोडा वेळ समुद्रावर जाऊन मी मासे पकडतो. मग पोराबाळांबरोबर मस्त खेळतो. दुपारी पुन्हा डुलकी घेतो. सायंकाळी बायकोला बरोबर घेऊन मित्रमंडळात जाऊन गप्पा करतो, मजा करतो, गिटार वाजवितो, नाचतो, गातो.' कोळ्याने दिवसभराचा वेळेचा उपयोग ऐकविला. ''आयुष्य आनंदाने जगतो.''

त्याला मधेच थांबवित मुंबईकर म्हणतो, ''हे पाहा, मी उच्च शिक्षण घेऊन बिझनेस मॅनेजमेंटमध्ये एम्. बी. ए. केले आहे. मी तुला मदत करू शकतो. तू आत्तापेक्षा जास्त वेळ मासे पकडायला हवेस. साहजिकच तुझ्या जाळ्यात जास्त मासे येतील. ते जास्त पकडलेले मासे विकून तू जास्त पैसे कमाऊ शकशील. त्या जास्त पैशातून मोठी बोट विकत घेऊ शकशील.''

''हो पण त्यानंतर काय होईल?'' कोळी उत्सुकतेने विचारतो.

''जास्त कमाईतून मोठी बोट, त्यातून जास्त मासे, त्याचे जास्त पैसे, दुसरी बोट मग तिसरी बोट असे करीत करीत इतक्या बोटी घेशील की, तुझ्याजवळ ट्रॉलर्सचा ताफाच तयार होईल. त्यानंतर तुला बाजारात किंवा दलालाला मासे विकण्याची गरजच भासणार नाही. तू परस्पर गोव्यातील फिश प्रोसेसिंग प्लांटबरोबर व्यवहाराच्या वाटाघाटी करू शकशील. इतकेच नाही तर तुला स्वत:चा एक प्रोसेसिंग प्लांट उभा करणे सहज शक्य होईल. साहजिकच तुला या छोट्या गावात राहावे लागणार नाही. तू मग पणजीसारख्या मोठ्या शहरात मुक्काम हलवू शकशील. इतकेच नाही तर महानगर मुंबईला येऊन तिथून स्वत:चा प्रचंड मोठा कारभार सांभाळू लागशील.''

कोळयाचे डोळे चमकतात व तो विचारतो, ''दादा हे सगळे व्हायला किती वेळ लागेल हो?''

''भाऊ जास्त नाही वीस किंवा जास्तीत जास्त पंचवीस वर्षे लागतील.''

''हो का? मग त्यानंतर काय होईल?'' भोळा कोळी प्रश्न करतो.

त्यावर मंद स्मित करून तो उच्च विद्वान मुंबईकर सांगतो, ''अरे मित्रा! त्यानंतर तर खरी मजा सुरू होते. जेव्हा तुझा धंदा भरभराटीस येईल तेव्हा तू शेअर मार्केटमध्ये उलाढाल करू लागशील. लक्षाधीश, कोट्यधीश होशील.''

वर्णन आणि आकडे ऐकून कोळ्याने प्रश्न केला, ''खरेच कोट्यधीश? आणि त्यानंतर मग काय होईल?''

''त्यानंतर तू आरामात निवृत्त होशील. मुंबईच्या दगदगीतून गोव्याच्या समुद्रकिनारी छोटयाशा गावात सुखाचे आयुष्य कंठू शकशील. रात्री ताणून देऊन सकाळी उशिरापर्यंत झोपशील, समुद्रावर जाऊन किरकोळ मासे पकडशील, मुलाबाळांशी खेळशील, दुपारी मस्त वामकुक्षी घेशील, सायंकाळी बायकोबरोबर मित्रमंडळीत जाऊन गप्पा, नाचगाणी, विनोद, खाणे, पिणे करीत मौजमजा करशील. उरलेले आयुष्य अत्यंत आनंदात, सुखासमाधानात व्यथित करशील.''

आपल्या बोटीच्या छोट्या छोट्या काठावर इतका वेळ टेकून बसलेला गोव्यात तो मत्स्यराज एक क्षणही न थांबता विचारता झाला, ''हात्तीच्या, दादा, त्यात नवीन ते काय नाय. हे सगळे मी आत्तासुद्धा करतो आहे की!! मग फुकटच त्रास घेऊन आयुष्याची वीस पंचवीस वर्षे वाया का घालवायची?''

**तात्पर्य :** आयुष्यात कोठवर जायचे व अंतिम ध्येय काय गाठायचे ते लवकर नक्की करा. मृगजळामागे नुसते धावू नका. सध्याच्या प्रगतजगामध्ये नावीन्याची व भौतिकसुखाची चढाओढ सुरू आहे. त्याचा अट्टाहास करून तरूणवयातच थकून जाऊ नका.

❋ ❋ ❋

# शिक्षकांचे समाजासाठी योगदान

एका रात्रीच्या जेवणाच्या टेबलावरील निमंत्रित अतिथ्यांच्या गप्पा रंगात आल्या होत्या. निमंत्रितांमध्ये वेगवेगळ्या व्यवसायातील मान्यवर व्यक्ती होत्या. अनेक विषय चर्चेला येत होते. त्यातच प्रत्येक जण आयुष्यात इतरांना काय देतो व त्याचे काय काम असते असा विषय चर्चेला आला.

मान्यवरांमध्ये एक नामांकित व्यवसायाचा कार्यकारी संचालक होता. त्याला आपल्या व्यवसायाचा व स्वत:च्या वरिष्ठ पदाचा थोडा जास्तच अभिमान होता. त्याने एकूण शिक्षण संस्था, त्यांची कार्यपद्धती व शिक्षकांचे विद्यादानासाठी होत असलेले योगदान याविषयी मते मांडायला सुरूवात केली. कडवटपणे तो म्हणाला, ''ज्यांनी स्वत:चे ध्येय फक्त साधे शिक्षक होण्याचे ठरविलेले असते, त्यांच्याकडून मुलांना काय उच्च व दिव्य शिक्षण मिळू शकणार?''

त्याने जमलेल्या इतर मान्यवरांना यावर त्यांचे काय मत आहे ते मांडायला सांगितले. शिक्षक काय करू शकतात व ते कसे शिकवू शकत नाहीत यावर त्यांचे म्हणणे काय हे त्याला ऐकायचे होते.

त्या लोकांमध्ये एक अनुभवी शिक्षिका होती. ती आपल्या स्पष्टवक्तेपणा व सचोटीसाठी ओळखली जात असे. तिने एक कटाक्ष टाकून विचारले, ''मी काय करते ते तुम्हाला ऐकायचे आहे ना?'' थोडे क्षण ती थांबली आणि नंतर अतिशय कणखर आवाजात तिने सांगायला सुरूवात केली.

''मी मुलांना स्वत:ला कल्पना सुद्धा नसेल इतकी शिक्षणासाठी मेहनत घ्यायला लावते.

मी मुलांना वर्गातील पूर्ण ४० मिनिटांचा वेळ माझ्या शिकविण्याकडे लक्ष केंद्रित करून बसायला शिकविते. याउलट हीच मुले घरी त्यांच्या पालकांसमोर पाच मिनिटे सुद्धा आय् पॅड, टी.व्ही., व्ही. डि.ओ. गेम, किंवा सिनेमा याशिवाय बसू शकत नाहीत.''

परत एकदा तिने जमलेल्या सर्वांकडे नजर टाकली आणि थोडा वेळ घेऊन पुन्हा बोलली, ''खरेच तुम्हाला मी काय करते ते ऐकायचे आहे ना?''

मी मुलांमध्ये आमूलाग्र बदल घडवून आणते. मी त्यांची उत्सुकता जागी करते. मी त्यांना केल्या चुकांबद्दल मनापासून माफी मागायला शिकविते. मी त्यांना मानाने जगायला तसेच दुसऱ्यांचा मान ठेवायला शिकविते. मी त्यांना त्यांनी केलेल्या कामाची जबाबदारी घ्यायला शिकविते. मी त्यांना लिहायला शिकविते आणि त्यांना लिहिते करते. मी त्यांना खूप खूप व विविध विषयावर वाचायला शिकविते.

मी त्यांना गणित विषयात पारंगत करते. त्यांना गणित करण्यासाठी क्यॅल्क्युलेटर नव्हे तर देवाने दिलेल्या बुद्धिचा उपयोग करायला शिकविते.

मी माझ्या विद्यार्थ्यांना इतर देशापासून जे जे शिकता येईल ते ते शिकण्यासाठी उद्युक्त करते.

स्वत:च्या भाषेवर प्रभुत्व मिळविताना इंग्रजी भाषेचे ज्ञान सुद्धा किती महत्त्वाचे आहे ते समजावून देते.

माझ्या वर्गात शिक्षण घेत असताना प्रत्येक विद्यार्थ्यांना निर्धास्त वाटून तो मोकळेपणाने शिकू शकेल असे वातावरण राहील असा माझा कटाक्ष असतो.

मी माझ्या विद्यार्थ्यांना राष्ट्राबद्दल अभिमान बाळगून राष्ट्राच्या ध्वजाबद्दल निष्ठा व प्रतिष्ठा बाळगण्यास शिकविते.

कारण ते या महान राष्ट्राचे नागरिक आहेत.

सर्वांत महत्त्वाचे म्हणजे मी त्यांना सांगते की, त्यांना मिळालेली ही आयुष्याची देणगी जर त्यांनी उत्तम रितीने निभावली, जरूर असणारी मेहनत केली, सद्बुद्धिने वर्तन केले तर त्यांना आयुष्यात यश हमखास मिळेल.''

त्यानंतर ती स्वाभिमानी व कर्तव्यदक्ष शिक्षिका परत एकदा थोडे थांबली आणि क्षणभराने म्हणाली,

''मी किती पैसे मिळविते यापेक्षा मी काय करते हे जेव्हा लोकांना समजते तेव्हा माझी मान अभिमानाने ताठ होते. पैशाने

माझी किंमत करणाऱ्या लोकांकडे मी अजिबात लक्ष देत नाही. कारण ते लोक या गोष्टीमध्ये अनभिज्ञ असतात. मला त्यांची पर्वा वाटत नाही. हे सगळे ऐकल्यानंतरही अजून कोणाला मी शिक्षिका म्हणून काय करते हे जाणून घ्यायचे आहे का? माझ्या व इतरांच्या करण्यात फरक असतो. मी बदल घडवून आणते. यावर आपले काय म्हणणे आहे संचालक महोदय?''

कार्यकारी संचालक महाशय अत्यंत खजिल होऊन खाली मान घालून स्वस्थ बसले होते.

❋ ❋ ❋

# शिवरामची गोष्ट .... आनंदाचा झरा

**बे**ल वाजली म्हणून दरवाजा उघडला. दारात शिवराम. शिवराम आमच्या सोसायटीतल्या लोकांच्या गाड्या, बाईक्स धुवायचं काम करतो.

'साहेब, जरा काम होतं.'

'पगार द्यायचा राहिलाय का माझ्याकडून?'

'नायसाहेब, ता केवाच भेटला. पेढे द्यायचे होते. पोरगा धाव्वी झाला.'

'अरे व्वा! या आत या.'

आमच्या दाराचा उंबरठा शिवराम प्रथमच ओलांडत होता.

मी शिवरामला बसायला सांगितलं. तो आधी नको नको म्हणाला. आग्रह केला तेव्हा बसला. पण अवघडून. मीही त्याच्यासमोर बसताच त्याने माझ्या हातात पेढ्यांची पुडी ठेवली.

'किती मार्क मिळाले मुलाला?'

'बासष्ट टक्के.'

'अरे वा!' त्याला बरं वाटावं म्हणून मी म्हटलं.

हल्ली ऐंशी, नव्वद टक्के ऐकायची इतकी सवय झालीये की तेवढे मार्क मिळालेला माणूस नापास झाल्यासारखा वाटतो. पण शिवराम खूश दिसत होता.

'साहेबा मी जाम खूश आहे. माझ्या अख्ख्या खानदानात इतका शिकलेला पहिला माणूस म्हणजे माझा पोरगा!'

'अच्छा, म्हणून पेढे वगैरे!'

शिवरामला माझं बोलणं कदाचित आवडलं नसावं. तो हलकेच हसला आणि म्हणाला, 'साहेब, परवडलं असतं ना, तर दरवर्षी वाटले असते पेढे. साहेब, माझा मुलगा फार हुशार नाही, ते माहित्येय मला. पन एकही वर्ष नापास न होता दरवर्षी त्याचे दोनदोन, तीन तीन टक्के वाढले. यात खुशी नाय का? साहेब, माझा पोरगा आहे म्हणून नाही सांगत, पन तो जाम खराब कंडिशनमध्ये अभ्यास करायचा. तुमचं कायते शांत वातावरण! आमच्यासाठी ही चैन आहे साहेब! तो सादा पास झाला असता ना, तरी मी पेढे वाटले असते.'

मी गप्प बसल्याचं पाहून शिवराम म्हणाला, 'साहेब सॉरी हा, काय चुकीचं बोललो असेन तर.

माझ्या बापाची शिकवन. म्हनायचा, आनंद एकट्याने खाऊ नको– सगल्यांना वाट !

हे नुसते पेढे नाय साहेब – हा माझा आनंद आहे !'

मला भरून आलं. मी आतल्या खोलीत गेलो. एका नक्षीदार पाकिटात बक्षिसाची रक्कम भरली. आतून मोठ्यांदा विचारलं, 'शिवराम, मुलाचं नाव काय?'

'विशाल.' बाहेरून आवाज आला.

मी पाकिटावर लिहिलं,

‘प्रिय विशाल, हार्दिक अभिनंदन!
नेहमी आनंदात राहा. तुझ्या बाबांसारखा !’

‘शिवराम हे घ्या.’

‘साहेब कशाला? तुम्ही माझ्याशी दोन मिन्टे बोल्लात यात आलं सगलं.’

‘हे विशालसाठी आहे. त्याला त्याच्या आवडीची पुस्तकं घेऊ दे यातून.’

शिवराम काहीच न बोलता पाकिटाकडे बघत राहिला.

‘चहा वगैरे घेणार का?’

‘नको साहेब, आणखी लाजवू नका. फक्त या पाकिटावर काय लिहिलंय ते जरा सांगाल? मला वाचता येत नाही. म्हनून...’

‘घरी जा आणि पाकीट विशालकडे दे. तो वाचून दाखवेल तुम्हाला!’ मी हसत म्हटलं.

माझे आभार मानत शिवराम निघून गेला खरा पण त्याचा आनंदी चेहरा डोळ्यांसमोरून जात नव्हता. खूप दिवसांनी एका आनंदी आणि समाधानी माणसाला भेटलो होतो. हल्ली अशी माणसं दुर्मीळ झाली आहेत. कोणाशी बोलायला जा - तक्रारींचा पाढा सुरू झालाच म्हणून समजा. नव्वद पंच्याण्णव टक्के मिळवून सुद्धा लांब चेहरे करून बसलेले मुलांचे पालक आठवले. आपल्या मुलाला/ मुलीला हव्या त्या कॉलेजात प्रवेश मिळेपर्यंत त्यांनी आपला आनंद लांबणीवर टाकलाय, म्हणजे. आपण त्यांना नको हसू या. कारण आपण सगळेच असे झालोय. आनंद ‘लांबणीवर’ टाकणारे!

माझ्याकडे वेळ नाही, माझ्याकडे पैसे नाहीत, स्पर्धेत टिकाव कसा लागेल, आज पाऊस पडतोय, माझा मूड नाही!’ आनंद ‘लांबणीवर’ टाकायच्या या सगळ्या सबबी आहेत हे आधी मान्य करू या. काही गोष्टी करून आपल्यालाच आनंद मिळणार आहे. पण आपणच तो आनंद घ्यायचा टाळतोय! Isn't it strange?

मोगऱ्याच्या फुलांचा गंध घ्यायला कितीसा वेळ लागतो?

सूर्योदय - सूर्यास्त पाहायला किती पैसे पडतात?

आंघोळ करताना गाणं म्हणताय, कोण मरायला येणारे तुमच्याशी स्पर्धा करायला?

पाऊस पडतोय? सोप्पं आहे - भिजायला जा!

अगदी काहीही न करता गादीत लोळत राहायला तुम्हाला ‘मूड’ लागतो?

माणूस जन्म घेतो त्यावेळी त्याच्या हाताच्या मुठी बंद असतात.

परमेश्वराने एका हातात ‘आनंद’ आणि एका हातात ‘समाधान’ कोंबून पाठवलेलं असतं.

माणूस मोठा होऊ लागतो. वाढत्या वयाबरोबर ‘आनंद’ आणि ‘समाधान’ कुठेकुठे सांडत जातो.

आता ‘आनंदी’ होण्यासाठी ‘कोणावर’ तरी, ‘कशावर’ तरी अवलंबून राहावं लागतं.

कुणाच्या येण्यावर - कुणाच्या जाण्यावर. कुणाच्या असण्यावर - कुणाच्या न बोलण्यावर.

खरंतर, ‘आत’ आनंदाचा न आटणारा झरा वाहतोय. कधीही त्यात उडी मारावी आणि मस्त डुंबावं.

इतकं असून.... आपण सगळे त्या झऱ्याच्या काठावर उभे आहोत - पाण्याच्या टँकरची वाट बघत!

जोवर हे वाट बघणं आहे तोवर ही तहान भागणं अशक्य!

इतरांशी तुलना करत आणखी पैसे, आणखी कपडे, आणखी मोठं घर, आणखी वरची ‘पोजिशन’, आणखी टक्के...! या ‘आणखी’ च्यामागे धावताधावता त्या आनंदाच्या झऱ्यापासून किती लांब आलो आपण!

जावेद अख्तर साहेबांनी खूप छान लिहून ठेवलंय -

सबका खुशी से फासला एक कदम है
हर घर में बस एकही कमरा कम है!

शिवराम भेटला नसता तर माझं आणि माझ्या आनंदामधलं ‘ते एका पावलाचं’ अंतर कदाचित भरून निघालं नसतं.

❋ ❋ ❋

# सत्यघटना.... अलेक्झांडर फ्लेमिंग आणि विन्स्टन चर्चिल

मि. फ्लेमिंग नावाचा एक स्कॉटिश शेतकरी होता. एक दिवस आपल्या शेतात काम करीत असताना, जवळच्या खड्ड्यातून मदत मागण्याचा करूण आवाज त्याच्या कानावर पडला. हातातील नांगर तसाच टाकून तो त्या खड्ड्याकडे धावला.

त्या खड्ड्यातील दलदलीमध्ये एक मुलगा त्याच्या कमरेपर्यंत बुडून अडकून बसला होता. त्यातून बाहेर पडण्यासाठी धडपड करूनही येता येत नसल्यामुळे जीवाच्या आकांताने ओरडून तो मदतीची हाक घालीत होता. भीतिमुळे तो गलितगात्र झाला होता. शेतकरी फ्लेमिंगने क्षणाचाही विचार न करता त्या मुलाला हाताने ओढून बाहेर काढले. जणू काही त्याने त्या मुलाला मरणाच्या दाढेतून ओढून बाहेर काढले होते.

दुसऱ्या दिवशी त्या स्कॉटिश शेतकऱ्याच्या अतिशय विरळ असलेल्या वस्तीत, त्याच्या शेतासमोर एक अतिशय आलिशान, आधुनिक आणि अत्यंत महाग अशी कार येऊन थांबली. अत्यंत रुबाबदार कपडे घातलेला एक अमीर सद्गृहस्थ त्या गाडीतून पायउतार झाला. त्याने फ्लेमिंगला आपली ओळख करून दिली. हस्तांदोलन करून तो फ्लेमिंगला म्हणाला, ''काल तुम्ही ज्या मुलाला खड्ड्यातून बाहेर काढून संकटातून वाचविलेत त्याचा मी बाप. तुम्ही माझ्या मुलाला मरता मरता वाचविलेत. तुमचे आमच्यावर फार उपकार झाले आहेत. त्याची थोडी का होईना परतफेड करण्याची माझी प्रामाणिक इच्छा आहे.''

तो स्कॉटिश शेतकरी नम्रपणे नकार देत म्हणाला, ''मी जे काही काल केले त्यासाठी एकही पैसा घेऊ शकणार नाही. अगदी बक्षिस म्हणून सुद्धा.'' नेमके त्याच वेळी त्या शेतकऱ्याचा मुलगा त्यांच्या झोपडीच्या दाराशी आला होता. त्या मुलाकडे पाहत त्या अमीर सद्गृहस्थाने विचारले, ''हा तुमचा मुलगा आहे काय?''

शेतकऱ्याने अतिशय अभिमानाने हो म्हटले.

तो अमीर सद्गृहस्थ तत्काळ म्हणाला, ''ठीक आहे. आपण दोघे एक ठराव करू या. माझ्या मुलाबरोबर इथून पुढे तुमचा मुलगा शिक्षण घेईल. माझ्या मुलाला मी ज्या पद्धतीचे आणि जसे शिक्षण देतो आहे तसेच त्याला हवे त्या विषयात मी त्यालाही शिक्षण देईन. त्याची संपूर्ण जबाबदारी माझी असेल. तुझा मुलगा तुझ्याप्रमाणेच सद्गुणी आणि सद्विचारी असला तर तो आयुष्यात नक्की यशस्वी होईल आणि नाव कमाविल. आपल्या दोघांनाही त्याचा अभिमान वाटेल.''

त्यानंतर त्या अमीर गृहस्थाने कबूल केल्याप्रमाणे केले.

शेतकरी फ्लेमिंगचा मुलगा अतिशय नावाजलेल्या शाळा व कॉलेजमध्ये शिकला. लंडनमधील अतिशय नामांकित अशा सेंट मेरीज् मेडिकल हॉस्पिटलमधून त्याने पदवी संपादन केली. त्याच्या हुशारी व अभ्यासामुळे पुढील काळात तो सर अलेक्झांडर फ्लेमिंग या नावाने जगप्रसिद्ध शास्त्रज्ञ म्हणून नावारूपास आला. काही वर्षांच्या संशोधनानंतर त्याने पेनिसिलीन औषधाचा शोध लावला.

पुढे त्या अमीर बापाचा बेटा ज्याला त्या शेतकऱ्याने खड्ड्यातून वाचविले होते तोच, न्यूमोनियाने खूप आजारी झाला. यावेळी त्याला कशाने वाचविले असेल तर फ्लेमिंगने संशोधन करून मिळवलेल्या 'पेनिसिलीन' या औषधाने. त्या अमीर सद्गृहस्थाचे नाव होते, रडॉल्फ चर्चिल.... त्याच्या मुलाचे नाव होते सर विन्स्टन चर्चिल.

असे म्हटले जाते की, जसे करावे तसे तुम्हाला परत मिळते.

म्हणूनच....

काम असे करा की ज्यासाठी तुम्हाला पैशाची गरज पडणार नाही.

प्रेम असे करा की तुम्हाला कधीच कोणी किंवा तुम्ही कोणालाच दुखावलेले नाही.

नाचताना असे धुंद होऊन नाचा की जणू तुमच्याकडे कोणाचेच लक्ष नाही.

गाणे गाताना इतके मोकळे गा की जणू कोणीच तुमचे गाणे ऐकत नाही.

जगाल तर असे जगा की तुम्ही स्वर्गात असल्याचे सुख तुम्हाला मिळत असेल.

❋ ❋ ❋

# सफरचंद देणाऱ्या मुलीची गोष्ट

**ऑ**गस्ट १९४२ चे दिवस होते. पिओत्रके, पोलंडमधील सकाळ अंध:कारमय उजाडली होती. आम्ही सर्व चिंतातूरपणे वाट पाहत होतो. गावातील ज्यू वस्तीमधील सगळ्या लहान, मोठे पुरूष बायका सर्वांना एका चौकात कळपाने आणले होते. आम्हाला तिथून हलविण्यात येणार असल्याची बातमी पसरली होती. साथीच्या तापाला बळी पडून माझे वडील नुकतेच वारले होते. गर्दीच्या वस्तीतील कळपाच्या राहणीमुळे रोग प्रचंड पसरला होता. आता आमचे कुटुंब विभक्त केले जाणार अशी मला जाम धास्ती वाटत होती.

काय वाटेल ते झाले तरी तुझे खरे वय सांगू नकोस. तू १६ वर्षांचा आहेस असेच सांग. माझा मोठा भाऊ माझ्या कानात कुजबुजला. माझ्या ११ वयाच्या मानाने मी खूपच उंच होतो. त्यामुळे मी सांगितलेले ढकून गेले. १६ वय सांगितल्यामुळे मी कदाचित कामासाठी उपयोगी येणार होतो. जर्मन सैनिक फरसबंद दगडावर धाडकन पाय आपटून माझ्यासमोर येऊन उभा राहिला. मला कपाळापासून पायापर्यंत न्याहाळल्यानंतर त्याने मला माझे वय विचारले. मी ते सोळा सांगितले. त्याने लगेच मला डावीकडे जाण्याचा आदेश दिला. त्या बाजूला माझे इतर तीन भाऊ व काही सशक्त लोक आधीच जाऊन उभे होते.

इतर काही बायका, आजारी, वयस्कर व मुलांबरोबर माझी आई उजव्या बाजूला पाठविली होती. मी माझ्या भावाला हळूच विचारले, असे का? त्याने उत्तर दिले नाही. मी आईकडे धावत गेलो आणि म्हणालो, ''मला माझ्या आईबरोबर जाऊ दे.'' ''नाही, जा चालता हो. मला उच्छाद आणू नकोस. तुझ्या भावांबरोबर जा.'' अत्यंत कडक शब्दांत तिने मला ताकीद दिली. आजपर्यंत ती माझ्याशी अशा कठोरपणे कधीच बोलली नव्हती. पण नंतर मला समजले ती माझा बचाव करीत होती. तिची माझ्यावर फार माया होती. ही एकच वेळ अशी होती की जेव्हा तिने तशी माया नसल्याचे नाटक केले होते. तेच मला झालेले तिचे अखेरचे दर्शन होते.

मला आणि माझ्या भावांना एका घोडागाडीतून जर्मनीत नेण्यात आले. आम्हाला एका बंद छावणी (concentration camp) मध्ये एका रात्रीपुरते आणले गेले. तिथून लगेचच आमची रवानगी अत्यंत गर्दीच्या बरॅकमध्ये केली गेली. तिथे आम्हाला गणवेश आणि ओळखीसाठी क्रमांक देण्यात आले. मी माझ्या भावांना मला नावाने हाक न मारता त्या दिलेल्या क्रमांकाने ९४९४८३ अशी हाक मारायला सांगितले.

मला स्मशानात काम दिले होते. मरण पावलेल्या लोकांची शवे ढकलत्या गाडीवर चढवण्याचे काम मला दिले होते. त्यांच्या बरोबर मला पण मेल्यासारखे वाटत असे. माझ्यातील माणूस संपून मी फक्त गळयात अडकवलेला क्रमांक झालो होतो.

लवकरच मी आणि माझ्या भावांना बर्लिनजवळच्या एका छावणीत नेण्यात आले. एका सकाळी मला आईचा आवाज ऐकू आला. ''बाळा, मी तुझ्यासाठी एक देवदूत पाठवित आहे.'' अतिशय नाजुक आणि स्पष्ट असा तो आवाज होता. मी जागा झालो. ते एक सुंदर स्वप्न होते. कारण त्या परिसरात फक्त काम होते. पोटात भुकेचा डोंब आणि सतत घाबरवित असलेली भीती होती. देवदूत असणे शक्य नव्हते.

दोन तीन दिवसांनंतर मी छावणीच्या कुंपणाच्या भागात हिंडत होतो. तिथे पहारेकऱ्याची नजर जात नव्हती. मी एकटाच होतो. कुंपणाच्या दुसऱ्या बाजूला एक मुलगी मला दिसली. तिचे केस काळे, चमकदार व कुरळे होते. ती एका झुडपाआड लपली होती. मी इकडेतिकडे पाहून मला कोणी पाहत नाही ना याची खात्री करून घेतली. मी तिला हलकेच जर्मन भाषेत विचारले, ''तुझ्याकडे माझ्यासाठी खायला द्यायला काही आहे का?'' तिला काहीच समजले नाही. मी काही इंच कुंपणाच्या जवळ जाऊन तिला परत पोलिश भाषेत तोच प्रश्न केला. ती मुलगी दोन पावले पुढे आली. मी काटकुळा, उंच होतो आणि माझ्या पायाला चिंध्या गुंडाळलेल्या होत्या. त्या मुलीच्या डोळ्यांत मला भीती दिसली नाही. उलट तिचे डोळे मला सतेज वाटले. तिच्या जॅकेटमधून तिने एक सफरचंद काढले आणि माझ्या दिशेने कुंपणावरून फेकले. मी ते पकडले आणि परत जाण्यासाठी पळ काढणार एवढ्यात निसटते शब्द कानांवर पडले, ''मी उद्या परत येईन.''

मी रोज त्या ठिकाणी ठरावीक वेळेला कुंपणाजवळ जात होतो. ती नेहमीच तिथे येऊन मला काही ना काही खायला आणीत असे. कधी सफरचंद, कधी ब्रेड इ. आमचे थांबून बोलण्याचे अगर रेंगाळण्याचे धैर्य मात्र झाले नाही. पकडले गेलो तर दोघांनाही मृत्युदंड नक्की झाला असता. तिला पोलिश भाषा येत होती या पलीकडे मला तिच्याविषयी काहीही माहिती नव्हती. मला ती एक शेतावरील दयाळू मुलगी म्हणून माहीत होती. तिचे नाव काय होते? माझ्यासाठी ती आपले आयुष्य धोक्यात का घालीत होती? आशा ही अत्यंत दुर्मीळ गोष्ट होती; पण ती मुलगी कुंपणाच्या दुसऱ्या बाजूने माझी आशा सफरचंद किंवा ब्रेड या स्वरूपात जागवत होती.

आम्ही त्या छावणीमध्ये तीन महिने होतो. युद्ध संपायची चिन्हे दिसत होती. तरी माझे भविष्य ठरले होते. १० मे १९४५ रोजी सकाळी गॅस चेंबरमध्ये माझे मरण नक्की केले होते. अरूणोदय होताच मी मनाची तयारी केली होती. आतापर्यंत बऱ्याच वेळा मृत्यु माझ्यासमोर आला होता; पण कसेतरी आजपर्यंत मी सहीसलामत बचावलो होतो. आता मात्र ती घडी येऊन ठेपली होती. मला माझ्या आईवडिलांची आठवण आली. वाटले निदान आमचे एकत्र येणे होईल. पण सकाळी आठ वाजता हलकल्लोळ माजला. मी बंदुकीच्या फैरी झडलेल्या ऐकल्या, लोक सैरावैरा धावताना दिसले. रशियन बटालियनने आमची सुटका केली होती. मला माझ्या भावांबरोबर छावणीतून बाहेर काढण्यात आले. छावणीचे दरवाजे सताड उघडले गेले. सगळेजण पळत होते म्हणून मीही पळत होतो.

कसे ते माहीत नाही पण माझे तीनही भाऊ वाचले होते. माझ्या जगण्यासाठी ती मुलगी कारणीभूत होती हे मला पक्के ठाऊक होते. ज्या ठिकाणी क्रौर्य आणि अभद्र यांचे राज्य होते त्या ठिकाणी एका मुलीच्या चांगुलपणाने माझा जीव वाचला होता. जिथे जगण्याची आशा पूर्णपणे मावळून गेली होती तिथे तिने आशेची ज्योत पेटविली होती. माझ्या आईने मला देवदूत पाठविते म्हणून सांगितले होते. त्या मुलीच्या रूपाने तो देवदूत आला होता.

अखेरीस मी इंग्लंडमध्ये पोहोचलो. एका ज्यू धर्मादाय संस्थेने माझी आणि काही मुलांची धर्मशाळेत सोय केली होती. आम्ही मुले त्या नरसंहारातून सहीसलामत सुटलो होतो. आम्हाला इलेक्ट्रॉनिक्स विषयात शिक्षण दिले गेले. शिक्षणानंतर मी अमेरिकेत स्थलांतर केले. तिथे माझे भाऊ आधीच आले होते. मी दोन वर्षे आर्मीत नोकरी केली. त्या दरम्यान मी कोरियन युद्धात गेलो होतो. दोन वर्षांनी परत आल्यावर मी माझा छोटासा इलेक्ट्रॉनिक दुरुस्तीचा व्यवसाय न्यूयॉर्क येथे सुरू केला.

एक दिवस माझ्या मित्राने फोन केला. तो माझा इंग्लंडपासूनच मित्र होता. त्याला त्याच्या मैत्रिणीला भेटायला जायचे होते. त्या मैत्रिणीची एक पोलिश मैत्रीण होती. मी तिच्याशी दोस्ती करावी असे त्याने मला सांगितले व त्याच्याबरोबर जाण्याचा आग्रह केला. प्रथमत: अनोळखी मुलीबरोबर डेट घ्यायला मी तयार नव्हतो; पण मित्र फारच आग्रह करू लागल्यावर मी तयार झालो. आम्ही दोघे त्याच्या मैत्रिणीला व तिच्या रोमा नावाच्या दुसऱ्या मैत्रिणीला भेटायला गेलो. रोमाला पाहिल्यावर एका अनोळखी मुलीबरोबर आल्याचे जाणवले नाही. ती एका दवाखान्यात नर्सचे काम करीत होती. अत्यंत साधी, दयाळू पण चाणाक्ष वाटली. देखणी तर होतीच. थोडेसे ब्राऊन रंगाचे, कुरळे केस व हिरव्या रंगाचे बदामी आकाराचे डोळे असलेली रोमा प्रथमदर्शनीच मला आवडून गेली. आम्ही चौघे कारने जवळच्या एका ठिकाणी गेलो. जाताना मी व रोमा मागच्या सीटवर बसलो होतो. दोघांना मोकळेपणा वाटत होता. गप्पांना रंग येत होता. बोलताना अशाप्रकारे एखाद्या अनोळखी मुलाबरोबर जायला ती पण सुरुवातीला बिचकत होती हे समजले. आम्ही दोघेही आपल्या मित्राच्या शब्दाला मान देऊन आलो होतो. आम्ही समुद्रकिनाऱ्यावर मनसोक्त भटकलो, रात्री छान जेवण केले.

परत येताना आम्ही दोघे परत मागच्या सीटवर बसलो होतो. आम्ही दोघेही युरोपमधील ज्यू असून युद्धाच्या भीषण प्रसंगातून वाचलेले होतो. दोघांनाही त्याबद्दल काही बोलणे झाले नाही हे जाणवले. अखेर तिने विषयाला तोंड फोडले व विचारले, ''तू युद्धकाळात कोठे होतास?'' ''अर्थात छळछावणीमध्ये. त्या भयानक आठवणी अजूनही मनाला त्रास देतात. विसरू म्हटले तरी विसरायला होत नाही.''

तिने मान हलवून प्रतिसाद दिला आणि म्हणाली, ''माझे कुटुंब जर्मनीमध्ये एका शेतात लपून राहात होते. चर्चच्या एका पाद्र्याने आम्हाला वाचविले होते.''

तिने किती सोसले असेल याची मी कल्पना करू शकलो. त्या काळात भीतिने सतत पाठपुरावा केला होता.

इतके होऊनही आज आम्ही एका वेगळयाच जगात जगून वाचून राहत होतो.

''आमच्या शेताला लागूनच एक छळछावणी होती.'' रोमा सांगत होती. ''तिथे मला एक मुलगा दिसायचा आणि मी रोज त्याला एक सफरचंद देत असे.'' काय अद्भुत योगायोग होता तो. ती एका मुलाला मदत करीत होती.

मी न राहवून विचारले, ''कसा होता तो दिसायला?'' ''तो उंच सडसडीत बांध्याचा आणि भुकेला दिसत असायचा. मी त्याला जवळजवळ सहा महिने रोज पाहत होते.''

माझ्या हृदयाचे ठोके जलद पडत होते. मी ऐकले त्यावर विश्वासच बसत नव्हता. हे अशक्य वाटत होते. ''मग त्या मुलाने एक दिवस उद्यापासून येऊ नकोस असे सांगितले. कारण तो त्या छावणीतून दुसरीकडे जाणार होता. '' रोमा हे ऐकल्यावर आश्चर्यचकित होऊन पाहतच राहिली. ''हो अगं, मीच तो मुलगा.'' मी अत्यंत आनंदाने व आश्चर्याने उडालोच होतो. मी अत्यंत भावनाविवश झालो होतो. माझा देवदूत माझ्यासमोर होता.

''आता मी तुला सोडणार नाही.'' त्या दिवशी अनोख्या नव्याने होणाऱ्या मैत्रीच्या दिवशी कारच्या मागच्या सीटवरच मी तिला लग्नासाठी विचारले. मला बिलकुल थांबायचे नव्हते.

''तू चमत्कारिकच आहेस'' असे ती म्हणाली पण तिने लगेच मला तिच्या आईवडिलांना भेटायला एका रेस्टॉरंटमध्ये बोलावले. रोमाबद्दल बरेच काही माहीत करून घ्यायला आवडले. पण सर्वांत जास्त मला काय आवडले असेल तर तिचा साधा सरळ स्वभाव, तिच्यातील माणुसकीची भावना. कित्येक दिवस अत्यंत कठीण परिस्थितीतही ती कुंपणाजवळ येऊन माझी आशा जिवंत ठेवीत होती. आता इतक्या वर्षांनंतर ती मला भेटत होती. आता मी तिला सोडूच शकत नव्हतो. त्या दिवशी तिने मला होकार दिला आणि मी पण माझा शब्द पाळला. पन्नास वर्षांच्या आमच्या वैवाहिक जीवनानंतर दोन मुले आणि तीन नातवंडे यांच्यासह मी तिला कोठेही जाऊ दिले नाही.

ही एक सत्यघटना असून हर्मन रोझनब्लॅट हा मियामी, फ्लोरिडा येथे वयाच्या ७५ व्या वर्षांत मस्त जगत आहे. त्याच्या जीवनावर 'दी फेन्स' नावाचा सिनेमा निघाला आहे.

❋ ❋ ❋

## समय

कल्पना करा तुमचे एका बँकेमध्ये खाते आहे. त्या खात्यात बँक रोज रू. ८६,४००/- जमा करते. त्या दिवसभरात जर तुम्ही जमा झालेले पैसे वापरले नाहीत तर राहिलेली शिल्लक दुसऱ्या दिवशी शिल्लक म्हणून दाखविली जात नाही. बँक ती रक्कम रद्दबातल करते. दुसऱ्या दिवशीच्या आरंभी नव्याने रू. ८६,४००/- जमा करते. म्हणजेच दिवस उलटल्यानंतर तुमच्या खात्यात शिल्लक केव्हाही वाढत नाही. मग तुम्ही काय करायला हवे? तर रोजच्या रोज जमा झालेली सर्वच्या सर्व रक्कम तुम्ही खात्यातून काढून वापरून टाकायला हवी.

आपल्यापैकी प्रत्येकासाठी अशीच एक बँक आहे. त्या बँकेचे नाव आहे 'समय'. दररोज सकाळी ही बँक तुमच्या नावे खात्यावर ८६,४००/- सेकंद जमा करते. त्यापैकी दिवसभरात जितके सेकंद तुम्ही काही कारणासाठी वापराल तेवढे सोडून बाकी राहिलेले सेकंद तुमच्या खात्यातून ती बँक रद्दबातल करते. दुसऱ्या दिवशीसाठी उरलेले सेकंद खात्यात शिल्लक राहात नाहीत. दुसऱ्या दिवशी ते तुम्हाला वापरता येत नाहीत. तसेच एखादे दिवशी तुमच्या खात्यात जमा झालेले सेकंद कमी पडले तर जास्तीचे हवे लागणारे सेकंद तुम्हाला उधार किंवा उसने मिळत नाहीत. प्रत्येक दिवशी तुमचे नवीन खाते ८६,४०० सेकंदांनी उघडले जाते. रात्रीच्या अंधारात शिल्लक राहिलेले सेकंद गडप होतात. खात्यात जमा झालेले सेकंद जर तुम्ही योग्य रीतीने वापरले

नाहीत तर ते तुमचेच नुकसान होते. त्यात परतीची वाट नसते. अगर उद्याच्या दिवसातील थोडेसे सेकंद आज वापरण्याची मुभा नसते. आजच्या दिवसासाठी नव्याने झालेल्या सेकंदातच तुम्हाला जगणे आवश्यक असते. म्हणूनच मिळालेला वेळ अशा उत्तम पद्धतीने वापरला पाहिजे की, प्रकृती, स्वास्थ्य, आनंद आणि यश हे तुम्हाला उदंड मिळू शकेल. समय चक्र फिरतच राहते. त्याचा योग्य तो उत्तम उपयोग करायला आपण शिकले पाहिजे.

❋ ❋ ❋

## सर्वांत श्रीमंत कोण?

**शा**ळेने पत्रक काढलं. यंदाच्या वर्षापासून शाळेतल्या सर्वांत गरीब मुलाला आर्थिक मदत द्यायची आहे. तेव्हा शिक्षकांनी प्रयत्नपूर्वक अचूक मुलगा निवडावा, ज्या योगे मदत योग्य विद्यार्थ्याला अगर विद्यार्थिनीला मिळेल!

आता सर्वांत गरीब मुलगा शोधणे म्हणजे खरोखर पंचाईत होती. ही छोटी मुलं सुद्धा इतकी नीटनेटकी राहतात की, अगदी एक विजार, एक सदरा असेल, तर तो रोज धुवून वाळवून त्याची इस्त्री केल्यासारखी घडी करून मगच तो घालतात. गरीब मुलगा शोधायचा कसा? आणि प्रत्येकाला विचारायचं तर कसं. तुमच्यात कोण गरीब? ते ही सर्वांत गरीब म्हणून? मोठीच अडचण होती. तीन चार दिवस नुसता अंदाज बांधण्यात गेले.

वयाने मोठ्या माणसांमध्ये गरीब माणूस शोधणं सोप्पं आहे. पण लहान मुलांमध्ये अडचणीचं. शेवटी दोन चार मुलांना हाताशी घेतलं. जी गाडीने शाळेत यायची आणि गाडीनेच घरी जायची. मधल्या सुट्टीत अचानक वर्गात आलो तर ती सफरचंद खाताना मला दिसायची.

अशा मुलांना विचारलं मला एक मदत कराल का? आपल्या वर्गातला सर्वांत गरीब ....?

क्षणाचाही विलंब न करता सर्वांनी एकच नाव उच्चारले, सर आपल्या वर्गातला तो मयूर आहे ना, तो सर्वांत गरीब आहे.

मुलांनी एका झटक्यात प्रश्न सोडवला होता. कशावरून म्हणता? सर त्याचा सदरा दोन तीन ठिकाणी तरी फाटलाय. त्याने शिवलाय, पण फाटलेला शर्ट घालतो.

त्याची खाकीपँट तरी नीट बघा. मागून दोन ठिगळं लावलेली आहेत. चपला त्याला नाहीतच. मधल्या सुट्टीत आम्ही डबा उघडतो. तो मात्र प्लॅस्टिक पिशवीतून अर्धी भाकरी आणतो. सर, ती भाकरीही कालचीच असते. भाजी कुठली सर? गुळाचा खडा असतो. आम्ही सांगतो, तो सर्वांत गरीब आहे. शाळेने त्याच मुलाला मदत द्यायला हवी.

मुलं एखाद्या खळाळत्या प्रवाहासारखी पुढे बोलतच राहिली. पण मला ते ऐकू येणे शक्य नव्हते.

मयूर एवढा गरीब असेल की सर्वांनी एकमुखाने त्याच्या गरीबीचे दाखले द्यावेत?

कारण मयूर वर्गातील सगळ्यात चपळ मुलगा होता.

अक्षर स्वच्छ, मोकळं होतं. त्या अक्षरात त्याच्या नितळ मनाचे दर्शन मला घडे.

एकदा तर त्याची वही मी माझ्या घरात पत्नीला दाखवली आणि म्हटलं; पाहिलंस हे सातवीतल्या मुलाचे अक्षर. असं अक्षर असावं हे माझे स्वप्न होते. उत्तराला सुबक परिच्छेद समास सोडून योग्य प्रस्तावना आणि अखेर करून लिहिलेली उत्तरे. पेपरचे गठ्ठे आणायला मयूर सर्वांत आधी धावत येई. माझ्या आधी ते गठ्ठे उचलून वर्गात नेण्याचा उत्साह मला थक्क करून टाकत असे. असा मयूर परिस्थितीने एवढा खचलेला असेल याची कल्पनासुद्धा मला येऊ नये, या गोष्टीचीच मला खंत वाटली. जी गोष्ट माझ्या इतर विद्यार्थ्यांना उमगते आणि मला त्याचा पत्ताही नसतो... अरेरे! मी खूप कमी पडतोय.

मयूर, गेल्या सहलीला आला नव्हता. अवघी पंचवीस रूपये वर्गणी होती. पण त्याचं नाव यादीत नव्हतं. आपण त्याला साधं विचारलं सुद्धा नाही.

असलेल्या मुलांच्या किलबिलाटातून आलेल्या मयूरची मला आठवणही झाली नव्हती. केवळ पंचवीस रूपये नसल्याने त्याचे National Park बघण्याचे राहून गेले. एका छान अनुभवाला मुकला होता तो. हा आनंद मी हिरावला होता. यादीत मयूरचे नाव नाही म्हणून मी त्याला जवळ बोलावलं नाही? मयूर स्वत:हून सांगणं शक्यच नव्हतं आणि माझ्या व्यग्र दिनक्रमात मयूरसाठी जणू वेळच शिल्लक नव्हता! शिक्षक म्हणून मी एक पायरी खाली आलो होतो. खरंच आहे. मुलांनी सुचवलेलं नाव आर्थिक मदत, तीही भरघोस मदत मयूरला मिळायलाच हवी. आता शंकाच नव्हती. त्याची गरिबी बघायला त्याच्या घरी जायचेही काहीच कारण नव्हते. मुलांनी एकमुखाने सुचवलेले नाव आणि मयूरने सहलीला न येणं याची सांगड घालून मी मुख्याध्यापकांना नाव देऊन टाकले. मयूर जाधव, सातवी अ, अनुक्रमांक बेचाळीस. डोळ्यांवरचा चश्मा हातात खेळवीत आदरणीय मुख्याध्यापक म्हणाले, ''खात्री केलीये ना सर? कारण थोडीथोडकी रक्कम नाही. या विद्यार्थ्यांची वर्षाची फी, त्याचे शालेय शिक्षण साहित्य, गणवेश... इत्यादी सर्व या रकमेत सामावणार आहे.'' मुख्याध्यापकांना मोठ्या आत्मविश्वासाने मी म्हटलं,

''सर, त्याची काळजीच करू नका. वर्गातला सर्वांत गरीब आणि आदर्शही म्हणा हवं तर मयूर जाधवच आहे.''

एका योग्य विद्यार्थ्याची निवड केल्याचे समाधान घेऊन मी निघालो. मयूरला मिळणारी मदत, त्यामुळे त्याचे आर्थिकदृष्ट्या सुसह्य होणारे शैक्षणिक वर्ष याची कल्पनाचित्रे रंगवताना दिवस कसा संपला ते कळलेच नाही.

दुसऱ्या दिवशी शाळेत लवकरच गेलो. देखण्या अक्षराच्या कदम सरांनी मोठ्या दिमाखाने फळा सजवला होता. त्यावर गरीब असूनही आदर्श असं म्हणून मयूरचं नाव होतं. शाळा भरली. मी अध्यापक खोलीत बसलेलो होतो. इतक्यात खोलीच्या दाराशी मयूर उभा दिसला. त्याच्या चेहऱ्यावरचा भाव समजत नव्हता. राग आवरावा तसा करारी चेहरा...

''सर, रागावू नका, पण आधी त्या फळ्यावरचे माझे नाव पुसून टाका.''

''अरे, काय बोलतोय तुला समजतेय का?''

'' चुकतही असेन मी. वाट्टेल ती शिक्षा करा. पण ते नाव...!''

त्याच्या आवळलेल्या मुठी घशातला आवंढा, डोळ्यांतलं पाणी....

मला कशाचा काही अर्थ लागेना. मी ज्याचं अभिनंदन करायच्या तयारीत तो असा...?

''सर, मला मदत कशासाठी? गरीब म्हणून ? मी तर श्रीमंत आहे?''

त्याची रफू केलेली कॉलर माझ्या नजरेतून सुटत नव्हती. येतानाच त्याचे अनवाणी पाय पाहिले होते. शाळेच्या चौदा वर्षांच्या माझ्या व्यावसायिक कालखंडात अशी पंचाईत प्रथमच आली होती.

''अरे पण...?''

''सर, विश्वास ठेवा. मी श्रीमंत आहे. कदाचित सर्वांत श्रीमंत असेन.... सर, मी गरीब आहे हे ठरवले कोणी?''

''मी चुकतोय बोलतांना हे कळतंय मला. पण सर ते नाव तसंच राहिले तर मी आजारी पडेन आज.''

अचानक तो जवळ आला आणि त्याने माझे पायच धरले.

त्याला उठवत मी म्हणालो, 'ठीक आहे. तुला नकोय ना ती मदत, नको घेऊस. पण तू श्रीमंत आहेस ते कसे काय?''

''सर, माझ्या अभ्यासाच्या वह्या बघा. कुठल्याही विषयाच्या... त्या पूर्ण आहेत. पुस्तकं मी Second Hand वापरतोय... खरंय! पण मजकूर तर तोच असतो ना?''

''मनात काय उतरवतो ते महत्त्वाचे नाही का? सर, माझे पाचवीपासूनचे मार्क बघा, नेहमी पहिल्या तीनांत असतो. गेल्या वर्षी स्पोर्टसपासून निबंधापर्यंत सर्व बक्षिसे मलाच आहेत.''

''सर... सर, सांगा ना, मी गरीब कसा?'' मयूर मलाच विचारत होता.

आता मघाचं दु:खाचं पाणी विरून त्यात भविष्याचं स्वप्नं थरारत होतं.

''खरंय मयूर, पण तुला या पैशाने मदतच...''

''सर, मदत कसली? माझी श्रम करण्याची वृत्तीच नाहीशी होईल. शाळेची फी दिलीये म्हटल्यावर मी वडिलांबरोबर रंगाच्या कामाला जाणं बंद करेन!''

'म्हणजे?'

'वडील घरांना रंग द्यायचे काम करतात. Contractor बोलावतो तेव्हाच काम मिळते. तेव्हा ते मला त्यांच्याबरोबर नेतात. चार पैसे मला मिळतात. ते मी साठवतो. सर, संचयिका आहे ना शाळेची, त्यातलं माझं पासबुक बघा. पुढच्याही वर्षीची फी देता येईल एवढी रक्कम आहे त्यात... मुलांनी तुम्हाला काहीतरी सांगितलेले दिसते.... म्हणून तुम्ही मला निवडलेलं दिसतं. पण सर, मीच नाही तर आमचं घरच श्रीमंत आहे. घरातले सगळे काम करतात. काम म्हणजे कष्ट. रंगाचं काम नसतं तेव्हा बाबा स्टेशनवर हमालीही करतात. आई धुणंभांडी करते. मोठी बहीण दुसरी तिसरीच्या शिकवण्या घेते. सर, वेळ कसा जातो, दिवस कसा संपतो ते कळतच नाही...शाळेतल्या वाचनालयातील पुस्तकं मीच सर्वांत जास्त वाचली आहेत. तुम्हीच सांगितल्याप्रमाणे लेखकांनाही पत्र पाठवतो मी सर, माझ्या घरी याच तुम्ही. माझ्याकडे पु. ल. देशपांडे यांच्या स्वाक्षरीचं पत्र आहे.''

''.... सर, आहे ना मी श्रीमंत?''

आता तर तो स्मितरेषांनी मोहरला होता.

''सर, शेजारच्या काकांकडून मी उरलेल्या वेळात पेटीही शिकतो. रात्री देवळात होणाऱ्या भजनात मीच पेटीची साथ देतो. भजनीबुवा किती छान गातात हे ऐकताना भान हरपून जातं.'' त्याच्या सावळ्या रंगातही निरोगीपणा चमकत होता.

अभावितपणे मी विचारलं. ''व्यायामशाळेतही जातोस?''

''सर, तेवढी फुरसत कुठली? घरातच रोज सूर्यनमस्कार आणि पन्नास बैठका काढतो.''

अंगावर एक थरार उमटला... कौतुकाचा.

''मयूर मित्रा, मला तुझा अभिमान वाटतो. तुझ्यासारखा श्रीमंत मुलगा माझ्या वर्गात आहे त्याचा...''

''म्हणूनच म्हणतो सर...''

''हे नाव ज्या कारणासाठी आहे. त्यात तू नक्कीच बसणार नाहीस. आमची निवड चुकली, पण याचं रूपांतर वेगळ्या शिष्यवृत्तीत होईल. शाळेतील सर्वांत अष्टपैलू बुद्धिमान मुलगा म्हणून हे पारितोषिक तरी...''

''सर, एवढ्यात नाही. त्याला वर्ष जाऊ द्या मी लिंकनचं, सावरकरांचं चरित्र वाचलं, हेलन केलरचं चरित्र वाचलं सर, हे वाचलं की कळतं की ही माणसे केवढे कष्ट करून मोठी झाली. माझ्यासारख्या मुलांना प्रोत्साहन द्या, योग्य वयात ते परखड मार्गदर्शन करा, पण सर, नको त्या वयात असा पैसा पुरवत गेलात तर घडायचं राहूनच जाईल. जे काय करतोय ते पैशासाठी असे होऊन जाईल.... सर... प्लीज....

वाचनानं,<br>
स्पर्धांतल्या सहभागाने,<br>
कलेच्या स्पर्शानं,<br>
कष्टानं......<br>
त्याच्या वाणीला प्रगल्भतेची खोली होती,<br>
संस्कारामुळे नम्रतेची झालर होती.<br>
आता मला माझ्या समोरचा मयूर जाधव स्पष्ट दिसतही नव्हता.<br>
त्याच्याबद्दलच्या कौतुकाचे अश्रू माझ्या डोळ्यांत दाटले होते.<br>
शाळेतला सर्वांत श्रीमंत मुलगा माझ्यासमोर उभा होता.<br>
परिस्थिती पचवून, परिश्रमाने स्वत:वर पैलू पाडणारा!<br>
श्रीमंत ! सर्वांत श्रीमंत.

❋ ❋ ❋

# साठवणुकीचे व्यसन

विचार करा हं! हाताला लागतील त्या निरनिराळ्या वस्तु गोळा करून त्या बाळगत बसण्याचा तुम्हाला नाद आहे का? त्या वस्तु, पुढे कधीतरी जरुरीच्या होतील असा विचार करुन तुम्ही त्या जपून ठेवित असाल.

पुढील आयुष्यात आपणास पैशाची गरज असेल या विचाराने तुम्ही मिळविलेल्या प्राप्तीतून पैशाची सतत बचत करीत असता का? त्यासाठी स्वत:ला मुरड घालून तो पैसा खर्च करण्याचे टाळत असाल.

तुमच्या घरातील अनेक कपडे, फर्निचर, बूट, चपला, स्वयंपाकघरातील अनेक उपकरणे, भांडी कित्येक इलेक्ट्रॉनिक वस्तू, व इतर खूपशा गोष्टी कपाटात बंद किंवा कोपऱ्यात महिनोंमहिने पडून आहेत का? मागील बऱ्याच दिवसांत त्याचा एकदाही वापर झालेला नसेल ना? काही वस्तूंचे वरचे कव्हर सुद्धा न काढता त्या तशाच पुढे लागतील म्हणून खरेदी करून घरात आणून ठेवल्या असतील.

हे झाले भौतिक वस्तूंबद्दल; परंतु तुमच्या मनाचे काय? त्यातही अनेक भावभावना दडून बसलेल्या असणार. कोणाचे तरी तुम्हाला दरडावणे, किंवा दाखविलेला धाकधपटशा, याबद्दलची चीड, संताप, वाटणारे दु:ख, भीती या आणि अशा संवेदना तुमच्या मनात घर करून बसलेल्या असतील.

कृपया असे करू नका. तुमच्या उत्कर्षाच्या, भरभराटीच्या वाटेत तुम्ही स्वत:च आडवे येत आहात. नवीन विचारांना, भावनांना स्थिर करण्यासाठी मनात मोकळी जागा करून देणे गरजेचे असते. तरच तुमच्या आयुष्यात नवीन गोष्टी प्रवेश करतील.

तुमच्या स्वत:च्या वैभवासाठी या निरर्थक विचारांना, भावनांना थारा न देणेच योग्य ठरेल. त्यामुळे मनात निर्माण झालेल्या पोकळीत नावीन्याचा शोध घेऊन आणि आकर्षित करून ते आत्मसात करण्याचे बळ प्राप्त होईल. तुमच्या सुप्त इच्छा तुम्ही प्रत्यक्षात आणू शकाल. तुम्ही घरात जोपर्यंत जुन्या भौतिक गोष्टी व मनात अनावश्यक विचार बाळगून बसाल तोपर्यंत तुम्ही येणाऱ्या संधीचा लाभ घेऊ शकणार नाही.

घरातील वस्तूंचे चलनवलन सतत व्हायला हवे. घरातील कपाटातील ड्रॉवरमधील, तसेच गराजमधील वापरात नसलेल्या वस्तू घराबाहेर काढा.

अशा अनावश्यक गोष्टी घरातील जागा निष्कारण व्यापून राहतात. रेंगाळणारे, नको ते विचार सतत मनात घोळत राहतात. खरे म्हणजे अशा टाकाऊ वस्तू किंवा रेंगाळणारे भाव तुमचे जगणे ठप्प करीत नाहीत तर त्या वस्तू साठवणीची व विचार न सोडण्याची जी प्रवृत्ती आहे तीच घात करते.

ही साठवणीची प्रवृत्ती हव्यासाचे सावट घेऊन येते. पुढील काळात गरज निर्माण होईल तेव्हा आपण या वस्तू विकत घेऊ शकणार नाही या भीतिपोटी हे साठवणीचे व्यसन आपल्याला जडते. त्यायोगे दोन चुकीचे संदेश तुम्ही तुमच्या मेंदूला देत असता. प्रथम म्हणजे उद्याच्या चांगल्यावर तुमचा विश्वास नाही. दुसरे म्हणजे नावीन्य, सुधारीत बदल तुमच्यासाठी योग्य नाहीत म्हणून तुम्ही जुन्याला चिकटून बसत आहात.

कृपया असे करू नका.

आनंदाने बेधुंद नाचा, जणू काही तुमच्याकडे कोणाचे लक्ष नाही.

मनापासून उत्कट प्रेम करा जसे तुम्हाला पूर्वी कोणीही दुखावले नसेल.

दिलखुलास तारस्वरात गाणे गा.... खरे तर ते ऐकायला आसमंतात कोणीही नाही.

आनंदाने मस्तीत जगा... जसे पृथ्वी हेच स्वर्गातील नंदनवन आहे.

ज्याचा रंग आणि चमक उडालेले आहे अशा वस्तू फेकून द्या. नव्या नावीन्य सूर्याच्या प्रकाशकिरणांबरोबर तुमच्या घरात आणि तुमच्या मनात प्रवेश करून प्रसन्नता आणू देत.

❋ ❋ ❋

# स्टिफन कोव्हेचे ९०/१० तत्त्व

**हे** तत्त्व आचारणात आणले तर तुमचे आयुष्यच बदलून जाईल. निदान तुमच्या प्रतिसाद देण्याच्या पद्धतीत फरक पडेल. काय आहे बरे हे तत्त्व?

तुमच्याबाबतीत ज्या घटना घडत असतात त्या तुमचे १०% आयुष्य घडवित असतात. आपण कारचे नादुरूस्त होणे थांबवू शकत नाही. विमान उशिरा पोहोचल्यामुळे तुमचे दिवसभराचे वेळापत्रक कोलमडून पडते, पण विमान उशिरा येणे यावर तुम्ही काहीच करू शकत नाही. गाडीचा चालक वाटेतील रहदारीमध्ये आपल्याला अडकवू शकतो ; पण त्या रहदारीच्या गोंधळाला तुमचा काहीच उपाय नसतो. या सर्व प्रकारच्या घटना १०% असतात ज्यावर तुमचा अजिबात अंकुश नसतो. इतर ९०% वेगळ्या असतात. त्याबाबत तुम्ही ठरवित असता.

कसे? तर तुमच्या प्रतिसादाने. तुम्ही रस्त्यावरच्या सिग्नलचा लाल दिवा लावू अथवा मालवू शकत नाही. पण त्याला तुमचा प्रतिसाद देणे तुमच्या हातात असते. लोकांनी तुम्हाला मूर्ख बनवता कामा नये. तुम्ही कसा प्रतिसाद द्यायचा ते तुम्ही ठरवू शकता. यासाठी आपण एक उदाहरण घेऊ या.

तुम्ही तुमच्या कुटुंबाबरोबर सकाळचा नाश्ता घेत आहात. तुमच्या मुलीचा धक्का लागतो आणि कॉफीचा कप पडून तुमच्या ऑफिससाठी घातलेल्या सफेद शर्टावर कॉफी सांडते. जे घडले त्यावर तुमचा काहीच अंकुश नसतो. पुढे जे घडणार असते ते तुम्ही कसे प्रतिसाद देता त्यावर सगळे अवलंबून असते. तुम्ही चिडता. अपशब्द बोलता. धक्का देऊन शर्टवर कॉफी सांडल्याबद्दल तुम्ही मुलीला खूप रागावता. त्यानंतर तुमचा मोर्चा बायकोकडे वळतो. कॉफीचा कप टेबलाच्या अगदी कडेला ठेवल्याबद्दल तिच्यावर आग पाखडता. दोघांचा वाद होतो. तुम्ही तणतणत वर जाता. खराब झालेला शर्ट बदलता. तुम्ही खाली येता. तुम्हाला मुलगी टेबलावर बसून नाश्ता खाताना रडत असताना दिसते. एकीकडे ती शाळेत जायला तयार होत असते. या सगळया गडबडीत तिची शाळेची बस चुकते.

तुमच्या पत्नीला ताबडतोब ऑफिसला जायला निघावे लागते. तुम्ही घाईघाईने कार सुरू करता आणि मुलीला शाळेत पोहोचविता. तुम्हाला ऑफिसला जायला आधीच उशीर झालेला असतो त्यामुळे तुम्ही वाहतुकीचे वेगमर्यादेचे नियम मोडलेले असतात. शाळेला तरी १५ मिनिटे उशीर होतो आणि वेगमर्यादा उल्लंघनाबद्दल तुम्हाला दंड भरावा लागतो. तुम्ही शाळेपाशी येता. मुलगी तुम्हाला न सांगताच शाळेच्या दिशेने पळते.

ऑफिसला तुम्ही २० मिनिटे उशिरा पोहोचता. पोहोचताच तुमच्या लक्षात येते की तुम्ही ऑफिसची बॅग घरीच विसरला आहात. तुमचा दिवस फार वाईट रितीने सुरू झालेला तो तसाच पुढे जात असतो. तो वेळ जाईल तसा अधिकच वाईट होत असतो. तुम्ही घरी यायला निघता. तुम्ही घरी पोहोचता त्यावेळी तुमची पत्नी आणि मुलगा एका नातेवाईकाबरोबर सकाळच्या घटनेवर चर्चा करताना आढळतात. तुमच्या सकाळच्या वागण्यावर ते बोलत असतात. एकूण तुमचा दिवस अशारितीने वाईट का गेला?

१. कॉफी हे त्यासाठी कारण होते का? २. तुमची मुलगी त्याला कारणीभूत होती का? ३. पोलीस याला कारण होते का? ४. तुम्ही त्याला कारणीभूत होतात का?

याचे उत्तर चौथे आहे. कॉफीमुळे जे घडले त्यावर तुमचे अजिबातच नियंत्रण असू शकत नव्हते. त्यानंतर पाच सेकंदात तुम्ही जो प्रतिसाद दिलात त्यामुळे तुमचा दिवस खराब गेला. तुम्ही त्यावेळी असे वागू शकला असतात, नव्हे तर असे वागायला हवे होतेत.

तुमच्या शर्टावर कॉफी सांडते. तुमची मुलगी रडवेली होते. तुम्ही तिची समजूत काढायला म्हणायला हवे होते, ''जाऊ दे बेटा, होते असे कधीतरी. तू जरा जास्त काळजी घ्यायला शिकले पाहिजे.'' टॉवेल घेऊन तुम्ही वर जाऊन शर्ट बदलता. तुमची बॅग उचलता आणि तुम्ही वेळेवर खाली येता. तुम्ही खिडकीतून पाहता. तुमची मुलगी बसला गेलेली असते. ती मागे वळून

तुम्हाला अच्छा करते. तुम्ही पाच मिनिटे लवकरच ऑफिसला पोहोचता, लोकांना प्रसन्नपणे अभिवादन करता. दोन घटनाक्रमांमधील फरक लक्षात घ्या. दोन्ही एकाच रितीने सुरू झाले पण दोन्ही वेगळया पद्धतीने शेवटास गेले. असे का घडले? तुमची प्रतिक्रिया वेगळी होती. पहिल्या १०% घटनेवर तुमचे नियंत्रण नव्हते पण नंतरच्या ९०% घटनेवर तुमचाच अंमल होता.

जर कोणी तुमच्याबद्दल नकारात्मक बोलले तर सगळे मनाला लावून घेऊ नका. पाणी जसे काचेवरून घरंगळून जाते तसे हे बोलणे पण कानावरून जाऊ दे. त्या तुमच्याबद्दलच्या विरूद्ध टोमण्यांकडे दुर्लक्ष करा. त्याला नीट प्रतिसाद द्या म्हणजे तुमचा दिवस खराब जाणार नाही. तुमच्या चुकीच्या वागण्यामुळे तुम्ही एखादा मित्र गमवाल किंवा तुम्हालाच मानसिक ताण सहन करावा लागेल.

तुम्ही अशा वेळी कसे वागाल? रहदारीमध्ये एखादा तुम्हाला आडवा आला तर तुमच्या मनाचा तोल तुम्ही बिघडून द्याल का? नाही. स्टिअरिंगवर हात ठेवून शांत बसा. तुमचा रक्तदाब आकाशाला टेकायला जाऊ देऊ नका. तुम्ही ऑफिसला दहा मिनिटे उशिरा पोहोचलात तर कोणाचेही काहीही नुकसान होत नाही. इतरांच्या गाडी चालविण्यामुळे तुम्ही गाडी का चुकीची चालवायची? अशावेळी ९० आणि १० टक्के तत्त्व लक्षात ठेवा. तुमची नोकरी गेली तर मनाला त्रास करून घेऊन रात्रीची झोप का घालवता? त्यावर उपाय सापडेल. तुमची काळजी करण्यात वाया जाणारी शक्ती आणि वेळ नवीन नोकरी शोधण्यात कामी आणा.

विमानाला उशीर झाल्याने तुमचे दिवसभराचे कार्यक्रमात बाधा येणार आहे; पण त्याचा राग विमानातील हवाई सुंदरीवर काढून काय फायदा? ती काही याला जबाबदार नसते. त्यापेक्षा इतर प्रवाश्यांशी गप्पा करा. वाचन करा. स्वत:वर कशाला ताण घ्यायचा? यामुळे होणाऱ्या गोष्टी अधिकच बिघडतील. ९० व १० टक्क्याचे तत्त्व लक्षात आणा. मिळणारे परिणाम आश्चर्यकारक असतील. परत तुमचे त्यात काहीच नुकसान असणार नाही. अनेकजणांना मानसिक तणाव, समस्या, डोकेदुखी, इतर त्रास सहन करावा लागतो, तो हे ९० व १० टक्क्याचे तत्त्व न समजावून घेतल्यामुळे. आपली इच्छाशक्ती आपल्याला याचा अनुभव घेण्यास उपयोगी पडते.

❋ ❋ ❋

# स्त्रीची ताकद आणि पुरूष आश्चर्यचकित

**स्त्री** .... परमेश्वराने स्त्रीची निर्मिती केली त्यावेळी तो सलग सहाव्या दिवशी उशिरापर्यंत काम करीत होता. एक देवदूत अवतरला आणि म्हणाला, ''परमेश्वरा, या क्षुल्लक प्राण्यावर इतका वेळ का खर्च करता आहात?''

परमेश्वर म्हणाला, ''मी तिच्या निर्मितीसाठी काय काय विशिष्ट तपशील नक्की केले आहेत ते पाहिले आहेस का? ती पूर्णपणे धुवून स्वच्छ करता आली पाहिजे, पण ती प्लास्टिकची असता कामा नये. तिला दोनशेपेक्षा अधिक अवयव असून ते सर्व बदलता येणे शक्य झाले पाहिजे. तिला सगळ्या प्रकारचे खाद्यपदार्थ बनवता आले पाहिजेत. एकाच वेळी तिला अनेक मुलांना सांभाळता आले पाहिजे. तिने मायेने जवळ घेतल्यावर गुढग्याला खरचटण्यापासून ते अगदी प्रेमभंगापर्यंत कसल्याही दु:खावर फुंकर घातली गेली पाहिजे. आणि मुख्य म्हणजे हे सर्व तिला तिच्या दोन हातांनी करता आले पाहिजे.''

वर्णन ऐकून देवदूत फारच प्रभावित झाला. ''काय सांगता? फक्त दोन हातांनी. हे शक्यच नाही. आणि हे त्याचे नमुन्यादाखल केलेले मॉडेल आहे ना? आजच्या दिवसात खूपच काम बाकी आहे. उद्यापर्यंत थांबून पूर्ण का करीत नाही?''

''छे छे!! मी निर्मिती अगदी पूर्ण करीत आणली आहे. माझ्या फार मनपसंद अशी ही निर्मिती आहे. ती स्वत: जेव्हा आजारी पडेल तेव्हा स्वत:च बरे करून घेऊ शकेल. ती दिवसभरात १८ तास काम करू शकेल.''

देवदूत त्या मॉडेलच्या जवळ येतो आणि स्पर्श करतो. ''पण परमेश्वरा तू तिला फार नाजुक केले आहेस.''

परमेश्वर म्हणतो, ''हो बरोबर आहे. ती नाजूकच आहे. पण मी तिला तितकीच खंबीर बनविली आहे. तुला कल्पना नाही ती किती सहनशील आहे आणि ती कशाही अडचणीवर मात करू शकते.''

देवदूत विचारतो, ''तिला विचार करता येतो का?''

''ती नुसती विचारच करत नाही तर ती कारणमिमांसा करू शकते आणि ती वाटाघाटी पण करू शकते.''

देवदूत त्या स्त्रीच्या गालाला बोट लावतो. ''परमेश्वरा ही स्त्रीच्या गालातून पाणी गळते आहे. मला वाटते तू तिच्यावर फारच अपेक्षांचे ओझे लादले आहेस.''

परमेश्वर: ''ते तिचे अश्रू आहेत. अश्रूद्वारे ती तिचे दु:ख, तिच्या शंका, तिचे प्रेम, तिचा एकटेपणा, तिचे सहन करणे आणि तिला वाटणारा अभिमान व्यक्त करते.''

आता मात्र देवदूत त्या नवनिर्मितीने फारच प्रभावित झाला. तो म्हणाला, ''परमेश्वरा तू अलौकिक आहेस. हे करताना तू प्रत्येक गोष्टीचा बारीक विचार केला आहेस. तू बनवलेली स्त्री अप्रतिम, अद्वितीय आहे.''

परमेश्वर: ''खरोखरच स्त्री ही अद्वितीय बनत आहे. तिचे सामर्थ्य पुरुषाला आश्चर्यचकित करून सोडेल. ती कोणतीही समस्या हाताळू शकेल. कोणतेही अडचणीचे ओझे वाहून नेऊ शकेल. ती सुख, प्रेम आणि विचार देऊ शकेल. तिला आकांत करावासा वाटेल तेव्हा ती हसेल. तिला रडावेसे वाटेल तेव्हा ती गाणे म्हणेल, ती फार आनंदात असली तर ती रडेल. ती जेव्हा खूप घाबरलेली असेल तेव्हा मी मोठ्याने हसेल. तिचा ज्यावर पूर्ण विश्वास आहे त्यासाठी ती झगडेल. ती अन्यायाविरूद्ध सर्व शक्तिनिशी लढेल. तिला ज्यावेळी अधिक चांगला पर्याय दिसतो तेव्हा ती नकारात्मक प्रतिसाद मान्य करणार नाही. कुटुंबाच्या उत्कर्षासाठी ती सर्वस्व पणाला लावेल. तिच्या मित्रांना बरे वाटत नसेल व तिला जरा जरी भीती वाटली तरी ती त्यांना डॉक्टरकडे घेऊन जाईल. तिचे प्रेम बिनशर्त असेल. तिच्या मुलांच्या यशाच्या आनंदाने तिला रडू येईल. तिच्या मित्रांच्या यशात ती आनंदाने सहभागी होईल. कोणाकडे बाळाचा पाळणा हलला किंवा कोणाचे लग्न झाले की तिचा आनंद गगनात मावेनासे होईल. जवळचे कोणी अथवा एखाद्या मित्राचे निधन तिला असह्य करेल. पण ती स्वत:च्या आयुष्यात झगडण्यास समर्थ असेल. दुखावलेली मने व तुटून गेलेली ऱ्हदये जोडण्यासाठी जवळ घेऊन कुरवाळणे हाच उपाय असू शकतो हे ती पूर्णत: जाणेल.

तिच्याबाबतीत फक्त एकच गोष्ट चुकीची असते. तिच्याकडे काय शक्ती आहे व तिचे काय महत्त्व आहे हेच ती विसरून जाते. सर्व महिलांनी लक्षात घ्यावे त्या किती अलौकिक आहेत. पुरुषांना सतत या सत्याची आठवण करून द्यावी लागते.

❋ ❋ ❋

# हाय, देखण्या मित्रा, माझे नाव रोज आहे

वर्गाचा वर्षाचा पहिला तास होता. प्राध्यापकाने स्वत:ची ओळख करून दिली आणि मुलांना सांगितले, ''तुम्ही अजिबात ज्याला ओळखत नाही अशा एकाची ओळख करून घ्या.'' मी वर्गात असे कोण दिसते ते पाहण्यासाठी उठलो तोच माझ्या पाठीवर एक नाजूक अशी थाप पडली. मी कोण आहे ते वळून पाहिले तर एक वयामुळे सुरकुत्या पडलेली एक लहानखोर वयस्कर महिला माझ्याकडे पाहून हसत होती. ती म्हणाली, ''हाय, देखण्या मित्रा, माझे नाव रोज. मी ८७ वर्षांची आहे. मी तुला कडकडून भेटू शकते का?''

मी हसून आणि अतिशय उत्साहाने म्हणालो, ''हो का नाही. आपण नक्कीच भेटू शकतो.'' असे म्हणताच तिने अत्यंत आवेशाने मला मिठी मारली. मी थोडे चेष्टेने तिला विचारले, ''अशा या कोवळ्या आणि अजाण वयात तुम्ही कॉलेजमध्ये येण्याचे काय प्रयोजन?'' तिनेही तितक्याच मजेने उत्तर दिले, ''एखादा श्रीमंत नवरा शोधून त्याच्याशी लग्न करून दोन मुले झाली तर मी पाहत आहे.'' ''असे नाही, खरंच मला प्रामाणिकपणे जाणून घ्यायचे आहे.'' मी विचारले. खरोखरच या वयात त्या महिलेला कॉलेजमध्ये येऊन अभ्यास करण्याचे काय नेमके कारण असावे हे जाणून घेण्याची मला उत्सुकता होती. वर्ग संपल्यानंतर मी व ती कॉलेजच्या विद्यार्थी युनियन इमारतीत गेलो. तिथे चॉकलेट मिल्कशेक घेतले.

आमची दोघांची तत्काळ मैत्री झाली. रोज तास संपल्यानंतर आम्ही दोघे चालत बाहेर पडत असू. तीन महिने सतत असा परिपाठ चालू होता. आमची अखंड बडबड चालू असायची. भूतकाळ आणि भविष्यकाळात तितक्याच सहजतेने वावरणाऱ्या

या अनुभवी 'टाईम मशिन'शी गप्पा करताना मला भुरळ पडत असे. मी गप्पांमध्ये स्वत:ला हरवून जात असे. तिचे अनुभव व ज्ञान मला ऐकत राहावेसे वाटत असे.

एक वर्षाच्या अभ्यासक्रमात रोज एक सर्वांना परिचित व्यक्ती होऊन गेली होती. ती जिथे जायची तिथे तिला लोकांची मैत्री मिळत होती. तिला रूबाबदार व साजेसे कपडे घालायला आवडत असे. इतर विद्यार्थ्यांच्या नजरेत भरण्याचा तिला आनंद होत असे.

आमच्या फुटबॉलच्या सामन्याच्या समारोपाला आम्ही रोजला पाहुणी म्हणून बोलायला आमंत्रित केले. त्या दिवशी तिने आम्हाला जे शिकविले ते आम्ही केव्हाही विसरू शकणार नाही. तिची ओळख करून दिल्यावर तिला बोलण्यासाठी व्यासपीठावर बोलाविले. तिने तयार करून आणलेले भाषण वाचून दाखविण्यास सुरुवात केली आणि लगेच तिच्या हातातून लिहून आणलेले कागद खाली पडले. निराश होऊन व थोडीशी ओशाळगत होऊन ती माईकसमोर आली आणि म्हणाली, ''माफ करा. मी बिअर सोडून ही व्हिस्की घेतली आणि त्याने माझा घात केला. आता मला माझे बेतलेले भाषण करता येणार नाही. तर मी आता मला जे ठाऊक आहे ते तुम्हाला सांगते.''

आम्ही हसत असताना तिने तिचा घसा साफ केला आणि मग बोलायला सुरूवात केली.

''आपण म्हातारे होतो म्हणून आपण खेळणे थांबवितो असे नाही तर आपण खेळणे थांबवितो म्हणून आपण म्हातारे होतो. आपले तारूण्य टिकविणे, सुखी राहणे व यशस्वी होणे यासाठी चार मुख्य रहस्ये आहेत. सतत हसत राहा व हसण्यासाठी रोज विनोद शोधत राहा. काहीतरी स्वप्न उराशी बाळगा. तुम्ही स्वप्ने पाहणे थांबवाल तेव्हा तुमचे मरण ओढवेल. आपल्यासभोवती अशी अनेक मृत माणसे वावरत असतात. त्यांना ते मेले आहेत हे सुद्धा कळत नाही.

तुमची वाढ होणे आणि नुसते वयाने वाढणे यात खूप फरक असतो. तुम्ही १९ वर्षांचे आहात व तुम्ही सबंध एक वर्ष काहीही न करता बेडवर नुसते पडून राहिलात तरी एक वर्षानंतर तुम्ही २० वर्षांचे झालेले असाल. मी आता ८७ वर्षांची आहे आणि मी एक वर्ष काहीही न करता बेडवर पडून राहिले तरी वर्षाअखेर ८८ वर्षांची होईन.

कोणीही वयाने वाढतातच त्यासाठी खास गुणवत्ता किंवा कर्तृत्व असावे लागत नाही. सततच्या बदलासाठी तुम्ही संधीच्या शोधात असायला हवे. वाढत्या वयाबरोबर आपण काय केले नाही याची कसलीही खंत बाळगता कामा नये. ज्यांच्या मनात खंत असते तेच लोक मरणाची भीती बाळगतात.'' आपले भाषण तिने 'रोज' कविता म्हणून संपविले.

वर्षअखेरीस रोजने आपला पदवीचा अभ्यासक्रम पुरा केला. ज्यास तिने बरेच पूर्वी सुरूवात केली होती.

पदवीदान समारंभानंतर एकच आठवडयात रोज अत्यंत शांतपणे झोपेतच निधन पावली. जवळजवळ दोन हजार विद्यार्थी तिच्या अंत्यसंस्काराला उपस्थित होते. तुम्हाला करता येण्यासारखी कोणतीही चांगली गोष्ट सुरू करायला कधीही उशीरा झालेला नसतो हा धडा रोजने स्वत:च्या उदाहरणावरून आम्हाला घालून दिला होता.

वयाने वाढणे हा निसर्गनियम प्रत्येकाला लागू असतो, पण आपली सर्वांगिण वाढ करणे हे आपल्यावर असते.

❋ ❋ ❋

# विभाग ३
# आदर्श जीवनाचे मंत्र

## अदृश्य वलय

प्रत्येक व्यक्तीच्या डोक्यामागे सतत एक अदृश्य वलयाचे चक्र निर्माण होऊन ते सतत चमकत फिरत असते.

''मी कोणीतरी अत्यंत महत्त्वाची व्यक्ती आहे असे मला सतत वाटत राहावे'' अशी जाणीव ते वलय इतरांना सतत करून देत असते. तुम्ही सुद्धा खास अदृश्य चश्म्यातून त्या व्यक्तीकडे पाहताच ते वलय तुम्हाला स्पष्टपणे दृश्य होऊ लागते. असे वलय समोरच्या व्यक्तीच्या मागे दिसणे ही तर सुरुवात असते. त्या संदर्भात काही हालचाल करणे हा पुढचा भाग असतो.

अशी व्यक्ती समोर येता क्षणी तुम्ही त्याच्याकडे पाहून फक्त मंद हास्य करा. या एका स्मितहास्यामुळे सुद्धा त्या व्यक्तीला वाटेल की आपल्याकडे कोणाचे तरी लक्ष गेले आहे. त्यांचा तो दिवस आनंदाचा जाण्यासाठी कोणीतरी त्यांना मदत करीत असल्याचा त्यांना आनंद मिळेल.

तुमची एखाद्याशी नव्याने ओळख झाली तर त्याच्याशी थोडासा संवाद करण्यासाठी वेळ खर्च करा. त्याची थोडीशी वैयक्तिक चौकशी करा. त्याचे काय म्हणणे आहे हे जाणून घेण्याचा प्रयत्न करा. कित्येक लोक त्यांच्या मोहात पडावे असे असतात. त्यांच्याकडून खूप काही शिकण्यासारखे असते. त्यांच्याशी गप्पा मारताना तुम्हाला खूप मजा आली आणि तुमचा वेळ खूप छान गेला हे त्यांना आवर्जून सांगा. तुमची भेट झाल्याचा आनंद ती व्यक्ती स्वत:च्या हृदयात साठवित असतानाच त्याचा निरोप घ्या.

त्या व्यक्तीच्या पाठीमागे असलेल्या त्या अदृश्य वलयाला सलाम करा. त्या चक्राला गती द्या. आपोआपच तुम्ही त्या व्यक्तीच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे होऊन जाल.

❋ ❋ ❋

## आव्हाने

कोणत्याही खेळात खेळाच्या दुसऱ्या सत्रात तुम्ही समोर येणाऱ्या आव्हानांना कसा प्रतिसाद देता यावर त्या खेळातील अंतिम जय किंवा पराजय अवलंबून असतो.

तुमचे व्यक्तिमत्त्व विकास होण्यासाठी मुख्यत्वे तुमच्यासमोर उभी ठाकलेली आव्हानेच कारणीभूत ठरतात. पण आपल्या एका आयुष्यात किती प्रमाणात व्यक्तिमत्त्व विकास घडवून आणण्याची आपल्याला आवश्यकता भासते? त्या प्रमाणाचे माप तुमचे तुम्हीच ठरवायचे असते. समोर येणाऱ्या आव्हानांना हिमतीने तोंड देऊन आपले व्यक्तिमत्त्व घडवायचे की, त्याकडे पाठ फिरवून पलायनवाद स्वीकारायचा हे ज्याचे त्याने नक्की करावे लागते. कोणत्याही प्रकारच्या आव्हानांना तोंड न देता, आयुष्यात मनाशी ठरविलेली उद्दिष्टे शेवटपर्यंत गाठलेली फारच थोडी माणसे असतात. या क्षणाला तुमच्यासमोर काय आव्हान उभे आहे आणि त्याला तोंड देऊन त्यातून तुम्ही कसे यशस्वीरित्या बाहेर पडू शकणार आहात याचाच विचार करा.

अत्यंत मनापासून व आवडीने तुमच्या ध्येयांचा, उद्दिष्टांचा पाठपुरावा करा.

❋ ❋ ❋

# जिंकण्याचे चिंतन

**जिं**कण्याची इच्छा असणे महत्त्वाचे असतेच; परंतु याहूनही जिंकण्यासाठी लागणारी तयारी करण्याची मनस्वी इच्छा अत्यंत आवश्यक असते.

पुढच्या सात दिवसांत तुम्हाला मिळणाऱ्या सगळ्या संधींचा जास्तीतजास्त फायदा करून घेण्यासाठी तुम्हाला कशी तयारी करणे आवश्यक आहे याचा नीट विचार करा. योजनाबद्ध आखणी करा. प्रत्येकाला जिंकण्याची जबरदस्त इच्छा असतेच, परंतु प्रत्येकजण त्यासाठी तयारी करण्याच्या योजनेबाबत चिंतन करण्यास मात्र तयार नसतो. तुम्हाला जर मुळात चिंतन करण्यासाठी सुद्धा वेळ नसेल, तर विजयासाठी करायला लागणाऱ्या तयारीसाठी तुम्ही कोठून वेळ काढू शकाल? आणि मग तुम्ही विजय तरी कसा मिळविणार?

यावर चिंतन करीत राहा.

❋ ❋ ❋

# आत्मबल आणि आत्मविश्वास

**ध्या**नात ठेवा तुम्हाला मिळालेल्या एका आयुष्यात...........

तुम्ही सर्व लोकांसाठी सर्व गोष्टी करू शकणार नाही.

तुम्ही सर्व गोष्टी सारख्याच उत्कृष्ट रितीने करू शकणार नाही.

तुम्ही सर्व गोष्टी एकाच वेळी करू शकणार नाही.

तुम्ही सर्व गोष्टी इतर प्रत्येक व्यक्तीपेक्षा अधिक चांगल्या पद्धतीने करू शकणार नाही.

तुमची माणुसकी, तुमचा सुसंस्कृतपणा आणि तुमचा दयाळू स्वभाव इतर कोणत्याही व्यक्तीसारखाच असणार.

म्हणूनच......

तुम्ही स्वत: कोण आहात याचा शोध घ्या आणि जसे आहात तसेच राहा.

तुम्ही स्वत: सर्वप्रथम काय करण्याची आवश्यकता आहे ते ठरवा आणि तेच सर्वप्रथम करा.

तुम्हाला स्वत:ची बलस्थाने, आत्मशक्ती जाणून घ्यायला हवी आणि त्याचा उपयोग करायला हवा.

तुम्हाला इतरांशी अजिबात स्पर्धा न करण्याचे शिकायला हवे कारण इतर कोणतीही व्यक्ती 'तुम्ही' बनू शकत नाही.

तेव्हा.............

तुम्ही स्वत:मधील वेगळेपणा, अद्वितीयपणा जाणून घ्यायला हवा.

तुम्ही स्वत:ची प्राधान्ये नक्की करुन निर्णय घ्यायला शिकायला हवे.

तुम्ही स्वत:च्या मर्यादा ओळखूनच जगायला शिकायला हवे.

तुम्ही स्वत:चा योग्य तो आत्मसन्मान करायला शिकायला हवे.

तरच तुम्ही अत्यंत महत्त्वाचा मर्त्य ठरू शकाल,

यावर पूर्ण विश्वास ठेवण्याचे धाडस करा की.........

तुम्ही एक अत्यंत आश्चर्यकारक, अद्वितीय व्यक्ती आहात.

तुम्ही जसे आहात तसेच राहाणे हे तुमचे कर्तव्य नसून तो तुमचा हक्क आहे.

तुमचे आयुष्य केवळ अडचणींवर मात करण्यासाठी नसून आयुष्य हे जीवनातील आनंद उपभोगण्यासाठी आहे.

तुम्ही म्हणजे मानवाच्या इतिहासात एखादीच जन्मलेली असामान्य व्यक्ती आहात.

तुमचे आयुष्य हे ईश्वराकडून तुम्हाला मिळालेली देणगी आहे.
त्यामुळे...........
जे आयुष्य तुम्हाला मान खाली घालून जगायला लावित होते, तेच आयुष्य तुम्ही ताठ मानेने, अभिमानाने, गर्वाने जगू शकाल.

❋ ❋ ❋

# दिवसभरातील आत्मउन्नतीचा वेळ

प्रत्येक मनुष्यासाठी प्रत्येक दिवशी दिवसभरातील ठरावीक काळ त्याच्या कामाला यश मिळवून देऊन त्याचा उत्कर्ष साधणारा असतो. तुम्हाला ठाऊक आहे सायंकाळी ६ ते रात्री १० या वेळात दूरदर्शनच्या कार्यक्रमात जाहिराती देण्यासाठी इतर कोणत्याही वेळेपेक्षा कितीतरी पटींनी पैसे मोजावे लागतात. आपण कार्यक्रमाबरोबर नकळत व नाइलाजाने या जाहिराती पाहतच असतो. या जाहिरातींमधून त्या व्यवसायातील आणि उद्योगातील लोक उत्तम प्रगती करून कसा अमाप पैसा कमावत आहेत, याचेच दर्शन घेत असतो. अशा तऱ्हेने त्या महत्त्वाच्या वेळेमध्ये दुसऱ्याने केलेली भरभराट (त्याची स्वत:ची) पाहण्यापेक्षा आपल्या जीवनाकडे आपण डोळसपणे पाहायला हवे. त्याच वेळेत स्वत:च्या उन्नतीसाठी ध्येये ठरवून त्या ध्येयाप्रत जाण्यासाठी आपण प्रयत्न केले तर आपणही यशाची उंच भरारी घेऊ शकतो.

दिवसभरातील सकाळपासून सायंकाळपर्यंतचा वेळ आपण आपल्या कामाच्या ठिकाणी असतो. आपल्या कामाचाच भाग म्हणून एक प्रकारे आपण इतरांचे प्रश्न सोडवण्यासाठी त्यांना मदत करीत असतो.

या व्यापातून आपल्या स्वत:साठी वेळ उरतो तो थोडाफार सायंकाळचा. निदान हा वेळ तरी आपण आपल्या आनंदासाठी, भल्यासाठी, उन्नतीसाठी खर्च करणे बरोबर नाही का? या आपल्या स्वत:च्या वेळेतच आपण आपली ध्येये व उद्दिष्टे गाठण्यासाठी धडपड करायला हवी.

❋ ❋ ❋

# ......पुढचे पाऊल

आयुष्यात प्रत्येक मनुष्य, त्यात तुम्ही सुद्धा काही एका विशिष्ट ध्येयाने प्रेरित होऊन ते उद्दिष्ट गाठण्यासाठी जिवाचे रान करीत असतो. परंतु मधेच एखादी कोणतीतरी अडचण येते आणि मग तुम्ही तुमचे प्रयत्न मधेच सोडून देता. तुम्ही असे कधी अनुभवले आहे का? अशावेळी हे असे कसे घडले याचे तुम्हाला आश्चर्य वाटले असेल. अशा वेळी तुम्ही हताश होऊन वैतागून गेला असणार. तुमच्या डोक्यातील विचारचक्र ठप्प होऊन तुमची कार्यशक्ती थंडावली असणार. तुमच्या मनामधील ध्येये आणि उद्दिष्टे गाठण्यासाठी किंवा तुम्ही हाती घेतलेल्या उद्योगात आणि पर्यायाने आयुष्य यशस्वी होण्यासाठी तुम्हाला आणखी एक प्रयत्न करण्याची तयारी ठेवायलाच हवी. पुढचे एक पाऊल तुम्ही टाकायलाच हवे. हे कौशल्य तुम्हाला आत्मसात करायलाच हवे.

बरेच लोक अशा परिस्थितीत त्यांची स्वप्ने, ध्येये, नियोजित उद्दिष्टे पूर्ण न करता अर्ध्यावरच सोडून देतात. अशा वेळी त्यांच्या लक्षात येत नाही की, केवळ पुढचे एक पाऊल किंवा आणखी फक्त एक निकराचा प्रयत्न त्यांना त्यांच्या अंतिम ध्येयाप्रत नेणार आहे. त्यामुळे ते पूर्ण यशस्वी ठरणार आहेत याची त्यांना जाणीव नसते. त्यासाठीच सदासर्वकाळ पुढचे एक पाऊल टाकत राहाणे किंवा एकदा पुन्हा प्रयत्न करीत राहाणे शिकायलाच हवे.

मोठे ध्येय व कठीण उद्दिष्टे डोळ्यांसमोर ठेवले की आपोआप त्याच्या पूर्ततेसाठी तुमची वाटचाल नक्की होत राहील. पूर्ततेच्या या वाटचालीत रोज एक तरी पुढचे पाऊल टाकण्याचा प्रयत्न सोडू नका. या क्षणाला टाकीत असलेल्या पावलाच्या पुढील पावलाचा सतत डोक्यात विचार सुरू ठेवा. पुढच्या पावलाचा विचार करता करता आज टाकले जाणारे पाऊल तुम्ही विनासायास टाकू शकाल. त्याचे श्रम तुम्हाला जाणवणार नाहीत.

तुम्ही टाकीत असलेली पावले छोटी छोटी असली तरी हरकत नाही. मात्र ते प्रत्येक पाऊल पुढच्या वाटचालीचे असायला हवे. एकूण वाटचालीत लहान लहान पावले सुद्धा महत्त्वाची व निर्णायक ठरतात. अशा वाटचालीमुळेच तुम्ही एक दिवस अंतिम टप्प्यात केव्हा जाऊन पोहोचता ते लक्षातच येत नाही. आयुष्य अशा आश्चर्यकारक वेडयावाकड्या वळणाचे व मधूनमधून काट्याकुट्यांचेच असते. प्रयत्नांचे डोंगर पार करीतच यशाचे शिखर गाठायचे असते.

म्हणूनच म्हणतात ना प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलही गळे.

❋ ❋ ❋

## आदर्श बना

जीवनात तुमच्या शत्रूशी सुद्धा तुम्ही सामोपचाराने वागा आणि मित्राशी प्रामाणिकपणाने व निष्ठेने वागा. जीवनातील रोजच्या धकाधकीला खंबीरपणे सामोरे जाण्यासाठी सज्ज व्हा. परंतु त्याचबरोबर तुम्ही सर्व गोष्टी एकट्याच्या हिमतीवर करू शकणार नाही याची मनाशी खूणगाठ बांधा. ज्यांना तुमच्या मदतीची गरज आहे त्यांच्यासाठी उदार होऊन त्यांना मदतीचा हात पुढे करा. पण तुमच्या स्वत:साठीच्या व्यवहारात मात्र काटकसरीचे धोरण स्वीकारा. तुम्ही सर्वज्ञ नाही हे समजण्याइतके शहाणे व्हा. पण या जगात चमत्कार केव्हाही घडू शकतात यावर डोळे झाकून विश्वास ठेवायला शिका. तुमच्या आनंदात इतरांना आवर्जून सहभागी करून घ्या. मात्र त्याचबरोबर इतरांच्या दु:खात तुम्ही समदु:खी व्हा. मार्ग चुकलेल्या किंवा भरकटलेल्या लोकांना योग्य मार्गदर्शन करण्यासाठी पुढाकार घेऊन त्यांचे नेतृत्व स्वीकारा. पण तुमच्याभोवती विषण्ण वातावरण असताना अगर अनिश्चिततेचे ढग जमा झालेले असताना इतर कोणाचे तरी अनुयायी होऊन त्या अंधूक वाटेबाहेर येण्याचा प्रयत्न जरूर करा. पराभवामध्ये प्रतिस्पर्ध्यांच्या विजयासाठी पुढे होऊन त्याचे अभिनंदन तुम्ही सर्वप्रथम करा. परंतु सहकार्याच्या अपयशावर टीका करण्यात मात्र कधीही भाग घेऊ नका. तुमचे पुढचे पाऊल घट्ट रोवून ठेवा. म्हणजे तुम्ही कधीच तोल जाऊन तोंडघशी पडणार नाही. एखाद्या वेळी चुकून तुम्ही तुमच्या मार्गात भरकटलात तरी तुम्ही मनात योजलेले अंतिम उद्दिष्ट कधीच विसरू नका. तुमच्यावर प्रेम करणाऱ्यांवर तर प्रेम कराच; परंतु तुमच्यावर प्रेम न करणाऱ्यांवरही प्रेम करीत राहा. कोणी सांगावे त्यांच्यात कधीतरी बदल घडून येईल.

पण या सर्वांपेक्षा महत्त्वाचे म्हणजे स्वत:वर विश्वास ठेवून प्रेम करा आणि आदर्श बना.

❋ ❋ ❋

## आपल्या कामावर प्रेम करा

जेव्हा तुम्ही तुमच्या व्यवसायातील कामावर प्रेम करता तेव्हा ते काम आणि पर्यायाने तुमचे जगणे आनंदी होते. ते हेतुपूर्ण आणि फलदायी ठरते. पुष्कळ माणसे स्वत:च्या कामाबद्दल नाराज राहून त्याबद्दल सतत तक्रार करीत असतात. अशा वेळी त्यांच्या हे लक्षात येत नाही की ते करीत असलेले काम जर इतके सोपे असते, तर त्यांच्या मालकाने किंवा त्यांना नोकरीवर ठेवणाऱ्याने त्यांच्यापेक्षा कमी प्रतीच्या, कमी कुवतीच्या कामगाराला, कमी मोबदला देऊन त्याच कामावर ठेवले असते. अनेक माणसे कामावर उपस्थित होणाऱ्या अडचणींकडे, समोर उभी राहिलेली कठीण परिस्थिती म्हणूनच पाहतात; परंतु या उद्भवलेल्या कठीण परिस्थितीमुळे त्यांच्यासाठी निर्माण झालेल्या संधीचा ते विचार करीत नाहीत. त्या चालून आलेल्या संधी त्यांच्या ध्यानातच येत नाहीत.

उदाहरणार्थ, तुरूंगात असलेले दोन कैदी एकाच वेळी जेव्हा तुरूंगाच्या गजाबाहेरचे जग पाहतात तेव्हा त्यापैकी एका

कैद्याला बाहेरच्या जगातील फक्त चिखल दिसतो. परंतु दुसऱ्या कैद्याला मात्र बाहेरच्या जगातील चमचम करणारे चांदणे दृष्टीस पडते. यावरून दोन माणसांच्या दृष्टिकोनातील फरक ध्यानात येतो. निराशावादातून दिसणारा चिखल हा येणाऱ्या संधीला त्याच धुळीत मिळवून टाकतो किंवा त्या संधीवर पाणी फिरवितो.

कोणत्याही कामात सुधारणा किंवा प्रगती घडून येताना त्याला विरोध करणाऱ्या लोकांच्या तक्रारीचे एकच तुणतुणे असते. त्यांचा असा समज होतो की, या सुधारणेमुळे अनेक लोक बेकार होतील. अनेकांना कामावरून कमी केले जाईल. मागच्या काही वर्षांत आपण संगणकांनी घडवून आणलेली प्रगती व केलेली क्रांती पाहिली आहेच. संगणकाने केली जाणारी कामे पाहून, सुरूवातीच्या काळात संगणक आल्यामुळे अनेक लोकांचे काम जाईल असा अनेकांचा गैरसमज झाला होता. बऱ्याच लोकांना संगणकावर काम सुरू करण्यापूर्वी त्याबद्दलचे प्रशिक्षण घ्यावे लागले हे सत्य आहे. परंतु थोड्याच दिवसांत संगणकामुळे खूप लोकांना काम करण्याचे नवीन क्षेत्र उपलब्ध झाले, इतकेच नाही तर त्यांचे काम खूप सोपे व सुखकर झाले हे मान्य करावेच लागेल.

पुढच्या वेळी जर तुम्हाला तुमच्या कामातील समस्यांचा बाऊ वाटू लागला तर तुम्हीच तुमच्या मनाला एक प्रश्न विचारा....''आपण करीत असलेले काम, यापेक्षा साध्या, सोप्या, जास्त चांगल्या, जास्त किफायतशीरपणे, जास्त वेगाने होणाऱ्या पद्धतीने करण्याची एखादी पद्धत, एखादा मार्ग अस्तित्वात आहे का?''

कोणी सांगावे या प्रश्नाच्या उत्तरातच कदाचित रामबाण उपाय मिळू शकेल. त्याचा फायदा तुम्हाला स्वत:ला आणि त्याबरोबर इतरांना होऊ शकेल; पण त्यासाठी तुमच्या कामावर तुम्ही प्रेम केले पाहिजे.

❋ ❋ ❋

## आनंद शोधण्याचा मार्ग..... आनंदाचा पाठलाग

लहानपणापासून आपण कशामुळे सुखी होणार याचा आपण सतत शोध घेत असतो. तरूणपणी आपल्याला वाटते की, लग्नानंतर आपण खूप आनंदात राहू. पण त्यानंतर वाटते की, मुले झाल्यानंतरच आपल्याला आनंद गवसेल. परंतु मुले घरात आल्यानंतरही आपण समाधानी होत नाही. डोक्यातील चिडचिड कमी होत नाही. त्यावेळी वाटते कधी ही मुले मोठी होणार? त्यानंतरच मनाला शांतता मिळेल. मुले मोठी होत असताना मनात चिंता असते ती त्यांच्या वाढत्या वयातील जडणघडणीची. त्यांच्या पौगंडावस्थेतील प्रगतीची. त्यानंतरही आपण मनात म्हणतो आपल्या जोडीदाराबरोबर (पती किंवा पत्नी) आपला जास्त सलोखा व्हावा, साथ मिळावी, दोघे बरोबर सुंदर सुंदर स्थळांच्या सहली कराव्यात. त्यासाठी आपली स्वत:ची मोटारगाडी असावी. आपले राहण्यासाठी छानसे टुमदार घर असावे. पण 'असावे' ची ही गाडी तिथेही थांबत नाही. वाटते की, छे, आपण निवृत्त झालो की मग कसे एकदम आनंदात दिवस घालवू.

एकूण काय? हवाय, असावे, व्हावे याचा पाढा संपतच नाही. खरे सांगायचे तर प्रत्येक वेळेचा तो क्षण आनंद घेण्याचा असतो. कारण त्या क्षणी तो आनंद तुम्ही उपभोगला नाही तर केव्हा आनंद लुटणार?

आयुष्यात तुम्हाला सतत आव्हानांना सामोरे जावेच लागते. या आव्हानांना धीराने तोंड देऊन आनंदाने जगण्याचा विडा प्रत्येकालाच उचलावा लागतो. बराच काळ असे वाटत राहते की, खऱ्या अर्थाने आपल्या आयुष्याची सुरुवात अजून झाली नाही. आयुष्याच्या वाटचालीत अडचणींचे अडथळे सतत उभे राहात असतातच. या रविवारी नवीन कार येणार, घर होणार, घराचे कर्ज फिटणार, उन्हाळा पावसाळा हिवाळा येणार,.... कधी मरण येणार, कधी पुनर्जन्म होणार. कायमच काहीतरी काम करण्याचे बाकी असणार. या दिव्यातून पार पडणे हीच तर खरी कसोटी असते. तसे बघितले तर या अडचणी, ही आव्हाने म्हणजेच आपले आयुष्य असते. कारण आनंदी होण्याचा कोणताही एखादा मार्ग नसतो तर आनंदाने जगणे हाच एक आनंदी जीवनाचा मंत्र आहे.

(There is not any road of happiness, happiness is the road.)

आता शाळा सुरू होईल, शाळा संपेल, सुट्टी लागेल, वजन वाढलंय ते दहा पौंडांनी तरी कमी केले पाहिजे, कधी एकदा शिक्षण पुरे होऊन नोकरी मिळेल, पैसे साठवून कधी एकदा लग्न होईल, लग्नानंतर.... या आणि अशा कोणत्याच विवंचनेत अडकून पडू नका. त्यावर तुमचा आनंद अवलंबून ठेवू नका. येणारा प्रत्येक क्षण आनंदाने जगा.

आनंदाने जगणे हा प्रवास आहे. आनंद हे त्याचे अंतिम स्थळ आहे. तेच अंतिम उद्दिष्ट आहे. येणाऱ्या प्रत्येक क्षणाखेरीज दुसरा कोणताही क्षण अथवा घटना अधिक आनंद देऊ शकणार नाही.

HAPPINESS IS A VOYAGE AND DESTINATION. THERE IS NO TIME TO BE HAPPY THAN.... NOW. LIVE AND ENJOY MOMENT.

❋ ❋ ❋

# आयुष्याचे वेगळे वळण

आपल्या आयुष्यात अनेक प्रसंगातून आणि घटनांमुळे निर्माण झालेले पुष्कळ कप्पे, कंगोरे किंवा धागे असतात. त्यापैकी काहींच्या बाबतीत आपल्याला टोचणी लागून राहिलेली असते. नंतरच्या काळात त्या प्रत्येक बाबतीत सुधारणा घडवून आणण्याची किंवा झालेल्या चुका दुरुस्त करण्याची संधी आपल्याला प्राप्त होत असते. संधी मिळताच आपल्या झालेल्या चुका दुरुस्त करण्यासाठी आपण आटोकाट उपाययोजना करीत असतो. त्यामुळे आपले स्वत:बद्दलचे मत आपण बदलत असतो.

आपण केलेले अनेक निश्चय आपणच सतत मोडीत काढीत असतो. कारण या निश्चयांशी आपण ठाम बांधिल राहिलेले नसतो. ते निश्चय म्हणजे केवळ आपल्या मनात उमटलेल्या इच्छा असतात. ते तुम्ही मनापासून घेतलेले ठाम निर्णय नसतात. आपले आयुष्य पूर्ण कृतार्थपणे जगण्यासाठी आपणच मनाने ठरविलेले आयुष्यातील बदल अमलात आणण्यासाठी जाणीवपूर्वक निश्चय करायला हवेत. हे बदल घडवून आणण्याचे काही मार्ग आहेत. त्यापैकी काही असे.

* तुमच्या गरजांवर तुमचे लक्ष केंद्रित करा. तुमच्या ज्या गरजा नाहीत किंवा तुम्हाला जे आवश्यक वाटत नाही त्याकडे लक्ष देऊ नका.
* नेहमी मोठेमोठे मनसुबे रचित राहा. तुमचे लक्ष त्या मनसुब्यांना प्रत्यक्षात आणण्याकडे केंद्रित करा. त्या मनसुब्यांच्या पूर्ततेच्या आड येणारे अवघड दगडधोंडे वाटेत येऊ देऊ नका.
* बदल घडवून आणण्यासाठी योजनाबद्ध कार्यक्रमांची आखणी करा व त्याप्रमाणे कार्यान्वित व्हा.
* तुमच्या तोंडून उमटलेल्या प्रत्येक शब्दाकडे लक्ष द्या. शब्द हे अत्यंत प्रभावी मार्गदर्शक असतात. तुम्हाला नक्की काय हवे आहे ते शब्दच तुम्हाला सांगत असतात.
* तुम्हाला ज्या घटनेमुळे किंवा ज्या प्रसंगातून खूप समाधान मिळाले असेल ते प्रसंग व त्या घटना आठवा. तुम्हाला मिळालेले यशाचे क्षण आठवा. तुमच्या मनासारखे घडते तेच चालू ठेवा. पण जे मनाविरुद्ध घडते ते बदलण्याचा आग्रह धरू नका.
* तुम्ही स्वत:ला काही प्रश्न विचारून पाहा. उदाहरणार्थ, अशी कोणती परिस्थिती होती की ज्यावेळी तुम्हाला स्वत:बद्दल अभिमान वाटला? आयुष्यात अशा घटना घडल्या त्यावेळी तुम्हाला काय वाटले? तुम्ही त्याकडे कसे पाहिलेत? तुम्ही कसे वागलात किंवा तुम्ही कसा प्रतिसाद दिलात? त्यावेळची परिस्थिती तुम्ही पुन्हा कशी निर्माण करू शकाल?
* तुमच्या मनात ज्या विषयांचे विचार घोळत असतील त्यावरच लक्ष केंद्रित करा. तुमच्या मनात एखादे चित्र उभे राहात असेल आणि ते जर तुम्हाला पसंत नसेल तर मनाच्या रिमोट कंट्रोलने ते बदलून दुसरे काहीतरी मनासमोर आणा.
* तुमच्या मनाची बिघडलेली अवस्था ठीक करून चित्त ताळ्यावर आणण्याचा तुमचा जर मानस असेल तर वास्तवतेचे भान बाळगा. जे प्राप्त करण्याची तुमच्या मनात अभिलाषा आहे त्याबद्दल तुम्हाला खरोखर काय वाटते याचा गांभीर्याने विचार करा.
* घडून गेलेल्या अप्रिय घटनांबद्दलचे दु:ख, वेदना, व्यथा जेव्हा तुम्हाला स्मरतात, तेव्हा त्याच अवस्थेत थोडा वेळ स्वत:ला थांबवून ठेवा.

* ज्यावेळी आपण आयुष्याला वेगळे वळण देण्याचा प्रयत्न करीत असतो तेव्हा केवळ प्रखर इच्छाशक्ती असणे उपयोगी पडत नाही तर खंबीर निर्णय व त्याची अंमलबजावणी हेच महत्त्वाचे व जरूरीचे असते.
* नुसत्या सबबी देण्यात पटाईत होऊ नका. कदाचित त्याची संयुक्तिक कारणे असू शकतील परंतु पळवाटा आणि लटकी कारणे असता कामा नयेत.

मुख्यत्वे करुन आपल्या आयुष्याला वेगळे वळण देण्याची एक दोन कारणे असू शकतात. एक म्हणजे आयुष्यातील दु:ख, व्यथा कमी करणे. दुसरे म्हणजे आयुष्यातील जगण्याचा आनंद मिळविणे. यापैकी तुमचे उद्दिष्ट कोणते आहे हे तुम्हीच पडताळून पाहा.

रडत बसू नका. कुथत राहून जगू नका. जीवनातील शर्यत जिंकण्याची ईर्षा मनात बाळगा. लक्षात असू द्या, प्रसन्नतेने जगायला, आनंदाने जगायला मिळण्याचा कोणताही दिवस महत्त्वाचा असतो.

❋ ❋ ❋

## आर्थिक नियोजन

कोणत्याही वेळी मिळकत किंवा आर्थिक प्राप्ती कमी व गरजा त्याहून अधिक असे समीकरण झाले की, हमखास आर्थिक अनर्थ ओढवतोच. ही चूक सुधारण्यासाठी प्रत्येक व्यक्तीने स्वत:चा आर्थिक ताळेबंद दुरूस्त करणे हे गरजेचे असते. परीक्षा जवळ येताच शेवटचे काही दिवस अभ्यास करणे हे अजिबातच अभ्यास न करता परीक्षेला बसण्यापेक्षा चांगले. तरीही प्रथमपासून अभ्यास नियमितपणे न करण्याने फारसे बिघडत नाही असा समज करून घेणे हे मात्र पूर्ण चुकीचे होय. आपली वैयक्तिक समीकरणे हीच आपले आयुष्य घडविण्यासाठी प्रमुख निर्णायक घटक असतात. केवळ मनुष्यप्राणीच कोणत्याही दिवशी स्वत:ची समीकरणे निश्चित करून पुढील आयुष्याची दिशा नक्की करू शकतो. तुमची आर्थिक सुबत्ता ही तुमच्या मिळकतीवर अवलंबून नसते तर त्या मिळकतीला साजेल असा जमाखर्चाचा ताळेबंद हाच या आर्थिक सुबत्तेची उंची व पातळी ठरवितो. योग्य रितीने व सर्वांगाने विचार करून केलेला ताळेबंद किंवा वैयक्तिक जमाखर्च हाच त्या व्यक्तीला अद्वितीय स्थिती प्राप्त करून देतो.

आपल्या जीवनाचे गलबत आपण योग्य मार्गाने वल्हवले तर भोवती वाहणारे वारे आपल्याला अलगदपणे आपल्या इच्छित स्थळावर तारून नेतात. आपल्याला मानसिक, आर्थिक आणि आत्मिक समाधान व धन्यता मिळवून देतात. आपण प्रगती पथावर जाणार की आपण चुकीची वाटचाल करीत राहणार हे आपले आर्थिक नियोजन व समीकरणेच ठरवितात. म्हणूनच आर्थिक नियोजने व समीकरणे ही आयुष्याच्या प्रवासात निर्णायक ठरतात.

❋ ❋ ❋

## मार्गक्रमणा

समुद्रातून प्रवास करणाऱ्या एखाद्या नावाड्याचा किंवा खलाशाचा समुद्राच्या प्रवासाचा नकाशा पाहिला तर आपल्याला एका क्षणात लक्षात येईल की तो मार्ग दाखविणारा नकाशा म्हणजे प्रवासाच्या सुरुवातीच्या स्थळापासून ते अंतिम इच्छित स्थळाला जोडणारी ती एक सरळ रेषा नसते. तर वेड्यावाकड्या वळणांनी आक्रमिलेला तो मार्ग असतो. भोवतालची परिस्थिती आणि वातावरणातील वेळोवेळी होणारे बदल लक्षात घेऊन नावाडी आपल्या ठरलेल्या मार्गात योग्य ते बदल करीत असतो. संपूर्ण प्रवासात फक्त एकच गोष्ट बदलत नाही. ती म्हणजे अंतिम इच्छित स्थळ.

माणसाच्या वैयक्तिक जीवनप्रवासातही हेच घडते. आपण आयुष्यात साध्य करायचे म्हणून जे काही ठरविलेले असते ते साध्य करीत असताना कारणे व आपल्याभोवती निर्माण होणारी परिस्थिती त्यामध्ये अनेक विघ्ने निर्माण करू शकतात. यावर

आपले जरासुद्धा नियंत्रण असू शकत नाही. आपण नक्की केलेल्या स्वत:च्या मार्गक्रमणात योग्य ते बदल करून इच्छित ध्येये गाठण्याचा प्रयत्न करावा लागतो.

आयुष्यात काय साध्य करायचे आहे ते मनात पक्के करा आणि येणाऱ्या अडचणींच्या प्रवाहात स्वत:ला वाहून जाऊ देऊ नका. हेच तुमच्या अंतिम यशाचे गमक ठरेल.

❋ ❋ ❋

## आत्मविश्वास

कोणताही यशस्वी मनुष्य स्वत:वरील विश्वासाला, स्वत:च्या अभिमानाला, स्वत:च्या मतांना, भावनांना किंवा स्वत:च्या मनातील प्रवृत्तीला कधीही कमी लेखून त्याकडे दुर्लक्ष करीत नाही. ते त्या सर्वांचा सतत आग्रह धरतात. त्यांना त्यासाठी आपला हक्क प्रस्थापित करण्याची अगर कसलेही ढोंग करण्याची अजिबात गरज भासत नाही. एकदा स्वत:मधील मीपणावर विश्वास बसला की, मग कसलाही बुरखा पांघरण्याची जरूरी भासत नाही. किंवा ते जे करतात त्याच्याशी इतर लोक सहमत आहेत की नाहीत याची काळजी करीत त्यांना असुरक्षित वाटत नाही.

दुसऱ्या कोणीतरी काय हवे हे ठरविण्यापेक्षा, तुम्हाला नक्की काय हवे ते तुमचे तुम्ही स्वत: ठरवा. दुसऱ्या कोणाच्या तरी आहारी जाऊन स्वत:चे अस्तित्व मुळीच धोक्यात येऊ देऊ नका. प्रथम तुम्हाला स्वत:ला काय व्हायचे आहे ते ठरवा. मग ते होण्यासाठी योग्य ते करा. योग्य ती पाऊले उचला. स्वत:चा निर्धार आणि स्वत:वरचा दृढविश्वासच तुम्हाला यश मिळवून देईल.

❋ ❋ ❋

## कठीण समय येता

तुमच्या मनात काय घडण्याचे तुम्ही योजिले आहे याचा विचार परमेश्वराच्या मनात कधीच नसतो. तुम्हाला या कठीण प्रसंगातून जायला आवडेल का? किंवा एखादा पराभव तुम्हाला मान्य होईल का? किंवा तुमच्या एखाद्या जवळच्या लाडक्या व्यक्तीचा मृत्यु तुम्ही सहन कराल का? असे तो परमेश्वर तुम्हाला कधीही विचारीत नाही. त्याच्या स्वत:च्या गरजेनुसार व इच्छेनुसार तो या घटना घडवून आणीत असतो.

अशा कठीण प्रसंगांना तोंड देत असतानाच मनुष्य कणखर, काटक, खंबीर वृत्तीचा, उमद्या स्वभावाचा, थोर मनाचा, दयाळू प्रवृत्तीचा तरी बनतो किंवा तेच कठीण प्रसंग काही काही माणसांना हळव्या, कमकुवत मनाचे, फक्त दुसऱ्यांच्या चुका शोधणारे आणि दुराग्रही बनवितात. तुमच्यावर येणाऱ्या कठीण प्रसंगातून तुम्ही जात असताना नजिकच्या लोकांनाही त्याची झळ निश्चितच पोहोचते. अशा वेळी ते तुम्हाला समजावून घेतात. याउलट दूरचे लोक मात्र या तापदायक प्रसंगात फक्त संशयखोर आणि घाबरवून सोडविणाऱ्याची भूमिका घेतात.

अर्थात, हे मात्र नक्की की, आजपर्यंत या जगात ज्या ज्या व्यक्तींनी पराकोटीचे दु:ख अनुभवले आणि जे जे अत्यंत कठीण प्रसंगातून गुदरले, त्यांनीच या जगाला तेजस्वी आणि विश्वासपूर्ण श्रद्धेचा मार्ग दाखविला. जगासमोर अशीच माणसे तेज:पुंज व ज्वलंत उदाहरणे म्हणून कायमची ध्यानात राहिली.

म्हणूनच आपल्या प्रत्येकाच्या मनात विश्वास व श्रद्धा कायम बाळगायला हवी.

❋ ❋ ❋

# ध्येयपूर्तीचा पाठपुरावा

एका विचारप्रवाहाप्रमाणे असे म्हटले जाते की, ध्येयपूर्ती हा ठरावीक कार्याचा अंतिम टप्पा असतो; परंतु ते काही आयुष्याची मार्गक्रमणा करण्याचे एकमेव कारण असू शकत नाही. नियोजित ध्येय गाठण्यासाठी केलेली धडपड ही विशिष्ट उद्देशाने केलेली एकाग्रता असून ती एक ठरवून केलेली मार्गक्रमणा असते. स्वत:ची प्रगती करून उन्नती करून घेणे हेच कोणत्याही ध्येयपूर्तीमागील प्रमुख कारण असते.

कसलेही कष्ट न करता ध्येय गाठली गेली तर त्याचा आपल्याला केव्हाही आनंद मिळणार नाही. उलट त्या ध्येयाप्रत जाण्यासाठी आपल्याला कष्ट पडले तर ते कष्ट कारणी लागल्याचा अवर्णनीय आनंद आपल्याला उपभोगात येतो. तो आनंदच आपल्याला प्रचंड समाधान देऊन जातो. ध्येयपूर्तीची वाटचाल करताना एक गोष्ट लक्षात ठेवायला हवी. या वाटचालीचा अंतिम परिणाम हे आपल्या अनेक यशस्वी कृतीचे एकत्रित लाभलेले फळ असते. मिळालेले हे यश आपल्या लहानात लहान अनेक दिवस अन् रात्र केलेल्या प्रयत्नांचेच दृश्य स्वरूप असते. या ध्येयपूर्तीच्या वाटचालीमध्ये मिळवलेले प्रत्येक यश हे तुमच्या अलौकिक कौशल्याचे, कर्तव्याचे सातत्याने टाकलेले पहिले, दुसरे, तिसरे इतकेच नाही तर पुढचे प्रत्येक पाऊल असते. टाकलेले प्रत्येक पुढचे पाऊल हे त्याआधी टाकलेल्या एकेका पावलाचे महत्त्व वाढवित असते.

कोणतीही गोष्ट प्राप्त करण्यासाठी सोपा आणि जवळचा मार्ग असूच शकत नाही. एका वेळी एक यशस्वी कृती केली तर अशा अनेक यशस्वी कृतींची मालिकाच तयार होते. जे जे जरुरीपेक्षा जोमाने आणि वेगाने उगवते ते तितक्याच वेगाने लवकर कोमेजून जाते. परंतु जे संथ आणि हळुवार उगवते तेच टिकून राहते. म्हणून उच्चस्थानावर पोहोचण्यासाठी पाया मजबूत असणे अत्यावश्यक असते.

❋ ❋ ❋

# कबुलीजबाब

गतकालातील चुका व त्याबद्दलचा खेद, पश्चा:त्ताप याची कबुली देणे म्हणजेच स्वत:ला मन:शांती मिळवून देणे असते. त्यातूनच भविष्यामधील चांगल्या व यथार्थ घटनांपर्यंत पोहोचता येते. यामुळेच उपलब्ध होणाऱ्या संधी साधण्याची शक्यता निर्माण होते. एकदा कबुलीजबाब दिला म्हणजे आपण कायमस्वरूपी निष्णात, परिपक्व किंवा परिपूर्ण झालो असा त्याचा अर्थ होत नाही. याचा खरा अर्थ इतकाच की, स्वत:च्या चुका सुधारून परिपूर्णता आणण्याचा आटोकाट प्रयत्न करण्याचे ते एक वचन असते.

कबुलीजबाब हा शांतता मिळविण्याचा मार्ग असतो. कबुलीजबाब म्हणजेच अत्यंत वाईट अवस्थेतून मुक्त होऊन उत्तम अवस्थेला पोहोचणे. त्या उच्चतम अवस्थेत सदासर्वकाळ स्थिरावण्याची आशा कबुलीजबाबानंतर निर्माण होते. कबुलीजबाब म्हणजे मनापासून केलेला स्वत:चा प्रतिवाद असतो. सत्कृत्यांचे समर्थन असते. प्रेमाचा तो उत्तम ठेवा असतो. कबुलीजबाबानंतर स्वत:चा स्वत:वर विश्वास वाढतो आणि त्याबरोबरच इतरांचा विश्वास संपादन केला जातो. कबुली दिल्यामुळे आयुष्य आनंदी होऊन जाते. कबुलीनंतर पुन्हा आयुष्यात जरी अडचणींचे डोंगर उभे राहिले तरी एक प्रकारची सुरक्षितता लाभण्याची खात्री वाटते.

कबुलीनंतर आपण नव्याने स्वप्न रंगवू लागतो. नव्या आशा फुलून येतात आणि क्षमायाचनेने हृदय भरुन येते.

❋ ❋ ❋

# कौतुकाचा एक शब्द

तुमच्या कुटुंबामधील व्यक्तींच्या आणि जिवलग मित्रांच्या प्रशंसनीय गोष्टी, त्यांनी केलेली सत्कृत्ये हेरण्याची सवय करा. इतरांच्या चुका व त्यांच्यातील वैगुण्ये शोधून त्यावर बोट ठेवण्यात आपण फार पटाईत असतो. पण वेगळे काही बघायचे म्हणून इतरांच्या चांगल्या गोष्टीच ओळखायच्या असे आव्हान म्हणून स्वीकारा.

तुमचे ज्यांच्यावर मनापासून प्रेम आहे अशा माणसांच्या वैगुण्यांवर, उणिवांवर किंवा अभावयुक्त आचरणांकडे बोट दाखविण्यापेक्षा त्यांच्यामध्ये असलेल्या गुणांचे कौतुक करण्यातच तुम्हाला अधिक आनंद मिळणार नाही का? असा विधायक दृष्टिकोन ठेवून आपल्या आप्तेष्टांच्या सद्वर्तनाबद्दल त्यांच्याजवळ उघड प्रशंसा करूनच जर दिवस संपविला तर दोघांनाही तो दिवस निश्चितच आनंदाचा आणि विशेष ठरेल. दुसऱ्या माणसांबद्दल सतत टीकास्त्र सोडण्याऐवजी त्यांची योग्य ती स्तुती केली किंवा कौतुकाचे चार शब्द काढले तर किती प्रसन्न वाटेल ते तुम्ही अनुभवायलाच हवे.

हे अवघड आहे का? काही माणसांसाठी हे कदाचित अवघड असेलही. लहानपणापासून आपल्या हातून घडणाऱ्या चुका आपल्या नजरेस आणूनच चांगले कसे वागायचे याचे प्रशिक्षण भोवतालची सर्व माणसे आपल्याला देत असतात. चुकांचा अभ्यास करीतच आपण लहानाचे मोठे होतो. हातून घडणाऱ्या चुकांसाठी दणके मिळण्याऐवजी हातून घडणाऱ्या कृतींसाठी योग्य मार्गदर्शन झाले तर कोणाचीही उत्तम जडणघडण होणार नाही का?

हे एक आव्हान म्हणूनच स्वीकारा. प्रत्येक दिवशी परिवार आणि जिवलग दोस्तांमधील गुणांचा शोध घ्या. अवगुणांकडे दुर्लक्ष करण्याची सवय अंगी बाळगा. रोज एका व्यक्तीला तरी ''तू असामान्य व्यक्ती आहेस'' असे मनापासून सांगण्याचा प्रयत्न करा. जसजसे दिवस पुढे पुढे सरकतील तसतसे जास्तीतजास्त लोकांना असे संबोधण्याची सबळ कारणे शोधा. त्या योगे तुमची गुणग्राहकता तर वाढेलच तसेच त्याबरोबर तुमचा माणसांचा संग्रहही वाढत राहील.

❋ ❋ ❋

# काहीही झाले तरी

कधी कधी लोकांशी प्रामाणिकपणे वागणे, त्यांना दया दाखविणे, त्यांची करुणा करणे, इतरांची काळजी करणे, त्यांच्याविषयी कळकळ वाटणे हे तुम्हाला स्वत:चा वेळ वाया घालविण्यासारखे वाटेल. विशेषत: त्यासाठी तुम्ही घेतलेल्या परिश्रमांची नोंद सुद्धा घेतली जात नाही त्यावेळी तर असे प्रकर्षाने वाटत राहाते. जेव्हा आपले प्रयत्न असे दुर्लक्षित केले जातात तेव्हा पुन्हा कधीही तसे प्रयत्न करायला आपण तयार होत नाही. आपल्या मनाच्या गाभाऱ्यात काहीतरी करण्याची फार तळमळीची इच्छा असली तरी मग आपण चटकन पुढे होत नाही.

मदर तेरेसा ह्या आपल्यासमोर उत्तम जगण्याचे एक उदाहरण म्हणून आयुष्य जगलेल्या एक साध्वी होत्या. त्यांनाही कदाचित अशाप्रकारचा अनुभव अनेक वेळा आला असेल. त्यांनाही कधीतरी दुर्लक्षित केल्याचा, डावलले गेल्याचा किंवा कुचेष्टा केल्याचा अनुभव आला असण्याची शक्यता नाकारता येत नाही. म्हणूनच त्या म्हणतात.......

'अनेक वेळा पुष्कळ लोक तर्कशून्य वागतात. ते तर्कशून्य नसतात. स्वत:मध्येच मश्गूल असतात. तरीसुद्धा त्यांना माफ करा. तुम्ही जर दयाळू, उदार असाल तर लोक तुम्ही स्वार्थी असल्याचा आरोप करतील. तुमचा काहीतरी गुप्त हेतू असल्याचा समज करुन घेतील. काहीही झाले तरी तुम्ही त्यांची दया करा. तुम्ही जर यशस्वी ठरलात तर तुम्हाला काही चुकीचे व खोटे मित्र भेटतील किंवा कट्टर शत्रू मिळतील. काहीही झाले तरी यशस्वी व्हा. जर तुम्ही प्रामाणिक व अती स्पष्टवक्ते असाल तर लोक तुम्हाला नक्की फसवतील. परंतू काहीही झाले तरी प्रामाणिकपणा व स्पष्टवक्तेपणा सोडू नका. जे निर्माण करण्यासाठी तुम्ही

वर्षानुवर्षे परिश्रम केले असतील ते एखादा दुष्ट, नतदृष्ट मनुष्य एका रात्रीत नष्ट करू शकेल. काहीही झाले तरी तुमच्या निर्मितीत खंड पडू देऊ नका. तुम्हाला जर शांतता, प्रसन्नता व सुख लाभलेले असेल तर लोकांना खचितच तुमचा हेवा , मत्सर वाटेल. पण काहीही झाले तरी तुम्ही सदैव शांत, प्रसन्न व आनंदी राहा. तुम्ही आज जे काही सत्कार्य कराल त्याचा लगेचच लोकांना उद्या विसर पडेल. पण काहीही झाले तरी चांगले काम करणे सोडू नका. तुमच्याजवळ जे जे उत्तम आहे ते ते जगाला देण्याचा प्रयत्न करा. जगाला ते कधीही पुरे पडणार नाही. तरीही जगाला तुमच्याजवळ असलेले उत्तम वाटत राहा.

शेवटी सर्व गोष्टींचा परामर्श घेतला तर तुमच्या असे लक्षात येईल की, या सर्व देवाणघेवाणीमध्ये तुम्ही व परमेश्वराचाच अंतर्भाव होता. काहीही झाले तरी यात तुमचा इतर लोकांशी संबंध नव्हताच.'

अत्यंत प्रामाणिकपणे, करुणापूर्वक आणि काळजीपूर्वक आपल्या ध्येयपूर्तीच्या मार्गाची वाटचाल करीत राहा. त्या मार्गामध्ये जर तुम्हाला प्रतिकाराशी सामना करावा लागला तरी कशाही परिस्थितीत वस्तुस्थितीला हसतमुखाने सामोरे जा. अंतिम आनंद, समाधान, तृप्ती तुम्हाला नक्की प्राप्त होईल.

❃ ❃ ❃

# कृतज्ञता

कृतज्ञता, अर्थात दुसऱ्याने केलेल्या उपकाराची जाणीव आणि ती व्यक्त केली गेली तर तुम्हाला ती नक्कीच परतफेड करते. गेला संपूर्ण आठवडा मी विचाराच्या गर्तेत हेलखावे खात घरंगळत होतो. कोणतीही गोष्ट मनासारखी घडत नव्हती. मनाची गाडी रुळावर येत नव्हती. मला कळत नाही मी कित्येक वेळा विचारांची दिशा बदलून त्या संभ्रमावस्थेतून बाहेर पडण्याचा आटोकाट प्रयत्न केला. माझी मन:स्थिती बदलून चैतन्य आणण्याचा प्रयत्न केला; परंतु कशाचाच उपयोग होत नव्हता. माझ्या भावस्थितीत सुधारणा होत नव्हती. आतले मन सांगत होते, तुझे खूप आवडते गाणे लाव. मागे घडून गेलेली एखादी आनंददायी घटना आठव. अशा परिस्थितीत करायला शिकलेले अनेक उपाय करून पाहिले परंतु कशाचाच परिणाम होत नव्हता.

शुक्रवारचा दिवस. ऑफिसमध्ये आलो. एरवी शुक्रवारचा दिवस उत्तेजित करणारा असतो. कारण आठवड्याच्या सुट्टीची सुरुवात असते. हे लक्षात येऊनही मला ढिम्मसुद्धा उत्साह वाटत नव्हता. दिवसभरात करण्याची खूप कामे डोक्यात होती. त्यासाठी दिवसाच्या कामाला मी जरा लवकरच सुरुवात केली. डोक्यातील सर्व कामे पूर्ण होण्यास दिवसभराचा वेळ पुरा पडेल की नाही याबद्दल साशंक होतो. चिंतातुर अवस्थेत होतो. मला एका विषयाचे सादरीकरण (प्रेझेंटेशन) करायचे होते. एक टेंडरपेपर तयार करायचा होता. परंतु असे वाटत होते की, दिवस सगळा फुकट जाणार आहे.

तरीही याच अवस्थेत मी कामाला हात घातला. तेवढ्यात माझ्या एका चुलतभावाचा मला फोन आला. त्याने फोनवर छोटीशीच बातमी सांगितली. त्यामुळे आमचे नातेसंबंध अधिक दृढ होऊन आपलेपणा वाढणार होता. ते ऐकताच माझ्या चेहऱ्यावर थोडेसे हसू उमटले. एव्हढ्यात मला समजले की, मला जे सादरीकरण करायचे होते ते तूर्तास रद्द झाले होते. गेले बरेच दिवस गाण्याची एक सीडी शोधत होतो, त्याच क्षणी ती सीडी अचानक माझ्या हाताला लागली. या एका पाठोपाठ एक घडणाऱ्या घटनांमुळे माझा उत्साह वाढत होता. आजचा दिवस आपल्यासाठी चांगला उगवला आहे असे वाटू लागले.

मनातल्या मनात या सर्व योगायोगाने घडणाऱ्या घटनांना धन्यवाद देत होतो. मला वाटते कृतज्ञता व्यक्त करावी अशी मनापासून इच्छा होण्याची हीच प्रक्रिया असावी. तुमच्यासंबंधी आणि तुमच्याभोवती तुमच्या मनाविरुद्ध कितीही घटना घडत असोत, जोपर्यंत तुमच्या मनात कृतज्ञतेची भावना जागृत असेल तोपर्यंत याच नको असणाऱ्या घटना तुमच्या मदतीच्या किंवा तुमच्या पसंतीच्या घडायला लागतील. तुमचे भले होऊ लागेल. त्या वेळी माझ्या मनात आले की, आपल्याला सकाळी किती वेळेवर जाग आली त्यासाठी आपण कोणाचेच आभार मानले नाहीत. मी विसरलो की ऑफिसमध्ये वेळेवर पोहोचण्यासाठी माझ्या एका मित्राने लिफ्ट दिली होती. ऑफिसमध्ये मला जे सादरीकरण करायचे होते ते तयार झाले होते. भले ते सादर करण्याचे आज रद्द झाले होते; परंतु आता ते मी नसतानाही सादर होऊ शकणार होते. यासाठी मला कृतज्ञता व्यक्त करणे आवश्यक होते.

दिवसाकाठी अशा अनेक छोट्या छोट्या घटना घडत असतात; त्यासाठी आपण आठवणीने धन्यवाद देणे गरजेचे असते. अशी कृतज्ञतेची भावना तुमच्यासाठी इतरांच्या शुभेच्छा घेऊन येत असते. दिवसभराच्या व्यापात प्रत्येक वेळी अशी कृतज्ञता व्यक्त करणे शक्य होणार नाही याची मला जाणीव आहे. तरी कृतज्ञतेची भावना सतत बाळगणे व मनोमन धन्यवाद देत राहणे हे तर करता येते. त्याची मनाला सवय तर लावून घेता येईल अशी प्रयत्नपूर्वक मनात जाणीव ठेवा. लहानसहान गोष्टींबद्दल सुद्धा धन्यवाद द्या आणि मग पाहा हीच भावना तुमच्यासाठी भरघोस सदिच्छा आणि आशीर्वाद घेऊन येईल.

❋ ❋ ❋

# कृतज्ञ व्हा

आपण किती वेळा किती कारणांसाठी दुसऱ्याचे व परमेश्वराचे आभार मानतो हे तपासून पाहणे खरोखरच संयुक्तिक ठरेल. आपल्या आयुष्यांत ज्या ज्या गोष्टी आपल्याला प्राप्त होतात त्यासाठी देणाऱ्याचे आभार व्यक्त करण्यासाठी मुद्दाम होऊन सवड काढण्यास आपण किती वेळा चुकतो, याचा विचार करणे फारच महत्त्वाचे व आवश्यक ठरते. कधी कधी आपण कृतज्ञ होण्याची कारणे नक्की करणे हे सुद्धा अवघड होत असेल. कित्येक वेळा आपल्या आयुष्यात आपल्याजवळ जे नाही तेच नेमके आपल्याला जरुर असल्यासारखे भासते. जे आपल्याजवळ आहे ते आपल्याला दिसतही नाही तेच नेमके आपल्याला जरुर असल्यासारखे भासते.

इंग्रजीमध्ये एक प्रसिद्ध म्हण आहे, ''मी माझ्या पायात बूट नाहीत म्हणून रडत बसलो होतो. पण हे केव्हापर्यंत? तर ज्या माणसाला पायच नाहीत अशा माणसाची माझी गाठ पडेपर्यंतच.'' परंतु आपल्याजवळ नसलेल्या गोष्टींसाठीच रडत बसल्यामुळे ह्या म्हणीचा योग्य तो परिणाम आपल्या मनावर घडू शकत नाही. ज्या वेळी आपण खाली पाहत असतो त्या वेळी आपल्याला फक्त आपल्या पायाजवळील गोष्टीच आपल्या लक्षात येतात. परंतु ज्या वेळी आपण मान वर करून, डोळे उघडून पाहतो, तेव्हाच आपल्याला या जगात मिळालेल्या सुंदर गोष्टींची जाणीव होते. आपण त्यासाठी कृतज्ञ होऊन जातो. प्रत्येक दिवशी आपल्याला एखादा तरी असा अनुभव येतो की, ज्या योगे आपले जगणे चांगले बनते. अधिक आनंदी होते. जगण्याला जास्त अर्थ प्राप्त होतो. जगणे सुखकर, सोपे आणि समृद्ध होते.

जेव्हा आपण जाणीवपूर्वक अशा अनुभवांना किंवा घटनांना दाद देतो आणि त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करतो, त्याच वेळी इतर अनेक बाबतीत आपण कृतज्ञता व्यक्त करुन ऋण मान्य केले पाहिजे असे लक्षात येते. इतकेच नव्हे तर ते मान्य करणे हे आपणास अधिक सुकर होते. आपण क्षणभराची फुरसद काढून आपल्या आयुष्यात घडणाऱ्या या अनुकूल घटनांचा विचार करुन त्या घटनांची जेव्हा बेरीज करायला लागतो, आणि त्या घटनांना दाद देतो तेव्हा आश्चर्य घडते. पुढे घडणाऱ्या घटनासुद्धा आपल्याला संपूर्ण अनुकूलच घडतात. ज्यासाठी आपण कृतज्ञ व्हायला हवे अशा अनेक घटना आपल्या आयुष्यात रोज घडत असतात. अशी कृतज्ञता दर्शविण्याची सवय व वृत्ती आपल्यामध्ये विशाल आणि जादुमय शक्ती निर्माण करतात. ही सवय आणि वृत्ती आपल्या आयुष्याच्या बगिच्याला उत्तम परिणामकारक व शक्तिशाली खताचे काम करतात.

प्रत्येक माणसाने आपल्या आयुष्यातील फक्त एक तास बाजूला काढावा. त्या एक तासात त्याला त्या वेळेपर्यंत आयुष्यात ज्या ज्या घटनांनी आनंद दिला, ज्या ज्या घटनांनी त्याचे आयुष्य समृद्ध केले व ज्या बद्दल त्याला मनापासून कोणाचे तरी आभार मानावेसे वाटतात, त्या सर्व घटनांची यादी तयार करावी. ती यादी घरात अशा सोयीस्कर जागी ठेवावी की त्यानंतर निदान तीस दिवस ती यादी रोज वाचनात येईल.

यादी वाचल्याबरोबर तुम्हाला मिळालेल्या वरदहस्तासाठी किंवा तुम्हाला प्राप्त झालेल्या आशीर्वादासाठी तुम्ही आपोआप कृतज्ञता व्यक्त करालच. या तीन दिवसांत तुमच्या या वर्तनाचा तुमच्यावर नकळत काय परिणाम घडून येतो व तुमच्या वागण्यात, वृत्तीत काय फरक पडतो ते जरुर पडताळून पाहा. चांगला बदल नक्कीच झाला असेल तो हाच की कृतज्ञता व्यक्त करण्याची वृत्ती तुमच्या मनात जोपासली गेलेली असेल.

❋ ❋ ❋

# जगण्याचा अर्थ

''ज्या आयुष्यावर तुम्ही प्रेम करीत नाही, ते आयुष्य रटाळपणे आणि शांतपणे जगण्याचा प्रयत्न करू नका. अनेक जणांना अशा प्रकारच्या व्याधीने, मानसिक विकाराने पछाडलेले असते.''

किथ अब्राहम या ऑस्ट्रेलियन विद्वानाने असे म्हटले आहे,

लोकांना जेव्हा स्वत:ची परमोच्च आवड कोणत्या विषयात आहे हे उमगले की मग ते जे काही करतात ते सर्व उत्कट प्रेमानेच करतात. इतकेच नाही तर असे लोक जे आनंदी आयुष्य जगतात तसे आयुष्य इतर अनेक लोकांच्या फक्त स्वप्नातच असते. हा केवळ नशिबाचा भाग असतो असे मुळीच नाही. किंवा तुम्ही कोणत्या कुटुंबात, कोणत्या परिस्थितीत जन्म घेतला एवढ्यापुरतेच मर्यादित नसते. तुमच्या स्वत:च्या आयुष्यात तुमच्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाची व तुमची सर्वांत आवडती गोष्ट कोणती त्यासाठी तुम्ही खर्ची घातलेला वेळ महत्त्वाचा असतो. तोच तुम्हाला परमानंद देतो. थोडक्यात, तुमच्या जगण्याला अर्थ काय?

तुमची अत्यंतिक आवड व तुम्हाला आयुष्यात आवडीने करायच्या गोष्टी यावरच तुमचे आयुष्य कसे जाईल ते ठरत असते. तरीही जगताना या जगण्यावर शतदा प्रेम करावे.

❋ ❋ ❋

# वेळेचा सदुपयोग

दररोज आपल्या सर्वांना सारखाच वेळ मिळालेला असतो. देवाने प्रत्येक मनुष्य एक दुसऱ्यापेक्षा वेगळा निर्माण केला आहे. अगदी दोन जुळ्या भावंडांमध्ये सुद्धा काहीतरी फरक करुन ठेवलेला असतो. फक्त एकाच बाबतीत परमेश्वराने सर्व माणसांना समानतेच्या पातळीवर ठेवले आहे. ते म्हणजे दिवसभराचा प्रत्येकाला मिळणारा वेळ. तो मिळालेला वेळ प्रत्येक मनुष्य त्याने ठरविलेल्या किंवा निवड केलेल्या कामासाठी खर्च करीत असतो. सवडीनुसार नंतरच्या वापरासाठी कोणीही वेळेची शिल्लक किंवा बचत करू शकत नाही. तो येतो तसाच तो खर्च करावा लागतो. म्हणूनच मिळणाऱ्या वेळेचा जास्तीतजास्त सदुपयोग करुन घेतला पाहिजे. वेळेच्या उत्तम तऱ्हेच्या वापरावर आपले संपूर्ण लक्ष केंद्रित करणे आवश्यक असते. तसा वापर केल्यामुळे त्यांचा आपल्या कामावर आणि पर्यायाने आपल्या आयुष्यावर चांगला परिणाम होत राहतो. अशाप्रकारे लक्ष केंद्रित करण्याची आपली क्षमताच आपल्याला जास्तीतजास्त परिणामकारक घडवू शकते. मिळालेला वेळ हा आपण निश्चित केलेल्या कामासाठी खर्च केला तर आपल्याहातून किती प्रचंड काम होऊ शकते याची कल्पना करता येत नाही.

आपल्याला मिळालेला वेळ हा अमूल्य असतो. तो वाया घालविला तर कशानेही भरुन काढता येत नाही.

❋ ❋ ❋

# मनाची घडण

जसजसे दिवस सरतात व आपले वय वाढते तसतसे हातात हात घेणे आणि दोन मने जुळणे यातील फरक आपण ओळखण्यास शिकायला हवे. प्रेम करणे म्हणजे दुसऱ्यासमोर झुकणे होत नाही आणि कोणत्याही नोकरीला सुरूवात करणे म्हणजे ती नोकरी कायम टिकेलच याची ग्वाही किंवा सुरक्षित शाश्वती मिळत नाही हे सुद्धा शिकायला हवे.

स्वत:मधील दोष मान्य करण्याची सवय करायला हवी. त्याचवेळी आपण डोळे उघडे ठेवून ताठ मानेने जगणे शिकायला हवे. हे करताना वाढत्या वयाची समज असली पाहिजे, रुबाब असला पाहिजे. त्याचवेळी बालवयातील मरणाचे दु:ख असता कामा नये.

उद्या येणारा काळ फार अनिश्चित असल्याकारणाने आणि भविष्यकाळात अर्ध्यावाटेवरच अपयश येण्याची शक्यता नाकारता येत नसल्याने, आजच आपला मार्ग नक्की करणे क्रमप्राप्त आहे. जसजसे वय वाढते तसतसे सूर्यप्रकाशाने सुद्धा भाजून निघायला होते हे ध्यानात ठेवले पाहिजे.

म्हणूनच दुसऱ्या कोणीतरी येऊन तुमच्या मनाला फुंकर घालून ते उल्हसित करण्याआधी तुमच्या मनाची फुलबाग तुम्हालाच फुलविता यायला हवी. आपली सहनशीलता दिवसेंदिवस वाढविता यायला हवी. आपण मनाने खंबीर असून आपणही मान्यवर योग्यतेचे आहोत हे मनाला बजावले पाहिजे.

अशाप्रमाणेच प्रत्येक क्षणाला आपण काही ना काही शिकत राहिले पाहिजे.

❋ ❋ ❋

## जगाच्या कल्याणासाठी

**या** जगातील सर्वच स्त्री व पुरूष जन्माला येतात, आयुष्य जगतात, वाट्याला येणारी सुखदु:खे उपभोगतात आणि मरण पावतात. जर प्रत्येक मनुष्यप्राण्याच्या जगण्यात कोणता फरक असेलच तर तो म्हणजे प्रत्येकाने पाहिलेल्या जगण्यातील स्वप्नांचा. मग ती स्वप्ने सांसारिक, पारंपरिक, पारमार्थिक किंवा लौकिक यापैकी कोणत्याही जगातील असतील. जन्माला येणे हे आपल्या इच्छेवर अवलंबून नसते. आपण आपले जन्मदाते निवडू शकत नाही. आपण आपल्या जन्म होण्याचा कालखंड, जन्माचे ठिकाण, देश ठरवू शकत नाही. किंवा जन्मानंतरच्या आपल्या पालनपोषणाची परिस्थिती यातही काहीही बदल घडवू शकत नाही. जन्माप्रमाणेच आपल्यापैकी बहुतेक जण स्वत:चा मृत्यू, त्याची वेळ, जागा व त्या वेळची परिस्थिती यापैकी कशाचीही निवड करू शकत नाहीत.

या सर्व विषयातील आपला निवड न करता येण्याचा अधिकारच आपल्या जगण्याची दिशा आपल्याला ठरवून किंवा निवडून देतो. जगात सुरू असलेल्या गोंधळामध्येच आपल्या आयुष्यात आपण आपला शांततेचा आणि सुखासीनतेचा मार्ग शोधित असतो. या जगातील गोंधळात आपण कशारितीने सहभागी व्हायचे, याच्यावर ताबा कसा मिळवायचा याचे भान आपल्याला ठेवणे गरजेचे असते. जगात चालणाऱ्या अनेक घडामोडींमुळे उद्‌भवणाऱ्या युद्धाला आपण थोपवू शकत नाही. तसेच अनेक कारणांनी निर्माण होणाऱ्या संघर्षाला आपण अडवू शकत नाही. परंतु अशा परिस्थितीमधील आपल्या प्रतिसादाला आपण नक्कीच आवर घालू शकतो. आपण दुसऱ्याशी संभाषण करताना वापरण्याचे शब्द, विचार किंवा आपण करण्याची कृती यावर निर्बंध घालू शकतो. आपल्या मुलांना देण्याचे शिक्षण आणि संस्कार हे आपण मनाप्रमाणे देऊ शकतो.

याचाच अर्थ, आपण एक सभ्य मनुष्यप्राणी बनून जीवनाची योग्यता जाणून, महत्त्व ओळखून हे जगणे कशासाठी आणि कोणासाठी जगायचे आहे हे नक्की ठरविता येते. या जगात लहानसा का होईना बदल घडवून आणणाऱ्या संधीचा योग्य उपयोग आपण प्रत्येकाने करून घेतला पाहिजे.

❋ ❋ ❋

## यशापयश

**आ**पण आपले काम जर मनापासून, प्रामाणिकपणे केले असेल तर त्या कामात आलेल्या अपयशामुळे कमीपणा वाटून घेण्याचे कारण नसते. आपण राहत असलेल्या स्पर्धेच्या किंवा चढाओढीच्या जगात यश हे जयपराजयाच्या तराजूने मोजले जाते. प्रत्येक विजयामुळे एका माणसाचा झालेला फायदा हा दुसऱ्या एखाद्या माणसाचा तितकाच प्रखर आणि व्याप्तीने मोठा असा तोटा असतो. वास्तविक एखाद्याने स्वत:शी केलेली स्पर्धा हीच खरे तर फार महत्त्वपूर्ण व दीर्घकाळ परिणामकारक असते. आपल्या कोणत्याही कृतीचा दर्जा हा आपल्यामध्ये असलेल्या क्षमतेच्या अत्युच्च पातळीवर स्वत:च्या भल्यासाठी जर केला तर

आपल्याला केव्हाही पराभव अनुभवायला लागणार नाही. प्रत्येक कृतीबरोबर आपली प्रगतीच होत राहील फक्त आपण वेळोवेळी आपल्या प्रत्येक कृतीचे डोळसपणे आणि त्रयस्थपणे परीक्षण करण्याची सवय लावून घ्यायला हवी. जेव्हा आपल्या एखाद्या कृतीमध्ये कशाची तरी उणीव जाणवली तर आपण स्वत:लाच प्रश्न विचारायला पाहिजे की, ''होणाऱ्या परिणामात बदल घडून येण्यासाठी माझ्याकडून दुसरे काही किंवा अधिक काही करण्याची आवश्यकता होती का?'' या प्रश्नाचे उत्तर जर नकारार्थी असेल आणि आपण केलेल्या प्रामाणिक प्रयत्नांवर जर आपला पूर्ण विश्वास असेल तर झाल्या गेल्या गोष्टींबद्दल खंत करीत बसण्यात काय अर्थ आहे? आणि त्यात निष्कारण वेळ का दवडायचा? आलेल्या त्या अनुभवातून योग्य ते धडे घ्यावेत आणि पुन्हा एकदा नव्या जोमाने कामाला लागावे. तुमची कामे जर तुम्ही सातत्याने, तुमच्या क्षमतेच्या पूर्ण ताकदीने करीत असाल, तर येणाऱ्या बारीकसारीक तात्कालिक अपयशांवर तुम्ही आपोआप मात करीत राहाल.

❋ ❋ ❋

## जबाबदारीचे बंधन

आपल्यापैकी प्रत्येकाच्या आयुष्यात कधीतरी उदासवाणी सकाळ उजाडतेच. त्या दिवशी आपल्याला कामावर जाण्याचा अगदी कंटाळा येऊन जातो. तरी आपण एक जबाबदार नागरीक असल्यामुळे आळस झटकून अंथरूणातून बाहेर पडतो. स्वयंपाकघरात जाऊन तरतरी येण्यासाठी कपभर चहा घशात ओततो. या प्रक्रियेमध्ये आपल्याला हळूहळू ताजेतवाने वाटू लागते. आपण ऑफिसला जाण्यासाठी अंगावर कपडे चढवितो. गाडी काढतो आणि तडक कामाच्या जागेवर पोहोचतो. जेव्हा आपण आपल्या सहकार्यांच्या सान्निध्यात जातो तेव्हा आपण आपल्या कामाचा वाटा आपोआप उचलायला लागतो. दोन तीन तासांनंतर आपला नेहमीचा उत्साह परत येतो. सकाळपासून त्या वेळेपर्यंत आपण केलेल्या हालचालींमुळेच ही उत्साहाची भावना परत आलेली असते.

तुम्हाला खरोखरीच बरे नसते अशा वेळीही तुम्ही कामावर जा असे सांगण्याचा हा मुळीच प्रयत्न नाही. तसे केले असता ते वागणे मुळीच शहाणपणाचे होणार नाही. कधीतरी आपली मन:स्थिती किंचित बिघडलेली असते. अशावेळी आपण कोणतेही क्षुल्लक कारण पुढे करून बरे वाटत नसल्याचा बहाणा करीत असतो. अशा वेळी जर आपण वेळीच योग्य ती काळजी घेतली नाही तर आपण स्वत:च स्वत:ची केविलवाणी अवस्था करून घेतो. यातूनच स्वत:चे फाजिल लाड करून घेण्यास सुरूवात होते.

म्हणूनच आपण अंगावर घेतलेली जबाबदारी आणि त्याची पूर्तता करण्याचा निश्चय हीच कर्तव्यपालनाची आवश्यक मूलभूत तत्त्वे आहेत. ज्या जबाबदार पुरुष अगर स्त्रीने कोणतीही गोष्ट करण्याचे किंवा ठरवून दिलेले काम पूर्ण करण्याचे बंधन स्वत:ला घालून घेतलेले असेल त्याला अगर तिला ही जबाबदारी पार पाडायचा मार्ग सापडतोच. हीच तर कोणत्याही वैयक्तिक कौटुंबिक अगर व्यावसायिक यशस्वी आयुष्याची गुरूकिल्ली आहे.

❋ ❋ ❋

## अडचणींवर मात

आपल्या रोजच्या जगण्यात अडचणी येणे यात काहीच गैर नसते. ज्यांना कधीच अडचणी भासत नाहीत अशी माणसे फक्त स्मशानामधील थडग्यात चिरविश्रांती घेत असतात. जितक्या अधिक अडचणींना तोंड द्यावे लागेल तितके अधिक आपण जागृत राहतो. अडचणी उद्भवल्यानंतर ती परिस्थिती आपण कशी हाताळतो हे महत्त्वाचे आहे. कदाचित अडचण आल्यानंतर ती अडचण काय आहे त्याची कारणे काय व कशी उद्भवली हे सर्व आपल्या शब्दांत लिहून काढणे व त्यावर सर्व बाजूने विचार करणे अतिशय आवश्यक असते. विचार करताना वीण उलगडल्याप्रमाणे एक एक मुद्याचा विचार करून तो बाजूला करीत

जावे. रोजच्या दिनक्रमात तुम्हाला त्या अडचणीतून बाहेर पडण्याच्या कल्पना सुचतील किंवा त्यावर मात करण्याचा मार्ग सापडेल.

अडचणी आल्यावर त्यांच्याविषयी नुसती काळजी करीत बसून मार्ग सापडणार नाही. काळजी करीत असण्यामुळे तुमचे विचारांचे दरवाजे बंद होतील. तुमच्या डोक्यात येणाऱ्या कल्पनांना खीळ बसेल आणि अडचणीतून बाहेर पडण्याचा मार्ग अंधारमय होऊन जाईल. अशावेळी नकळत उद्‌भवणाऱ्या पराजित वृत्तीच्या विचारसरणीला प्रतिबंध केला पाहिजे. अशा नेभळट मानसिक वृत्तीचा आपण गांभीर्याने विचार करायला हवा. येणाऱ्या अडचणी आपल्या आत्मविश्वासालाच तडा देतात. आपली विचार करण्याची शक्ती गुंठीत करून टाकतात. कामात लक्ष केंद्रित करण्यापासून आपल्याला परावृत्त करतात. त्यानंतर समोर ठाकलेल्या आव्हानांकडे आपण पाठ फिरवितो. आपल्या सर्व शक्तीनिशी एकाग्र चित्त करून सकारात्मक दृष्टी ठेवून परिस्थिती हाताळणे जरूरीचे असते. तसे केले तर परिस्थिती खूपच निवळते. आपल्या अडचणीबाबत आपण निश्चयात्मक दृष्टिकोन कसा ठेवतो आणि त्यावर उत्साहाने मार्ग कसा शोधतो यावरच सर्व अवलंबून असते. निश्चय आणि उत्साह यांच्या बळावरच अडचणींवर मात करणे सहज शक्य होते. विधायक दृष्टिकोन असला की अडचणीतून बाहेर पडण्याचा मार्ग सापडतोच.

❋ ❋ ❋

# जागृती - सुप्तगुणांची

**मा**नसशास्त्राचा एक प्राध्यापक आपल्या विद्यार्थ्यांना शिकवित होता. त्याने विद्यार्थ्यांना जगातील काही विद्वान, प्रसिद्ध व्यक्तींची छायाचित्रे दाखविली. त्यामध्ये थॉमस एडिसन, वॉल्ट डिस्ने, रिचर्ड ब्रान्सन, जे लिनो, वुफी गोल्डबर्ग, टेडटयूनर आणि विन्स्टन चर्चिल अशी थोर मंडळी होती.

सर्वांची छायाचित्रे दाखवून त्याने विद्यार्थ्यांना प्रश्न केला, 'या सर्व निरनिराळया विषयातील थोर व्यक्तींमध्ये एक समान पण महत्त्वाची गोष्ट आहे. ती कोणास ठाऊक आहे का?'

विद्यार्थ्यांकडून अनेक अंदाज व्यक्त केले; पण कोणाचेच उत्तर बरोबर नव्हते. प्राध्यापकाने बरोबर उत्तर देणाऱ्यास बक्षिस जाहीर केले. सर्वांत मागच्या बाकावरचा एक विद्यार्थी इतका वेळ उत्तर चुकीचे असेल या भीतिने गप्प होता. बक्षिसाच्या आशेने तो उभा राहिला आणि तो उत्तरला, 'सर, यापैकी सर्वांना वाचन करताना त्रास होत होता. त्यांना वाचन दोष होता.'(Dyslexic)

'बरोबर, पण या सर्वांना त्यांचे ज्ञान मिळवून त्यांच्या प्राप्त झालेल्या योग्यतेस पोहोचण्यासाठी खूप वाचन करणे आवश्यक होते. कल्पना करा. त्यांना असलेला वाचन दोष त्यांच्या उद्दिष्टांपर्यंत जाण्यासाठी किती त्रासदायक ठरला असणार. परंतु मी दाखविलेल्या थोर व्यक्तींपैकी कोणालाच त्यांच्यातील दोष त्यांना अभिप्रेत असलेल्या योग्यतेस पोहोचण्यासाठी बाधा आणू शकला नाही. प्रत्येकाने त्यावर मात करून आपले साध्य उत्तम साधले.' म्हणूनच असे म्हटले जाते की, तुमच्याजवळ असणारे सुप्तगुण किंवा तुम्ही जे व जसे आहात ते तुम्हाला कशापासूनही रोखू शकत नाही. तुम्ही जो स्वत:बद्दल विचार करता किंवा तुम्हाला कशाची तरी कमतरता आहे असे सतत मनात ठेवता तो विचार तुम्हाला ध्येयापासून दूर ठेवतो. तो विचारच तुमचा अडसर होतो. इंग्रजीत या अर्थाचे एक प्रसिद्ध सुभाषित आहे.....'It is not what you are that holds you back. It is what you think what you are not.'

पुष्कळशा व्यक्तींना त्यांचे यश मिळविण्याच्या प्रयत्नात त्रास देत असते ती गोष्ट म्हणजे, ते सतत करत असलेला एक विचार. त्यांना वाटत राहते की आपल्यात असणारी ही कमतरताच आपल्याला यश मिळू देत नाही.

जर ही कमतरता नसती तर आपण खात्रीने यशस्वी झालो असतो. पण खरी गोष्ट अशी असते की, त्यांच्यात मुळी ती उणीव नसतेच. यशप्राप्तीसाठी आवश्यक असणारे सर्व गुण त्यांच्या ठायी असतातच. फक्त सुप्तगुण ओळखून त्यांनी त्याचा वापर करणे आवश्यक असते.

अशा प्रकारची वृथा भीती मनात असणे म्हणजे एकप्रकारे आत्मविश्वास कमी असणे होय. सुरुवातीस दिलेले उदाहरण या विचाराला दुजोरा देणारे आहे.

❋ ❋ ❋

# धिटाई मनाची

मार्क व्टिनने म्हटले आहे की, ''हिंमत किंवा धीटपणा हा भीतिला थोपविण्याचा किंवा भीतिवर मात करण्याचा खात्रीपूर्वक उपाय आहे पण त्यामुळे भीती नाहीशी कधीच होत नाही.''

आपल्यापैकी प्रत्येकालाच वारंवार कशाची ना कशाची तरी भीती असते किंवा काहीतरी घडण्याच्या भीतिने ग्रासलेले असते. ही काहीतरी घडण्याची भीती म्हणजेच ''जर असे घडले तर'' अशा प्रश्नचिन्हातून मनात ठसठसत असणारे चित्र असते. अशा प्रकारचे मनात उमटणारे पराजयाचे अगदी अंधुकसे सुद्धा चित्र, किंवा स्वत:बद्दलच्या अवास्तव कल्पना किंवा इतरांकडून आपण नाकारले जाण्याची भावना हीच एक जीवघेणी भीती असते. अशा तऱ्हेची मनात घट्ट ठाण मांडून बसलेली भीती नाहीशी होण्याची आशा करीत राहिलात तर तुम्हाला आयुष्याच्या अखेरपर्यंत वाट पाहात बसावे लागेल. त्यापेक्षा या मनातील सततच्या भीतिला धैर्याने सामोरे गेलात तर ती भीती आपोआप संपुष्टात जाईल. मनातील भीतिचे सावट दूर होईल.

तुम्हाला एखादी गोष्ट कराविशी वाटते आहे; परंतु त्याच्या अंतिम परिणामाची तुमच्या मनात भीती आहे अशा गोष्टीला या आठवड्यात सुरूवात करा, आणि मग पाहा काय घडते ते.

❋ ❋ ❋

# विश्वासाचे सामर्थ्य

प्रत्येक उगवलेला दिवस ही नव्याची सुरूवात आहे असे समजणे व तसे मान्य करणे हेच सत्याला सामोरे जाणे असते. कधी कधी अशक्य वाटणारे चमत्कार किंवा अलौकिक वाटणाऱ्या घटना घडून जातात. कधी कधी स्वप्न प्रत्यक्षात उतरतात. यावर विश्वास ठेवावाच लागतो. आकाशातील देवदूत आणि सुंदर पऱ्या, संगीताच्या तालावर नृत्य करतात. अवकाशामधील तारांगणातील अद्‌भुतरम्य देखावे पाहण्याचा आनंद आपण घेतो. चंद्रावर केलेल्या स्वारीमुळे माणसाच्या बुद्धिमत्तेला दाद द्यावी लागते. यालाच सत्याला सामोरे जाणे असे म्हणता येईल. पालनकर्त्याचे आभाळाएवढे मोठे मन जाणणे, लहान मुलाच्या डोळ्यांमधला निरागस भाव वाचता येणे, आणि वृद्ध माणसाचा मायाळू हात हातात घेऊन त्याच्या मायेची ऊब अनुभवता येणे ह्यालाच सत्य मान्य करणे असे समजता येईल.

सत्य सापडणे म्हणजेच आत्मबल व मनोधैर्य याची जाणीव होणे. उद्‌ध्वस्त झालेल्या गोष्टी सांधून एकत्र करून नव्याने प्रारंभ करणे हे सत्य आहे. आपला एकटेपणा झुगारून देऊन, इतरही आपल्यासोबत आहेत याची खात्री पटणे हे सत्य आहे. आपल्याला मिळालेले आयुष्य ही आपल्याला मिळालेली सर्वांत उत्तम देणगी आहे आणि ती पूर्ण प्रेमाने आणि आनंदाने उपभोगली पाहिजे. तुमच्यासाठी अकस्मातपणे घडणाऱ्या आनंददायी आश्चर्यकारक घटना घडण्यासाठी योग्य वेळेची त्या घटना प्रतिक्षा करीत असतात.

यावर मनापासून विश्वास ठेवा. त्यामुळे तुमच्या सर्व आशाआकांक्षा व स्वप्न पूर्ण होण्याच्या टप्प्यात येतील. हे घडण्यासाठी मनात सतत विश्वास जागृत ठेवा.

❋ ❋ ❋

# पायाभरणी

**ज**र केव्हा कधी तुम्ही हवेतील इमले बांधले असाल तर त्यांना अजिबात धक्का लावू नका. त्यांना तसेच हवेत तरंगत राहू देत. ते तुमच्या मनातून व हवेतून नाहीसे करू नका. आता फक्त त्या हवेतल्या इमल्यांसाठी पायाभरणी करा इतकेच.

भविष्याचा विचार करुन त्याबद्दल स्वप्न रंगविणे यात काहीच गैर नाही, परंतु एक काळ असा येतो की तुमच्या विचारांचे, स्वप्नांचे कृतीमध्ये रुपांतर करणे आवश्यक असते. अशा हवेतील इमल्यांसाठी पायाभरणी करणे याचाच अर्थ तुमच्या दीर्घ कालाच्या प्रयत्नांना मिळालेली ती बक्षिसी असते. तुम्ही जो त्या स्वप्नांचा पिच्छा पुरविलेला असतो त्या अथक प्रयत्नांचे ते फळ असते.

आजच तुम्ही पूर्वी हवेत बांधलेल्या इमल्यांसाठी पाया रचायला सुरूवात करा.

❋ ❋ ❋

# सूर्य नेहमी तळपत असतो

**सू**र्य नेहमीच स्वप्रकाशाने तळपत असतो. काही कालापुरते आकाशात ढग जमा होतात. त्या ढगांच्या मागे थोडावेळ सूर्य झाकोळला जातो. पण सत्य असे आहे की सूर्य तेव्हाही आणि नेहमीच तळपत असतो. सूर्य तळपण्याचे कधीही बंद होत नाही. पृथ्वीच्या स्वत:भोवतीच्या फिरण्याने क्षितिजावरुन सूर्य मावळलेला भासतो. पण सत्य हेच आहे की सूर्य मावळलेला नसतोच. तो त्याच्या जागी तळपतच असतो.

सूर्याचे सतत तळपत राहणे आपल्याला स्फूर्तिदायक व प्रचंड उत्साह देणारे ठरू शकणार नाही का?

❋ ❋ ❋

# स्वप्ने

**तु**म्ही काही गोष्टी पाहता आणि मग विचारता, 'हे असे का?' पण मी प्रत्यक्षात कधीही न घडलेले किंवा अस्तित्वात नसलेले स्वप्नात पाहतो. आणि मग माझ्या मनात येते, ''अरे असे का घडत नाही?'' जॉर्ज बर्नार्ड शॉ असे म्हणून गेला होता.

तुमच्या मनात आत्ता या क्षणी काय स्वप्ने तरंगत आहेत? तुमच्या रोजच्या धावपळीच्या आयुष्यामधून तुम्ही कधी ३० ते ६० मिनिटे स्वस्थ वेळ काढला आहे का? त्या वेळी स्वत:च्या आयुष्याबद्दल कधी शांतपणे विचार केला आहे का? तुमच्या मनात तरंगत असलेली स्वप्ने एकदा कागदावर उतरवून काढा आणि मग स्वत:लाच विचारा, ''का बरे, असे का घडणार नाही?''

❋ ❋ ❋

# यश - अपयश

मिळालेले यश हे काही चिरंतन – कायमस्वरूपी किंवा टिकाऊ नसते. त्याचप्रमाणे अपयशाने नामोहरम होऊन खचून जाण्याचे कारण नसते. येणारे अपयश पूर्वसूचना देऊन ते टाळण्यासाठी काय करावे हे तुम्हाला समजले तर तुम्ही काय कराल? तुम्हाला ठाऊक आहे का, काही लोक थोड्याश्या यशाने हुरळून जातात आणि आत्मसंतुष्ट होऊन त्या थोड्या यशाला कुरवाळीत आयुष्यभर जगत राहतात.

तुम्हाला एक साधा सरळ सल्ला आहे. तुम्ही अशा लोकांच्या माळेतील एक बनू नका.

❋ ❋ ❋

# स्वत:ची बलस्थाने

अत्यंत यशस्वी मनुष्य आणि इतर लोक यांच्यामधील फरक काय असा विचार केला तर यशस्वी माणसाच्या ठायी असलेली बलस्थाने हे उत्तर अचूक ठरत नाही किंवा त्या यशस्वी माणसापेक्षा इतरांना कमी असलेले ज्ञान असाही फरक करणे बरोबर ठरत नाही. दोघांमधील मुख्य फरक असतो तो म्हणजे यशस्वी माणसाकडे असलेली जबरदस्त इच्छाशक्ती या उलट इतरांकडे असलेला इच्छाशक्तीचा अभाव.

यशप्राप्तीसाठी आपल्यामधील बलस्थाने ओळखून, आपल्यासमोरील आव्हानांना खंबीरपणे सामोरे जाण्यासाठी त्यांचा वापर करणे हे तर फार आवश्यक असते. परंतु त्याच्याही पलीकडे जाऊन आपल्याकडे पुष्कळ काहीतरी शक्ती, गुण मुळातच असतात. ते अधिक काहीतरी काय आहे ते ओळखून त्या लपलेल्या शक्तीला बाहेर काढणे हेच आपले सर्वप्रथम उद्दिष्ट ठरते.

आणि हेच अधिक काहीतरी ओळखून बाहेर काढून त्यावर लक्ष केंद्रित केले की तुमच्या आयुष्यात फार मोठा बदल घडून येतो.

चला स्वत:मध्ये खोल डोकावून पाहा.

❋ ❋ ❋

# प्रश्नात दडलेली उत्तरे

गेली अनेक शतके आपण पाहत आलो आहोत की यशस्वी नेतृत्व करणाऱ्यांना योग्य आणि मार्मिक प्रश्न विचारून समोरच्या माणसाकडून त्यांना हवी ती माहिती बरोबर काढून घेण्याची हातोटी साध्य झालेली असते. त्यांचे प्रश्न अतिशय तीक्ष्ण, वेधक व अचूक असतात. ते प्रश्न दुसऱ्याचे अंतरंग तपासून पाहणारे किंवा विचार करायला प्रवृत्त करणारे असतात. ज्याला प्रश्न विचारलेला असतो तो मनुष्य विचारात गढून जातो. अशाप्रकारच्या प्रश्नांमुळे समोरच्या माणसामधील जे श्रेष्ठ विचार आहेत ते बाहेर काढण्यात प्रश्नकर्ता यशस्वी ठरतो.

प्रत्येकाने स्वत:ला सुद्धा असे भेदक किंवा अचूक प्रश्न विचारायला हवेत. कारण त्यामुळेच आपल्या मनातील विचारांचा आपल्याला शोध लागू शकतो किंवा थांगपत्ता लागू शकतो. उदाहरणार्थ, तुम्ही तुमच्या मनात येणाऱ्या शंकांवर विश्वास ठेवता का? किंवा तुमच्या भरवश्याच्या गोष्टींवर तुम्ही विश्वास ठेवता? त्या गोष्टीबद्दल तुम्हाला कधी शंका येते का?

एका विद्वान तत्त्ववेत्याने विचारलेले प्रश्न तुम्हांला गंभीर विचार करायला भाग पाडतील.

तुम्ही आशावादी आहात की निराशावादी आहात? तुमचा स्वभाव तुसडा, तिरकस किंवा माणूसघाणा आहे की, तुम्ही

उमद्या स्वभावाचे व मोकळ्या मनाचे आहात? एखाद्या माणसाबद्दल जर तुम्हाला नुसतीच शंका आली आणि खात्री पटली नाही तर त्या अनुत्तरित संशयाचा फायदा त्या व्यक्तीला देऊन त्याला तुम्ही झुकते माप देता का?

दुसऱ्या माणसाला तुम्ही केवळ प्रश्न विचारण्यासाठी म्हणून प्रश्न विचारता की काही विचारपूर्वक चौकशीसाठी जिज्ञासापूर्वक प्रश्न विचारता? तुम्ही विचारलेल्या प्रश्नांच्या उत्तरामध्ये तुम्हाला खरोखरच आस्था किंवा कळकळ असते का? तुम्ही भविष्यात घडणाऱ्या गोष्टींचा विचार करून त्याबद्दल तयारी केली आहे का? की भविष्यात जे घडेल ते घडू देण्याची मख्खपणे केवळ वाट पाहत राहता? निष्कारण घेरलेल्या प्रश्नांची तुम्हाला जाणीव आहे का? तुमच्या किंवा तुमच्या कुटुंबांसंबंधी कालच्यापेक्षा आजच्या प्रश्नांची तुम्हाला जाणीव आहे का? तुम्ही कोणत्या नवीन गोष्टी आत्मसात केल्या आहेत? भविष्यात घडणाऱ्या घटनांची तुम्ही केवळ वाट पाहता की भविष्यात जे घडावे असे वाटते ते घडण्यासाठी काही ठोस प्रयत्न करता? तुमच्या पूर्वायुष्यातील घटनांपासून तुम्ही काही धडे घेतले आहेत का? की तुम्ही पुन्हा तशाच चुका करून ठेचा खाणार आहात? दुसऱ्या व्यक्तीलाही काही मत असते, त्याचे काही म्हणणे असते व त्यालाही काही अर्थ असतो यावर तुमचा विश्वास आहे का? की तुम्ही तुमच्याच विचारांना चिकटून बसून तुमचे म्हणणे इतरांवर लादण्याचा प्रयत्न करता? स्वत:चेच म्हणणे बरोबर असे प्रतिपादून समोर येणाऱ्या विरूद्ध पुराव्यांना हेतुपुरस्सर डावलता का? की तुमचे म्हणणे चुकीचे ठरेल याची तुम्हाला धास्ती वाटते?

होय! या सर्व प्रश्नांमध्येच त्यांची उत्तरे दडलेली असतात. या प्रश्नांची उत्तरे तुमची तुम्ही अगदी प्रामाणिकपणे शोधलीत तर तुम्ही तुमचे आयुष्य सुखी, समाधानी, आनंदी व समृद्ध करू शकाल.

❋ ❋ ❋

# यशाचे श्रेय कोणाचे?

**हा**ती घेतलेल्या कोणत्याही कार्यातील लक्षणीय यशप्राप्तीनंतर त्या यशाचे श्रेय कोणाला द्यायचे हा फार मोठा प्रश्न उभा राहतो. एका सिद्ध तत्त्ववेत्त्याने याला समर्पक उत्तर दिले आहे. ते त्याच्याच शब्दांत असे आहे.

''त्या यशाचे श्रेय निश्चितपणे टीकाकाराला किंवा जो मनुष्य नुसते दोष शोधण्याचे काम करतो त्याला जाऊ शकत नाही. टीका करणारा मनुष्य हा केवळ दुसऱ्यांच्या चुकांकडे अंगुलीनिर्देश करणारा माणूस असतो. प्रत्यक्ष काम करणारा माणूस ताकदवान असूनही गोंधळून कसा आपटी घेऊन कोसळला याचे रसभरीत वर्णन टीकाकार करून सांगतो. किंवा केलेल्या कामापेक्षा वेगळे काम करायला हवे होते एवढेच फक्त टीकाकार सांगतो. खरे श्रेय जर कोणाला द्यायचे असेल तर प्रत्यक्ष त्या कार्यात बुडवून घेणाऱ्या माणसाला द्यायला हवे.''

याचाच अर्थ, प्रत्यक्ष रणभूमीवर लढणाऱ्या योद्ध्याला त्या विजयाचे श्रेय द्यायला हवे. ज्या माणसाचे हात चिखलात बरबटलेले असतील, ज्याच्या अंगातून घामाच्या धारा लागल्या असतील, आणि ज्याच्या सर्वांगातून रक्ताचे पाट वाहात असतील तोच खऱ्या अर्थाने यशाचा धनी समजला पाहिजे. यशप्राप्तीनंतर अशाच माणसाचा उत्साह काठोकाठ भरून वाहात असेल. प्रचंड निष्ठेने तो स्वत:ला त्या कार्यात हरवून बसला असेल त्याने प्रयत्नांची पराकाष्ठा केलेली असेल. झालेल्या किरकोळ चुका दुरूस्त करून त्याने मार्गक्रमणा केली असेल आणि याचमुळे अखेरीस मिळणाऱ्या विजयोत्सवाचा उन्मादही तोच जाणू शकेल. अनुभवू शकेल.

अशाप्रकारे यशासाठी लढताना किंवा धडपड करताना जरी अपयश आलेच तरी ते अपयश त्याने केलेल्या धाडसी प्रयत्नांच्या ओघात आले असल्यामुळे त्याला त्याची खंत वाटणार नाही. त्यामुळेच असा मनुष्य इतर आळशी, घाबरट, कामचुकार माणसांच्या पंक्तीला केव्हाही जाऊन बसणार नाही. इतर वर्गात मोडणाऱ्या त्या लोकांना ना विजयाची ना पराभवाची पुसटशी सुद्धा कल्पना येणार नाही.

❋ ❋ ❋

# कर भला तो हो भला

आपल्या सानिध्यातील इतर लोकांना त्यांच्या प्रगतीसाठी मदत करणे हाच तुमच्या स्वत:च्या प्रगतीचा खात्रीचा मार्ग असतो. तुम्ही ज्यावेळी दुसऱ्यासाठी काही करता, मग ती गोष्ट त्याच्या फायद्याची असो अगर तोट्याची असो, तो मनुष्य जशास तसे या न्यायाने त्याची परतफेड करायला उत्सुक असतो. जर तुम्ही दयाळू व सभ्य गृहस्थ असाल तर त्या परतफेडीद्वारे तुम्ही चांगल्या प्रतिक्रियेची अपेक्षा करू शकता. मात्र या उलट तुमच्या स्वत:च्या फायद्यासाठी इतरांचा वापर करून घेत असाल आणि त्याचा त्या इतरांना यत्किंचितही फायदा होणार नसेल तर तुम्हाला त्यांच्याकडून कदापिही कसलीही मदत मिळणार नाही. साधारण सकारात्मक, निश्चयपूर्वक आणि समजूतदार विचारी माणसांबरोबर आणि अशाच माणसांसाठी काम करण्यास सर्वसाधारण माणसे उत्सुक असतात. जेव्हा तुम्ही मुद्दाम, प्रयत्नपूर्वक किंवा वाकडी वाट करून इतरांना त्यांच्या प्रगतीसाठी मदत करता तेव्हा तुम्हाला तशीच मदत मिळणे हे अपरिहार्यच असते. ज्यांना मदत करायची त्यांची प्रगती तुमच्यापेक्षा द्रुत गतीने होत असलेली दिसत असूनही किंवा तुमच्यापेक्षा त्यांना जलद मान्यता मिळते आहे हे समजूनही जर प्रामाणिकपणे तुम्ही त्या दुसऱ्यांचे भले चिंतीत असाल तर त्यांच्याकडून तुम्हाला मिळणारा प्रतिसाद जरूर तसाच असेल. कदाचित त्या क्षणी तुम्हाला त्यांचा हेवा सुद्धा वाटेल. दुसऱ्याचे भले करण्याने तुमचेही इतर भलेच करतील. तुम्हाला चरितार्थासाठी काम मिळवून देण्यासाठी इतर कित्येकांचे हातभार लागले असतील. त्याची तुम्हाला कल्पनाही येणार नाही; परंतु इतर कोणाला तशीच जरूरी असताना तुम्ही त्यांना हमखास मनापासून मदत केलेली असणार.

❋ ❋ ❋

# वेळेचे महत्त्व

आपल्याला असे आढळून येते की, पुरेसा वेळ नसल्याबद्दल आपण नेहमीच तक्रार करीत असतो. आपण आपले ठरविलेले काम पूर्वनियोजित वेळेत पूर्ण करण्याचा जेव्हा प्रयत्न करतो तेव्हा वेळ पुरला नसल्याची विशेष तक्रार करतो. तसेच फारच वेळ विनाकारण दवडला जात आहे असेही कधी कधी आपल्याला वाटते. विशेषत: नियोजित वेळेवर विमान येण्यास विलंब झाला आणि वाट पाहात असलो की असे आपल्याला जास्तच वाटते. आपल्याला हव्या असणाऱ्या गोष्टी जेव्हा आपण तातडीने करु पाहतो, त्या वेळी दिवसभराचा वेळ कमी असल्याचे आपल्याला फार दु:ख होते.

ईश्वराकडून आपल्याला वेळेची देणगी मिळाली आहे. दिवसभरात आपल्यापैकी प्रत्येकाला ८६,४०० सेकंद मिळतात. ते सर्व त्याच दिवसभरात प्रत्येकाला वापरावे लागतात. अन्यथा ते कायमचे वाया जातात. आपल्याला सतत वेळेच्या महतीच्या उपदेशाचा भडिमार केला जातो. वेळेचा योग्य उपयोग करण्याच्या योजनेचे तंत्र शिकण्यासाठी तुम्ही अनेक चर्चासत्रे व प्रशिक्षणवर्गांना हजर राहता. वेळेची बचत करण्याच्या कौशल्यावरचे अनेक ग्रंथांचे तुम्ही पारायण करता. तरीही तुमच्याजवळ पुरेसा वेळ नसल्याचे तुम्हाला जाणवत राहते.

आपण वेळेला खरोखरच महत्त्व देतो का? तुमच्यासभोवती तुम्ही नजर टाकलीत तर तुम्हाला अनेक सूचना व स्मरणपत्रेच आढळून येतील. तुमच्या घरात, टेबलावर, भिंतीवर किती घड्याळे सतत टिकटिक करीत असतात. तुमचे वेळेचे गणित चुकले तर तुम्ही अस्वस्थ होता की हवालदिल होता? तुमचा वेळ खरोखरच किती महत्त्वाचा असतो? तुमच्या वेळेला तुम्ही किती किंमत देता? तुमच्या आयुष्यात घडणाऱ्या घटनांप्रमाणे तुम्ही तुमच्या वेळेची किंमत करता का? त्याप्रमाणे वेळेचे महत्त्व तुमच्यासाठी बदलते का?

या प्रश्नावर मनापासून पण वेळेवर विचार करा.

❋ ❋ ❋

# वेळेचे गणित

तुम्हाला पुरेसा वेळ मिळत नाही असे अजिबात म्हणू नका. ते चूक आहे. जितके एकूण तास प्रत्येक दिवशी हेलन केलर, मदर टेरेसा, थॉमस जेफरसन, जमशेटजी टाटा, पंडित जवाहरलाल नेहरू अशा जागतिक किर्तीच्या लोकांना मिळाले होते तितकेच तास, तासांची मिनिटे आणि मिनिटांचे सेकंद तुम्हालाही मिळाले आहेत.

वेळ ही अशी एक गोष्ट आहे की, जी सर्व माणसांना एकाच पातळीवर आणून बसविते. मग विचार करा तुमचा वेळ कशामध्ये वाया जातो? तुमच्या आयुष्यात सर्वांत अग्रगण्य असलेल्या गोष्टी कोणत्या?

आपल्या वेळेचे योग्य वापरासाठी नियोजन करणे हे तर महत्त्वाचे आहेच; परंतु त्याहूनही त्या वेळेमध्ये आयुष्यातील घटना, कार्ये व उद्दिष्टांचा अग्रक्रम ठरविणे हे अधिक महत्त्वाचे आहे. असे केल्यानेच या एका आयुष्यात मिळालेल्या वेळेचा तुम्ही जास्तीतजास्त उपयोग करू शकाल.

❋ ❋ ❋

# सांघिक सामर्थ्य

सांघिक कार्य याचाच अर्थ त्या संघातील सर्व सभासदांनी एकत्र येऊन सामाईक यशासाठी केलेले सांघिक प्रयत्न असाच होतो. या व्याख्येप्रमाणे ''सांघिक प्रयत्न'' हे फार महत्त्वाचे असतात. संघातील सर्व सभासदांच्या साहाय्याखेरीज कोणताही संघ त्यांचे यश टिकवू शकणार नाही.

फुटबॉल या खेळातील कोणताही एकच खेळाडू हा प्रत्येक सामन्यात चमकदार खेळ करू शकणार नाही, हे संपूर्ण संघाला ठाऊक असते. सर्वांनी मिळून केलेल्या चमकदार खेळामुळेच अनेक चमकदार सोनेरी क्षणांची मालिका तयार होते. असे सर्व क्षण, संघातील सर्व सभासदांनी जबाबदारीने, निश्चयपूर्वक, एकमेकांच्या खांद्याला खांदा लावून आणि नेटाचा प्रयत्न करून खेळलेले असतात. विजयी संघाला हे सुद्धा ठाऊक असते की, त्या दिवशीचा विजय हा संघातील एका खेळाडूच्या चमकदार खेळामुळेच प्राप्त झालेला विजय आहे. एकाच संघातील खेळाडू त्या संघाच्या विरूद्ध संघाऐवजी आपल्याच संघातील खेळाडूंबरोबर स्पर्धा करू लागले तर ती संघाच्या पराभवाचीच सिद्धता ठरू शकते. जेव्हा संघातील प्रत्येक खेळाडू आपल्या संघासाठी स्वत:चा खेळ उंचावतो किंवा प्राण पणाला लावून खेळतो तेव्हा तो संघ सहजपणे विजयी होतो. त्या खेळामध्ये प्रत्येक खेळाडू चेंडू मारीत असतो, अडवीत असतो, दुसऱ्याकडे पास करीत असतो अगर गोलरक्षक तो जिद्दीने अडवित असतो. त्या त्या क्षणाला त्या त्या खेळाडूचा खेळ उत्तम व्हावा लागतो.

अशावेळी तो संघ तर विजयी होतोच शिवाय संघाबरोबर त्या संघातील प्रत्येक खेळाडू हासुद्धा विजय प्राप्त करतो.

❋ ❋ ❋

# आत्मपरीक्षण

स्वत:ची किंमत किंवा स्वत:चे महत्त्व ओळखण्याची क्षमता आणि स्वत:च्या कुवतीमधील प्रामाणिकपणा इतरांशी जोडल्या जाणाऱ्या नातेसंबंधांसाठी अत्यंत महत्त्वाचे असते. आयुष्यात मिळणाऱ्या यशाच्या एकूण दर्जावर याचा प्रचंड परिणाम होत असतो. आपल्या ठायी मुळात असलेली शक्ती किंवा सामर्थ्य आणि तितकाच मुळात असलेला अभाव, कमीपणा जाणून घेतल्याखेरीज आपली प्रगती घडून येणे शक्य होणार नाही. आपण एखादी गोष्ट मिळविण्याची किंवा एखाद्या उंचीवर पोहोचण्यासाठी

योजना आखण्यापूर्वी आपण स्वत: कोठे आहोत हे मनात पक्के करणे आवश्यक असते.

तुम्ही स्वत: नि:पक्षपाती निरीक्षकाच्या भूमिकेतून स्वत:ला काय सल्ला द्याल त्याचा विचार करा. असा सल्ला दिल्यामुळे तुमच्यामधील कौशल्य कसे वृद्धिंगत होईल, तुमच्या कामात प्रगती कशी घडून येईल, तुमचे इतरांबरोबरचे नातेसंबंध कसे सुधारतील किंवा तुमच्या संघटनेच्या उत्कर्षामध्ये तुमचा किती हातभार लागेल याचा नीट विचार करून अंदाज घ्या. ते फार गरजेचे ठरते.

स्वत:बद्दल स्वत:शी प्रामाणिक असणे हेच स्वत:च्या प्रगती करण्यासाठीचे पहिले पाऊल असते.

❋ ❋ ❋

## विश्वास हाच यशाचा मार्ग

विश्वास हाच प्रगतीचा मूलभूत पाया असतो. आपण ज्यावर विश्वास ठेवतो, जे जे सत्य मानतो. त्याच्याच अनुरोधाने आपण आपली कृती करीत असतो. ज्याच्यावर आपला पूर्ण विश्वास असतो त्याच्याच सांगण्यानुसार आपली वाटचाल सुरू असते. जितक्या विविध प्रकारच्या व्यक्तींबरोबर आपण काम करायला सुरूवात करतो तितकी जास्त आव्हाने आपल्या प्रगतीआड उभी ठाकतात. असे चौफेर काम करीत असताना एखाद्या माणसावर ठेवलेला विश्वास चुकीचा ठरतो. त्याच्याबरोबर काम करणे योग्य नव्हते असे एखाद्या बाबतीत तुम्हाला केव्हातरी जाणवते. एखाद्या अगदी जवळच्या व्यक्तीकडून तुम्हाला विश्वासघाताचा धक्का बसतो. त्यानंतर पुन्हा दुसऱ्याकडूनही असेच घडेल असा विचार करून तुम्ही काळजी करीत असाल, तर अशा परिस्थितीत आपण स्वत:ला लगाम घालून स्वत:ची प्रगती थांबवून टाकतो. यावेळी नव्या जोमाने, नव्या उमेदीने पुन्हा एकदा प्रारंभ करून नवीन विश्वासाची माणसे सोबतीला घेणे फार आवश्यक असते. कारण आपल्या सान्निध्यात येणारी प्रत्येक व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीपेक्षा वेगळी असते. एका व्यक्तीने तुमच्या विश्वासाला तडा दिला याचा अर्थ तुम्हाला भेटणाऱ्या सर्वच व्यक्ती तशा असतील असे मानणे चुकीचे असते.

प्रगतीचा नवा मार्ग स्विकारणे हे जुने दु:ख विसरून किंवा जुन्या जखमा भरून येऊन यशाचा मार्ग आक्रमिणे असते.

❋ ❋ ❋

## हवेत बांधलेले इमले

रात्रभर झोपेत स्वप्नरंजन करा. सकाळी उजाडले की त्या स्वप्नांना प्रत्यक्षात आणण्यासाठी कृतीची, कर्माची आखणी करा. हे ब्रीदवाक्य अनेक उत्तरे खरडण्यापेक्षा कितीतरी गंभीर व अर्थपूर्ण आहे. स्वप्नरंजनाबरहुकूम कृतीची आखणी करताना हवेतील इमले जरूर उभे राहू देत. स्वत:ला चावून खाता येईल त्यापेक्षा मोठा घास तोंडात घ्या आणि मग प्रयत्नपूर्वक चावून तो घास आपल्या पोटात रिचवा. तुमच्या आवाक्याबाहेरील कृतींची योजना करा आणि मग प्रत्यक्ष कृती करायला सुरूवात करा. तुमच्या हातातील धनुष्यबाणाने आकाशातील एखाद्या ताऱ्याचा वेध घेण्यासाठी नेम धरा अन् मग पाहा, तुमचा बाण त्या ताऱ्याच्या किती जवळपास पोहोचतो. तुम्ही प्रत्यक्ष देऊ शकणाऱ्या वेळेपेक्षा अधिक वेळेची आवश्यकता असणाऱ्या एखाद्या कृतीची योजना मनात करा आणि मग आवश्यक असणारा वेळ रोजच्या दिनक्रमातून त्यासाठी देण्याचा मनापासून प्रयत्न करा. तुमच्या क्षमतेपेक्षा जरा जास्तच कार्याची आखणी किंवा योजना करा आणि मग त्या योजलेल्या कार्याची सुरुवात करा. हवेत बांधलेल्या इमल्यापर्यंत पोहोचण्यासाठी सुसज्ज रथ उभा करा अन् मग पाहा, त्या सर्व सज्ज रथाची घोडदौड वाऱ्यालाही मागे टाकू शकेल.

थोडक्यात म्हणजे स्वप्नरंजन करून हवेत इमले बांधणे यात बिलकूल चूक नाही. त्याला मूर्तस्वरूप देण्यासाठी खरी आवश्यकता आहे ती तुमच्या विचारांची, दृष्टीची, संयोजनाची आणि कृतीची. त्याच्या जोरावर तुम्ही भक्कम पायाभरणी करून हवेतील इमला जमिनीवर नक्की उभा करू शकाल.

❋ ❋ ❋

# गिर्यारोहण

प्रत्येक माणसाच्या मनात आशाआकांक्षा आणि ध्येयाचे हिमालयाइतके उंचच उंच घर करून बसलेले असते. त्या पर्वतमाथ्यावर जाण्यासाठी प्रत्येकाला दिवसच्या दिवस थोडे थोडे परंतु सातत्याने प्रयत्न करावे लागतात. एक दिवस सर एडमंड हिलरी हिमालयाच्या शिखरावर पोहोचला. परंतु असे घडले नाही की, त्याला हिमालय सर करायची इच्छा झाली आणि एक दिवस तो हिमालयाच्या पायथ्याशी जाऊन उभा राहिला. त्याने एक छलांग मारली व क्षणार्धात त्याने शिखरावर पाऊल ठेवले. त्याला हिमालयावर चढून जाण्यासाठी अनेक गोष्टी शिकाव्या लागल्या. योग्य ती लागणारी तयारी, कौशल्ये, कसब, प्रावीण्य आत्मसात करावे लागले. हे सर्व त्याने एका दिवसात साध्य केले नाही तर त्यासाठी त्याला बराच काळ द्यावा लागला.

याप्रमाणेच तुम्ही व मी आपल्या मनातील हिमालयावर चढून जाण्यासाठी अनेक दिवस मेहनत करुन आपल्या स्नायूंना बळकटी आणणे जरूरीचे असते. आपल्या शरीराला व मनाला हे बळ, हे वळण, ही शिस्त आपल्या कुटुंबियांकडून व आपल्या मित्रमंडळींकडूनच मिळविता येते.

गिर्यारोहण करताना सांघिक भावनेच्या रूपाने एकमेकांना तुम्ही भक्कम दोरीने बांधून घेता. तुमच्यापैकी एखाद्याचा पाय घसरला तर त्याला पडू न देता सावरून वर घेता. त्याला वाचविता. उलट एखादा कोणी घसरला तर ‘‘त्याला त्याच्या कर्माचे फळ मिळाले’’ असे कधीही म्हणत नाही. त्याही परिस्थितीत त्याला संकटातून बाहेर खेचून काढता. तसेच एखादे वेळी तुम्ही घसरलात तर संघातील इतर सहकारी तुम्हाला मदतीचा हात देतात.

हीच तर प्रेमाची देवाणघेवाण असते. प्रेमाची साखळी असते. प्रेमाचे बंधन असते. म्हणूनच संघभावनेने एकत्रित एकमेकांच्या आधाराने आणि एकमेकांच्या साहाय्याने राहाणे यापरते वेगळे, सुरक्षित व समृद्ध जगणे नसते.

❋ ❋ ❋